


# पहिले बाजीराव पेशवे

लेखक

प्रो. नारायण केशव बेहेरे,
एम.ए., बी.एससी.

पुष्प
१२ वें.

भारत-गौरव-ग्रंथमाला-पुष्प ९२ वें.

# पहिले
# बाजीराव पेशवे




न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

—भगवान् श्रीकृष्ण.

लेखक—

**प्रो. नारायण केशव बेहेरे,**

एम. ए., बी. एससी.

मे १९३०. वैशाख शके १८५२

साधी बांधणी २-०-० ] किंमत [ कापडी रु. २-४-०

# अनुक्रमा.

# हिंदुस्थान

पेशावर
लाहोर
मुलतान
सतलज नदी
दिल्ली
यमुना नदी
गंगा नदी
मथुरा
आग्रा
सिंधु नदी
कराची
प्रयाग
काशी
पाटना
गंगा नदी
सागर
भोपाळ
जबलपूर
अहमदाबाद
इंदूर
नर्मदा
बुऱ्हाणपूर
सुरत
नागपूर
वर्धा
औरंगाबाद
चांदा
वसई
मुंबई
अहमदनगर
कुलाबा
जंजिरा
सातारा
अक्कलकोट
हैदराबाद
कोल्हापूर
कृष्णा नदी
गोवा
अरबी समुद्र
बंगालचा उपसागर
वेलोर
जिंजी
अर्काट


शाहूचा मुलूख (१७१३)


बाजीरावानें जिंकलेला मुलूख (१७४० पर्यंत)


मराठ्यांच्या दबावाखालीं आलेला मुलूख

हिंदी महासागर

# दोन शब्द.



थोरल्या बाजीरावपेशव्यांची पुण्यतिथी समारंभानें साजरी करण्याचा उपक्रम इंदुरांतून झाला, ही गोष्ट पेशवे व होळकर या घराण्यांचा जो पूर्वापार प्रेमाचा व घरोब्याचा संबंध आहे त्याला अनुसरूनच आहे. नर्मदानदीच्या कांठीं रावेर-खेडी येथें हा उत्सव प्रतिवर्षी साजरा करण्यांत येतो. या उत्सवामुळेंच बाजी-रावचें विस्तृत चरित्र लिहावयाची कल्पना माझ्या मनांत उद्भवली. श्री. बापट यांनीं लिहिलेलें बाजीराव पेशव्यांचें चरित्र आज उपलब्ध असलें, तरी त्याला ऐतिहा-सिक किंमत आज नाहीं. तें दंतकथात्मक व कादंबरीवजा आहे. त्याबद्दल बापटांना नांवें ठेवण्यांत मात्र अर्थ नाहीं. कारण त्यांनीं १८७९ सालीं हें चरित्र लिहिलें, तेव्हां **राजवाडे, पारसनीस, खरे व सरदेसाई** हे उदयास यावयाचे होते, आणि मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें उजेडांत यावयाचीं होतीं. तेव्हां बापटांनीं केली तीच कामगिरी मोठी असें म्हटलें पाहिजे. उलट पक्षीं मीं वर निर्दिष्ट केलेल्या भक्कम चौखांबी मंडपावर उभा असल्यामुळें, माझ्या लिखाणचें श्रेय माझ्यापेक्षां त्या थोरांनाच अधिक आहे.

माझ्या शाळेंतील शिक्षक श्री. महादेवराव तुरिले व नार्मल स्कूलमधील शिक्षक श्री. रामराव मोहिते, यांनीं लेखनाची हौसेनें मदत केल्यामुळें माझें कार्य सुकर झालें. श्री. हरिभाऊ नेने यांनीं प्रुफें तपासण्याचें जिकिरीचें काम पत्करून माझ्या-वरचा भार हलका केला. माझ्या शाळेंतील विद्यार्थी दातार व साठे यानीं नकाशे तयार करून दिले, व माझे मित्र श्री. माडखोलकर यांनीं संदर्भ ग्रंथ पुरविले व ते मजजवळ बरेच दिवस राहूं दिले. तेव्हां या सर्व संबंधी मंडळींचे मी मनःपूर्वक आभार मानतों.

कर्नाटक प्रेसचे व भारत गौरव ग्रंथमालेचे मालक श्री. मंगेशराव कुळकर्णी यांच्या प्रेमामुळें ग्रंथाचें प्रकाशन इतकें चांगलें व इतक्या लवकर झालें. माझ्यासारख्या बहुव्यवसायी माणसाच्या हातून त्यांशिवाय कार्य झालें नसतें. तेव्हां त्यांचा व त्यांच्या कार्यालयांतील मंडळींचा मी आभारी आहें, हें सांगणें नकोच.

सरते शेवटीं, ज्या रसिक महाराष्ट्र वाचकांनीं माझ्यावर आजपर्यंत प्रेम केलें, व परोपरीनें उत्तेजन देऊन मला वाङ्मयकार्य अखंड चालविण्यास प्रोत्साहन दिलें, माझ्या किंचिन्मात्र गुणांचा गौरव केला व दोषांकडे दुर्लक्ष केलें, त्यांच्या ऋणांतच मी राहूं इच्छितों. त्यांच्या कृपेची पांखर अशीच पुढेंही असावी, म्हणजे आमरणांत मराठीवाङ्मयाची व भाषेची सेवा करण्याचा माझा कृतसंकल्प तडीस जाईल.

धनतोली, नागपूर.
ता. ३१ डिसेंबर १९२९



सर्वांचा नम्र.
**नारायण केशव बेहेरे.**

# आधार व आभ




History of the Deccan by G. Bhandarkar.

History of the Maratha People by Kincaid and Parasnis.

Hindu-Pad-Padshahi by V. D. Sarvarkar.

ऐतिहासिक पोवाडे—य. न. केळकर, व शालिग्राम आणि एकवर्थ.

बाळाजी विश्वनाथ चरित्र—गोगटे.

बाजीराव बल्लाळ चरित्र—बापट.

ऐतिहासिक गोष्टी—लोकहितवादी.

पेशव्यांची बखर—कृ. वि. सोहनी.

थोरले शाहू महाराज यांचें चरित्र—चिटणीस.

इतिहास-विहार—न. चिं. केळकर.

हरिवंशाची बखर—खरे शास्त्री.

इतिहास मंजरी—द. वि. आपटे.

इतिहास संग्रह—पारसनीस.

मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें—राजवाडे.

पेशव्यांच्या दप्तरांतील निवाडे, सनदापत्रें, कैफियती, पत्रव्यवहार, डायऱ्या वगैरे. } वाड, पारसनीस पु. वि. भावजी.

ब्रम्हेंद्रस्वामी धावडशीकर चरित्र—पारसनीस.

शिवाजी महाराजांचें चरित्र—केळूसकर.

पुरंदरे दप्तर—भा. इ. सं. मंडळ.

पुणें शहर—पारसनीस.

मराठी रियासत.<br>मुसलमानी रियासत. } —सरदेसाई.


या सर्व थोर ग्रंथकारांच्या ग्रंथांचा व इतरांचाहि मीं यथेच्छ उपयोग करून घेतला आहे. तेव्हां त्या सर्वांचे विशेषतः श्री. सरदेसाई यांचे मी अत्यंत नम्रपणें आभार मानतों. श्री. राजवाडे, पारसनीस, खरे व सरदेसाई यांनीं महाराष्ट्राच्या इतिहासाची आयुष्यभर सेवा करून, मराठेशाहीवर प्रकाश पाडला आहे. तेव्हां मराठ्यांच्या इतिहासाचा अभ्यास करणाऱ्या प्रत्येक इसमाला या वाटाड्यांना सादर वंदन केल्याशिवाय पुढें जातां येत नाहीं. कारण त्यांचे ग्रंथ गतकालाच्या दालनांतील दीप होत.

ना. के. बेहेरे.



श्रीमंत पहिले बाजीराव पेशवे.

पहिले

# बाजीराव पेशवे



## प्रकरण १ लें.

## उपोद्घात.

महाराष्ट्र हा खडकाळ व रुक्ष देश असेल, उत्तर हिंदुस्थानांतील गंगा-यमुना यांच्यामधील दुआबासारखी तेथील जमीन पिकत नसेल न त्यामुळें महाराष्ट्रांतील श्रीमंती उत्तरेप्रमाणें उतास जाऊन ताजमहाल किंवा जुम्मामशीदीच्या रूपानें लोकांना दिसतही नसेल; परंतु महाराष्ट्रासारखें स्वाभाविक सृष्टिसौंदर्य इतरत्र क्वचितच दृष्टीस पडेल. काश्मीरांत गुलाबाचे गालिचे पसरले असतील व हिमालयाचीं सुंदर बर्फाच्छादित शुभ्र शिखरें तेथून दिसत असतील, परंतु महाराष्ट्रासारखें वैचित्र्य त्यांत आढळणार नाहीं. वऱ्हाडच्या सपाट व सुपीक मैदानाप्रमाणें कोंकणांतील खांचाखळग्यांचा निर्धन प्रदेशदेखील महाराष्ट्रांतच मोडतो.

**'गोदा, कृष्णा, भीमा यांनीं पूनित केलेला**  
**सह्याद्रीच्या सहस्र शिखरीं उन्नत झालेला ॥**  
**पश्चिम सिंधू बंधु पाठिशीं, पूर्व असे जामात**  
**विंध्याद्रीची उंची लक्षी सातपुडा प्रांत ॥'**

असा दोन्ही पूर्वपश्चिम समुद्राशीं नातें जोडणारा देश खरोखरीच धन्य होय. दिसण्यांत जसा हा बहुरूपी, तसा उत्पन्नाच्या बाबतींतही बहुरंगी आहे.

'वरी, नागली, भात पिकवितो कोकणचा प्रांत
गहू, जोंधळा, कापूस, वरती देशावर होत ॥'

त्यामुळें ह्या देश गरीब असला तरी अन्नवस्त्रासाठीं त्याला दुसऱ्याच्या तोंडाकडे पहावें लागत नाहीं. पर्वताच्या उतरणीवर मुबलक गवत मिळत असल्यामुळें ह्या देशांत घोडे, गाई, म्हशी, शेळ्या, मेंढ्या वगैरे कामसू जनावरांची पैदासही चांगली आहे. हत्तीसारखे दिखाऊ प्राणी या देशांत नाहींत. येथील घोडे देखील कटक व चपळ असले, तरी त्यांना त्यांच्या ठेंगण्या आकारामुळें बहुधा 'बटे' असेंच संबोधण्यांत येतें. जनावरांची गोष्ट सोडून दिली व माणसांच्या जगांत पाहिलें तरी तोच साधेपणा सर्वत्र दृष्टीस पडतो. महाराष्ट्रीय लोक रजपुतांप्रमाणें हाडापेरानें भव्य व उंचेपुरे नसतात, किंवा संयुक्त प्रांतीय लोकांप्रमाणें त्यांना नबाबी छानछौकीनें राहतां येत नाहीं.

'कांबळ खांदीं, वहाण पायीं, डोइस मुंडासें
श्यामल रंगी, सानरूप तें साधेंपण भासे ॥'

महाराष्ट्रीयांची भाषादेखील त्यांच्याप्रमाणें सडेतोड व रोकठोक आहे. तिच्यांत अर्थसौष्टव असलें तरी बंगालीची मृदुता किंवा गुजराथीची मंजुळता सांपडावयाची नाहीं. संस्कृतपासून जरी सर्व भाषा निघाल्या असल्या, तरी त्यांनीं जसा देश तसा वेष घेतला आहे. ब्राह्मण ज्ञानेश्वरापासून तों चोखामेळा ह्या महार 'संता'पावेतों महाराष्ट्रांतील अनेक जातींच्या संतांनीं ह्या मराठी भाषेला संपन्न केली आहे. त्यामुळें ही भाषा केवळ पंडिती बाण्याची न राहतां राष्ट्राची स्वामिनी झाली. बैतुलचा मुकुंदराज, पैठणचा एकनाथ व देहूचा तुकाराम यांच्या भाषेहून आजची मराठी भाषा फारशी निराळी नाहीं. त्या तिघां महाकवींत काल व स्थलदृष्ट्या इतकें अंतर असतांना देखील त्यांच्या भाषांत फारसा फरक पडला नाहीं. महाराष्ट्रांत कुठेंहि राहणारा माणूस असला तरी त्याला ह्या तिन्ही आचार्यांचे ग्रंथ वाचून समजतात. म्हणजे सहाशें मैल अंतर असलेल्या दोन प्राचीन लेखकांत प्रांतिक भाषाभेद फारसे उत्पन्न झाले नाहींत. तसें झालें असतें तर एका टापूंत लिहिले गेलेले ग्रंथ दुसऱ्या टापूंत राहणाऱ्या लोकांना विशेष अभ्यासाशिवाय कळले नसते. मराठी भाषेच्या या व्यापक व संग्राहक राष्ट्रीय स्वरूपामुळें मराठ्यांची एकी फार लवकर होऊं शकली. प्रांतिक बोली बारा कोसावर बदलते; परंतु या बोलींत पडणाऱ्या फरकामुळें महाराष्ट्राची राष्ट्रीय भाषा बदलली नाहीं. किंबहुना पैठणची

विदर्भी भाषा हीच राष्ट्रीय भाषा सदैव समजली जात असे, व आजची प्रचलित मराठी भाषा हीदेखील बहुतांशीं विदर्भी वळणाची आहे. कारण विदर्भ हें नांव लोपूनच महाराष्ट्र हें नांव प्रचारांत आलें. विदर्भालाच महाराष्ट्र म्हणूं लागले. कारण आजचा महाराष्ट्र त्या वेळीं जंगली व अनार्यांचा देश होता.

ह्या त्रिकोनाकृती महाराष्ट्राच्या पश्चिम किनारेपट्टीला कोंकण हें नांव आहे. एका बाजूस उंच सह्याद्रि व दुसऱ्या बाजूस अफाट महासागर, अशा अजस्र सीमांत सांपडलेली ही नक्षीदार सुंदर पट्टी इतकी चिंचोळी आहे कीं, ती लुगड्याच्या कांठा-प्रमाणें दिसते. एकीकडून समुद्राच्या भरतीचें खारें पाणी आंत शिरत असल्यामुळें जमीन नापीक होते, तर दुसरीकडे सह्याद्रीच्या शेजारामुळें एखादा हात खोल जमीन खणली म्हणजे खडकाशींच गांठ पडते, आणि तो खडकही काळा कठीण पाषाण असतो. त्यामुळें करील त्याची शेती व पिकवील त्याचा मळा, ही म्हण कोंकणांत अक्षरशः लागू पडते. किंबहुना मेहनत करूनही वर्षभर पोट भरेल इतकें पीक हातीं लागत नाहीं. वर्षभर सपाटून काम करावें तेव्हां कोठें सहा महिन्यांचें अन्न तेथें उत्पन्न होतें. त्यामुळें पोटासाठीं अवांतर उद्योग करणें लोकांना भाग पडतें. सुदैवानें ताड, माड, फणस, पोफळी व आंबे हीं झाडें कोंकणांत जीव धरतात व मशागत केली म्हणजे फोफावतात. मच्छीमारीचा धंदाही लोकांना राहजगत्या करतां येतो, व मालाच्या वाहतुकीसाठीं लमाणांचे तांडेही देशावरून खालीं कोंकणांत व कोंकणांतून वर देशावर फेऱ्या मारून फावल्या वेळांत व्यापार करीत व पोटाला थोडें बहुत मिळवीत. कित्येक लोक पांच महिने घरची शेती संभाळून उरलेले सात महिने वर देशावर नोकरी करतात.

श्रीयुत वासुदेवशास्त्री खरे यांनीं आपल्या जन्मभूमी या कवितेंत कोंकणपट्टीचें खालीलप्रमाणें वर्णन केलें आहेः—

पाथोधीची श्रवणिं पडतां गर्जना मंद धीर,
वृक्षच्छायांतरिं झुळझुळू वाहतां वात गार, ॥
होतों अंकीं निजत, जननी ! जन्मभूमी ! तुझ्या ते,
गेले कोठें दिवस ! झुरतों आठवोनी तयांते ॥
'निःसत्व निर्धन,' तुला म्हणतात लोक,
वाटे मला, लवहि त्यांस नसे विवेक; ॥

लक्ष्मीस देइ जननाप्रति वारिराशी,
सेवार्थ तो सतत सिद्ध तुझ्या पदाशीं ! ॥
लाटा आपटतां उठे ध्वनि, शिरे तो ज्यांचिया कंदरीं,
ऐसे पर्वत दुर्ग शोभति अति प्राचीन ज्यांच्या शिरीं; ॥
'धो धो धो' हि करीत त्यांतुन झरे खालीं कसे धावती !
पाणी तेंच पिऊन बाग उठती, शोभा तयांची किती ॥
आंबे, पोफळि, साग, नारळि, तटीं दाटे तरूंचें वन,
झोंके घेति सुरम्य चंचल जलीं, छाया तयांच्या घन; ॥
आकाशीं जणुं कीं विजा तळपती, मासे जलीं त्यापरी,
खाड्या त्या तव, जन्मभूमि ! नयनीं पाहीन केव्हां तरी ! ॥

रुक्ष व नापिकी असला तरी रम्य, समुद्राच्या सान्निध्यानें भव्य झालेला, चिंचोळा असला तरी दृष्टीला अमर्यादित, ताड, माड व पोफळी या उंच आणि चित्रमनोहर वृक्षांनीं खुणावलेला देश तेथील रहिवाशांस अत्यंत प्रिय झाला असला तर त्यांत नवल नाहीं. तिजोरीची श्रीमंती नसली तरी मनाची श्रीमंती त्यांना लाधली होती. पोटाचें समाधान नसलें तरी पौरुषत्वाचें व स्वावलंबनाचें समाधान त्यांना लाभलें होतें.

कोंकणाच्या नापिकीमुळें व तेथील भौगोलिक परिस्थितीमुळें लोक साहजिकच कंटक, मेहनती व धाडसी बनले. अफाट दर्यावर संध्याकाळीं सहज जाऊन बसले म्हणजे त्यांचें मनहि वाऱ्याप्रमाणें धावूं लागतें व त्यांच्या महत्वाकांक्षेलाहि समुद्राप्रमाणें सीमा दिसत नाहीं. या धाडशी व दर्यावर्दी लोकांच्या बळावरच शिवाजीमहाराजांनीं कोंकणप्रांतीं आपलें आरमार ठेवलें व फिरंग्यांना आणि यवनांना शह दिला.

कोंकणांतही देशाप्रमाणें अठरा पगड जातींची वसती आहे. तेथें फक्त चित्पावन ब्राम्हण राहतात असें नाहीं. देशाच्या नापिकीमुळें तेथील ब्राम्हणही इतर जातींप्रमाणें कंटक, धाडशी व साध्या वळणाचे आहेत. पोषाखी व दरबारी रिवाज तेथील ब्राम्हणांत अजूनहि शिरले नाहींत. पंचा नेसलेला, अंगानें उघडा व हातांत विळे कोयते घेऊन शेताची लावणी–निंदाई दिवसभर करीत असणारा इसम ब्राम्हण आहे किंवा दुसऱ्या जातीचा आहे, हें पुष्कळदां त्रयस्थाला ओळखूं येत नाहीं, व कदाचित् आलेंच तर तें वर्णामुळें येतें. ब्राह्मणांचा रंग किंचित उजळ

असतो, परंतु हेटकरी लोकांनाही रंगांत लाजविणारे ब्राह्मण कोंकणांत नाहींत असें नाहीं. कोंकणांत चित्पावन, सारस्वत व कऱ्हाडे या तीन शाखांचे ब्राह्मण विशेषतः आहेत. त्यांतल्या त्यांत चित्पावनांची संख्या अधिक आहे, हें खरें. परंतु आजमितीला बायकामुलें व मोठीं माणसें मिळून, खुद्द कोंकणांत राहणारी व देशावर पसरलेली अखिल हिंदुस्थानांतील चित्पावन ब्राह्मणांची संख्या केवळ एक लक्ष दहा हजार जेमतेम भरते. म्हणजे हिंदुस्थानांत पारशांपेक्षां देखील चित्पावनांची संख्या अल्प प्रमाणांत आहे. कोंकणांतील एकंदर लोकसंख्येच्या प्रमाणांत चित्पावन ब्राह्मणांची संख्या शेंकडा दोन इतकीच भरते.

परशुरामानें समुद्रांतून वाहत आलेल्या प्रेतांना—मग तीं माणसांचीं असोत किंवा गाढवांचीं असोत—जीवंत करून त्यांची वसाहत कोंकणांत करविली अशी धार्मिक म्हणून चालत आलेली आचरट दंतकथा आहे. परशुरामानें आपल्या सामर्थ्यानें समुद्र हटवून या १४ गोत्री घराण्यांना रहावयास जागा करून दिली व हा प्रांत निर्माण करून आपल्या भक्तांकरवीं भरविला. कारण परशुराम हें दैवत इतरत्र पूजिलें जात नाहीं, त्यामुळें हा तर्क आहे. हें खरें धरलें तर मग कोंकणांतील लक्षावधी महाराष्ट्र ब्राह्मणेतर कसे उत्पन्न झाले व ते केव्हां व कां कोंकणांत रहावयास आले हा प्रश्न शिल्लक उरतो. त्यावरून चित्पावन ब्राह्मण हे इराणांतून किंवा सिथियांतून वा मिसरमधून हिंदुस्थानांत केव्हां तरी आले असावेत, असा कांहीं इतिहासज्ञांचा तर्क आहे. परंतु सर्वच आर्य उत्तरेकडून दक्षिणेंत केव्हांना केव्हां तरी आले असल्यामुळें या तर्कटांत फारसा मतलब रहात नाहीं. चित्पावनांची शरीरकाठी, नाक व चेहऱ्याची ठेवण इतर ब्राह्मणांहून भिन्न नाहींत. गोरेपणा व घारे डोळे हीं चित्पावनी वैशिष्ट्यें सर्वत्र लागू पडत नाहींत. कारण रंगानें काळे व काळ्या पिंगट डोळ्यांचेही चित्पावन ब्राह्मण अनेक सांपडतात. दक्षिणेंतील सर्वच आर्यधर्मीय मूळचे उत्तरेकडील राहाणारे, तेव्हां चित्पावनांनाच परस्थ पाहुणे लेखण्यांत अर्थ नाहीं. ते आर्यच नाहींत असें कोणी म्हणत असेल तर गोष्ट निराळी. परंतु मग इतर ब्राह्मणांचें आर्यत्व अधिकच संशयास्पद होईल. वास्तविक प्रकार असा असावा कीं, कोंकणपट्टी इतर देशापासून पृथक् असल्यामुळें जुन्या काळीं दक्षिणेंत देशावर जसे आर्य व द्रविड ब्राह्मणांचे शरीरसंबंध झाले, तसे चित्पावनांत व द्रविडांत फारसे झाले नसतील. त्यामुळें गुजराथी नागर ब्राह्मणाप्रमाणें कदाचित् चित्पावन आर्यांनीं आपला वर्ण उजळ राखला असावा.

## बाजीराव पेशवे

महाराष्ट्र हा उत्तर व दक्षिण हिंदुस्थान यांच्या सीमेवरील देश आहे. जुन्या काळीं वाहतुकीचीं साधनें अत्यंत कमी होतीं, आणि विंध्याद्रीची उभी भिंत, तिच्यावरील घनदाट अरण्य, नर्मदानदीचा खंदक व सातपुड्याचें इंद्रजाल आणि पुनः तापीचा लहानसा खंदक, यामुळें उत्तर व दक्षिण यांचा संबंध फारसा रहात नसे. दक्षिणेंत एकदा माणूस आला कीं तो दक्षिणचाच होत असे. आर्य लोक उत्तरेंतून दक्षिणेंत उतरले तेव्हां त्यांना येथें द्रवीड संस्कृति नांदत असलेली आढळली. द्रवीड लोक आर्यांप्रमाणेंच सुधारलेले होते. त्यामुळें महाराष्ट्र हा आर्य व द्रवीड संस्कृतीचा सीमांत प्रदेश असल्यामुळें त्यांत या दोन्ही संस्कृतींचा मिलाफ झाला असल्यास नवल नाहीं. तामील, तेलगू, कानडी या दक्षिणेंतील आजच्या भाषा द्रवीड घाटाच्या आहेत, तर मराठी ही संस्कृत थाटाची आहे. यावरून महाराष्ट्रांत ज्याअर्थी संस्कृतोद्भव भाषा नांदू लागली त्याअर्थी आर्य संस्कृतीलाच या देशांत प्राधान्य मिळालें हें उघड आहे. द्रवीड लोकांचे नाग-पंचमी, चंपाषष्ठी वगैरे सण महाराष्ट्रांत रूढ झाले, इतकेंच नव्हे तर महाराष्ट्रांतील आर्यवंशीय ब्राह्मण आपणाला पंचद्रविडांत लेखूं लागले. महाराष्ट्रांत परस्पर घर्षणानें व शेजारीपणाच्या धर्मानें आर्य व द्रवीड या दोन तुल्य बळ व उच्च संस्कृतीच्या लोकांचें जें एकीकरण होऊं शकलें, तेवढें कदाचित् कोंकणांत त्या प्रदेशाच्या पृथक्पणामुळें होऊं शकलें नसेल; तें थोड्यावहुत प्रमाणांत झालें यांत शंकाच नाहीं. कारण चित्पावन ब्राह्मणांनीं देखील परशुरामाबरोबरच देशावरील देवांना व कुलाचारांना आपल्या देवघरांत मानाचें स्थान दिलें, आणि द्रविडी ब्राह्मणांचा रंग देशावरील ब्राह्मणांप्रमाणेंच कित्येक चित्पावन ब्राह्मणांनींही उचलला व आत्मसात् केला.

पूर्वी देशावरील ब्राम्हण चित्पावनांना कमी दर्जाचे लेखित असत, असा एक प्रवाद आहे. पेशव्यांना राजवैभव व अधिकार लाभल्यानंतरच चित्पावनांना बरो-बरीच्या नात्यानें इतर ब्राम्हणांकडून मान मिळूं लागला, असे उल्लेख सांपडतात. परंतु राजकारणांत मानापमानाचे व चढाओढीचे प्रसंग उद्भवल्यानंतरच हे खोडसाळ प्रवाद व ह्या अर्धवट समजुती पसरल्या असाव्यात. विशेषतः शाहूच्या दरबारीं जुने देशस्थब्राम्हण प्रधान (प्रतिनिधी, पेशवे पिंगळे, अमात्य, वगैरे) व नवे चित्पावन पेशवे यांच्यांत अधिकाराबद्दल हेवादावा सुरू झाला, त्यावेळचे हे कुत्सित उल्लेख व समज असावेत. गेलीं हजार वर्षें हिंदुसमाज अत्यंत विस्कळित बनला आहे. जातींच्या उपजाती व पोटजाती होण्याची क्रिया इतक्या अव्याहत

रीतीनें व जारीनें या देशांत चालली आहे कीं, एकट्या क्षत्रियांच्याच ( षाण्णव कुळी ) मराठे, कुणबी, तेली, माळी, रंगारी अशा धंद्यांवरून विविध जाती उत्पन्न झाल्या. आणि त्या जातींतहि घाण्याचा बैल एक कीं दोन यासारख्या क्षुल्लक भेदावरून, एक बैले व दो बैले तेली अशा पोटजाती एकदा निर्माण झाल्या. बरें, या जाती किंवा पोटजाती एकदा निर्माण झाल्या म्हणजे एखाद्या अभेद्य किल्ले-कोटाप्रमाणें त्या समाजांत चिरस्थायी रहावयाच्या ! त्यांच्यांत रोटीव्यवहारच नसावयाचा, मग बेटीव्यवहाराची गोष्ट कशाला ? या सार्वत्रिक नियमानुसार, प्रांतिक भेदामुळें महाराष्ट्र ब्राम्हणांत देशस्थ, कोंकणस्थ, कऱ्हाडे अशा पोटजाती झाल्या असल्या तर तें नवल नव्हे. त्या झाल्या नसत्या तरच तो अलौकिक चमत्कार गणावा लागला असता. हिंदु धर्माची ही जी अवनति झाली व पूर्वीची सर्व संग्राहक आणि उदार वृत्ती जाऊन, त्याची मुसलमानी अमलापूर्वी व तदनंतर जी कोती दृष्टी झाली, तिजमुळें इतर पोटजातींप्रमाणें कोंकणस्थ—देशस्थ–कऱ्हाड्यांतील बेटीव्यवहार बंद पडला होता, व रोटीव्यवहारही कांहीं कांहीं प्रसंगीं दुराग्रही लोकांच्या हट्टामुळें होत नसेल. परंतु त्यामुळें त्यांची उच्चनीचता कशी सिद्ध होणार व त्यांचा गुणानुक्रम कसा लावतां येणार ? ब्राम्हणांचे सर्व संस्कार इतरांप्रमाणेंच चित्पावनांतही होत असत, व शेजारच्या सारस्वतांप्रमाणें न वागतां देशावरील इतर ब्राम्हणांप्रमाणें चित्पावनांनीं मत्स्याहार वर्ज्य मानला होता. तेव्हां त्यांचा सामाजिक दर्जा कमी कसा होणार व त्यांचें ब्राम्हण्य कोण, कसें व कां नाकबूल करणार ? या विधानाला एक महत्वाचा अत्यंत प्राचीन आधार डॉक्टर भांडारकरांच्या दक्षिणच्या इतिहासांत सांपडतो. इ. स. १२४९ मध्यें सिंघणाच्या दक्षिणेंतील मल्ल नांवाच्या सुभेदारानें कृष्ण-राजाच्या संमतीनें ज्या ३२ भिन्नगोत्री ब्राम्हणांना बागेवाडींतील जमीन दान केली म्हणून उल्लेख आहे, त्यांत पटवर्धन व घैसास या आडनांवाचे ब्राम्हण आहेत. पटवर्धन आजला निवळ चित्पावनी आडनांव नाहीं हें खरें. दक्षिण महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध पटवर्धन सरदार उदयास आल्यानंतर, त्यांच्या कांहीं आश्रितांनीं घोरपड्यांप्रमाणें आपल्या आश्रयदात्यांचें आडनांव सन्मानपुरस्सर आपणास लावून घेतलें. पूर्वी तें फक्त चित्पावनांतच रूढ होतें. परंतु घैसास हें आडनांव आजदेखील फक्त चित्पावनांतच रूढ आहे. तेव्हां चित्पावनांचें ब्राम्हण्य पेशवाईपूर्वी अनेक वर्षे निदान शिवाजी महाराजांपूर्वी ४०० वर्षे तरी राजमान्य होतें हें सिद्ध आहे. पेशवाई नंतर त्यांना इतरेजनांकडून अधिक मान

मिळूं लागला. राजकर्त्यांच्या जाति-बांधवांशीं नम्रतेनें व सलोख्यानें वागण्याची सामान्य जनांत प्रवृत्ति असते. चित्पावन ब्राम्हणांना पेशवाईंत तो मान प्राप्त झाला व त्यांचें केवळ बहुजन समाजांतच नव्हे, तर इतर ब्राम्हणांतही अधिक प्रस्थ माजलें; परंतु हा वैभवप्राप्तीचा साहजिक परिणाम आहे. एक पुरुष थोर झाला कीं कुलाचा गौरव वाढतो व कुलाच्या थोरवीनें सबंध ज्ञातीची किंमत वाढते.

महाराष्ट्रांतील ब्राह्मण व इतर जातींचे धाडशी व महत्वाकांक्षी पुरुष मराठेशाहीच्या उत्तरार्धांत म्हणजे पेशवाईंत उत्तर हिंदुस्थानांत जाऊन वसाहती करूं लागले असा सार्वत्रिक समज आहे. तो बव्हंशानें खरा आहे पण तत्त्वार्थानें मात्र नव्हे. श्री छत्रपति शिवाजी महाराजांचें लक्ष स्वराज्य स्थापण्याकडे वेधलें होतें. मराठी स्वराज्याची भूमि त्यांना मुसलमानी अमलांतून मुक्त करावयाची होती. त्यामुळें त्यांना मराठा तितका मिळवून, स्वराज्यांतच खपवावा लागला. त्यांच्या प्रयत्नांनीं महाराष्ट्रांत धर्मराज्य स्थापन झालें व धर्मकार्य करण्याकरितां आनंदवनभुवनांत उदंड पाणी झालें. परंतु त्यांच्या प्रतापानें, आणि त्यांच्यानंतर मराठेमंडळाच्या अपूर्व स्वार्थत्यागानें मोंगलबादशाही खिळखिळी झाली, तेव्हां पेशवाईंत महाराष्ट्राचें राजकारण उत्तराभिमुख झालें. या बदललेल्या राजकारणाचा विसर पडूं नये म्हणून वाड्याच्या महाद्वाराला दिल्लीदरवाजा असें म्हणण्याची वहिवाट पडली. कारण या उत्तराभिमुख द्वारांतून बाहेर पडूनच, दिल्लीवर चढाई करून मोंगल बादशाही मराठे वीरांना जिंकावयाची होती. मराठेशाहीच्या उत्तरार्धांत मूळच्या स्वराज्याच्या ध्येयाची हिंदुपदपादशाहींत परिणती झाली, त्या वेळीं पेशव्यांच्या निशाणाखालीं अनेक कर्तबगार पुरुष मुसलमानी अमलाखालीं असलेल्या हिंदुस्थानांतील अनेक प्रांतांवर चढाई करून जाऊं लागले. त्यांनीं शत्रूंचा पराभव करावा, त्यांचे प्रांत जिंकावे व आपलें आसन त्या जागीं मांडावें. त्यांच्या आश्रयानें इतरांनीं तेथें जाऊन आपला संसार थाटावा. त्यांच्या शिपाईप्याद्यांनीं तेथेंच ठाणें द्यावें व तद्देशीय लोकांवर आपला अंमल गाजवावा. हिंदुस्थानांत चौफेर पसरलेल्या परप्रांतस्थ मातब्बर मराठी वसाहती पेशवाईंत वर सांगितल्याप्रमाणें वसलेल्या आहेत, हें खरें आहे. परंतु तत्पूर्वी महाराष्ट्रीय लोक बाहेर जात नव्हते असें मात्र नाहीं. फरक एवढाच कीं, पेशवाईत बाहेर पडलेले मराठे आपण कोणीतरी श्रेष्ठ व कर्तबगार लोक आहोंत अशी भावना मनांत ठेवून परप्रांतस्थांशीं वागत; दळणवळणाचीं साधनें वाढल्यामुळें व संपत्ति आणि सत्ता अनुकुल असल्यामुळें त्यांचे सोयरसंबंध त्यांच्या जवळच्या

किंवा दूरस्थ गणगोतांतच होत, व ते आपली मराठी भाषा अभिमानानें जतन करून आपला खासगी व राजकीय व्यवहार बहुधा मराठींतच करीत. कारण ते जेते म्हणून परप्रांतांत जात असत. परप्रांतस्थ हिंदूंच्या चालीरीती, भाषा व आचार त्यांना कमी दर्जाचे वाटत, त्यामुळें त्यांचा ते स्वीकार करीत नसत. परप्रांतस्थ केवळ जित म्हणून कनिष्ठ संस्कृतीचे अशी आकुंचित दृष्टि मात्र त्यांची नसे. उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक हिंदू त्या वेळीं अर्धवट मुसलमान बनलेले होते, व लाखों तर प्रत्यक्षच बाटून पूर्णपणें मुसलमान बनले होते. हिंदु म्हणविणारेही उर्दू भाषा घरीं दारीं व दरबारीं बोलत, त्याच भाषेंत मुलाबाळांना शिकवीत, मुसलमानी सणांत भाग घेत, त्यांच्या पोषाखाचें व रीतीभातीचें अंधानुकरण करीत असत, फार काय पण आपल्या मुलांना गमतीनें मोहरमांत फकीरी देत, आपल्या घरीं ताजिये मांडून त्यांची पूजा करीत व त्यांच्या बरोबर रोजे पाळून नमाजदेखील प्रत्यहीं पढत असत. यांत अतिशयोक्ति मुळींच नाहीं. (आज देखील दक्षिण हैदराबादेंत नव्हे तर खुद्द नागपुरांत देखील मुसलमानी सण पाळणारे अनेक हिंदु आहेत.) अशा स्थितींत शिवाजी महाराजांच्या शिकवणुकीनें धर्माभिमानी व देशाभिमानी बनलेल्या मराठ्यांनीं, परप्रांतीं गेल्यावर तत्रस्थांपासून तुटक रहावें व आपल्या उदाहरणानें त्यांना योग्य वळण लावावें, असें वाटत असल्यास नवल नाहीं. सारांश, पेशवाईंत बाहेरदेशीं रहावयास गेलेले महाराष्ट्रीय शरीरानें, मनानें, भाषेनें, व रक्तमांसानें महाराष्ट्रीयच रहात! त्यांच्यांत लवमात्र बदल होत नसे. वैभव व अधिकार यांची प्राप्ति झाल्यामुळें त्यांची विलासप्रियता जी काय वाढत असेल ती खरी.

पेशवाईपूर्वी जे लोक महाराष्ट्रांतून बाहेर पडत त्यांना मात्र ही अनुकूल परिस्थिती नसे. त्यांना परप्रांतस्थ लोकांशीं नम्रतेनें, त्यांच्या कलानें व त्यांच्या धोरणानें वागावें लागे. दळणवळणाचीं अल्प साधनें, व सांपत्तिक प्रतिकूलता या दोन अडचणींनीं परदेशांत पुरतेपणीं घेरल्यावर, माणूस आपुलकी घटकाभर विसरला तर तें क्षम्य होय. अखिल हिंदुस्थानांत मराठा या शब्दाला शिवकालांत व विशेषतः पेशवाईंत जो मान चढला होता, तो तत्पूर्वी असणें शक्य नव्हतें. त्यामुळें शिवकालापूर्वी जे मराठे परदेशांत गेले ते तत्रस्थांत विरघळून गेले. त्यांनीं तिकडील लोकांचे रीतिरिवाज उचलले व त्यांच्याशींच सोयरसंबंध केले; मग ते मराठी भाषादेखील विसरले हें निराळें सांगावयास नको; कारण त्यांच्या संततीची मातृभाषा मराठी राहिली नाहीं, व दोन पिढयांनंतर पितृभाषादेखील मराठी

उरली नाहीं. हे शरीरसंबंध अर्थातच ब्राह्मणांचे ब्राह्मणांशीं व क्षत्रियांचे क्षत्रियांशीं झाले. प्रांतभेद व त्यामुळें आचारभेद आणि भाषाभेद पडला असला तरी उत्तरदक्षिणेंतील सर्वच लोक वेदानुयायी हिंदूचना ! हल्लीं मानसन्मानानें उत्तर हिंदुस्थानांत नांदत असलेली पंत, जोशी, बर्वे वगैरे आडनांवाची जुनी महाराष्ट्र-मंडळी हल्लीं पूर्णपणें परदेशी बनली आहे. ब्राह्मणांखेरीज इतर जातींच्या आडनांवांत फारसें स्थैर्य नसल्यामुळें, त्यांच्या परप्रांतगमनाचा पक्का ठावठिकाणा लावणें कठीण आहे. परंतु महाराष्ट्राशीं अति प्राचीन ऋणानुबंध सांगणारे अनेक खत्री उत्तर हिंदुस्थानांत व ब्रह्मक्षत्रिय गुजराथेंत सांपडतात. आज ते महाराष्ट्राला परके झाले असले, तरी महाराष्ट्रीयांची फार प्राचीन काळापासून अंगीं असलेली परदेशगमनाची धाडशी वृत्ति सिद्ध करून दाखवितात. महाराष्ट्राचें दारिद्य हेंच महाराष्ट्रीयांचें वैभव. कारण ह्या दारिद्याच्या आंचेनें महाराष्ट्रीय लोक पराक्रमी व धाडसी बनले. भौगोलिक परिस्थितीनें महाराष्ट्रीयांना कणखर, बेडर व सडेतोड बनविलें. हुएनसंग या प्रसिद्ध चिनी प्रवाशानें इ. स. ६३९ सालीं महाराष्ट्रीय लोकांचें जें वर्णन केलें आहे तें आजलाही तितकेंच खरें आहे. त्या वेळीं उत्तरेस महापराक्रमी हर्षवर्धनाचें साम्राज्य पसरलें होतें, आणि महाराष्ट्रांत तैलप राज्य करीत होता. हर्षवर्धनाच्या साम्राज्यविस्ताराला त्यानेंच यशस्वी प्रतिबंध केला. हुएनसंगानें त्याचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे—

'His name is Pulakeshi. His ideas are large and profound and he extends widely his sympathy and benefactions. *His subjects serve him with perfect self-devotion.* At present the great king Harshavardhan carries his victorious arms from East to West; he subdues distant peoples and makes the neighbouring nations fear him; *but the people of this kingdom alone have not submitted.* Although he be often at the head of all the troops of the five Indies, though he has summoned the bravest generals of all the kingdoms, and though he has marched himself to punish them, he has not yet been able to vanquish their

opposition. From this we may judge of their warlike habits and manners'—त्याचें नांव पुलकेशी आहे. त्याचें मन मोठें आणि त्याचें दातृत्व व्यापक आहे. **त्याची प्रजा अत्यंत निष्ठापूर्वक त्याची नोकरी करते.** हल्लीं महाराज हर्षवर्धनांनीं पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत सर्व प्रदेश आपल्या पराक्रमानें जिंकला आहे. दूरचीं राष्ट्रें त्यांनीं जिंकलीं व जवळचीं धाकांत ठेविलीं. **परंतु फक्त या राज्यांतील लोक जिंकले गेले नाहींत.** हर्षवर्धनानें भारतांतील पांचही प्रांतांचें सैन्य गोळा केलें, राज्यांतील अत्यंत शूर सेनापतींना पाचारण केलें, आणि महाराष्ट्रीयांना शिक्षा लावण्याकरितां स्वतः त्यांच्यावर चालून गेला, तरी त्यांना जिंकणें शक्य झालें नाहीं. यावरून त्या लोकांच्या लष्करी रीतीभाती लक्षांत येतील.' हुएनसंगाचें हें वर्णन औरंगजेब व शिवाजी यांच्यामधील सामन्याला इतकें हुबेहुब लागू पडतें कीं तें शिवकालीनच असावें असा क्षणभर भ्रम उत्पन्न होतो. महाराष्ट्रीयांबद्दल तो लिहितो—

'The manners are simple and honest. The natives are tall, haughty and supercilious in character. Whoever does them a service may count on their gratitude, but he that offends them will not escape their revenge. If anyone insults them they will risk their lives to wipe out that affront. If one applies to them in difficulty they will forget to care for themselves in order to flee to his assistance. When they have an injury to avenge they never fail to give warning to their enemy; after which each puts on his cuirass and grasps his spear in his hand. In battle they pursue the fugitives, but do not slay those who give themselves up.' लोकांची राहणी साधी व प्रामाणिकपणाची आहे. ते उंच, हट्टी व मस्तवाल आहेत. जो त्यांच्या उपयोगीं पडतो त्याच्याशीं ते कृतज्ञ राहतात, परंतु जो त्यांच्या वाटेस जातो तो त्यांच्या सुडांतून सुटत नाहीं. कोणी त्यांचा अपमान केला तर जीव धोक्यांत घालून ते तो धुवून टाकतील; जर कोणी त्यांचें सहाय्य मागितलें तर त्याच्या मदतीला धांवून जातांना ते आपल्या शरीराची काळजी करणार नाहींत. अपमानाचा सूड उगविण्यापूर्वीं ते

आपल्या शत्रूंना प्रथम सूचना देतात व नंतर समशेर लटकावून व हातीं भाला घेऊन ते युद्धास निघतात. ते पराजितांचा पाठलाग करतात, परंतु शरणागताला मारित नाहींत.' तेराशें वर्षांपूर्वी एका परकीय संशोधक विद्वानानें हिंदुस्थानांत अनेक वर्षें राहून व तीर्थाटन करून, व साग्र माहिती गोळा करून मराठ्यांचे जे स्वभाव-विशेष वर्णिले आहेत, त्यांचें महत्व अपूर्व आहे; आणि म्हणूनच हा उतारा विस्तारानें दिला आहे. त्यानें दारुबाजी वगैरे जे मराठ्यांचे दोष दाखविले आहेत ते आजही तितकेच खरे आहेत.

सुमारें अडीचशें वर्षांपूर्वी वेंकटाध्वरि नांवाच्या कर्नाटकी पंडितानें विश्वगुणादर्शचंपू नांवाच्या स्वकृत संस्कृतग्रंथांत तत्कालीन परिस्थितीचें वर्णन केलें आहे. त्यांत प्रत्येक प्रश्नाची अनुकूल बाजू विश्ववसू या गंधर्वानें व प्रतिकूल बाजू कृशानू या गंधर्वानें वर्णन केली आहे. महाराष्ट्राचें वर्णन करतांना कृशानू म्हणतो—

" अपारैर्व्यापारैरहरिह नयंतो दशदिशा-
स्वथज्ञाताः संध्यां विदधाति न जातु स्वसमये ॥
त्यजन्तः स्वां वृत्तिं द्विजकुलभवां ग्रामगणकीं
भवंतो हंताऽमी कथमपि च जीवंति बहवः ॥
उपनयनविवाहावुत्सवैकप्रधानौ
कलिविभवत एषां कालभेदानभिज्ञौ ॥
विजहति न कदाचिद्वेदपाठैकयोग्ये
वयसि च यवनानी-वाचनाभ्यासमेते. ॥"

'महाराष्ट्रांतील ब्राह्मण वेदाध्ययनाविषयीं उदासीन राहून भलतेच उद्योग करीत असतात. यावनी भाषा शिकतात व जमाखर्च मांडतात. विटाळ चांडाळ मानीत नाहींत. लग्नमुंजी वगैरे धार्मिक कार्यें केवळ उत्सवाच्या दृष्टीनें उरकून घेतात.' या व्यवहारी धोरणामुळेंच त्यांचा भाग्योदय झाला. दक्षिणी पंडिताप्रमाणें विटाळाचें बंड त्यांनीं वाढविलें नाहीं व जुन्या विद्येला चिकटून बसले नाहींत. जसा काळ तसा वेष हें त्यांचें धोरण! यावर विश्वावसू उत्तरतो—

'देवक्षोणीसुरहितकृते दारितम्लेंच्छपंक्तेः
मह्यां सह्या कथमपि महाराष्ट्रयूथस्य चेष्टा ॥

व्याधिव्यूहप्रतिहतिकृतां व्यक्तमुग्रौषधानाम्
कायारोग्यप्रणयिहृदयैः काटवं मर्षणीयम् ॥ '

त्यांचे दोष खरे असले तरी ते पराक्रमी आहेत व त्यांनीं म्लेंच्छांचें पारिपत्य करून हिंदूंना थारा दिला. रोग घालविणारें औषध कडू असलें तरी तें आनंदानें सेवन करावें लागतें. म्हणूनच मराठ्यांचे दोष सर्वांना पोटांत घालावे लागतात.

---

प्रकरण २ रें

# कुलवृत्तांत



बाळाजी विश्वनाथ हा कोंकणांत राहणारा एक सामान्य भटभिक्षुक होता, व जंजिरा येथील शिद्दी त्याच्या कुटुंबावर अत्यंत संतापला, आणि संतापाच्या भरांत शिद्दीनें त्याच्या भावाला पोत्यांत शिवून बंद केलें व नंतर तें पोतें समुद्रांत बुडवून त्याला अत्यंत क्रूरपणानें ठार मारलें, आणि त्या भीतीनेंच बाळाजी कोंकणांतील घर सोडून देशावर पळून गेला, व केवळ नशीबाचा जोर म्हणून युक्तीप्रयुक्तीनें पांचसहा वर्षांच्या अल्पावधींत पेशवा झाला, ही भ्रामक समजूत इतकी दृढमूल झाली आहे कीं, ती नष्ट करणें महाकठीण कर्म आहे. या समजुतींत काडीमात्र तथ्य नाहीं. कोणत्याही माणसाच्या थोरवीची योग्यता त्याच्यावरून न ठरवितां व त्याच्या अभ्युदयाचें श्रेय त्याच्या अविरत प्रयत्नांना व पराक्रमाला, चिकाटीला आणि प्रामाणिकपणाला न देतां, तो हवाला दैवावर टाकून हात झाडून मोकळें होण्याचा आपणा हिंदूंचा पूर्वापार लौकिक आहे. राष्ट्रांतील तरुण या मिथ्या दैववादानें आळशी व चुकारतट्टू बनतात व 'असेल माझा हरी तर देईल घरच्या घरीं', असा पोकळ वेदांती जप करीत कर्तव्यशून्य बनतात. राष्ट्राचें पौरुषत्व जागें होण्याकरितां अशा ढोंगी कारणमीमांसेकडे व भोळेपणाच्या धर्मभावनेकडे काणाडोळा करून तत्वमसीची गांठ घालणें जरूर आहे; त्यामुळें उद्धाराचा मार्ग तरी दिसूं लागेल व या हतवीर्य बनलेल्या राष्ट्राचा स्वाभिमान जागा होईल व तें स्वावलंबनाची पायरी चढूं लागेल. बाळाजी विश्वनाथाच्या उदयाचें श्रेय सर्वस्वीं त्यांच्या कर्तबगारीकडे व आंगच्या गुणाकडे आहे.

बाळाजी विश्वनाथ यांचें आडनांव भट होतें, म्हणजे ते भटभिक्षुक होते असा अर्थ नाहीं. भट या शब्दाचा अर्थ वीरपुरुष आणि त्या दृष्टीनें त्या कुलांतील पुरुषांनीं आपलें नांव सार्थ करून दाखविलें. महाराष्ट्रांत भोंसल्यांचें कुल जेवढें नामांकित व पराक्रमी, तितकेंच किंबहुना कोंकणभर सरसच भटांचें घराणें होतें. छत्रपती शिवाजीमहाराजांचे पूर्वज बाबाजी पाटील हे वेरूळ-घृष्णेश्वर येथील पाटील होते व या पाटीलकीचा मोठा अभिमान त्या घराण्याला होता. दौलताबाद परगणा सोडल्यानंतर त्यांनीं सवडीसवडीनें हिंगणीं, बेरडी, देऊळगांव वगैरे कृष्णा आणि भीमाकांठच्या कांहीं खेड्यांच्या पाटीलक्या आणखी **खरेदी केल्या** व नंतर ते सुखानें नांदू लागले. ह्या पाटीलक्या त्यांनीं पराक्रमानें जिंकून मिळविल्या नाहींत, तर मामुली माणसाप्रमाणें विकत घेतल्या. परंतु त्यामुळें छत्रपती शिवाजीमहाराजांच्या नांवाला थोडाच कमीपणा येतो? शहाजीला आपली मुलगी जिजाई देतांना जाधवरावांनीं भोंसल्यांच्या कुलीनत्वाबद्दल प्रथम शंका प्रदर्शित केली. परंतु जाधवरावापेक्षां भोंसल्यांचें कुलच अखेर अधिक तेजस्वी, घरंदाज व कुलीन ठरलें. कारण श्रीशिवछत्रपतींनीं आपल्या पराक्रमानें व चारित्र्यानें अखिल महाराष्ट्राचेंच नव्हे तर हिंदुस्थानाचें मुख उज्वल केलें. तात्पर्य, स्वपराक्रमानें कुलाला मोठेपणा येतो, पूर्वजांच्या श्रीमंतीनें फारसा येत नाहीं. हें खरें असलें, तरी कुलाची मातवरी दुसऱ्या अर्थानें गौरवास्पद वाटते. उत्तम वळणांतील घराण्याचा पुरुष संस्कृतीनें उमदा निपजण्याचा संभव फार. कर्तबगारीला अर्थातच फार वाव असतो. बाळाजी विश्वनाथ भटाचे पूर्वज हे मुंबईच्या दक्षिणेस असलेल्या बाणकोट खाडीच्या उत्तरतीरावरील हरिहरेश्वर व श्रीवर्धन या दोन गांवचे देशमुख होते. ग्रामपंचायतींत देशमुख या नात्यानें प्रामुख्य त्यांच्याकडे असे, व गांवांत यत्किंचित कमी जास्ती झालें तरी त्याची वर्दी त्यांना पोहोंचविण्यांत येऊन त्यांचा निवाडा सर्वांस मान्य होई. हे दोन्ही गांव हबशाच्या राज्यांत मोडत असले, तरी व्यवहारदृष्टीनें देशमुखच त्या गांवांत प्रमुख असत. रा. वि. का. राजवाडे यांच्या मतानें या घराण्याकडे दंडाराजपुरीची देशमुखी इ. स. १४७८ च्या सुमारास आली असावी. म्हणजे श्रीशिवछत्रपतीच्या जन्मापूर्वीं सरासरी दीडशें वर्षें भटांचें घराणें कोकणपट्टींत नामांकित गणलें जाई. इ. स. १५७५ मध्यें बाळाजी विश्वनाथाचा चौथा पूर्वज महादाजी भट हा दंडाराजपुरीचा देशमुख—देसाई म्हणविला जाई.

## पेशव्यांचा वंशवृक्ष




* सध्यां ही शाखा कोंकणांत तळें येथें आहे.

शिवाजी महाराजांचा अवतार झाला व त्यांनीं स्वराज्य स्थापन केलें तें गोब्राह्मण प्रतिपालनाकरितांच, हा लौकिक ऐकून अनेक देशस्थ ब्राह्मणांचीं कुटुंबें त्यांच्या राज्यकारभारांत भाग घेण्याकरितां पुढें सरसावलीं. सासवडजवळच्या प्रदेशास कऱ्हेपाठार ही संज्ञा होती. त्यांत बेदर व वाईकडील अनेक कुटुंबांनीं कैक वर्षांपासून वसाहत केली होती. यांची शिवाजी महाराजांस फार मदत झाली. राघो-बल्लाळ अत्रे, निळकंठराव सरनाईक, गोपीनाथपंत बोकील, शामराव अंबाजी, तुकोपंत पुरंदरे इत्यादि शिवकालिन देशस्थ ब्राह्मणांचे वंशज पेशवाईंतही नांवलौकीकास चढले. शिवाजी महाराजांचा कोंकणपट्टीशीं जरा उशीरां संबंध आला. परंतु त्यांच्या कालांतच कोंकणांतील अनेक चित्पावन व प्रभू घराणीं वरघांटी येऊन मराठेशाहीच्या कारभारांत सामील झालीं. त्यांचा शिरकाव उशीरां झाल्यामुळें त्यांचा भाग्योदयही उशीरां झाला. संभाजी महाराजांच्या मृत्यूनंतर स्वराज्यावर जें भयंकर औरंगजेबी संकट कोसळलें होतें, त्या वेळीं म्हणजे राजाराम महाराजांच्या कारकीर्दीत हीं कोंकणी घराणीं आपल्या पराक्रमानें व स्वराज्यनिष्ठेनें पुढें आलीं. इचलकरंजी संस्थानाचा मूळ पुरुष नारो महादेव जोशी (घोरपडे) हा याच सुमारास नांवलौकीकास चढला. बाळाजीचा बाप व आजा घाटावर श्रीशिवछत्रपतीकडे नोकर होते असे त्रोटक उल्लेख सांपडतात. बाळाजीचा भाऊ विठ्ठलपंत व पत्नी राधाबाई, यांचे इ. स. १६७९ चे हस्ताक्षरी लेख नाशीकचे तीर्थोपाध्ये हिंगणे यांच्या चोपड्यांत आहेत. त्यावरून बाळाजी हा त्या सुमारास देशावर रहावयास आला असण्याचा संभव आहे. म्हणजे शिवाजी महाराजांची अखेरची काराकीर्द त्यानें पाहिली असावी व त्यांच्या सेवेलाच तो रुजु झाला असावा. त्या वेळीं त्याचें वय वीस वर्षांचें धरलें तर पेशवाई मिळाली तेव्हां तो ५३–५४ वर्षें वयाचा अनुभवी कार्यकर्ता असला पाहिजे हें उघड होतें. जानोजी भटाला जंजीऱ्याच्या शिद्यानें गोणत्यांत बांधून व त्या पोत्याचें तोंड बंद करून समुद्रांत बुडवून मारलें, त्यामुळें आपल्यावर पुढें मागें तोच प्रसंग येईल या भीतीनें बाळाजीनें देशत्याग केला, ही अगदींच कपोलकल्पित कादंबरी ठरते. कारण खुद्द जानोजीच्या हातची इ. स. १७०६ तील नोंद त्र्यंबकच्या तीर्थोपाध्यायाच्या चोपडींत सांपडली आहे. त्याचप्रमाणें इ. स. १६९७ त कोंकणच्या साधुश्रेष्ठ ब्रह्मेंद्रस्वामीशीं बाळाजीची ओळख झाली व स्वामींच्या वजनानें त्याचा मराठेशाहींत शिरकाव झाला ही देखील दंतकथाच ठरते. कारण इ.स. १६९९ सालीं तो सरसुभेदार असल्याचा उल्लेख आहे.

खालील दोन पत्रें वाचलीं म्हणजे याविषयीं संशय उरणार नाहीं.

" अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री बाळाजी विश्वनाथ, सरसुभेदार प्रांत पुर्णे गोसावी.

सेवक रामचंद्र निलकंठ, नमस्कार, सुरसन मया व अलफ ( इसवी सन १६९९ –१७०० ) श्री वास्तव्य चिंचवड यांस, इनाम मौजे हिंजवडी, तर्फ कर्यात मावळ हा गांव दिल्हा आहे. तमाम गुरें मौजे वाकड, तर्फ हवेली प्रांत मजकूर या गांवाच्या रानास चरायास जातातो, म्हणून मौजे मजकूरच्या मोकदमास दोरवणीचा तगादा महालीचे कारकून करितातो. त्यास राजश्री स्वामींनीं यांस इनाम मौजे मजकूर दोरवणी देखील दिल्हा आहे. खदबदल मना केली असे. तरी तुम्हीं एकंदर तगादा न करणें. फिरोन बोभाट येऊं न देणें. छ २१ जिल्हेज. निर्देश समक्ष. "

" स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ३० तारणनाम संवत्सरे, ज्येष्ठ शुद्ध ६ शष्टी, रविवासरे, क्षत्रियकुलावंतस श्रीराजा शिवछत्रपति यांणीं, राजमान्य राजश्री, बाळाजी विश्वनाथ, सरसुभेदार, प्रांत दौलताबाद यांसी, आज्ञा केली ऐसीजेः— मौजे तांदळी जवकाची, तर्फ रांजणगांव, प्रांत जुन्नर हा गांव, राजश्री रामचंद्र पंडित आमात्य यांचे कुळकर्ण व ज्योतिषपणाच्या वतनाचा, याकरितां कैलासवासी स्वामींनीं यांस इनाम करून दिल्हा. त्याप्रमाणें स्वामींनीं करार करून पत्रें दिल्हीं आहेत. ऐसीयास मौजे मजकुरास कोण्हाचा उपसर्ग लागों न देणें. बिलाकुसूर पंडित मशारनिल्हेस इनाम चाले ऐसी गोष्टी करणें. कोण्ही धामधूम करितील, तरी ताकीद करीत जाणें. जाणिजे. बहुत काय लिहिणें. तारीख ५ सफर, सन खमस ( इसवी सन १७०४–५ ) "

वरील पत्रांत उल्लेखलेला बाळाजी विश्वनाथ सर सुभेदार प्रांत पुणें, हाच बाळाजी विश्वनाथ भट कशावरून, अशी कोणी कदाचित् शंका घेईल. कारण एकाच नांवाचे दोन स्वतंत्र इसम असणें संभवनीय असतें. त्या पत्रांत भट आडनांव दिलें नसल्यामुळें तसा कोणी संशय घेऊं शकेल. परंतु बाळाजी विश्वनाथ सरसुभेदार प्रांत पुणें यांनीं **जगथांपांचा** केलेला निवाडा इ. स. १७२२ त बाजीराव पेशव्याकडे फेर विचारार्थ आला असतां, त्यानें सदहू बाळाजी विश्वनाथाचा निर्देश 'तीर्थरूप' असा केला आहे. त्यामुळें शंकेला आतां जागाच उरलेली नाहीं.

कोणताही माणूस एकदम सरसुभेदार होत नाहीं, त्यापूर्वी त्याचीं दहावीस वर्षें तरी मराठेशाहीच्या सेवेंत गेलीं असावींत. दीर्घकाल सचोटीची सेवा केल्यावरच माणूस महत्पदाला चढतो. देशमुख मामले दंडाराजपुरी व अधिकारी श्रीवर्धन, सभासद, सरसुभेदार प्रांत पुणें व नंतर दौलताबाद, मुख्य देशाधिकारी व लेखक महालानिहाय, मुतालिक पंतसचीव व सेनाकर्ते, हीं उपपदें वेळो वेळीं बाळाजीस लावलेलीं तत्कालिन कागदपत्रांत आढळतात. रामचंद्र नीळकंठादि अष्ट प्रधान त्यास मोठ्या गौरवानें सरकारी कामें सांगत व अनेक निवाड्यावर त्यांनीं त्याची साक्ष घेतली आहे. यावरून बाळाजीनें आपल्या कर्तबगारीनें व सचोटीनें मराठे दरबारचा चांगला विश्वास संपादन केल्याचें दिसतें. सारांश, त्याचा उदय एकाद्या धुमकेतूप्रमाणें अवचित झाला नाहीं. तो पायरी पायरीनें वर चढत गेला, आणि त्याचे गुण त्याच्या उत्कर्षास सर्वस्वी कारणीभूत झाले. १७०८ मध्यें बाळाजीचा सेनाकर्ते असा उल्लेख आहे. तेव्हां तें पद त्यापूर्वी त्यास केव्हां तरी मिळालें असलें पाहिजे. १७१३त बाळाजीस पेशवाई मिळाली, तेव्हां त्याचें सेनाकर्ते हें पद शाहूनें होनाजी अनंतास दिलें.

बाळाजीचा मोंगल दरबाराशींही निकट संबंध आला होता. बाळाजी मराठेशाहींत नोकरीस आल्यानंतर जवळजवळ २५ वर्षें मोंगल बादशहा औरंगजेब यानें दक्षिणेंत कायमचें ठाणें दिलें होतें. मराठी स्वराज्य धुळीस मिळविण्याची बादशाहाची प्रतिज्ञा, तर त्याचें शक्य त्या उपायांनीं संरक्षण व्हावें म्हणून महाराष्ट्रीयांनीं चंग बांधलेला; अशा परिस्थितींत मोंगल व मराठे यांच्यांतील अद्भुत रणसंग्राम चालला होता. औरंगजेबाची गुर्मी मराठ्यांच्या कमालीच्या स्वार्थत्यागानें जिरली. संभाजी महाराजांना बादशहानें हाल हाल करून ठार मारलें, बाल छत्रपती शाहू व राणी येसूबाई मोंगलांच्या कैदेंत सांपडलीं, तरी मराठ्यांचा धीर खचला नाहीं. राजाराम महाराजांच्या आधिपत्याखालीं मराठे सरदारांनीं सारखे धावते छापे घालून मुसलमानी सैन्यास जेरीस आणलें. मुसलमानांनीं किल्ले सर करावेत व प्रदेशावर कबजा करावा, परंतु मोंगल फौज तेथून दुसरीकडे सरकतांच मागें राहिलेल्या चिमुकल्या शिबंदीचा मराठ्यांनीं फडशा पाडावा व मुलुख आणि किल्ले परत आपल्या ताब्यांत घ्यावे. मुसलमान जो मुलुख आपला म्हणून सांगत त्यावरच मराठेही आपला हक्क सांगत. यामुळें औरंगाबाद–दौलताबादचा टापू मोंगलांच्या ताब्यांत असला, तरी दौलताबाद–नगर यांच्या मधील टापूंतील बऱ्याचशा खेड्यांवर मराठ्यांचा अंमल चालू असे. तेथील वसूल करण्याकरितां बाळाजीला सर सुभेदार

असतांना आपल्या पदरीं हजार दोन हजार शिलेदार ठेवणें भाग पडे. औरंग-जेबाच्या प्रत्यक्ष नाकाखालीं मराठ्यांतर्फे दौलताबाद परगण्याची सर सुभेदारी करणारा बाळाजी किती धाडशी, चतुर व कर्तबगार असला पाहिजे? मराठ्यांच्या या संकटकालीं खऱ्या कर्तबगारांचें तेज दिसून आलें व त्यांचा स्वार्थत्याग कसाला लागला. येथें असतांनाच त्याला मोंगलांच्या कारभाराची माहिती झाली व अनेक मोंगल लहानमोठ्या अधिकाऱ्यांच्या व त्याच्या ओळखी झाल्या. त्यांच्या मार्फत कैदेंत असलेल्या शाहूशीं त्यानें संधान बांधलें असल्यास नवल नाहीं. त्या धामधुमीच्या काळांत बाळाजी आपल्या अधिकारामुळें अनेकांच्या उपयोगीं पडला व त्यानें अनेक मित्र जोडले. धनाजी जाधवांच्या सरंजामी व वतनी गांवांचा वसूल करण्याचें काम त्यानें पत्करलें होतें. धनाजी जाधवांप्रमाणें मराठेशाहींतील इतर अनेक सरदार व प्रधानांचीं असलीं कामें तो बिनबोभाट पार पाडी. हा दलालीचा धंदा होता, पण ह्या दलालींत फौज बाळगावी लागे, लढाया कराव्या लागत व अनेक संकटांशीं झुंज घ्यावी लागे, तेव्हां कोठें गांवचा वसूल पदरांत पडे. तो वसूलही मालकाला बंदोबस्तानें फौजफांटा बरोबर देऊन पोहोंचवावा लागे. धनाजीच्या जहागिरीचा पसारा बाळाजीनें याप्रमाणें सांभाळल्यामुळें, त्याला मुलुखगिरीवर बाराही महिने निर्वेधपणें जातां येऊं लागलें व मोंगलांचा तो उत्तरोत्तर खरपूस समाचार घेऊं लागला. बाळाजीच्या सचोटीमुळें त्याच्यावर धनाजीचा लोभ जडला, आणि ह्या दोघांची मैत्रीच पुढें शाहू छत्रपतींच्या उपयोगीं पडली.

११ मार्च १६८९ रोजीं औरंगजेबानें संभाजी महाराजांचा वध केला, व १९ ऑक्टोबर १६८९ रोजीं सूर्याजी पिसाळाच्या निमकहरामीनें व स्वामिद्रोहामुळें रायगड किल्ला मराठ्यांच्या हातून मोंगलांच्या कबजांत गेला. म्हणजे मराठ्यांची ही राजधानी केवळ पंधरा वर्षेच मराठ्यांच्या ताब्यांत राहिली. पुण्यश्लोक शिवाजी महाराजांनीं ज्येष्ठ शुद्ध १३ शके १५९६ ( ६ जून १६७४ ) रोजीं आपणांस राज्याभिषेक करून घेतला व रायगडला मराठी स्वराज्याची राजधानी केली. परंतु दुर्भाग्यानें पंधरा वर्षांनंतर राजधानी बादशहाच्या स्वाधीन झाली, आणि मराठी राज्याचा वारस छत्रपति शाहू व त्याची माता साध्वी येसूबाई मोंगलांचे कैदी झाले. शाहूचें वय त्यावेळीं पुरतें ९ वर्षांचें देखील नव्हतें. मराठी राज्याचा प्रत्यक्ष स्वामी व राजमाता हातीं लागल्यामुळें मराठी राज्य आपण जिंकलें असें औरंगजेबास प्रथम वाटलें, पण लवकरच त्याचा तो भ्रम उतरला. धनाजी जाधव व संताजी घोरपडे

या दोन मराठे सरदारांनीं बादशहाला 'त्राहि भगवन्' करून सोडलें. बादशहानें अनेक मोहिमा केल्या, अनेक मैदानी लढाया मारल्या व अनेक किल्ले सर केले. परंतु विजयाच्या दुसऱ्याच दिवशीं हातीं आलेलें फळ मराठ्यांनीं पुन्हां हिसकावून न्यावयाचें ! औरंगजेबानें जंग जंग पछाडले परंतु मराठे चेंचले गेले नाहींत; काल्पनिक मराठे स्वार बादशहाच्या फौजेंतील घोड्यांना पाणी पितांना देखील नदींत दिसून भीति दाखवूं लागले.

राणी येसूबाई व छत्रपति शाहू बादशहाच्या स्वारीबरोबरच दक्षिणेंत इकडून तिकडे सारखे फिरत असत. कारण औरंगजेबाचा कोणावर विश्वास नसल्यामुळें त्यांना आपल्यापासून दूर ठेवावयास तो भीत होता. न जाणो निसटले तर ! शाहूचें शिक्षण मौजे पुनाळ प्रांत पन्हाळा येथील पाटील जोत्याजी केसरकर याच्या देखरेखीखालीं झालें. छत्रपतीबरोबरच त्यानेंही आपखुख कैद पत्करली होती. बादशहाच्या स्वारींत ज्या विपत्ति इतरांस भोगाव्या लागल्या, त्या भोगणें शाहूच्याहि कपाळीं आलें. बादशहाची छावणी पावसानें अगदीं भिजून चिंब झाली असतां तेलाचे कांकडे पेटवून त्यावर जोत्याजीला शाहूसाठीं एकदां भात शिजवावा लागला. त्याची पुरस्कर्ती बेगम इ. स. १७०२ मध्यें मरण पावली, तरी शाहूच्या व्यवस्थेंत कमतरता पडली नाहीं. त्याला स्वास्थ्य मात्र मिळालें नाहीं. सारखी धांवपळ, सारख्या मोहिमा व सारखे बदलते मुक्काम, अशा धांदलींत शाहूचें तारुण्य गेलें. औरंगजेबाच्या स्वारींत अठरा वर्षें एकसारखें मिरवून देखील, तलवार एकदाही हातीं धरण्याची संधी त्याला मिळाली नाहीं. त्याचा राजारामाशीं अंतस्थ पत्रव्यवहार मात्र चोरून लपून सवडीनें चालत होता. १६९६ त बादशाही छावणीवर अवचित छापा घालून शाहूस सोडविण्याचा राजारामानें प्रयत्न करून पाहिला, परंतु तो फसला. या छाप्यानें बादशहा मात्र सावध झाला व त्यानें शाहूची अधिक निगराणी चालू केली. १६९९ मध्यें बादशहानें शाहूचें लग्न केलें. रुस्तुमराव जाधव यांची कन्या अंबिकाबाई, व कण्हेरखेडचे शिंदे यांची कन्या सावित्रीबाई ह्या दोन पत्न्या व विरुबाई नांवाची दासी यांच्या संगतीं शाहूचा संसार सुरू झाला. सुखोपभोग व बादशाही विलास अनुभवण्यांत तारुण्य गेल्यामुळें शाहूचा स्वभाव शांत, स्वस्थ, निर्वीर्य व ऐषआरामी बनला. राजारामाच्या व मराठे सरदारांच्या विरुद्ध शाहूचें प्यादें पुढें ढकलून महाराष्ट्रांत दुफळी माजवावयाची, आणि याप्रमाणें महाराष्ट्रांत एकदां फूट पडल्यावर, शाहूला हाताशीं धरून मराठ्यांना भाजून भरडून काढावयाचें व मराठे हतवीर्य झाल्यावर आपल्या देखरेखीखालीं

शाहूचें बावलें मराठेशाहीवर स्थापन करावयाचें, हा बाहशहाचा आंखीव डाव होता. तेवढ्याकरितांच त्यानें शाहूस इतमामानें बरोबर वागविलें होतें. मराठ्यांनीं बादशहाचा कावा ओळखून त्याचा डाव उधळून लावला. शाहूच्या नांवानें मराठे सरदारांना आज्ञापत्रें गेलीं, तरीदेखील बादशाही छावणींत तहासाठीं किंवा राजदर्शनासाठीं मराठे ढुंकून पाहीनात. निराशेनें बादशहाची कंबर खचली; दक्षिणदिग्विजयाच्या त्याच्या महत्वाकांक्षेला मूठमाती मिळाली; मराठे शिरजोर होऊन बादशाही मुलुखाची खराबी करूं लागले; त्याच्या पुत्रांत भांडणें सुरू झालीं व कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत राहिला नाहीं; पराजयानें तोंडाला काळिमा लागला व सैन्य बिथरून जाऊं लागलें. अशा विपत्तींत बाहशहा २० फेब्रुवारी १७०७ रोजीं मरण पावला.

औरंगजेबाचे मृत्यूसमयीं शाहू त्याच्या छावणींतच होता. आपली सुटका व्हावी म्हणून त्यानें उतावीळपणा दाखविला नाहीं, व अपमानास्पद अटींचा तह आपणावर लादून घेऊन त्यानें आपली सुटकाहि करून घेतली नाहीं. बादशहानें पूर्वींच एक दोन वेळां तसले प्रयत्न करून पाहिले होते, पण शाहूनें कोणत्या ना कोणत्या तरी सबबीवर ते साध्य होऊं दिले नाहींत. राजारामाबद्दल शाहूच्या मनांत अत्यादर होता व आंतून शक्य तेव्हां तो आपल्या चुलत्याशीं गुप्त खलबतें करी. परंतु बादशहाला तो असें सांगे कीं, मला राजारामाची भीति वाटते. मी त्याच्या हातीं लागलों कीं तो मला तावडतोब कैदेंत ठेवील व माझ्या पित्यानें त्याचा जो छळ केला त्याचा सूड घेईल. तेव्हां दक्षिणेंतील युद्धाचा सोक्षमोक्ष झाल्याशिवाय मला गादीवर बसविण्याची बादशहानें गर्दी करूं नये, कारण बादशहाचा आग्रहा सुटल्याबरोबर मी आपल्या काकांच्या कैदेंत पडेन, व तेथेंच मला आपलें सारें आयुष्य कंठावें लागेल. बादशहाला शाहूच्या या भाषणामुळें अंतर्यामीं गुदगुल्या होत व शाहूचें बावलें आपल्या चांगलें कच्छपीं लागलें, असें वाटे. उलट शाहू मनांत पूर्णपणें समजून होता कीं, चाललेल्या युद्धांत मराठ्यांची सरशी हटकून होणार; कारण बादशहा थकलेला व त्याचें वय झालेलें, आणि मराठे उत्साही ! बादशहाचा प्रयत्न मुलुख जिंकण्याचा तर मराठ्यांचा आत्मसंरक्षणपर ! बादशहा मुल्लांचा दास तर मराठे धर्माचे अभिमानी ! या युद्धाचा शेवट काय लागणार हें बादशहाला देखील स्पष्ट दिसूं लागलें. पण केव्हां ? फार उशीरां !

बादशहाच्या मृत्यूनंतर त्याच्या पुत्रांत लढाया सुरू झाल्या. मुलांनीं आपल्या बापाचें अनुकरण करूं नये तर कोणाचें करावें ? शिवाय बादशहाला दीर्घ आयुष्य

लाभल्यामुळें, बादशहा होण्यासाठीं उत्सुक झालेले त्याचे पुत्र त्याच्या मरणासाठीं उपासना करीत होते. बादशहा दीर्घायु होवो, हें फक्त प्रजेनें ओरडावें परंतु त्याचे पुत्र अशी देवाला प्रार्थना करतील तर विधाता त्यांच्या कपाळीं राज्यवैभव ठेवणारच नाहीं. बादशहा फार जगला म्हणजे त्याची गादी मुलाऐवजीं नातवाकडे जाण्याचा संभव फार ! बादशहाला हें दक्षिणचें युद्ध फारच महाग पडलें. हातीं फळ तर कांहीं लागलें नाहींच, पण शिवाय उत्तर हिंदुस्थानांतील धनत्तर प्रांतांचें उत्पन्न या युद्धांत वेंचावें लागलें. रयत कंगाल झाली, खजिना रिता पडला व लाखों लोक कामास आले.

बादशहानें मृत्यूच्या पूर्वी अजीमशहास माळव्याच्या सुभेदारीवर पाठविलें होतें- आपण ज्याप्रमाणें आपल्या बापास कैदेंत टाकून तो जीवंत असतांच त्याची बादशहात बळकावली, त्याप्रमाणें आपले मुलगे तर करणार नाहींतना, अशी बादशहास रात्रंदिवस विवंचना लागलेली असे. त्या भीतीनें तो अत्यंत आजारी असतांना देखील आपल्या पुत्रांना जवळ राहूं देत नसे. अजीमशहा बादशहाची छावणी सोडून वीस कोस जातो न जातो तोंच त्याला बादशहाच्या मृत्यूची बातमी लागली. तसाच तो परत आला व अहमदनगरास विधिपूर्वक गादीवर बसला. त्यानें आपल्या नांवाचीं नाणीं देखील पाडलीं. वजीर आसदखान व त्याचा पराक्रमी पुत्र झुलफिकारखान हे त्याच्याबरोबर होते. शाहूला त्यानें आपल्या ताब्यांत घेतलें व उत्तरेकडे त्याचे बंधू बादशाही बळकावूं पहात होते, त्यांचा समाचार घेण्याकरितां तो निघाला. हर्दा हंडियाजवळ नर्मदा नदी उतरून तो माळव्यांत शिरला. तेथें त्याला मराठ्यांनीं दक्षिणेंतील बहुतेक किल्ले परत काबीज केल्याची बातमी लागली. तेव्हां झुल-फिकारखानानें त्यास शाहूस सोडून देण्याची सल्ला दिली. कारण त्यामुळें मराठ्यांत दुफळी माजून त्यांचें सामर्थ्य लुलें पडेल व बादशाही नजरेखालीं बादशाही कृपेनें लहानाचा मोठा झालेला शाहू, बादशहाचा मांडलिक म्हणून दक्षि-णेंत मिंधेपणानें राज्य करील व बादशहातीचा आधार बनेल. अजीमशहाला हा सल्ला ताबडतोब पटला, कारण त्याला भाऊबंदकीच्या लढाया लढून बादशाही पचनीं पाडावयाची होती. तेव्हां दक्षिणेची उठलेली भुतावळ परभारें गाडली गेली तर बरें असें त्याला साहजिक वाटलें. शाहूनें मोंगल दरबारांतील सरदारांची मर्जी आपल्या गोड व हळुवार वागण्यानें संपादन केली होती. अठरा वर्षांत त्याला परा-क्रम दाखविण्याची संधी सांपडली नव्हती, परंतु त्यानें पराक्रम केला नसला तरी आपल्या राज्याची व मराठे मंडळाच्या मनस्थितीची आणि एकंदर दक्षिणेंतील

परिस्थितीची माहिती मात्र त्यानें मोंगल सरदारांकडून खडानखडा मिळवून ठेवली होती. त्याचा गोडा स्वभाव व त्याचें ज्ञान त्याला या वेळीं उपयोगीं पडलें. त्यानें गुजराथ, कर्नाटक, आदिलशाही व कुतुबशाही ह्यांपैकीं कांहीं मुलुख आपणांस मिळालाच पाहिजे असा हट्ट धरला. 'तुमचें पुढें वर्तन कसें काय राहतें हें पाहून तुमच्या इतर मागण्या पुरविण्यांत येतील,' असें बादशाही आश्वासन त्यास मिळालें. शाहूशीं अजीमशहानें केलेला तह बराच उदारपणाचा होता. 'तुम्ही आपणास दिल्लीच्या बादशहाचे अंकित समजून राज्य करावें. तुमची आई, संभाजीचा दासी-पुत्र मदनसिंह व बायका यांस येथेंच आम्हांपाशीं ठेवावें. तसेंच तुम्ही आपल्या राज्यास जाऊन बखेडा करणाऱ्या लोकांचें पारिपत्य करावें, आणि बादशाही मुलुखास उपद्रव देऊं नये. तुमच्या वर्तनाची हुजुर खातरजमा झाली म्हणजे तुमचीं बायकामाणसें तुम्हांकडे पाठवूं व तुम्हांस सहा सुभ्यांची चौथाई व सर-देशमुखीची सनद पाठवूं. त्याचप्रमाणें बालेघांटावरील महाल, विजापूर व दौलता-बादचे पादशाहींतील महाल, भीमा व गोदावरी यांच्यामधील निम्या बादशाही मुलखाचें, ठाणें किल्लेकोटासकट बक्षीसपत्र करून देऊं. तूर्त, 'यांचें राज्य हें बंदो-बस्तानें करतील' अशी आमच्या सुभ्यांस लिहिलेलीं पत्रें तुमच्याजवळ देतों. ते तुम्हांस मदत करतील. कर्नाटक, गोंडवण, गुजराथ, तंजावर यांचा अंमल तुम्ही पूर्वी प्रमाणें चालवावा, आणि नेहमीं बादशहाचे हुकुमांत वागून प्रसंग पडेल तेव्हां आपल्या फौजेनिशीं आम्हांस मदत करावी.' शाहूची परमपूज्य मातोश्री व इतर मंडळी बादशहानें आपणाकडे ओलीस ठेवून घेतली हें शाहूनें ओळखलें, परंतु अधिक घासाघीस करण्यांत कांहीं अर्थ नाहीं हें तो जाणून होता. आपण बादश-हावर बेभरंवसा दाखविला व आपलीं सर्व माणसें घेऊन जाण्याचा हट्ट धरला, तर बादशहाला संशय येऊन त्याचें मन फिरेल व आपली सुटका कालावधीवर लांबेल, कदाचित् दिल्लीकडील यादवीमुळें सुटका होणारदेखील नाहीं आणि स्वातंत्र्यास कायमचें किंबहुना प्राणास देखील मुकावें लागेल, असा पोक्त विचार करून मिळालें तें पदरांत टाकून शाहू तेथून सटकला. सनदापत्रें तयार होऊन त्यावर बादशाही मोर्तब होऊन, तीं त्याच्या हातीं पडेतोंपर्यंत देखील त्यानें वाट पाहिली नाहीं. जोत्याजी केसरकर यास सनदांसाठीं मागें ठेवून त्यानें तावडतोब दक्षि-णचा मार्ग धरला.

एप्रील १७०७ मध्यें शाहू एकदांचा स्वतंत्र झाला. अठरा वर्षांनंतर त्याच्या मागची मोंगलांची नजरकैद एकदांची चुकली. तो मराठ्यांचा नामधारी छत्रपति तर

केव्हांपासूनच होता. परंतु त्याचें राजेपण कल्पनासृष्टींतून सत्यसृष्टींत यावयाचें होतें. त्याच्या समोर हजारों अडचणी 'आ' वासून उभ्या होत्या. त्याला अनुभव नव्हता व तडफ नव्हती. बिचाऱ्याचा काय दोष ? त्याचें सर्व तारुण्य मोंगलांच्या कैदेंत गंजलें. तो शहाणा होता, परंतु त्याचें शहाणपण केवळ पुस्तकी होतें. अशा संकटकालीं कोकणांतील श्रीवर्धनच्या प्रतिष्ठित देशमुख घराण्यानें त्याला हात दिला. मराठेशाहीच्या विपत्कालीं स्वपराक्रमानें सभासद, व सरसुभेदार अशा महत्वाच्या पदावर चढलेल्या अनुभवी, तेजस्वी व वजनदार बाळाजी विश्वनाथ भटानें त्याचा पाठपुरावा केला, व म्हणूनच भटांचें मूळचें कर्तबगार व प्रतिष्ठित घराणें उदयोन्मुख होऊन वैभवास चढलें. या त्यांच्या पुण्याईवर खुश होऊनच प्रभाकर शाहीरानें त्यांच्या वंशाविषयीं असे गौरवास्पद उद्गार काढले—

**"श्रीमंत ईश्वरी अंश धन्य तो वंश परमपुरुषार्थी । बरोबरी त्यांची कोण करिल पहातार्थी ॥ ध्रु० ॥**

**राजाधिराज महाराज, गरीब नवाज, धनी श्रीमंत । भासती सदैव देव आमचे हेच भगवंत ॥ पाषाण धातुच्या मूर्ती, धरत्रीवरती, आहेत अनंत । त्या पूज्य परंतु नाहींत प्रगट जीवंत ॥ तसे नव्हेत हे तर देव, कलिमध्यें भूदेव, ब्राह्मण संत । त्या वंशीं पेशवे झाले सबळ बळिवंत ॥ ( चाल ) ॥ योग्यतेस आणिले पंत होऊनिया कृपावंत, त्या राजांनीं. ह्या मुळेंच चढती कमान धरुनी अभिमान ............॥ मग बहिरोपंत सोडवून, बिडी तोडवून, प्रभुच्या पणज्यांनीं ॥ ( चाल पहिली ) ॥ पुढें प्रधानपद मिळवून, वैरी पळवून मारिल्या शर्थी ॥ श्रीमंत० ॥ १**

**राव बाजी पुण्यामध्यें येऊन, हातावर घेऊन, निघाले शीर । प्रारंभीं पाहिलें जनस्थान रघुवीर ॥ नेमाड माळवा मुलूख, करून सरसलूख, मोडिले वीर । मेवाडचे राजे न धरती धीर ॥ गढमंडळ बुंदेलखंड, डंघईत अखंड राहून थंड, सही केलें । प्रतापें करून या जगांत नांव मिळविलें ॥ ( चाल ) बुडवुनि या बहाद्दरास, आणिली घरास, माषुक मस्तानी । दरवर्षीं धौशा घालून, जावें चालून, अघाडीस मस्तानी ॥ शह दिला नगर थेटपास खु.............. । ................ ॥ ( चाल पहिली ) ॥ उपरांत नर्मदा कांठीं, सार्थका-**

साठीं, मोक्षकार्यार्थी । देह समर्पिला त्या स्थानीं याच भावार्थी ॥ श्रीमंत० ॥ २

तेची दुनियेमाजी धन्य न मानी अन्य, वंदिती स्वामी । जीव खर्चे कराया सिद्ध धन्याच्या कामीं ॥ तीन वर्षे राज्य वसवून, मोर्चे वसवून, सभोंवते धमामी । सुरुंगांनीं पाडिला अलगत बुरुज बदामी ॥ हल्ल्यांत उडाले लोक, करिती शोक, पडून संग्रामीं । नऊ लक्ष बांगडी फुटली वसई मुक्कामीं ॥ (चाल) ॥ बक्षीस दिले कडितोडे, पालख्या घोडे, वाजे चौघडे, जमीनदाऱ्या । ठायीं ठायीं दिमती भरभरून, आंख ठरवून, सजीवल्या सरदाऱ्या । परशत्रू होईना खाक वांटूनी परख, तशाच हवालदाऱ्या ॥ (चाल पहिली) ॥ खूब केली तुम्हीं तलवार, नांवनिशीवार, म्हणून किती प्रार्थी । यशस्वी होता तो संवत्सर सिद्धार्थी ॥ श्रीमंत० ॥ ३

बाळाजी बाजीराव प्रधान, केवळ निधान, होते प्राणी । आणिलें पुण्यांत जपानी नळाचें पाणि ॥ युद्धांत जिंकुन नबाब, बसविली बाब, करून धूळधाणी । त्या सालींच बंगाल्यांत घातलीं ठाणीं ॥ (चाल) ॥ लागलेंच केलें कूच, स्वारी दरकूच, परतली सगळयांची । लष्करांत केवढा गजर, होई नित्य नजर, मोतींमणिपोंवळयांची ॥ वांटून खिचडी रमण्यांत, आनंदें पुण्यांत, मोहरा पुतळयांची ॥ (चाल पहिली) ॥ खुष केले शास्त्रीपंडीत, विद्यामंडित, विप्र विद्यार्थी । गेले कीर्त गात ते ब्राह्मण तीर्थोतीर्थी ॥ श्रीमंत० ॥ ४

शत्रूस न जाती शरण, आल्या जरी मरण, न देती पाठ । दादाही गणावा त्यांत, बाण भात्यांत, भाताचें ताट ॥ भलत्याच ठिकाणीं घाली रिपुशीं गांठ । तिन्ही काळ निरंतर साधी, जातीनें बांधी, हत्यारें आठ ॥ (चाल) ॥ फेडून नवस माहोरास, केले लाहोरास, जिंकीत शेंडे । अरे जपानी सहज अटकेंत, पाव घटकेंत, लाविले झेंडे ॥ सरदार पदरचे कसे, कोणी सिंह जसे, कोणी शार्दुल गेंडे ॥ (चाल पहिली) ॥ पुढें चाले वीरांचा भार, घेती करभार, स्वामी कार्यार्थी । हे पुरुष म्हणावे श्रेष्ठ बंधुचे स्वार्थी ॥ श्रीमंत० ॥ ५

**भाऊसाहेब योद्धा थोर, अंगामध्यें जोर, पुरा धैर्याचा । विश्वास-रावही तो तसाच शौर्याचा ॥ दोहों बाजूस भाला दाट, पलिटेना वाट, अशा पर्यांचा । किंचित पडेना प्रकाश वर सूर्याचा ॥ दृष्टांत किती कवि भरील, काय स्तव करील, ऐश्वर्याचा । शेवटीं बिघडला बेत सकल कार्याचा ॥** ( चाल ) **॥ कितीकांचीं बसलीं घरेंच, हें तर खरेंच, ईश्वरी कृत्य । शोकार्णवीं नाना पडून, नित्य रडरडून, पावले मृत्य । कवि गंगु हैबती दीन, पदांबुजीं लीन, कृपेंतील भृत्य ॥** ( चाल पहिली ) **॥ महादेव प्रभाकर ध्यायी, सदा गुण गाई, यथा साह्यार्थी । श्रीमंत प्रभूची कीर्त जशी भागीरथी ॥ श्रीमंत० ॥ ६"**

प्रभाकर मोठा वस्ताद खरा. पेशवे वंशावर पोवाडा रचला पण तो अर्धाच. ज्या दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत त्यानें तो रचला, त्याच्यापर्यंत तो येऊं न दिल्यामुळें सत्याचा आब राहिला.

---

प्रकरण ३ रें

## पित्याचा पराक्रम



पराक्रम व्यक्तीच्या व कुलाच्या गौरवाला कारणीभूत होत असला, तरी त्या पराक्रमाला सत्याचा व स्वदेशाभिमानाचा पाठिंबा अवश्य असतो. चोर व लुटारू यांच्या पराक्रमाचें व धाडसाचें कोणीहि कौतुक करीत नाहीं, आणि देशद्रोह्यांच्या कपाळीं फुलांच्या ऐवजीं शिव्यांची बरसात होते. पराक्रमाला स्वार्थत्यागाची भूमिका नसली तर तो वांझोटा ठरतो. मराठ्यांनीं ज्या स्वार्थत्यागाच्या बळावर श्री शिवछत्रपतीच्या आधिपत्याखालीं मराठी स्वराज्य स्थापन केलें व शिवछत्र-पतींच्या मृत्यूनंतर औरंगजेबाशीं जो पाव शतक प्रचंड संग्राम केला, तो स्वार्थ-त्याग वतनांच्या मोहांत गुंतून पडला. ज्या धनाजी जाधवांनीं व संताजी घोर-पड्यांनीं महाराष्ट्राची अब्रू विपत्कालीं रक्षण केली, त्यांनींच आपापसांत यादवी मांडली. जे मित्र खांद्यास खांदा लावून बरोबरीनें परकीय शत्रूशीं शौर्यानें झुंजले, तेच एकमेकांचे गळे कापण्यास उद्युक्त झाले. स्वार्थ बळावला आणि वतनाच्या लोभासाठीं स्वराज्य व स्वधर्म तुच्छ लेखले गेले. शिवाजी महाराजांची मृत्युकाळची

इच्छा कीं, संभाजीपेक्षां राजाराम अधिक लायक असल्यामुळें तो गादीवर बसला तर बरें; संभाजीनें आपल्या अल्प कारकीर्दींत त्याच्या आईला भिंतींत चिणून मारून त्याला कैदेंत टाकलें व त्याची अप्रतिष्ठा केली; मराठी राज्यावर संकट कोसळलें तेव्हां राज्याला कोणी तरी स्वामी असावा व झुंजणाऱ्या मराठ्यांना पुढारी लाभावा म्हणून, सरदारांनीं राजारामाला गादीवर बसण्याविषयीं पराकाष्ठेचा आग्रह केला. परंतु तो मोह दूर सारून व वैयक्तिक महत्वाकांक्षेवर तिलांजलि देऊन त्या **शांत पुण्यश्लोक महाभागानें,** गादीचा खरा वारस मोंगलांच्या कैदेंत असलेला संभाजीचा मुलगा शाहू हें जाणून, **पुढारींपणाचें निदर्शक असें मंचकारोहण केलें, सिंहासनारोहण केलें नाहीं.** मुडाच्या क्षुद्र भावनेला वश होऊन कैदेंत पडलेल्या शाहूचा न्याय्य हक्क हिरावून घेण्याची बुद्धि त्यास झाली नाहीं. तो कोणाच्या आग्रहाला वश झाला नाहीं, मुत्सद्यांच्या तर्कशास्त्राकडे त्यानें पाहिलें नाहीं, व अंतर्भरांतील शब्दांचा सतत होणारा आणि प्रेमाश्रूंनीं बळावलेला मार, त्यानें पाठमोरा होऊन चुकविला, पण सत्पक्ष सोडिला नाहीं. दुसरे लोक हक्क नसला तर खून करून व रक्ताचे पाट वाहवून राजे बनण्याचा प्रयत्न करतात; परंतु या नरश्रेष्ठानें घरांत आयतें चालून आलेलें राज्य न्यायाला मान देऊन दूर लोटलें. अतिश्रमानें या थोर व शांत पुरुषास रक्ताच्या उलट्या होऊन १७०० सालच्या मार्च महिन्यांत मृत्यु आला. मृत्युसमयीं त्याचें वय अवघें ३९ वर्षांचें होतें.

राजारामाच्या चौघी बायकांपैकीं धाकटी अंबिकाबाई विशाळगडावर होती ती सती गेली. हंबीरराव मोहिते यांची कन्या ताराबाई व कागलकर घाटग्यांची कन्या राजसबाई यांना प्रत्येकीं एकेक मुलगा होता. या मुलांचीं नांवें शिवाजी व संभाजी अशीं ठेवलेलीं होतीं. ताराबाईचा मुलगा शिवाजी राजारामाच्या मृत्युसमयीं दहा वर्षांचा व संभाजी केवळ तीन वर्षांचा होता. राजसबाई व तिचा मुलगा संभाजी यांना कैदेंत टाकून आपल्या मुलाच्या नांवानें ताराबाईनें राज्यकारभार सुरू केला. राजारामानें मरतांनासुद्धां शाहूस मोंगलांच्या कैदेंतून सोडवून गादी-वर स्थापण्यास आज्ञापिलें. परंतु त्याची ही अखेरची इच्छादेखील गुंडाळून ठेवून व शाहूचा गादीवरील हक्क बुडवून, शिवाजीस गादीवर बसविण्याची घटना तारा-बाईनें पुढें केली व ती सरदारांवर बळेंच लादली. रामचंद्रपंतास ही गोष्ट आवडली नाहीं, पण सत्तेपुढें शहाणपण फारसें चालत नाहीं. शाहू कैदेंत असल्यामुळें तारा-बाई व शिवाजी यांचें तात्पुरतें पुढारीपण व राज्यपद सर्व मराठे सरदारांना मान्य होतें; पण शाहू व त्याची माता यांनीं भोगलेली विपत्ति आणि संभाजी

महाराजांनीं धर्मासाठीं केलेला प्राणत्याग या गोष्टी मराठे सरदार विसरले नव्हते. त्यामुळें शाहूचा न्याय्य हक्क बुडविणें कोणासच रुचेना. पण ताराबाई जितकी पराक्रमी व हिंमतबाज होती तितकीच ती फाजील महत्वाकांक्षी, दीर्घद्वेषी व स्वार्थसाधु होती. मराठे मंडळांत तिनें दुहीचें बीज पेरलें, आणि तेंच बीज अखेरीस मराठेशाहीच्या नाशाला कारणीभूत झालें. शाहू कैदेंतून सुटला नव्हता तोंपर्यंत तिची धडाडी व कर्तबगारी राष्ट्राला पोषक झाली, परंतु शाहू कैदेंतून सुटल्यानंतर देखील त्या स्वार्थी व कपटी महामायेनें त्याला प्रथम तोतया ठरविण्याचा प्रयत्न केला, नंतर तें साधलें नाहीं म्हणून त्याच्याशीं झुंज घेऊन त्याला पकडून कैद करण्याचें ठरविलें, आणि तेंहि साधलें नाहीं तेव्हां स्वराज्यांत यादवी माजविली व अखेरीस मुसलमानांचें देखील साहाय्य मागून एका राज्याचीं दोन छकलें करविलीं. हिंदुस्थानांत खासगी व्यक्तींना व त्यांच्या मिळकतीला हिस्सेरशीच्या वांटपाचा कायदा लागत असला, तरी राजांच्या व राज्यांच्या बाबतींत वडीलकीचा वारस न्याय (Law of primogeniture) लागू पडतो. राज्याचे वांटे होत नसतात. हा न्याय हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती अशा सर्व धर्मांच्या राजांना लागू आहे. इंग्लंडांत तर सर्वच वतनांचें रक्षण व्हावें व त्यांची विभागणी होतां होतां तीं समूळ नष्ट होऊं नये, म्हणून सरदारांना देखील हाच कायदा लावतात. म्हणजे गादीचा वारसा फक्त वडील मुलाकडे किंवा थोरल्या शाखेकडे येतो. शिवाजी महाराजांचा थोरला पुत्र संभाजी व त्याचा पुत्र शाहू असल्यामुळें गादीवर सर्वस्वी त्याचाच हक्क होता. तो येतांच गादीवर त्याला बसविणें हेंच प्रत्येकाचें कर्तव्य होतें. परंतु हा पूर्वापार राजकीय न्याय व कायदा पायाखालीं केवळ स्वार्थी भावनेनें तुडवून, शाहूशीं टक्कर देण्याची ताराबाईनें तयारी केली. सेनापति धनाजी जाधवाला मोठ्या फौजेनिशीं तिनें शाहूवर चालून जाण्यास फर्माविलें. तिच्या नवऱ्यानें संभाजीच्यामागें मराठेशाहीचें रक्षण केलें व त्याच्या मृत्यूनंतर खास तिनें देखील सात वर्षें औरंगजेबाशीं यशस्वी झुंज घेतली, या सबबीवर ताराबाईचे पक्षपाती तिच्या अघोरी व अन्याय्य वर्तनाचें समर्थन करूं पाहतात. पण केवळ मंचकारोहण करणाऱ्या व शेवटपर्यंत शाहूच्या सुटकेचा निजध्यास घेणाऱ्या राजारामाचें उदाहरण व त्याची अखेरची आज्ञादेखील तिला सन्मार्गावर आणण्यास समर्थ झाली नाहीं. स्वार्थ, सत्ता व सूड, या तीन सकारांनीं तिचें मन विषारी बनलें होतें. न्यायान्याय व पापपुण्य तिच्या खिजगणतींत उरलें नाहीं. वाटेल तो अनाचार व अत्याचार करण्यास ती सिद्ध झाली. तिचा स्वार्थ समर्थनीय मानला, तर त्याच

तर्कशास्त्राच्या जोरावर कोणत्याही बालराजाच्या अज्ञानावस्थेंत, त्याच्या प्रधा-
नांनीं कर्तबगारीच्या मुद्यावर त्याची गादी बळकावणें व त्याच्या हातीं चौपदरी
देणें रास्त ठरेल. एखादा मुलगा अज्ञान व परदेशांत असतां त्याची इस्टेट त्याच्या
काकानें अत्यंत प्रामाणिकपणें जतन करून वाढविली, तर त्या काकाच्या पुण्याईचा
मोबदला म्हणून त्याच्या मुलाला त्या इस्टेटीचें बक्षीसपत्र द्यावें, व मूळ मालक
सज्ञान होऊन वाटा मागूं लागला म्हणजे त्याच्या हातीं धुपाटणें द्यावें, हें तर्कशास्त्र
'मऱ्हाठेशाही'लाच शोभेल, इतरांना नाहीं. म्हणून गादी बळकावणें (usurpation)
हा गुन्हाच ठरूं शकणार नाहीं. कारण जो कर्तबगार असेल तोच ती बळकावूं
शकेल. येरा गबाळ्याचें तें काम नव्हे.

मराठे सरदारांच्या न्यायप्रियतेमुळें तिचे दुष्ट हेतू तडीस मात्र जाऊं शकले
नाहींत. शाहू मोंगलांच्या कैदेंत वाढला असला तरी त्याला स्वराज्याविषयीं व धर्मा-
विषयीं अत्यादर होता. मुसलमान सरदारांचीं मनेंहि त्याला अनुकूल होतीं. औरं-
गजेबाच्या छावणींत असतांना मुसलमान सरदारांशीं झालेल्या त्याच्या ओळखी
त्याला या वेळीं कामीं पडल्या. त्यानें मोंगलांची ताबेदारी स्वीकारून दक्षिणेंत प्रवेश
केला, म्हणून त्याला दोष देण्यांत किंवा हीन लेखण्यांत अर्थ नाहीं. जयसिंगानें दक्षिणेंत
जेव्हां स्वारी केली व थोरल्या महाराजांचा सारखा पराभव होऊं लागला, त्या संकट-
काळीं त्यांनीं देखील मोंगल बादशाहाची तत्पुरती मनसबदारी पत्करून [illegible] प्रमाण
केलें. राजकारणी पुरुषांस हे सर्व रंगढंग खेळावे लागतात व वेळ पाहून वर्तावें
लागतें. शाहूनें आपली सुटका व्हावी म्हणून ताबेदारी पत्करून वेळ मारून नेली,
म्हणून त्यालाच दोष कां द्यावा? शाहू हें लाडकें नांव त्याला औरंगजेबानें दिलें होतें
खरें, परंतु त्याबरोबरच त्याचें शिवाजी हें जुनें नांवहि प्रचारांत होतें. ज्यांना शाहू
नांवाची चीड होती त्यांनीं त्याला शिवाजी म्हणून संबोधावयाचें होतें; त्यांना
कोण मनाई करीत होतें? परंतु शाहूच्या न्याय्य हक्काविषयीं अशा फुसक्या
सबबीवर प्रतारणा कशी करतां येणार? असें तर्कट लढवून त्याचा न्याय्य हक्क
कसा बुडवितां येणार? ताराबाईचें स्वपक्षसमर्थन कोणालाच पटलें नाहीं; कारण
त्यांत राम नव्हता. एकामागून एक सरदार तिचा पक्ष सोडून शाहूस जाऊन मिळूं
लागले. तिचें समर्थन जर तिच्या नवऱ्याचा व तिचा पराक्रम प्रत्यक्ष पाहिलेल्या
मराठे सरदारांनाच पटलें नाहीं, तर आजच्या पिढीला तें कसें रुचणार? व कसें
पटणार? राजारामाच्या पराक्रमाचा मोबदला म्हणून त्याच्या मुलाला गादी
द्यावयाची, तर संभाजीनें स्वधर्माकरितां केलेल्या प्राणार्पणाचें मोल त्याच्या मुलाला

महाराजांनीं धर्मासाठीं केलेला प्राणत्याग या गोष्टी मराठे सरदार विसरले नव्हते. त्यामुळें शाहूचा न्याय्य हक्क बुडविणें कोणासच रुचेना. पण ताराबाई जितकी पराक्रमी व हिंमतबाज होती तितकीच ती फाजील महत्वाकांक्षी, दीर्घद्वेषी व स्वार्थसाधु होती. मराठे मंडळांत तिनें दुहीचें बीज पेरलें, आणि तेंच बीज अखेरीस मराठेशाहीच्या नाशाला कारणीभूत झालें. शाहू कैदेंतून सुटला नव्हता तोंपर्यंत तिची धडाडी व कर्तबगारी राष्ट्राला पोषक झाली, परंतु शाहू कैदेंतून सुटल्यानंतर देखील त्या स्वार्थी व कपटी महामायेनें त्याला प्रथम तोतया ठरविण्याचा प्रयत्न केला, नंतर तें साधलें नाहीं म्हणून त्याच्याशीं झुंज घेऊन त्याला पकडून कैद करण्याचें ठरविलें, आणि तेंहि साधलें नाहीं तेव्हां स्वराज्यांत यादवी माजविली व अखेरीस मुसलमानांचें देखील साहाय्य मागून एका राज्याचीं दोन छकलें करविलीं. हिंदुस्थानांत खासगी व्यक्तींना व त्यांच्या मिळकतीला हिस्सेरशीच्या वांटपाचा कायदा लागत असला, तरी राजांच्या व राज्यांच्या बाबतींत वडीलकीचा वारस न्याय ( Law of primogeniture ) लागू पडतो. राज्याचे वांटे होत नसतात. हा न्याय हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती अशा सर्व धर्मांच्या राजांना लागू आहे. इंग्लंडांत तर सर्वच वतनांचें रक्षण व्हावें व त्यांची विभागणी होतां होतां तीं समूळ नष्ट होऊं नये, म्हणून सरदारांना देखील हाच कायदा लावतात. म्हणजे गादीचा वारसा फक्त वडील मुलाकडे किंवा थोरल्या शाखेकडे येतो. शिवाजी महाराजांचा थोरला पुत्र संभाजी व त्याचा पुत्र शाहू असल्यामुळें गादीवर सर्वस्वी त्याचाच हक्क होता. तो येतांच गादीवर त्याला बसविणें हेंच प्रत्येकाचें कर्तव्य होतें. परंतु हा पूर्वापार राजकीय न्याय व कायदा पायाखालीं केवळ स्वार्थी भावनेनें तुडवून, शाहूशीं टक्कर देण्याची ताराबाईनें तयारी केली. सेनापति धनाजी जाधवाला मोठ्या फौजेनिशीं तिनें शाहूवर चालून जाण्यास फर्माविलें. तिच्या नवऱ्यानें संभाजीच्यामागें मराठेशाहीचें रक्षण केलें व त्याच्या मृत्यूनंतर खास तिनें देखील सात वर्षें औरंगजेबाशीं यशस्वी झुंज घेतली, या सबबीवर ताराबाईचे पक्षपाती तिच्या अघोरी व अन्याय्य वर्तनाचें समर्थन करूं पाहतात. पण केवळ मंचकारोहण करणाऱ्या व शेवटपर्यंत शाहूच्या सुटकेचा निजध्यास घेणाऱ्या राजारामाचें उदाहरण व त्याची अखेरची आज्ञादेखील तिला सन्मार्गावर आणण्यास समर्थ झाली नाहीं. स्वार्थ, सत्ता व सूड, या तीन सकारांनीं तिचें मन विषारी बनलें होतें. न्यायान्याय व पापपुण्य तिच्या खिजगणतींत उरलें नाहीं. वाटेल तो अनाचार व अत्याचार करण्यास ती सिद्ध झाली. तिचा स्वार्थ समर्थनीय मानला, तर त्याच

तर्कशास्त्राच्या जोरावर कोणत्याही बालराजाच्या अज्ञानावस्थेंत, त्याच्या प्रधानांनीं कर्तबगारीच्या मुद्यावर त्याची गादी बळकावणें व त्याच्या हातीं चौपदरी देणें रास्त ठरेल. एखादा मुलगा अज्ञान व परदेशांत असतां त्याची इस्टेट त्याचा काकानें अत्यंत प्रामाणिकपणें जतन करून वाढविली, तर त्या काकाच्या पुण्याईचा मोबदला म्हणून त्याच्या मुलाला त्या इस्टेटीचें बक्षीसपत्र द्यावें, व मूळ मालक सज्ञान होऊन वाटा मागूं लागला म्हणजे त्याच्या हातीं धुपाटणें द्यावें, हें तर्कशास्त्र 'मऱ्हाठेशाही'लाच शोभेल, इतरांना नाहीं. म्हणून गादी बळकावणें (usurpation) हा गुन्हाच ठरूं शकणार नाहीं. कारण जो कर्तबगार असेल तोच ती बळकावूं शकेल. येरा गबाळ्याचें तें काम नव्हे.

मराठे सरदारांच्या न्यायप्रियतेमुळें तिचे दुष्ट हेतू तडीस मात्र जाऊं शकले नाहींत. शाहू मोंगलांच्या कैदेंत वाढला असला तरी त्याला स्वराज्याविषयीं व काकाविषयीं अत्यादर होता. मुसलमान सरदारांचीं मनेंहि त्याला अनुकूल होतीं. औरंगजेबाच्या छावणींत असतांना मुसलमान सरदारांशीं झालेल्या त्याच्या ओळखी त्याला या वेळीं कामीं पडल्या. त्यानें मोंगलांची ताबेदारी स्वीकारून दक्षिणेंत प्रवेश केला, म्हणून त्याला दोष देण्यांत किंवा हीन लेखण्यांत अर्थ नाहीं. जयसिंगानें दक्षिणेंत जेव्हां स्वारी केली व थोरल्या महाराजांचा सारखा पराभव होऊं लागला, त्या संकटकाळीं त्यांनीं देखील मोंगल बादशाहाची तत्पुरती मनसबदारी पत्करून दिल्लीकडे प्रयाण केलें. राजकारणी पुरुषांस हे सर्व रंगढंग खेळावे लागतात व वेळ पाहून वर्तावें लागतें. शाहूनें आपली सुटका व्हावी म्हणून ताबेदारी पत्करून वेळ मारून नेली, म्हणून त्यालाच दोष कां द्यावा? शाहू हें लाडकें नांव त्याला औरंगजेबानें दिलें होतें खरें, परंतु त्याबरोबरच त्याचें शिवाजी हें जुनें नांवहि प्रचारांत होतें. ज्यांना शाहू या नांवाची चीड होती त्यांनीं त्याला शिवाजी म्हणून संबोधावयाचें होतें; त्यांना कोण मनाई करीत होतें? परंतु शाहूच्या न्याय्य हक्काविषयीं अशा फुसक्या सबबीवर प्रतारणा कशी करतां येणार? असें तर्कट लढवून त्याचा न्याय्य हक्क कसा बुडवितां येणार? ताराबाईचें स्वपक्षसमर्थन कोणालाच पटलें नाहीं; कारण त्यांत राम नव्हता. एकामागून एक सरदार तिचा पक्ष सोडून शाहूस जाऊन मिळूं लागले. तिचें समर्थन जर तिच्या नवऱ्याचा व तिचा पराक्रम प्रत्यक्ष पाहिलेल्या मराठे सरदारांनाच पटलें नाहीं, तर आजच्या पिढीला तें कसें रुचणार? व कसें पटणार? राजारामाच्या पराक्रमाचा मोबदला म्हणून त्याच्या मुलाला गादी द्यावयाची, तर संभाजीनें स्वधर्माकरितां केलेल्या प्राणार्पणाचें मोल त्याच्या मुलाला

द्यावयास नको काय ? कीं ताराबाईच्या अधिकारलालसेला शरण जाऊन त्याचा न्याय्य हक्क मारावयाचा ? मराठे सरदारांनीं शाहूचा पक्ष उचलण्याचें ठरविलें तें योग्यच होतें. कारण त्याचा सत्पक्ष होता. या प्रसंगीं त्याला खंडोबल्लाळ व बाळाजी विश्वनाथ यांची अमोलिक मदत झाली. त्यांनीं शाहूचा सत्पक्ष जाणून सरदारांचीं मनें शाहूकडे वळविलीं व नव्या मालकाशीं त्यांची रुजवात करून दिली. बरेचसे सरदार त्यामुळें शाहूकडे वळले. सेनापति धनाजी जाधव अनुकूल झाल्यामुळें खेडची लढाई शाहूला सहज जिंकतां आली. शाहूनें या वेळीं फारच धोरण दाखविलें. प्रथम त्यानें गोदेच्या वर राहूनच सरदारांच्या भेटी गांठी घेतल्या, व आपण तोतया नसून गादीचे खरे वारस आहोंत अशी सर्वांची खातरजमा करून दिली. निरनिराळ्या अधिकाऱ्यांना शेकडों पत्रें लिहिलीं, हुकुमनामे काढले, वतनें दिलीं व जुनीं कायम केलीं, तंटे तोडले व आपली छाप सर्वांवर बसविली. परिपूर्ण तयारी होईतोंपर्यंत भीमेच्या अलीकडे येण्याची त्यानें घाई केली नाहीं. खेडच्या लढाई-नंतर एक महिन्याचे आंत साताऱ्यास जाऊन तो किल्ला त्यानें सर केला व अष्ट-प्रधानांच्या नेमणुका करून कारभाराला सुरवात केली. १२ जानेवारी १७०८ रोजीं शाहूस विधिपूर्वक राज्याभिषेक झाला. खंडोबल्लाळाकडे त्याची वंशपरंपरागत चिटणीशी ठेवण्यांत आली व बाळाजी विश्वनाथास अमात्याचे मुतालीक नेमण्यांत आलें. बाळाजीनें गोळा केलेल्या द्रव्याचा व सेनेचा शाहूस विशेष उपयोग झाल्यामुळें सेनाकर्ते हें पदहि पुढें लवकरच बाळाजीस मिळालें.

ताराबाईनें यानंतर राज्यांत जी भाऊबंदकी आरंभिली ती महाराष्ट्रास अखेर-पर्यंत भोंवली. शाहूचे सरदार ताराबाईनें फोडावे व ताराबाईकडील अधि-कारी शाहूनें आपल्याकडे वळवावे. दोघांचे परस्परांविरुद्ध प्रजेला हुकूम एकसारखे सुटत असल्यामुळें, खरोखर कोणाचें ऐकावें व कसें वागावें हें प्रजेस कळेना. राज्याचा बंदोबस्त ढिला झाला, वसूल नीट येईना व सैन्यांत शिस्त राहिना. राज्यकारभारांत गोंधळ माजला. प्रत्येक सरदार व प्रधान आपल्या पोळीवर तूप ओतण्याचा प्रयत्न करूं लागला. पुंडांचें चांगलेंच फावलें. राज्यांतील अधिकारी नेहमीं साशंक राहून दोन्हीकडे संधान ठेवीत; कारण या यादवीचा शेवट कसा-ही झाला व कोणताही पक्ष यशस्वी झाला, तरी आपल्या पोळीवरील वतनदा-रीचें तूप कमी होऊं नये ही प्रत्येकाची इच्छा. दरबारांतील मसलती यामुळें गुप्त राहिनाशा झाल्या व राजकारण षट्कर्णी होऊं लागलें. षट्कर्णी होणारें राजकारण यशस्वी कसें व्हावें ? ह्या दुटप्पी व दुतोंडी लोकांच्या बाजारांत कोणावर विश्वास

ठेवावा व कोणावर ठेवूं नये, हें कळेनासें झालें. त्यामुळें बाळाजीसारख्या चाणाक्ष, कर्तबगार व एकनिष्ठ सेवकावर शाहूचा विश्वास अधिकाधिक जडत चालला. बाळाजीच्या सल्ल्याशिवाय शाहूचें पान हालेनासें झालें. शाहूपाशीं बाळाजींचें वाढतें वजन पाहून इतर सरदारांच्या पोटांत मत्सराचा गोळा उठूं लागला. परंतु शाहूची एकनिष्ठ सेवा करून त्याचा विश्वास संपादन करण्याचा सरळ मार्ग टाकून, त्या मत्सरग्रस्त सरदारांनीं फंदफितुरी व विश्वासघाताचा वांकडा मार्ग धरला. सत्याचा जय होतो व अन्यायी रसातळास जातात, हा ईश्वरी न्याय आहे.

मोंगल घराण्यांतील पुरुषांप्रमाणें शाहू क्रूर वृत्तीचा नव्हता. गादीला वारसा सांगणारे भाऊबंद त्यानें ठार मारले नाहींत. तसें करणें त्याला फारसें कठीण नव्हतें. पण राजारामानें संभाजीच्या मागें किती सायासानें मराठ्यांची अब्रू सांभाळली हें त्याला माहीत होतें. म्हणून त्यानें ताराबाईच्या स्वार्थी व राष्ट्रघातकी वर्तनाकडे कानाडोळा केला; इतकेंच नव्हे, तर मोठ्या औदार्यानें कोल्हापूरचें राज्य ताराबाईकडे राहूं दिलें व शिवाजीचा पिच्छा पुरविला नाहीं. याप्रमाणें कोल्हापूरचें स्वराज्यद्रोही संस्थान निर्माण झालें. अन्याय व स्वार्थ या पायावर त्याची उभारणी झाली व फंदफितुरीवर तें पोसलें गेलें. घरांतील मुलाबाळांत राज्याचे तुकडे पाडून ते वांटून देण्याचें धोरण अमलांत आणलें तर एकही राज्य चारदोन पिढ्यांपलीकडे टिकणार नाहीं. मोठ्या थोरल्या बादशाहीच्या देखील अशा वांटण्यांनीं दहापांच पिढ्यांत क्षुद्र पाटीलक्या निर्माण होतील. राजे लोक निपुत्रिक राहिले तर गोष्ट निराळी. ताराबाईला मदत करणाऱ्या राजद्रोही व विश्वासघातकी प्रधानांना व सरदारांनाहि शाहूनें दयाशीलपणें वागविलें. शाहूच्या या गोड्या स्वभावामुळें त्याला अजातशत्रु हें नांव मिळालें, आणि त्याच्या दयाशील गुणानें राज्यांतील शिस्त बिघडली तरी राज्याला वळकटी आली व त्याची लोकप्रियता वाढली.

१७०७ च्या जून महिन्यांत अजीमशहा मारला जाऊन बहादुरशहा बादशाहा झाला. त्याच्या विरुद्ध त्याचा धाकटा भाऊ कामबक्ष यानें दक्षिणेंत बंड उभारलें व विजापुरास बादशाही पद धारण करून आपल्या नांवाचीं नाणीं पाडविलीं. हें बंड मोडण्याकरितां बादशहा दक्षिणेंत चालून आला व त्यानें शाहूची मदत मागितली. शाहूनें दहा हजार फौजेनिशीं नेमाजी शिंद्यास बहादुरशहाच्या मदतीस पाठविलें. ९ जानेवारी १७०९ रोजीं मोठी मातबर लढाई होऊन कामबक्षाचा

शेवट झाला. ह्या मदतीबद्दल बादशहानें मराठ्यांचा गौरव केला; तेव्हां ही संधी साधून शाहूनें आपल्या वकिलामार्फत सरदेशमुखीच्या सनदा मागितल्या. बादशहा व झुलफिकारखान शाहूच्या मागणीस अनुकूल होते. परंतु ताराबाईनें भाऊबंदकी साधल्यामुळें हा डाव फुकट गेला. तिनें त्या सनदांवर आपला हक्क सांगितला व आपल्या हस्तकांकरवीं त्यांची मागणी करून शाहूच्या हक्कास विरोध केला. तेव्हां बादशाही दरबारनें धूर्तपणानें ती शाहूची रास्त मागणी फेंटाळून लावली. 'तुम्ही आपसांत लढून आपल्या घरगुती भांडणाचा निकाल लावा व नंतर विजयी पक्षास आम्ही सनदा देऊं,' असा निरोप देऊन त्यानें दोन्ही पक्षांची बोळवण केली. लिहिलेलीं फर्मानें शाहूच्या हातीं पडलीं नाहींत, परंतु तरीहि ताराबाईचे डोळे उघडले नाहींत. तिला सत्तेची अमर्याद हांव सुटली होती. आपापसांत भांडणें चालत असलीं, तरी परकीय शत्रूसमोर आपण शंभर कौरव व पांच पांडव मिळून १०५ बनलों, तरच आपला निभाव लागेल ही साधी गोष्ट तिच्या ध्यानांत आली नाहीं. सत्तेचा मद डोळ्यांवर चढला म्हणजे माणसाचा किती अधःपात होऊं शकतो याचा हा उत्तम मासला आहे.

सेनापति धनाजी जाधव वारल्यानंतर शाहूनें सेनापतिपद त्याचा मुलगा चंद्रसेन यास दिलें. हा मोठा कर्तबगार व शूर पुरूष होता; परंतु द्रोहामुळें याचा पराक्रम वांझोटा ठरला. बाळाजीच्या मत्सराची बाधा याला अतोनात झाली होती. त्यामुळें शाहूचा पगार खाऊन तो ताराबाईशीं फितुरी करी. चंद्रसेनानें शिवाजीस लिहिलें, 'आमची निष्ठा स्वामींच्या चरणीं, स्वामीची सेवा करावी व यशकीर्ति संपादावी' * * * आजपर्यंत याच मानीं राहून राजश्री आपाजी थोरात, दमाजी थोरात, शहाजी निंबाळकर, संताजी पांढरे आदिकरून सामील करून घेऊन, **शाहूनीं केल्या लोभाची आस्था न धरतां**, त्यांसही वैमनस्य दर्शवून, प्रतिनिधी व रा. खंडेराव दाभाडे, स्वामींच्या लोभाचे सेवक ह्या प्रसंगांत आणावे. ह्या अर्थें आपल्या समाधानास या उभयतांस पाठविणें, म्हणून मुद्दाम सांगून पाठविलें, त्यावरून उभयतांस पाठवून दिलें. * * * मग आम्ही अवघे वर्तमान सरदार कटांत घेऊन प्रतिनिधि यांस विचारांत घेतलें. स्वामींची द्वाही फिरविली. खुशाली केली * * * वरील पत्राचा २७ आगष्ट १७११ रोजीं ताराबाईकडून खालील जबाब गेला— 'आपण लिहिलेलें वर्तमान श्रवण गोचरें करून संतोषातिशय झाला तो पत्रारूढ किती काय म्हणून करावा ? कार्य कर्तव्य, पराक्रमी, मायेचे हिंदु सेवक असावे, ते तुम्हांसारिखेच कृतकर्मे असावे. रा. जाधवराव ( धनाजी ) यांनीं कै. रा. स्वामींचे

वेळेपासून राज्याभिवृद्धीविषयीं केले श्रम साहस व सांप्रत दुहीमुळें राज्याभिवृद्धीस झाला अपाय चित्तांत आणून, पुढें स्वामीचें राज्यवृद्धीतें पाववून यशकीर्ति संपादावी हें मनीं धरून जो अर्थ विशदें लिहिला तो उचित व यथार्थित लिहिला. तरी तुम्ही दीर्घदृष्टेच आहां. हें राज्य समग्र ताम्राक्रांत झालें असतां कै. स्वामींनीं लहानापासून थोरास आपली माया लावून, अवघियांवरी सदयत्वें कृपामृतवृद्धि करून दिनप्रतिदिनीं राज्य वृद्धिंगत पावविलें, ते प्रसंगीं कै. स्वामीचे संपूर्ण कृपेस पात्र एक जाधवराव मात्र झाले, तों पुढें दुहीचा प्रसंग प्राप्त झाला. दुही निःशेष करावी म्हणून स्वार होऊन गेले. त्यास विपरीत कालवशें सर्व लोकांस एक प्रकारें मोह प्राप्त झाला, तन्मुळें मशारनिल्हेचा कृतसंकल्प सिद्धीतें न पावला. त्यांचे पुत्र तुम्ही, त्यांजसारिखें कृतकर्मे आहां. तुम्हां व्यतिरिक्त त्यांचा संकल्प आणखी कोण शेवटास नेतो ! राज्याभिवृद्धीचा उपाय मायेच्या सेवकाविना दुसऱ्याचे मनांत कसा येईल ! तरी दुही निःशेष करून स्वामीचें शासन चालविण्याचा संकल्प सफल करावा. प्रतिनिधि, दाभाडे व मोरे यांस एकाग्रतेनें जवळ आणावयाचा विचार कल्पून, आपलें कर्तेपण प्रगट केलें ही गोष्ट कांहीं साहजिक केली नाहीं. हे तुमची दीर्घदृष्टि व आंगेजणी व बुद्धीचें वैभव व शूरत्वाचा प्रसंग मनन करून पाहतां दुसरी साम्यता आहे असें नाहीं. तुम्हांसारिखे बुद्धिप्रगल्भ पराक्रमी पुत्र जाधवरावास होऊन स्वामीचे सेवेसीं तत्पर झाले. तुमच्या भरंवशानें स्वामी निश्चिंत आहेत. एकाग्रता होय तें करणें आणि संतोषाचें वर्तमान हुजूर लिहून पाठविणें. प्रतिनिधिही स्वामीच्या मायेचेच सेवक आहेत. गडकिले यांस त्यांहीं व तुम्हीं पत्रें पाठविलीं ही गोष्ट उत्तम केली. पुढेंही ज्यास जें लिहिणें तें लिहावें. स्वामीनींही हुजूरहून गडकिल्ल्यांस व हशम नोकरांस पत्रें पाठविलीं आहेत. रा. हैबतराव निंबाळकर सरलष्कर यांनी चित्तवृत्ति स्वामीचे चरणीं दृढ आहे. त्यांस समाधान पत्र पाठवावें म्हणून लिहिलें. त्यांचें सर्व प्रकारें स्वामीस अगत्य आहे. हल्लीं तुमच्या लिहिण्यावरून स्वामींनीं त्यांस समाधानपत्र सादर केलें आहे. त्याचप्रमाणें थोरात व खंडेराव दाभाडे व संताजी पांढरे यांनीं तुमच्या चित्ताचे ठायीं एक-रूप होऊन महत्कार्य संपादिलें; येणें करून स्वामी त्यावर संतुष्ट आहेत. त्यांचींही पत्रें हुजूर आलीं होतीं व स्वामींनीं त्यांस चित्तानुरूप समाधान पत्रें पाठविलीं आहेत. तसेंच रा. मानसिंग मोरे, शहाजी निंबाळकर, आदिकरून कुल सरदारांना समाधानपत्रें पाठविलीं आहेत. अतःपर कोणी संशय मनांत आणावा असें नाहीं. मध्यें कांहीं दिवस काळाची गति कुटिल होती, तथापि स्वामीच्या चित्तीं कोणा एकाचें वैषम्य

किंवा संदेह नाहीं. अवघ्यांच्या विचारें स्वामिकार्याची सिद्धी करावी अशीच स्वामींनीं अवघ्यांस आज्ञापत्रीं आज्ञा केली आहे. सर्व गोष्टींनीं मातोश्री साहेब व स्वामी बहुत संतोषी आहेत. तुम्ही जें कर्तव्य लिहिलें तें निःशेष करून संतोषाचें वर्तमान लिहून पाठवावें.'

या पत्रव्यवहारावरून चंद्रसेन दोन्हीकडे कसा संधान ठेवून वागत होता हें दिसेल. तो तर फितुर झाला होताच, परंतु शाहूच्या पक्षांतील इतर मातबर सरदार व प्रधान फोडण्याचा त्याचा प्रयत्न सारखा चालू होता व तो यशस्वी देखील होऊं पहात होता. या कटाचे धागेदोरे चंद्रसेनानें कसे दूरवर गुंफले होते व त्यानें पसरलेलें जाळें केवढें व्यापक होतें याची कल्पना पत्र वाचून सहज होते. ह्या जाळ्यांत शाहू फसला असता तर नामशेषच होता. हें जाळें तोडण्याकरितां बाळाजीसारखा विश्वासू व हुषार मनुष्य त्याला लाभला म्हणून प्रसंग निभावला.

अशा फितुरी सेनापतीवर राजाचा विश्वास कसा बसावा? शाहूच्या हिताला डोळ्यांत तेल घालून जपणाऱ्या बाळाजीला हा विश्वासघात कसा सहन व्हावा? बाळाजीचें व चंद्रसेनाचें चांगलेंच वांकडें आलें. धनाजीचें सेनापतिपद शाहूनें चंद्रसेनास दिलें असलें तरी जमाबंदीचा अधिकार बाळाजीस दिला. चंद्रसेन, दमाजी थोरात, उदाजी चव्हाण वगैरे बंडखोरांच्या पारिपत्यासाठीं स्वारीवर निघाला, तेव्हां शाहूनें बाळाजीस त्याच्या दिमतीस दिलें. खरा मनांतील हेतु हा कीं, चंद्रसेनावर निगराणी रहावी व त्याचे गुप्त बेत आपणास कळावे. इकडे बाळाजीचा कांटा कसा दूर करावा या फिकिरींत चंद्रसेन होता. तेव्हां त्यानें या स्वारींत घडलेल्या एका क्षुल्लक प्रसंगावरून बाळाजीशीं भांडण उपस्थित केलें व त्याचा पाठलाग चालविला.

पिराजी राऊत हरणाची शिकार करीत असतां, तें हरिण कर्मधर्मसंयोगानें व्यासराव नांवाच्या ब्राह्मणाच्या राहुटींत शिरलें. पिराजी त्याच्या मागोमाग आला व त्यानें व्यासाजवळ आपली शिकार मागितली. हरिण माझ्या आश्रयासाठीं येथें शिरलें त्याअर्थीं मी तें तुला देणार नाहीं असा व्यासरावानें हट्ट धरला; कारण ब्राह्मणाला हिंसा वर्ज. दोघांत बोलाचाली उद्भवली व तें भांडण वाढतां वाढतां हातघाईवर आलें. त्या भांडणांत पिराजीचा भाला व्यासरावाला लागला. तेव्हां व्यासरावानें आपल्या मालकाजवळ म्हणजे

चंद्रसेनाजवळ फिर्याद केली, आणि पिराजीनें आपल्या मालकाचा म्हणजे बाळाजीचा आश्रय घेतला. चंद्रसेनानें बाळाजीजवळ पिराजीची मागणी केली. ती मागणी बाळाजीनें नाकारली व माझ्या नोकराला शिक्षा द्यावयास मी समर्थ आहें, असा निरोप पाठविला. हा ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद नव्हता. कारण बाळाजी ब्राह्मण असला तरी त्यानें पिराजीचा म्हणजे मराठ्याचा पक्ष उचलला होता व चंद्रसेन मराठा असून त्यानें व्यासरावास म्हणजे एका ब्राह्मणास पाठिंबा दिला. हें बाळाजी व चंद्रसेनाचें वैयक्तिक भांडण होतें, त्याला हें क्षुल्लक कारण निमित्तमात्र पुरे झालें. ही हरिणाची कथा घडली नसती तर दुसऱ्या एखाद्या क्षुल्लक कारणावरून दोघांचें भांडण जुंपलेंच असतें. प्रश्न तत्वाचा असून कोणी कोणावर कधीं मात करावी हें कोडें केव्हां तरी सडेतोडपणें उलगडणें जरूर होतें. कारण चंद्रसेनाचें व बाळाजीचें वांकडें धनाजीच्या हयातींतच पडलें होतें. धनाजीचा, चंचल चंद्रसेनापेक्षां, नेकीच्या बाळाजीवर अधिक विश्वास असे, त्यामुळें पूर्वींच बाळाजीविषयीं चंद्रसेनाचें मत्सरी मन भडकलें होतें. चंद्रसेन सेनापति असल्यामुळें त्याच्याजवळ हजारों शिपाई होते; त्यामुळें बाळाजीच्या हजार पांचशें लोकांचा निभाव त्याच्या फौजेपुढें कसा लागणार? बाळाजीवर या वेळीं मोठा कठीण प्रसंग ओढवला, परंतु तो मोठ्या शिताफीनें तेथून निसटला व पुरंदर किल्ल्यांत सचिवाच्या आश्रयास गेला. तेव्हां जाधवरावानें पुरंदरास शह दिला व बाळाजीस काढून लावा नाहींपेक्षां तुमचें चाटोळें करूं, असा सचिवास निरोप पाठविला. तेव्हां बाळाजी तेथून बाहेर पडून व जाधवरावाच्या अफाट सेनेशीं पळती झटापट करीत पांडवगडच्या रानांत शिरला व आश्रयासाठीं त्यानें शाहूस सविस्तर हकीकत कळवून त्याचा आसरा मागितला, आणि त्या किल्ल्यांतून तो त्यास मिळाला. चंद्रसेनाचें त्यामुळें कांहीं चालेना तेव्हां त्यानें 'स्वामींनीं बाळाजीस माझ्या स्वाधीन करावें. त्यास आश्रय दिल्यास आम्हांस महाराजांचे पाय सुटतील,' असा उद्दामपणाचा निरोप शाहूस पाठविला. चंद्रसेनासारखा फितुरी गेला तरी हरकत नाहीं, परंतु बाळाजीसारखा राजनिष्ठ व सचोटीचा सेवक गमवावयाचा नाहीं, असें शाहूनें ठरविलें तें योग्यच झालें. चंद्रसेनावर त्याच्या बापानाच विश्वास बसला नाहीं तर शाहूचा कसा बसावा? चंद्रसेनासारखा कर्तबगार सेनापति शाहूनें गमावला म्हणून त्यास दोष देणारे एक तत्व विसरतात कीं, बायको कितीही सुंदर असली परंतु पातिव्रत्याचा तिच्या ठिकाणीं अभाव असला तर तिची किंमत शून्य बनते. नेकी नसलेली कर्तबगारी काय जाळावयाची आहे? शाहूनें हैबतराव निंबाळकरास चंद्रसेनावर पाठविलें, तेव्हां चंद्रसेनाचा जेऊर येथें पुरा

पराभव झाला व त्यानंतर तो उघडपणें ताराबाईस मिळाला. तेवढयानें त्याची सुडाची भावना साध्य होईना म्हणून त्यानें मुसलमानांची नोकरी पत्करली व निजामच्या सैन्यांत सरदारी पत्करलेला हा कुऱ्हाडीचा दांडा आपल्या गोतास काळ झाला. ताराबाईची भाऊबंदकी महाराष्ट्रास अशी खडतर भोंवली कीं त्यापायीं अखेरीस मराठेशाहीचा सत्यनाश झाला. मोंगलबादशहाशीं उत्तरेंत झुंज घेत असतांना पेशव्यांना निरंतर दक्षिणचा ध्यास ठेवावा लागे. कारण ताराबाई व तिचे कोल्हापुरी वंशज कोणत्या वेळीं निजामाचें गुप्तपणें कारस्थान साधून त्याच्या साहाय्यानें मराठ्यांचे पाय मागें ओढतील, याचा भरंवसाच राहिला नव्हता. दक्षिणेंतील या विवंचनेमुळें पेशव्यांचें पाऊल उत्तरेंत लवकर कायमचें रुजलें नाहीं, कारण त्यांना दक्षिणेचा प्रथम बंदोबस्त करून नंतरच उरल्या फौजेनिशीं उत्तरेस जातां येई. या दुफळीमुळेंच, शंभर वर्षें मराठे व निजाम यांच्या लढाया चालून व प्रत्येक वेळीं निजामाचा पराभव होऊन देखील निजाम कायमच राहिला व मराठे अंतर्धान पावले. ताराबाईच्या या राष्ट्रद्रोही वर्तनाचा जितका निषेध करावा तितका थोडाच होईल. तिच्या पक्षांतील सरदारदेखील तिला शोभण्यासारखे एका माळेंतील मणी होते. मनुष्य महत्वाकांक्षी असला म्हणून त्याला कोणी तेवढयाच कारणावरून दोष देत नाहीं. त्यानें अधिक पराक्रम करून व अधिक सचोटी दाखवून आपली प्रतिष्ठा वाढविली म्हणजे झालें. परंतु हा सन्मार्ग चंद्रसेनाला रुचला नाहीं. त्यानें शाहूची चाकरी पत्करून ताराबाईशीं फितूर केला, व तेवढयानें महत्वाकांक्षा साध्य होईना म्हणून स्वदेशाभिमानावर त्यानें उदक सोडून निजामाची चाकरी पत्करली. स्वदेशाभिमानशून्य माणसाची कर्तबगारी काय जाळावयाची आहे? शाहूचें वर्तन मात्र या फितुरी सरदाराशीं अत्यंत दिलदारपणाचें असे. त्यानें सेनापतिपद चंद्रसेनाच्या भावाला दिलें.

महादाजी कृष्ण, बाबूजी नाइकाचा चुलता कृष्णाजी नाइक वगैरे सरदारांकडून कर्ज काढून बाळाजीनें नवीन फौज उभी केली व चंद्रसेन स्वराज्य सोडून गेला तरी त्याची उणीव शाहूस भासूं दिली नाहीं. त्यानें शाहूस धीर दिला व फौज नवी असल्यामुळें कर्तबगार आणि पराक्रमी बनली नव्हती, तरी तिच्याकडून धीरेधीरे काम घेतलें. ताराबाईवर व परशुरामपंत प्रतिनिधि वगैरे शाहूच्या फितूरी सरदारांवर व प्रधानावर त्यानें त्या फौजेच्या साहाय्यानें वचक ठेवला, व कृष्णराव खटावकराचें बंड १७१२ त मोडलें. संभाजीच्या पश्चात् महाराष्ट्रांत जी बजबजपुरी माजली होती, तिचा फायदा घेऊन अनेक ब्राम्हण व मराठे सरदार, नामसात्र मोंगलांची

तावेदारी पत्करून भोंतालच्या प्रदेशास उपद्रव देत व लुटमार करून आपला बडेजाव वाढवीत. कृष्णराव हा असाच एक देशस्थ ब्राम्हण पुंड होता. खटाव साताऱ्यापासून केवळ पंधरा वीस मैलांवर असल्यामुळें, तो शाहूच्या अस्तनींतील निखाराच होऊन बसला होता. त्यानें लढण्याची शिकस्त केली, पण त्याचा बाळाजीनें पराभव केला. तेव्हां तो व त्याचा मुलगा शाहूस शरण आले. शाहूनें त्यांना इनाम करून देऊन आपल्या नोकरींत घेतलें.

बाळाजीचा शाहूच्या दरबारांतील मान बराच वाढला असला तरी तो अजून दुय्यम दर्जाचा सरदार होता. सभासद, मुतालिक, सेनाकर्ते वगैरे पदव्या त्याला मिळाल्या होत्या. १७०८ मध्यें खंडेराव दाभाड्याकडे असलेला नाशीकचा मोकासा काढून तो शाहूनें बाळाजीस सांगितला होता. मोरोपंत पिंगळे यांचे दोन पुत्र निळोपंत व केसोपंत हे कोल्हापुरास असल्यामुळें, मधला भाऊ बहिरवपंत यास शाहूनें राज्याभिषेकसमयीं पेशवाईचीं वस्त्रें दिलीं. जुनीं घराणीं न तोडण्याची शाहूची वहिवाट होती, तिला अनुसरून शाहूनें बहिरवपंतास पेशवाई दिली. परंतु हा अत्यंत नालायक माणूस होता. गादीवर आल्यापासून शाहूला त्याचा एकदां देखील उपयोग झाला नाहीं. कान्होजी आंगरे शाहूचा अंमल मानीना म्हणून त्याच्यावर शाहूनें बहिरवपंतास फौज देऊन पाठविलें. परंतु कान्होजीनें बहिरवपंताचा मोड करून त्याला पकडलें व कैदेंत घातलें. ती बातमी ऐकतांच १६ नव्हेंबर १७१३ रोजीं शाहूनें घाईघाईनें बाळाजीस पेशवेपदाचीं वस्त्रें दिलीं व कान्होजीवर त्याची रवानगी केली. पिढीजाद वतनदार नालायक असले तर त्यांचीं पदें काढून तीं दुसऱ्यास देण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं आहे, हें शाहूस यामुळें दाखवितां आलें. बाळाजी हरहुन्नरी, पडेल तें काम करणारा, कर्तबगार, व्यवहारदक्ष, पराक्रमी व वजनदार असून शिवाय तो आपला एकनिष्ठ सेवक आहे हें शाहूला पांच सहा वर्षांच्या निकट व सतत सहवासानें कळून आलें होतें. जवळच्या मंडळींत तोच सर्वांत लायक दिसल्यामुळें त्यास शाहूनें पेशवा केलें. खंडोबल्लाळ व परशुरामपंत प्रतिनिधी या दोघांनींही आपली भीड या कामीं शाहूपाशीं खर्च केली असावी. बाळाजीनें आग्रह करून एकदां काढलेलें प्रतिनिधिपद पुन्हां शाहूकडून परशुरामपंतास देवविलें होतें, हे उपकार परशुरामपंत विसरला नव्हता. आणि खंडोबल्लाळ? मराठेशाहीच्या अखिल इतिहासांत इतकी अपूर्व व नेकीची कामगिरी दुसऱ्या कोणी क्वचितच केली असेल. चिटणिसांच्या घराण्यानें स्वराज्यासाठीं स्वार्थत्यागाची पराकाष्ठा केली. केवळ

कर्तव्य म्हणून फलाशेची पर्वा न करतां स्वराज्यासाठीं कायावाचामनेंकरून आजन्म खपणाऱ्या खंडोबल्लाळ चिटणिसांची धन्य होय ! त्यांच्यामुळें प्रभू ज्ञातीचें नाक वर झालें आहे. हा पुरुष अखिल हिंदुस्थानला भूषणभूत व्हावा इतका थोर होता. त्याचा स्वार्थत्याग, सत्यनिष्ठा व राजभक्ति पराकाष्ठेच्या उच्च कोटीला पोहोंचली होती. अशा श्रेष्ठ पुरुषाचे 'कर्ता ब्राह्मण, पेशवाईस योग्य' असे बाळाजीबद्दल उद्गार आहेत.

खंडो बल्लाळाच्या चिरंजीवाला पुढें शके १६५५ मध्यें शाहूनें जी सनद दिली त्यांत या घराण्याच्या थोर कामगिरीचा वृत्तांत आहे, तो असा—

" स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ६१ आनंदनाम संवत्सरे चैत्र शुद्ध पंचमी गुरुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपति स्वामी याणीं राजकार्यलेखनधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री जिवाजी खंडेराव चिटणीस यासी आज्ञा केली ऐसीजे. तुम्ही विनंति केली " आपले वडील आजे व तीर्थरूप यांणीं सेवा केली त्याजवरून कृपाळु होऊन चिटणिसीचा दरक वतनी वंशपरंपरेनें करून दिला. व कारखानिसी व जमेनिसी हे दोन धंदे सर्व राज्यांतील वंशपरंपरेनें करून देऊन शपतयुक्त पत्रें करून दिलीं. त्या अन्वयें स्वामीनींहि अभयपत्र दिलें. चिटणिसी वेतनास गांव जमिनी मोकासे लावून दिले तें इनाम चालावेसें अभय वचन दिलें, त्याप्रमाणें पत्र करून देऊन चालविलें पाहिजे " म्हणून त्यावरून पूर्वीपासून कागदपत्र वृत्त मनास आणितां तुमचे आजे बाळाजी आवजी थोरले कैलासवासी स्वामींनीं राज्य साधन केलें ते समयीं बहुत श्रम साहस करून उपयोगीं पडले. त्यानंतर दिल्लीचे जाण्याचे प्रसंगीं संकट पडलें असतां बराबर फार सेवा केली व राज्याभिषेकाचे समयीं उपयोगीं पडून मनोरथसिद्धी केली. त्याजवरून संतोष होऊन अष्टप्रधानांतील पद द्यावयाची योजना केली असतां चिटणीसीच वतनी वंशपरंपरेनें द्यावी, विनंती केली. त्यावरून प्रसन्न होऊन शपथयुक्त पत्र करून दिलें. नंतर थोरले महाराज कैलासवासी जाले. यावर कैलासवासी तीर्थरूप स्वामी याणीं कोणी गैरवाका समजाविल्यावरून राज्यभार प्रसंगीं सरकारांतून मुत्सद्दियास शिक्षा केल्या, त्यांत त्यासहि केली असतां तुमचे वडील खंडो बल्लाळ याणीं बहुत निष्ठेनें वागून स्वामीस गोव्याचे लढाईंत शूरत्व करून समुद्राचे भरतीस स्वामीचा घोडा पोहोणी लागला असतां धरून उडी टाकून घेऊन निघाले. याजवरून बहुतच संतोष होऊन शपथ करून वचन दिलें. सर्व राज्य केलें. तोहि प्रसंग यवन यांचें प्राबल्य होऊन जाला. स्वामीसहि यवनांचे संन्निध जाणें आलें.

तेथें गेलें असतां कैलासवासी काकासाहेब चंदीकडे जाऊन राज्य रक्षण करण्याच्या प्रसंगास लागले. तेव्हां जाते समयीं त्यांनीं संकट प्राप्त जालें असतां त्यास काढून देऊन आपण क्लेश भोगिले. त्यानंतर चंदीस जाऊन तेथेंहि शेवा निष्ठें केली. तेथें संकटाचा प्रसंग प्राप्त होऊन निघणें दुर्घट पडलें असतां झुलपुकारखान व गणोजी शिर्के यांस देऊन त्यांचे मोर्च्यांतून पाळण्यांत बसवून काढून घेऊन येऊन देशीं सेवा केली. त्यानंतर काकासाहेब समाप्त जाले. यवनास दिल्लीचें व्यसन प्राप्त जालें. तेव्हां स्वामीस त्यानीं निरोप देऊन लावून दिलें. देशीं येणें घडलें असतां काकासाहेब यांची स्त्री आईसाहेब यांस आपला पुत्र घेऊन राज्यकारभार करण्याची इच्छा होऊन दुर्बुद्धि धरली. फौज देऊन सेनापति व परशराम त्रिंबक प्रतिनिधी रवाना केले. त्या बरोबर खंडोबास दिले असतां स्वामीस गुप्तरूपें भेटून सेनापति व सरदार यांच्या खातरजमा करून सर्वांस स्वामींच्या लक्षीं आणिलें. लडाई जाली. प्रतिनिधी पळून गेले. विजयी होऊन राज्यकारभार साधन प्रसंगांत सर्व स्थळें व सरदार व प्रतिनिधी सरकारांतून यांस स्वामी लक्षीं लागण्याचे उपयोगीं बहुत केलें. पुढें तुम्हीहि त्याअन्वयें स्वामीचें ठायीं एकनिष्ठता धरून आंग्रे वगैरे मातुश्रीचे लक्षांतील सरदार, स्थळें वगैरे स्वामींचे लक्षीं वागण्याचा उपयोग करितां यावरून तुम्हांवर कृपा करणें अवश्यक जाणून चिटणिसी तुम्हांस शपथयुक्त वतनी दिली आहे. ते व कारखानिसी व जमेनिसी हे दोन धंदे राज्यांतील दिले. त्याप्रमाणें करार करून चिटणिसी वतनास गांव व मोकासे व जमिनी लागल्या आहेत, इनाम करार करून दिले.......येणें प्रमाणें महाल गांव जमिनी एकंदर ४५ तुम्हांस इनामी करून दिले असत. तरी तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें सदरहु दरक अनुभव करून सेवा करून सुखरूप राहणें. जाणिजे. खास दस्तुर. येणेंप्रमाणें सेवा केली असे. वतनी धंदे करून इनाम खाणें. बहुत काय लिहिणें मोर्तब."

'तुम्हासारखे अतुल पराक्रमी सेवक असतां स्वामींनी याचा हृद्रोग बाळगावा असा प्रकार नाहीं,' असे उद्गार शाहूनें बाळाजीबद्दल काढले आहेत. तेव्हां बाळाजीस पेशवाई मिळाली या गोष्टीचें आश्चर्य वाटावयास नको. त्याची योग्यताच तितकी मोठी होती. पुण्यापासून आठ मैलांवर हडपसरचे दक्षिणेस मांजरी म्हणून गांव आहे तेथेंच हा समारंभ पार पडला. 'मुख्य प्रधानपदाचीं वस्त्रें, बादली सणगें सहा व जवाहीर, शिरपेच, तुरा, कंठी, चौकडा, ढाल तरवार, शिक्के कट्यार व चौघडा, महानौबत, हत्ती, घोडे, जरीपटका वगैरे देऊन मौजे मांजरी

प्रांत पुणें या मुक्कामीं बाळाजीस **मुख्य प्रधान** केलें. पेशवेपदास सरंजाम महाल वगैरे दिले. कर्डी रांजणगांव वगैरे पांच महालांचें सरदेशमुखीचें वतन नानास दिलें.' अंबाजीपंत पुरंदरे यास शाहूनें बाळाजीचा मुतालिक नेमलें व बाळाजीच्या आग्रहावरून रामाजीपंत भानूस फडणिशी दिली. पुरंदऱ्यांचें बाळाजीशीं व त्याच्या कुटुंबीय मंडळीशींही अत्यंत सख्य होतें. पुरंदरे, भानू चिटणीस व भट हीं घराणीं अत्यंत घरोब्यानें एकमेकांशीं नांदत असत. बाळाजीचा उदय होण्यापूर्वी पुरंदऱ्यांनीं त्याला वेळ प्रसंगीं साहाय्य करून आसरा दिला होता. तेव्हां बाळाजीनें आपल्या भाग्यकालीं यांना विसरूं नये, हें स्वाभाविक होतें. वरील सरंजाम मिळाल्यामुळें पेशव्यांचें आसन पुण्याच्या जवळ आलें. खास पुणें मात्र या वेळीं त्यांना मिळालें नाहीं. पुढें बाजीरावाच्या कारकीर्दींत पुणें कसब्याची सनद २ एप्रिल १७२६ रोजीं पेशव्यांना मिळाली. बाळाजी विश्वनाथ सरसुभेदार असतांना पुढें दिलेला शिक्का वापरीत असत. 'श्री उमाकांत पदांभोज भजनास्य समुन्नतेः बाळाजी विश्वनाथस्यं मुद्रा विजयतेतरां' परंतु पेशवाई लाभल्यावर हा संस्कृतप्रचुर शिक्का टाकून त्यांनीं मराठेशाहीचा अर्थप्रचुर व ठसठसीत शिक्का सुरू केला. शिवाजीमहाराजांच्या वेळेपासूनच हा शिक्का प्रचारांत होता. मुख्य प्रधानाला तलवार व लेखणी हीं दोन्ही हत्यारें लीलेनें पेलतां येणें जरूर होतें. शिवशाहींत महाराजांच्या खालोखाल मोरोपंत पेशवे यांचा स्वराज्यांत मान होता. अत्यंत शूर सेनापति, कर्तबगार मुत्सद्दी व राजनिष्ठ सेवक असा तिहेरी लौकिक त्यांनीं संपादन केला होता. थोरले शिवाजीमहाराज औरंगजेबाच्या कैदेंत पडले असतां मोरोपंतानें स्वराज्याचें मोठ्या चतुराईनें सर्वांवर छाप ठेवून रक्षण केलें, मोरोपंताचे गुण त्याच्या पुत्रांत नव्हते. गुणांचा वारसा केवळ रक्त-वंशानें खालीं उतरतो असें थोडेंच आहे. मोरोपंताचे गुण बाळाजीच्या अंगीं असल्यामुळें पेशवाईनें त्याला माळ घालणें क्रमप्राप्तच होतें. पेशव्यांनीं आपल्या शिक्क्यावर खालील मंत्र कोरला.

**'श्रीशाहूनरपति हर्षनिधान।**
**बाळाजी विश्वनाथ मुख्य प्रधान॥'**

या शिक्क्यावरून पेशवे म्हणजे अष्ट प्रधानांपैकीं केवळ एक होते, त्यांना पुढें महत्व चढलें किंवा त्यांनीं स्वतःस बळेंच महत्व चिकटवून घेतलें, हा समज चुकीचा ठरेल. शिवाजी महाराजांच्या वेळीं देखील पेशवे म्हणजे मुख्य प्रधान हाच अर्थ रूढ होता. कारण मोरोपंत पिंगळे देखील असा शिक्का वापरीत होते.

**श्रीशिवनरपति हर्षनिधान ।**
**मोरो त्रिमल मुख्य प्रधान ॥**

बाळाजी याप्रमाणें मराठेशाहीचा मुख्य प्रधान बनला.

कर्तबगारी, चिकाटी व सचोटी या गुणांबरोबरच बाळाजीचा सुस्वभाव व माणसें मिळविण्याचें त्याचें चतुर धोरण त्याच्या भाग्योदयास कारणीभूत झालें. त्याच्या गोड स्वभावामुळें धनाजीराव जाधव, पुरंदरे, परशुरामपंत प्रतिनिधि व खंडोबल्लाळ अशा भिन्न जातीय लोकांचा गाढ स्नेह व विश्वास त्यानें संपादन केला. ब्रम्हेंद्रस्वामीशीं त्याची नम्रपणाची वागणूक व त्यांच्या विषयीं भक्तिपरभाव ह्यादेखील त्याला साहाय्यक झाला. त्या काळीं धर्माची भावना जागृत होती, व साधुसंतांबद्दल लोकांत आदर होता. मुसलमान राजेदेखील हिंदु साधूसंतांना आदरानें वागवीत. शाहूची ब्रम्हेंद्रस्वामीवर फार निष्ठा होती आणि कोंकणांतील पूर्वसंबंधामुळें परशुराम क्षेत्रांतील या स्वामीचें भटघराण्यावर फार प्रेम होतें. हे स्वामी मूळ कोंकणांतले, पुढें ते देशावर धावडशीस येऊन राहिले. द्रव्याची—तें वेदांत्याला काष्टवत् असलें तरी—व्यवहारांत व विशेषतः राजकारणांत महती जाणून बाळाजीनें राज्यांतील सावकारांशीं स्नेह जोडला व त्यांच्याशीं पुढें सोयरेसंबंध जोडले. भानूबंधु हे तर त्याच्याबरोबरच कोकणांतून देशावर आले होते, त्यामुळें त्यांचें साहाय्य तर नेहमींच त्यास होई. तलवारीबरोबर लेखणीदेखील त्याला उत्तम पेलतां येत होती. त्याचा पत्रव्यवहार दांडगा होता व शत्रूंना देखील तो आपल्या पत्रांनीं गार करीत असे, व त्याचें मिठ्ठास भाषण सर्वांवर छाप पाडी. स्वार्थ कोणासच सुटला नाहीं, परंतु आपल्या राजाशीं किंवा देशाशीं इतर सरदारांप्रमाणें बेइमानी करून स्वार्थ साधण्याचा यत्किंचित् देखील प्रयत्न बाळाजीनें कधीं केला नाहीं. या त्याच्या गुणविशेषामुळें तो शाहूला आवडूं लागला.

बाळाजीस लौकिक व्यवहारांत बाळाजीपंत नाना असें म्हणत. बाळाजीची बायको नेवरें येथील बर्वे घराण्यांतील असून फार हुषार म्हणून नांवाजलेली होती. तिला लिहितां वाचतां चांगलें येत होतें. नाशीकचे तीर्थोपाध्ये हिंगणे यांच्या चोपडींत तिचे हस्तलेख सांपडले आहेत. राजकारणांत देखील ही भाग घेई व अनेक सामाजिक आणि कौटुंबिक बाबतींत स्वतःच्या मुखत्यारीनें वागे. एकदां ब्राम्हणाच्या घरांत महाराचा विटाळ कालविला गेल्याबद्दल पटवर्धनावर बहिष्कार पडला, तेव्हां बाईनें आपल्या जबाबदारीवर जातीनें पुढाकार घेऊन तें प्रकरण युक्तीनें मिटविलें. तिचा घरांत सर्वांना धाक असे. ही बाई पतीमागें पुष्कळ दिवस

जगली व नातवाचा बडेजावीचा कारभार तिनें पाहिला. नानासाहेब पेशव्यांनीं १७५१ मध्यें तिची रुपयांनीं तुला केली. तिचें बाळाजीला फार साहाय्य झालें असावें याविषयीं शंकाच नाहीं.

बाळाजीला दोन मुलगे व दोन मुली झाल्या. वडील मुलगा बाजीराव हा १६९८ त जन्मला. याची नक्की जन्मतिथी अजून माहित नाहीं. बाजीरावाच्या पाठीवर भिऊबाई, नंतर चिमाजी व सर्वांत लहान अनुबाई असा त्या भावंडांचा क्रम लागतो. बाजी म्हणजे पराक्रमी. बाजी प्रभू, बाजी मोहिते, बाजी घोरपडे, बाजी शामराव, मुरार बाजी वगैरे पराक्रमी पुरुषांच्या प्रतापानें बाजी हें नांव त्या काळीं लोकांना प्रिय झालें असलें तर त्यांत नवल नाहीं. बाळाजीसारख्या शिवशाहीच्या एकनिष्ठ भक्तानें आपल्या पहिल्या मुलाचें नांव बाजी असें प्रेमानें ठेवलें असल्यास आश्चर्य वाटावयास नको. मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात, तें असें. या उपरिनिर्दिष्ट बाजींच्या मालिकेंत बाजी भट पुढें जाऊन बसला. बाकी बाजीरावचें पाळण्यांतलें नांव विश्वनाथ असून चिमाजीचें अनंत असें होतें. धाकटा मुलगा म्हणून कौतुकानें त्याचें नांव चिमणा असें पडलें व मोठेपणीं चिमाजी ऊर्फ चिमणाजी हेंच नांव रूढ झालें. बाजीरावाप्रमाणें चिमाजीची अचूक जन्मतिथी देखील उपलब्ध नाहीं. परंतु या दोन भावांमध्यें ८–१० वर्षांचें अंतर असावें. शाहूचा सावकार महादाजी कृष्ण जोशी याची मुलगी काशीबाई हिच्याशीं बाजीरावचें लग्न झालें. बाळाजीची वडील मुलगी भिऊबाई, दुसरे प्रसिद्ध सावकार बाबूजी नाईक बारामतीकर यांचे बंधु आबाजी यास दिली. हीं दोन्हीं लग्नें १७१० त उरकल्यामुळें बाळाजीची समाजांत फार मानमान्यता वाढली, व त्यामुळें चंद्रसेनानें फितवा केल्यावर किंवा बहिरवपंत पिंगळ्यांचा पराभव होऊन ते कान्होजीच्या हातीं सांपडल्यावर, कर्ज काढून नवी फौज तयार करणें बाळाजीस सोपें गेलें असावें. बाळाजी मोठा धोरणी होता यांत शंकाच नाहीं. चिमाजी व अनुबाई यांचीं लग्नें पुढें, म्हणजे त्यास पेशवाई मिळाल्यानंतर झालीं. चिमाजी आपाचें लग्न १७१६ त त्रिंबकराव पेठे यांच्या बहिणीशीं झालें. तिचें नांव रखमाबाई. अनुबाईचें लग्न कोल्हापुर प्रांतांत १७१९ मध्यें बाळाजी स्वारीवर असतां, इचलकरंजीकरांचे पूर्वज व्यंकटराव जोशी घोरपडे यांच्याशीं झालें. आपल्या व आपल्या घराण्याच्या उत्कर्षाला कारणीभूत होतील या धोरणानें बाळाजीनें आपले संसारी पाश पसरले. पेशवाईची उभारणी याप्रमाणें फारच भक्कम पायावर झाली व म्हणूनच तिला एवढें स्थैर्य, सामर्थ्य व संपन्नता लाभली.

---

## प्रकरण ४ थें

# बाजीरावाचें शिक्षण



बाजीराव हा वतनदार व पिढीजाद देशमुखाच्या घराण्यांतील मुलगा, तशांत ब्राम्हणाचा, त्याच्या आईला उत्तम लिहिणें वाचणें येत असलेलें, तेव्हां त्यालाही मराठी व मोडी लिहितां वाचतां येत असलें तर त्यांत नवल नाहीं. परंतु बाळाजी-प्रमाणें फर्डा लेखक होण्याचें भाग्य मात्र त्याला लाभलें नाहीं. कारण त्याच्या लहान-पणीं महाराष्ट्रांत इतकी अस्वस्थता होती कीं, कोणतेंही काम फुरसतीनें करणें शक्यच नव्हतें. शिवाय त्याच्या लहानपणींच त्याच्या बापाचा भाग्योदय झाल्यामुळें लेख-नपटुत्वाचें महत्व त्याला किंवा बाळाजीलाहि फारसें वाटत नसावें. संस्कृत भाषे-विषयीं म्हणाल तर प्रत्येक ब्राम्हणाच्या मुलाला त्या काळीं ब्रम्हकर्म शिकावेंच लागे. त्यामुळें इच्छा असो किंवा नसो, चार दोन श्लोक लावण्याइतकें संस्कृत अनायासेंच प्रत्येकास येत असे. त्याकरितां निराळी यातायात करावी लागत नसे. परंतु बाजीरावाला पुस्तकी विद्या एकंदरीनें फारच कमी येत होती. त्यामुळें दुसऱ्या-वर लिहिण्याबोलण्यानें आपली छाप पाडण्याची कला त्याला साधली नाहीं. त्याचें व्यवहारी शिक्षण मात्र भरपूर झालें होतें. घोड्यावर बसणें, तिरंदाजी, भाला, बोथाटी, लाठी, तलवार यांचे हात करण्यांत तो फार लहानपणींच पटाईत झाला. शिकारीचा नाददेखील त्याला लहान वयांतच लागला. जोर, बैठका, वगैरे व्याया-मानें त्याचें शरीर कसदार झालें. वयाच्या सरासरी बाराव्या वर्षापासून तो आपल्या बापाबरोबर मोहिमेवर जाऊं लागला. मुलांना स्वारी शिकारीवर जातांना बरोबर नेण्यांत बाळाजीनें विलक्षण चातुर्य दाखविलें. त्यामुळें बाजीरावाला जें प्रत्यक्ष लष्करी शिक्षण मिळालें तें कोणत्याही शाळेंत त्याला मिळालें नसतें. पिलाजीराव जाधव व नाथाजी धुमाळ हे दोन शूर शिलेदार बाजीरावाच्या खास तैनातींत होते, किंवा बाजीरावच त्यांच्या तालमींत होता असें म्हटलें तर अधिक शोभेल. पुढें जेव्हां चंद्रसेन व बाळाजीचें वांकडें आलें व चंद्रसेनानें बाळाजीचा पाठलाग चालविला तेव्हां बाजीराव त्या स्वारींतच होता. या दोघां शिलेदारांनीं व कान्होजी राजे शिर्के यांनीं चंद्रसेन जाधवाशीं चार हात त्या प्रसंगीं करून, बाळाजीस त्याच्या कुटुंबासह पांडवगडच्या किल्ल्यावर आश्रयास मोठ्या मिनतवारीनें पोहोंचविलें. बाजी-रावास प्रत्यक्ष लढाईचा हा चांगला धडा मिळाला. पिलाजी जाधवावर यामुळें

बाजीरावाचें फार प्रेम जडलें. या प्रसंगानंतर झालेल्या मोहिमांत नियमानें बाळाजीनें बाजीरावास बरोबर वागविलें. आपल्या हाताशीं घरचा विश्वासू मुलगा राहील व त्यालाही शहाणपण येईल, असा दुहेरी हेतू बाळाजीचा असला पाहिजे.

पेशवाईचीं वस्त्रें मिळाल्यानंतर बाळाजी लागलीच मांजरीहून लोहगडास गेला. कारण कान्होजी आंगरे यांचा मुक्काम त्या वेळीं लोहगडास होता. बाळाजी व आंगरे यांचा फार जुना स्नेहसंबंध. त्यामुळें लढाईचा निकर न करतां सामोपचारानें तें प्रकरण मिटविण्याचें बाळाजीनें ठरविलें. शिवाजी महाराजांच्या वेळेपासून आंगऱ्याच्या घराण्यानें समुद्रपट्टी संभाळून स्वराज्याची चाकरी बजावली. कान्होजीचा बाप तुकोजी व आजा सेखोजी यांनीं मराठ्यांच्या सेवेंत आपले देह वेंचले. कान्होजी हा अत्यंत शूर पुरुष होता. त्याचा रंग काळा व बांधा भक्कम होता. त्याचा चेहरा राकट व डोळे उग्र असत. त्याला पाहतांच लोक थरथर कांपत. त्याची शिस्त अत्यंत जबरी. तो मनाचा दयाळू असला तरी न्यायनिष्ठुर होता. संभाजी व राजाराम यांच्या कारकीर्दींत त्यानें फार बहादुरी दाखविली. 'शहाणे शूर मर्द जाणून राजारामानें आंगरे यास सुवर्णदुर्गीं ठेवलें. त्यांनीं तेथें राहून बहुत खबरदारीनें सर्व जंजिरे व प्रांत राखिला; कांहीं किल्ले व ठाणीं पादशाहींत गेलीं होतीं तीं जवामर्दीनें घेतलीं. त्याजमुळें महाराज चंदीहून आल्यावर, त्यांनीं सर्फराजी करून कान्होजीस सरखेल हा किताब दिला.' मुंबईपासून त्रावणकोरपर्यंत सर्व किनाऱ्यावर त्याची छाप बसली होती. मुसलमान व फिरंगी व्यापारी त्याला थर्र कांपत. कुलाबा हें त्याचें मुख्य आरमारी ठाणें होतें. जवळच जंजिरा येथें शिद्दीचा अंमल होता. ह्या शिद्दीला जिंकण्याचा व कोंकणपट्टी सर्वस्वी हिंदुमय करण्याचा शिवाजी व संभाजी महाराज या दोघांनींही यत्न करून पाहिला, परंतु कार्यव्याप्तृत्वामुळें त्यांना त्या कार्यांत यश आलें नाहीं. आंगरे यांची राजधानी कुलाबा व शिद्याची मुरुड, यांत अंतर फारच अल्प असल्यामुळें दोघांच्या नित्य झटापटी होत. कान्होजी शिद्द्याला पुरून उरला होता. भटांचें घराणें शिद्द्याच्या राज्यांत नांदत होतें. श्रीवर्धन, हरेश्वर, दंडाराजपुरी वगैरे भटांचीं देशमुखीचीं गांवें शिद्द्याच्या ताब्यांत होतीं. शिवाजी महाराजांनीं गोब्राह्मणप्रतिपालनासाठीं स्वराज्य स्थापन करण्याची प्रतिज्ञा केल्यापासून भटांचा ओढा महाराजांकडे व त्यांच्या सरदारांकडे लागला असल्यास नवल नाहीं. आंगऱ्यांना शत्रूच्या राज्यांतील अशा प्रमुख इसमाची मदत हवीच होती. त्यामुळें आंगरे व भट यांचीं नेहमीं स्वराज्यासंबंधीं गुप्त कारस्थानें चालत असत. शिद्द्याच्या डोळ्यांत भट सलत

असत, परंतु इतक्या मोठ्या प्रतिष्ठित घराण्यावर त्याच्यानें उघडपणें शस्त्र धरवेना. त्याला भटांचा नित्य संशय येई, परंतु हात चोळीत स्वस्थ बसावें लागे. बाळाजी देशावर जाऊन योग्यतेस चढल्यानंतर भटांचे मराठी सरदारांशीं अधिक घरोब्याचे व जिव्हाळ्याचे स्नेह संबंध होऊं लागले. ह्या सुमारास बाळाजीच्या एखाद्या भावास किंवा चुलत्यास आंगऱ्यास फितूर झाल्याच्या आरोपावरून शिद्द्यानें गोणत्यांत बांधून समुद्रांत बुडविलें असावें. या फितूरीबद्दल भटांना निमकहराम म्हणून दोष द्यावयाचा असल्यास, आदिलशाहीशीं फितुरी केल्याबद्दल स्वराज्यसंस्थापक शिवाजीमहाराजांना दोष देऊन, स्वराज्यद्रोही चंद्रराव मोऱ्याची निमकहलाल म्हणून पाठ थोपटावी लागेल. परधर्मी जुलमी राजांविरुद्ध फंदफितूर करून आपल्या देश व धर्मबांधवांना मदत करून स्वराज्याची सेवा करणें हें पाप ठरूं लागलें, तर शिवशाहींतील सर्वच नामांकित सरदार आणि मुत्सद्दी पापी व द्रोही ठरतील. आंगऱ्यांच्या स्वराज्याच्या कार्याला, शिद्दीसारख्या उन्मत्त व प्रबळ काळाच्या जबड्यांत राहून भटांनीं जी अमोलिक मदत केली व त्यापायीं जो छळ व अपमान सोसून स्वार्थत्याग केला, त्याची किंमत कान्होजी पूर्णपणें ओळखून होता. त्यामुळें बाळाजी भट पेशवा होऊन येत असल्याचें वर्तमान ऐकून कान्होजी त्यास सामोरे गेला व त्या दोघांची लोहगडच्या पायथ्याशीं वलवण येथें गांठ पडली.

ताराबाईनें कान्होजीस आपल्या पक्षास वळवून घेतलें असल्यामुळें तो शाहूच्या राज्यांत पुंडावा करून त्यास त्रास देत होता. शाहूच्या गादीवरील हक्काविषयीं व त्याच्या खरेपणाविषयीं बाळाजीनें कान्होजीची खात्री पटविली. "उपरांत खलबतास बसोन त्यास सांगितलें कीं, 'तुमचा आमचा भाऊपणा. पेशवाई तुमच्या घरांत. आयते किल्ले देत असाल तरी तसेंच सांगावें.' शिक्के कट्यार व वस्त्रें त्यास दाखविली व त्यांस विचार सांगितला कीं सरखेलीचें पद ताराबाईकडोनि आहेच; इकडूनहि करून देववितों. महाराजांचे चाकर होऊन कृपा संपादून घ्यावी. बहिरोपंतास सोडवून समागमें घेऊन आले. महाराजांचे लोक किल्ल्यावर चढविले. सातान्यास जाऊन महाराजांचें दर्शन घेतलें. कान्होजी आंगरे यास सरखेलीचें पद करून वस्त्रें व सिक्के कटार पाठविली." या तहानंतर कान्होजी शाहूचा एकनिष्ठ सेवक बनला, व समुद्राची बाजू निर्घोर झाली. पुढें त्या दोघांच्या एकमेकांशीं अनेकवार मोठ्या समारंभानें भेटीगांठी झाल्या, व दोघांनीही एकमेकांना अनेक वस्तू नजर म्हणून दिल्या. या मोहिमेंत न लढतां बाळाजीनें जें थोर कार्य करून दाखविलें त्यामुळें त्याचा मानमरातब वाढला, व त्याच्या कर्तबगारीविषयीं सर्वांची

खात्री पटली. जें काम मोठमोठ्या लढाया मारून देखील होणें कठीण, कदाचित् युद्धाचा प्रसंग आला असता तर अधिक बिघडलें असतें, तें बाळाजीनें चुटकीसरसें पार पाडलें, व कान्होजीसारखा दर्यावर्दी सारंग महाराजांच्या सेवेंत ऋजु केला.

दुहीनें स्थापन झालेल्या कोल्हापुरी राज्यांत १७१४ त आणखी फाटाफूट झाली. राजारामाची दुसरी बायको राजसबाई ही राजमाता झाली, म्हणजे तिचा पुत्र संभाजी हा गादीवर बसला, आणि ताराबाई व तिचा पुत्र शिवाजी यांच्या कपाळीं बंदिवास आला. एकदां राज्यांत अन्यायाचा प्रवेश होऊं दिला कीं, एका अन्यायाच्या मागें अन्यायांची परंपरा चालणारच! खरा वारस शाहू याच्याशीं यादवी माजवून जर ताराबाईचा पुत्र शिवाजी गादीवर बसून शाहूचा हक्क बुडवूं शकतो, तर संधी सांपडतांच शिवाजीला बाजूस सारून राजारामाच्या दुसऱ्या पुत्रानें गादीवर कां बसूं नये? राजसबाई ही ताराबाईप्रमाणें दुष्ट व कारस्थानी नसल्यामुळें तिच्या मुलाच्या व तिच्या मनांत शाहूविषयीं फारशी वांकडेपणाची अढी नव्हती. शिवाय संभाजी शिवाजीप्रमाणें वेडसर नव्हता. संभाजी व शाहूचा खुशालीचा पत्रव्यवहार मधून मधून होत असे. राज्याला लागलेली दुहीची कीड कायम असली तरी वरचा रोग तात्पुरता वरा झाला. शाहूनें दोन्ही राज्यांतील हद्द वारणा नदी ठरवून दिली. वारणेचा तह पुढें झाला, परंतु तें तत्त्व व धोरण शाहूनें एव्हांपासूनच अमलांत आणण्याचें ठरविलें.

या पुढील बाळाजीचीं दोन वर्षें दमाजी थोरात व उदाजी चव्हाण या दोन पुंडांचीं बंडें मोडण्यांत खर्च झालीं. हे दोघे शाहूच्या मुलुखावर सारखे हल्ले करून चौथाई वसूल करीत व रयतेची खराबी करीत. दमाजीस मोंगलांकडून रुस्तमखान असा किताब मिळाला होता. पाटस तर्फेत हिंगणागांव येथें गढी बांधून, तिच्या आश्रयानें पुणें प्रांताची पूर्व हद्द दमाजी ताराबाई तर्फे प्रथम सांभाळीत होता. पण पुढें तो कोणाचेंच ऐकेना. बाळाजी त्याच्यावर स्वारी करून चालून आला, तेव्हां त्यानें तहाचें बोलणें लावलें व बेलभांडार करून त्यास कुटुंबासह गढींत येण्याचें आमंत्रण दिलें, व मग विश्वासघातानें कैद केलें. बेल म्हणजे झाडाचा पाला व भंडार तर नित्याची खाण्याची वस्तू, असें म्हणून त्यानें घेतलेल्या शपथेची थट्टा चालविली. शिवाजी महाराजांच्या वेळीं रजपुतांप्रमाणेंच मराठ्यांच्या शब्दाला मोठी किंमत असे. एकदां वचन दिल्यावर वचनभंग सहसा कोणी करीत नसे व केला तर समाजांत त्याची नामुष्की होई. पण ताराबाईच्या उदाहरणानें शपथ, वचनें व निष्ठा यांना किंमतच उरली नव्हती.

आज शपथ घ्यावी व सोईप्रमाणें उद्यां ती मोडावी, असा मराठ्यांचा जीवनक्रम चालू झाला. निरुपाय म्हणून आपली बायको आणि बाजीराव, व चिमाजी हीं दोन्ही मुलें थोराताजवळ ओलीस ठेवून बाळाजीनें प्रथम आपली सुटका करून घेतली व नंतर केल्या कराराप्रमाणें खंड भरून त्यांस सोडवून आणलें. शाहूच्या आज्ञेनें सचिवानें थोरातावर स्वारी केली, तेव्हां त्यानें अचानक छापा घालून नारो शंकरास पकडून नेलें. नारो शंकर सचीव त्यावेळीं अल्पवयी होता व रांझेकर थोरातावरची मोहीम चालवीत होता. मागें शंकराजी नारायण सचीव याला शाहू तोतया आहे असें सांगून, आपल्याशीं राजनिष्ठ राहण्याची त्याच्याकडून ताराबाईनें शपथ घेवविली होती. परंतु शाहू तोतया नसून खरा आहे असें त्याला कळलें, तेव्हां गादीच्या खऱ्या मालकाविरुद्ध लढल्याबद्दल त्याला पश्चात्ताप झाला. शाहूनें त्याला भेटीस बोलाविलें तेव्हां तर तो पेंचांत पडला. एकदां घेतलेली शपथ मोडण्यापेक्षां किंवा आपलें काळें झालेलें तोंड शाहूस दाखविण्याऐवजीं, स्वामिद्रोहाचें प्रायश्चित्त म्हणून त्यानें आत्महत्या केली. तेव्हांपासून शाहूचा या कुटुंबावर फार लोभ जडला होता. आरंभीं तरी शाहूजवळ पैसा व फौज यांची सदैव कमतरता होती. नारो शंकरची आई येसूबाई अत्यंत कष्टी झाली. तेव्हां खंड भरून सचिवाची शाहूनें सुटका केली. तरी सचिवाला एक वर्ष थोराताच्या कैदेंत रहावें लागलें. थोरातास सामोपचारानें वळवून स्वराज्याच्या कामीं लावावें अशी शाहूची फार इच्छा होती. प्रत्येक बंडखोराशीं शाहू अशाच गोडीनें वागत असे. थोरात शाहूच्या भेटीस बोलावल्याप्रमाणें आला, पण तो महाराजाशीं अत्यंत उद्दामपणें वागला. शाहूनें मात्र त्याला झाल्या बैठकींत कैद न करतां सुखरूप परत जाऊं दिलें. पुढें मोंगलांच्या तोफखान्याची मदत आणवून बाळाजीनें थोराताचें पारिपत्य केलें व त्यास पुरंदरच्या किल्ल्यावर कैदेंत टाकलें, आणि हिंगणगांवची गढी मोडून जमीनदोस्त करविली, व पांढरीवर गाढवांचा नांगर फिरविला. शाहूनें नंतर थोराताला सोडून दिलें, परंतु त्यानें पुन्हां बंड केल्यामुळें त्याला पकडून परळीच्या किल्ल्यावर पाठविलें. तेथें तो कैदेंतच मरण पावला. पुणें प्रांताची व्यवस्था सचिवाकडून काढून घेऊन ती बाळाजीवर सोंपविण्यांत आली. बंदोबस्ताकरितां सासवड व पुरंदर हीं सचिवाचीं ठाणीं शाहूच्या हुकुमानें बाळाजीनें आपल्या ताब्यांत घेतलीं. सचिवाला अर्थातच हा खुशीच्या सक्तीचा सौदा आवडला नाहीं. उदाजी चव्हाणाचा तात्पुरता पराभव बाळाजीस करतां आला, पण त्याचा कायमचा बंदोबस्त मात्र करतां आला नाहीं. या पुंडांना चंद्रसेन जाधवाची मदत असे. जाधवाची किंवा निजामाची

मदत घेऊन, उदाजी संभाजीतर्फे म्हणून शाहूच्या मुलुखास फार उपद्रव देई. शाहूनें त्याच्यावर अनेक स्वाऱ्या केल्या, परंतु त्यांत त्याचा तात्पुरता पराभव झाला तरी तो पुनः डोकें वर काढी. [ नानासाहेब पेशव्यांनीं पुढें १७३७ त त्याची समजूत घालून व त्याला दिग्रज येथें सरंजाम देऊन स्वराज्याच्या कामीं लावलें ].

शाहूनें दिल्लीपतीचें मांडलिकत्व पत्करूनच मराठी राज्य हस्तगत करून घेतलें, व तसें केलें नसतें तर त्याचा आरंभीं तरी फारसा निभाव लागला नसता. पुंडांचा पुंडावा मोडण्याकरितां देखील प्रसंगीं त्याचें एकट्याचें सैन्य सामर्थ्यवान ठरत नसे. परंतु दिल्लींत औरंगजेबाच्या मृत्यूनंतर इतक्या कांहीं घडामोडी झाल्या कीं, हें मांडलिकत्व नाममात्र उरलें. दिल्ली दरबारांत मोंगल, इराणी व तुराणी असे तीन प्रमुख मुसलमान पक्ष होते. आपल्या पक्षाची सरशी व्हावी म्हणून प्रत्येकाची खटपट चालू असे. बादशहा दणदणीत होता तोंपर्यंत या पक्षांच्या कारस्थानांना फारसें महत्व चढलें नाहीं. परंतु वरचें दडपण नाहींसें झाल्यावर सरदारांच्या चळवळीला उसळी आली. प्रत्येक पक्षाला बादशहा आपल्या हातां-तील बाहुलें म्हणून रहावा असें वाटूं लागलें व तसें शक्य नसल्यास एका बादशहाला पदच्युत, कैद, किंबहुना ठार करून, दुसरा आपल्या वर्गीचा बादशहा गादीवर आणण्याइतकी त्यांची राजनिष्ठा अघोरी बनली होती. हातांत बादशहाचें बाहुलें असलें, म्हणजे त्या कुंकवाच्या आधारावर देशांत वाटेल तसा धुडघूस घालतां येऊन स्वार्थ साधतां यावा, हीच प्रत्येक सरदाराची इच्छा. औरंगजेबाच्या मृत्यू-नंतर अजीमशाह, कामबक्ष व बहादूरशहा हे तिघेही गादीवर आपला हक्क सांगून मोकळे झाले. अखेरीस बहादूरशहा त्या यादवींत जिंकला खरा, परंतु फेब्रुवारी १७१२ मध्यें तो मरण पावला. पुढें त्याच्या मुलांत लढाया सुरू होऊन, वडील मुलगा जहांदरशहा यानें झुलफिकारखानाच्या मदतीनें गादी मिळविली. परंतु एक वर्षाच्या आंतच जहांदरशहाला ठार मारून, सय्यद बंधूंच्या सहाय्यानें फरुखशाय-रनें बादशाही तख्त संपादन केलें.

मुख्य सत्ता परावलंबी व दुर्बल झाल्यामुळें, निरनिराळ्या प्रांतांतील बादशाही सुभेदार आपापल्या सुभ्यांचा कारभार स्वतंत्रपणें पाहूं लागले. कुंकवापुरता धनी या नात्यानें ते बादशहाला लेखीत. सुभेदारीवर स्वतंत्र नबाबी भोगण्यास त्यांना मिळत असे खरी, परंतु बादशाही सत्ता व वैभवाचा मोह यांचा त्यांच्या मनावर इतका पगडा पडला असे कीं, वजीरी मिळविण्याकरितां स्वतंत्र अशा सुभेदारीवर

लाथ मारण्यासहि प्रत्येक सुभेदार वेळ प्रसंगीं तयार होत असे. बादशहा बुळा असल्यावर वजीरच व्यवहारी बादशाही व्हावयाचा, या आशेनें प्रत्येक सुभेदाराचे डोळे दिल्लीकडे लागलेले असत. प्रत्येकाची दिल्लींतील मित्रमंडळी त्याच्यातर्फे वाटतील तशीं कारस्थानें करीत व आपल्या बाजूला मजबुती आणण्याकरितां, **वचने किं दरिद्रता** हें सुभाषित नजरेसमोर धरून, वाटेल त्या सरदाराला वाटेल तसें आमिष दाखवीत व तोंडास येतील तीं भरमसाट वचनें देत. इकडे बादशहाहि सय्यदांच्या मदतीनें गादीवर बसला, परंतु सय्यदांच्या ओंजळीनें पाणी पिणें त्याला आवडेनासें झालें. तो सय्यदांविरुद्ध कारस्थानें रचूं लागला, परंतु सय्यदांना मनांतून तो फार भीत असे; कारण सय्यद आपणांस चुरडून टाकतील हें तो जाणून होता. म्हणून तो कांहीं ना कांहीं तरी निमित्तानें प्रथम सय्यदांना दिल्लीबाहेर मोठ्या मानमरातबानें जाऊं देई व नंतर त्यांचा पाडाव करण्याच्या उद्योगाला लागे. सय्यदांना ज्या बादशाही शत्रूंवर स्वारी करावयास तो पाठवी, त्यांनाच गुप्तपणें पत्रें पाठवून सय्यदांचा पराभव करून बादशहास त्यांच्या जाचांतून सोडवल्यास, चांगलें इनाम व जहागिरी देऊं करी. सय्यदांना बादशहाचा हा नेभळा व नामर्द स्वभाव पुरतेपणीं कळला असल्यामुळें, तेहि आपल्या संरक्षणासाठीं कारस्थानें करीत असत.

रजपूतराजेहि स्वतंत्रपणें वागूं लागले. राजपुतान्यांतील मुख्य राज्यें तीन जयपूर, जोधपूर व उदेपूर. इतर संस्थानिक ह्या तिघांपैकीं कोणाच्या तरी तंत्रानें चालत असत. उदेपुरास राणा अमरसिंह ( १७०० ते १७१६ ) व राणा संग्रामसिंह ( १७१६ ते १७३४ ) या दोन शूर व चतुर राज्यांच्या कारकीर्दी या काळांत घडून आल्या. पण त्यांचें लक्ष त्यांच्या पूर्वपरंपरेप्रमाणें राज्यविस्ताराकडे नसून स्वतःचें व कुलाचें पावित्र्य व सन्मान रक्षण करण्याकडे होतें. जोधपूर येथील अजितसिंह (१६७८–१७३१) व त्याचा मुलगा अभयसिंह (१७३१–१७५०) हे दिल्ली येथील पक्षोपक्षांतील भांडणांत प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष भाग घेऊन आपला फायदा करून घेण्याच्या प्रयत्नांत असत. जयपुरचा राजा सवाई जयसिंह (१६९९ -१७४३) याचें लक्ष विद्याव्यासंगांत असे. हा धाडशी नसला तरी कारस्थानी होता. दिल्लीच्या बादशाहीविषयीं यांच्या मनांत मुळींच प्रेम उरलें नव्हतें. औरंगजेबानें हिंदूंवर जिझिया कर बसविल्यापासून रजपुतांचीं मनें बादशाहीविषयीं विटलीं होतीं. औरंगजेबासारखा व्याघ्र जिवंत असतां हे मुखस्तंभ होते, परंतु मराठ्यांनीं त्याचा नक्षा उतरलेला पाहतांच यांना मनांतल्या मनांत गुदगुल्या होत असत. तो आनंद अर्थातच मुखावर प्रगट करण्याची सोय नसे; कारण बादशहानें

त्यांच्या घरादारांवरून ताबडतोब नांगर फिरविला असता व त्यांना सुळावर धरलें असतें. औरंगजेबाच्या कारकीर्दींत त्यांचें राजेपण म्हणजे सुळावरच्या पोळी प्रमाणें होतें. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर त्यांनीं १७१० मध्यें आपसांत उदेपूर येथें असा करार केला कीं, इतःपर आपल्या मुली बादशहाला द्यावयाच्या नाहींत व त्याची नोकरी करावयाची नाहीं. अकबराच्या वेळेपासून चालत आलेल्या बादशाही हक्कावर व विलासावर या तहानें विरजण पडूं पाहत होतें. तेव्हां सय्यदांनीं त्यांच्यावर स्वारी केली. प्रथम रजपुतांनीं १७१४ त सय्यदांचा पराभव केला. परंतु त्या त्रिकुटांपैकीं अजितसिंह स्वार्थाला बळी पडून त्या कटांतून फुटला व त्यानें आपली मुलगी इंद्रकुमारी बादशहाला देऊन आपल्या मुलांसाठीं सरदारी मिळविली. बादशहाच्या मृत्यूनंतर इंद्रकुमारीला परत जोधपुरास आणवून व तिची मोठ्या समारंभानें शुद्धी करून तिला परत हिंदु धर्मांत घेण्यांत आलें, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. उरलेल्या रजपूत राजांचा ओढा अर्थातच मराठ्यांकडे लागला, कारण बादशहाला जेरीला आणण्यास ते समर्थ आहेत असें त्यांना पूर्वानुभवानें कळलें होतें. याप्रमाणें मराठ्यांचा उत्तर हिंदुस्थानांत प्रवेश होतांना रजपूत व त्यांचे प्रतिस्पर्धी सय्यदबंधू हे दोघेहि आपापल्यापरी भिन्न हेतूनें पण मराठ्यांचे साहाय्यक झाले.

त्यावेळीं दक्षिणच्या सरसुभेदाराचें मुख्य ठाणें औरंगाबादेस असे. त्याच्या दिमतींत दक्षिणेंतील बऱ्हाणपूर ( खानदेश ), वऱ्हाड, हैदराबाद, बेदर, विजापूर व कर्नाटक असे सहा सुभे असत. शाहू दक्षिणेंत आल्यापासून या सरसुभेदारीवर खालील सरदारांच्या नेमणुका झाल्या.

दाऊदखान पन्नी ......१७०८ ते जानेवारी १७१३
निजामुल्मुल्क .........फेब्रुवारी १७१३ ते एप्रिल १७१५
सय्यद हुसेन अल्ली ......मे १७१५ ते नव्हेंबर १७१८
आलमअल्ली ...........डिसेंबर १७१८ ते आगस्ट १७२०
निजामुल्मुल्क .........सप्टेंबर १७२० ते जानेवारी १७२२

यांपैकीं दाऊदखान पन्नी हा मराठ्यांना अनुकूल होता. त्याच्या पदरीं रायभान भोसले म्हणून एक मोठा मराठा सरदार होता. हा व्यंकोजीचा दासीपुत्र असल्या- मुळें मराठेमंडळांत तो साहाजिकच रायभानजी काका म्हणून ओळखला जाई.

त्याच्या मदतीनें शाहूची घडी नीट बसली. शाहूला चौथाई सरदेशमुखीच्या सनदादेखील या सुभेदाराच्या कारकीर्दीत द्यावयाचें ठरलें होतें. परंतु ताराबाईनें ऐन मोक्यावर भाऊबंदकीचा दावा साधल्यामुळें तो योग घडून आला नाहीं. पुढील सरसुभेदारांची कारकीर्द मात्र शाहूला अत्यंत त्रासदायक झाली. निजामुल्मुल्क हा अत्यंत पराक्रमी व कारस्थानी सरदार होता. त्याच्या घराण्याचे शरीरसंबंध इतर थोरामोठ्या सरदारांशीं झाले होते. त्याची आई शहाजहानचा प्रसिद्ध वजीर सादुल्लाखान याची मुलगी होती. दक्षिणेंत पेशव्याचा व निजामचा झगडा जवळ जवळ एकसारखा शंभर वर्षे चालला होता; त्याचा प्रारंभ निजामाच्या या अल्पघडीच्या सरसुभेदारीच्या कारकीर्दीतच प्रथम झाला. याचा जन्म ११ आगस्ट १६७१ रोजीं झाला असून दक्षिणच्या मुख्य सुभेदारीवर येण्यापूर्वी यानें बादशाहीचीं अनेक लहानमोठीं कामें पार पाडलीं होतीं. याची बुद्धि तीक्ष्ण व पराक्रम दांडगा होता. दक्षिणेंत आल्याबरोबर यानें प्रथम ताराबाई व नंतर संभाजीचा पक्ष उचलला, आणि शाहूला परोपरीनें शह देण्याचा प्रयत्न केला. शाहूपासून फुटून निघालेले सरदार यानें हाताशीं धरले व त्यांना जहागिरी देऊन शाहूवर उठविले. चंद्रसेन जाधवाला यानें भालकी येथें फौजेच्या सरंजामाकरितां म्हणून मोठी जहागीर दिली. सर्जेराव घाटग्यास कागल बहाल केलें, व बारामती रंभाजी निंबाळकराच्या हवालीं केली. याच्या १३ ते १५ या दोन वर्षांच्या कारकीर्दीत शाहूला ' त्राहि भगवान ' झालें. निजाम, संभाजी, चंद्रसेन व निंबाळकर या चौघांनीं इतर लहान मोठ्या सरदारांना फितवून उच्छेद मांडला. ' निंबाळकर वगैरेंनीं एकत्र होऊन जमाव केला आहे. वाई देशीं येऊन धामधूम करणार. तरी तुम्ही जमानिशीं येणें ', अशी आज्ञा बाळाजीस शाहूनें ५ नव्हेंबर १७१४ रोजीं केली. ' या प्रांतीं करवीरकरांनीं निजामुल्मुल्क यानें साहाय्य करून घेऊन दंगा करण्याचा विचार केला. नबाबाचा अदूरपणाचा प्रकार व करवीरकरांची कोते अंदेशी हे दोन अर्थ एकत्र झाले आहेत. याचा परिणाम कळलाच आहे. तुम्हांसारखे अतुल पराक्रमी सेवक असतां स्वामींनीं या मनसुब्याचा हृद्रोग बाळगावा असा प्रकार नाहीं. देशी फौजा आहेत त्या जमावल्या आहेत, तुम्ही तिकडील चार कामें सामान्य असतील तीं ठेवून सत्वर यावें. ' शाहूच्या या आज्ञेनुसार बाळाजीनें पुणें प्रांताचा तातडीनें बंदोबस्त केला. आंगरे यांजकडून लोहगड घेऊन व पुरंदर सचिवाकडून आपल्या हातीं घेऊन, त्यानें पुण्यावर पूर्वपश्चिम बाजूंनीं शह दिला, व निजामाचीं कारस्थानें हाणून पाडलीं.

शाहूच्या सुदैवानें १७१५ च्या आरंभीं निजामाची बदली होऊन सय्यद हुसेन दक्षिणचा सरसुभेदार होऊन आला. सय्यदाचें व निजामाचें वांकडें होतें, तेव्हां एकाच्या धोरणाविरुद्ध दुसरा हटकून वागावयाचा, हा मनुष्यस्वभाव जाणून बाळाजीनें आपलें पुढील धोरण आंखलें. सय्यदाला स्वसंरक्षणासाठीं कोणा तरी मोठ्याचा हात धरावयाचा होता; कारण दिल्लींत बादशहा त्याच्या विरुद्ध उठला होता. करवीर-करांत बादशाही फौजेशीं टक्कर घेण्याची ताकद नव्हती. शाहूच्या राज्यांत खाजवून खरूज काढण्याइतकें सामर्थ्य मराठ्यांच्या अंगीं आलें होतें. शिवाय संभाजी हा निजामाचा हस्तक बनला होता. तेव्हां सय्यदानें साहजिकच शाहूचा पक्ष घेतला. याचा परिणाम लागलीच दिसून आला. बाळाजीनें ताबडतोब मातलेल्या पुंडांचीं बंडें मोडलीं व त्याच्या फौजेंतील व्यंकोजी ढमढेऱ्यानें पुण्यांतील निंबाळकरांचें ठाणें उठवून दिलें. संभाजीच्या मुलुखावरही चालून जाऊन त्यानें त्यास गप्प केलें.

इकडे बादशहानें दाऊदखान पन्नीस सय्यदाचा पराभव करून त्यास ठार करण्याची कामगिरी सांगितली. बऱ्हाणपूरनजीक या दोघां मुसलमान सरदारांची लढाई होऊन तींत दाऊदखान मारला होता. खानदेशचा बंदोबस्त त्यानंतर ढिला झाल्यामुळें, खंडेराव दाभाड्यानें खानदेश व गुजराथ प्रांतावर स्वाऱ्या करून या प्रांतांतील दळणवळणाचा मुलुख आपल्या ताब्यांत घेतला. शाहूनें त्या नंतर दाभाड्यास सेनापतीचा हुद्दा देऊन, गुजराथ व काठेवाडवर मराठ्यांचा अंमल बसवावा अशी आज्ञा केली. सय्यदाच्या मनांत मराठ्यांविषयीं विशेष प्रेम होतें अशांतला भाग नाहीं. परंतु तो पेंचांत सांपडल्यामुळें त्यानें शाहूशीं तह केला. राजाराम महाराजांच्या वेळीं शंकराजी मल्हार सचिव होता. पुढें तो स्वराज्य सोडून काशीस यात्रेकरितां गेला व नंतर दिल्लीस जाऊन बादशाहींतील एक वजनदार मुत्सद्दी बनला. तो सय्यदांबरोबर त्याचा वकील या नात्यानें दक्षिणेंत आला. शाहूनें त्याला बहुमान देऊन त्याची उत्तम बरदास्त ठेवली.

"पादशाईंत बादशहा यांशीं सर्वाध्यक्ष सैद होऊन वजीरी कारभार करूं लागले, तें निजाम उन्मुलुक वगैरे सरदार यांस असह्य झालें. आणि दोन भाग होऊन एक-मेकांस घालवावें ऐशी मसलत वाढली यावरून औरंगाबादेस हसन अल्लीखान सैद होते यांस आलम अल्लीखान सैद याणीं लिहिलें जे 'जुल्पकारखान वगैरे सरदार याणीं फरोखशहास अनुकूळ करून बखेडा आरंभिला आहे.' यावरून हसनअल्ली याणी संक्राजी मल्हार यांस 'मसलत कशी करावी ? तुम्ही येथें सुभ्याचें काम

बंदोबस्त राखावा; आपण फौज जमाव घेऊन दिल्लीस जाऊन बखेडा मोडितों ' विचारिलें. ते समयीं संक्राजी मल्हार याणीं मसलत सांगितली कीं, 'शाहूराजे पादशाहींतून सुटून आले. सर्व आपले दौलतीचा बंदोबस्त केला. मातबर सरदार व कर्ते माणसें, मुत्सद्दी, कार्यकर्ते जमविले. फौज, पागा, कारखाने, मोडलेले जमविले. आणि फौजसुभे मोठमोठे पाठवून मुलूख अंमल काबीज केला. त्यांशीं सख्य करावें. म्हणजे ते सहजच आपले सुभ्यांत उपद्रव करणार नाहींत. त्यांची फौज व लोक मदतीस बरोबर घेऊन जावे म्हणजे थोर मसलत व मोठीं कार्यें घडून येतील. नाहीं तरी मसलत दुर्घट आहे. ' यावरून हसनअल्ली बहुत खुष होऊन, ' तुम्ही पूर्वी त्यांचे पदरींचे, तुम्हींच या कामास जाऊन तह ठरवून पन्नास हजार फौज त्यांची कुमकेस बराबर यावी [ असें करावें. ] त्याचा खर्च देऊन व त्यांचे मतलब काय असतील ते येथें करावयाचे व पादशहापाशीं करून द्यावयाचे ते कबूल करावे. आणि दक्षिणेंत जे आमचे तर्फेचे कामावरि राहतील त्यांची मदत त्याणीं राखावी ऐसें ठरवून यावें ' सांगितलें. तेव्हां संक्राजीपंत यांणीं मनांत विचार केला जे ' महाराजांचा प्रताप, दैव विचित्र आहे. गुण हीं सर्व राजचिन्हें दिवसेंदिवस वृद्धीस पावावें ऐसेंच आहे. आपण पूर्वी पासोन त्यांचे पदरचे त्यांचें अन्न भक्षिलें आहे. त्यांचें दर्शन होईल. त्यांची सेवा घडावी ऐसा योग सहज प्राप्त झाला आहे.' म्हणोन हसन अल्लीखानापाशीं जाऊन मसलत सिद्ध करितों ऐसें मान्य केलें. त्यांनीं बराबर लवाजिमा मातबर, हत्ती घोडे व पांच हजार फौज, स्वार, गारद ऐसे मोठे योग्यतेचा दिल्हा व महाराजांस पोशाख वस्त्रें जवाहीर, हत्ती, घोडे उत्तम पदार्थ ऐसे देऊन रवाना केले. ते आले. संक्राजी मल्हार पूर्वीचे आपले सचिव व सैदाकडून वकीलीस येतात कळोन महाराजांनीं प्रतिनिधी व अष्ट प्रधान व सरदार सर्व आणविले. संक्राजीपंत आले त्यास सामोरे जाऊन मोठे योग्यतेनें भेटी जाल्या. त्यांणीं नजर केली. सरकारांतून बादली चादर घातली. त्यांस राहण्यास जागा याचे लवाजम्या सुद्धां राहण्याजोगी नेमून देविली..............
या नंतर बोलण्यास प्रारंभ केला तेव्हां संक्राजीपत यांनीं सैदाचीं बोलणीं सर्व विदित केलीं. 'यांत महाराजांचीं कार्यें असतील ते आज्ञा करावी त्यास दरमहा काय तो नेमावा ' बोलले. तें महाराजांसीं मानलें आणि सांगितलें जे ' पूर्वी जैसिंगराजे येऊन महाराजांचा तह होऊन दिल्लीस जातेसमयीं स्वराज्य दरोबस्त पावले, घाट, कोंकण, वरघाट, बालाघाट चालावा. सहा सुभे दक्षिणेंतील चौथाई व सरदेशमुखी चालावी ऐसा तह जाला त्याप्रमाणें चालावे.

मातुश्री व कबिले तेथें राहिले ते येणें घडावे ' ऐसे मतलब ते निवडोन यादी करून फौज घेऊन जाण्यास मुख्य प्रधान बाळाजी विश्वनाथ व खंडेराव दाभाडे सेनापति व संताजी भोसले, परसोजी भोसले सेनासाहेब सुभा यांचे पुत्र व पवार विश्वासराव ऐसे सरदार व पन्नास हजार फौज नेमिली. त्यास दररोज पन्नास हजार रुपये याप्रमाणें पंध्रा लक्ष रुपये दरमहा पावावा ऐसें ठरावून मतलबाची यादी करून दिल्ही......आणि सध्याच ठाणियांत मोगलाई अमलाचे सुभे होते व स्वराज्याचे जिमेचे बाहेर राहून अमल घेत होते ते मोंगलाई ठाणीं सदरीं लिहिलीं तीं उठवून दरोबस्त अमल स्वराज्याकडे यावा ऐसें सांगितलें. ते संक्राजीपंत यांणीं सैदास लिहून मतलबाची यादी तह ठरावून आणिला. व ठाणेदार यास सोडचिठ्या आणून मोंगलाई अमल उठवून ' दरोबस्त अंमल स्वराज्याकडे मतलब दिल्लीहून व्हावयाचे ते करून तेथून देतो ' ऐसा तहनामा ठरावून पाठविला. शके १६३६ जयनाम संवत्सरे; सन खमस अशर मया व अलफ याप्रमाणें तह होऊन संक्राजीपंत याणीं महाराजांस मेजवानी सर्व अष्टप्रधान व सरदार व कारखानदार व राजमंडळ यांस वस्त्रें जवाहीर यथायोग्य देऊन केली. महाराजांनींहि पंतास मेजवानी त्याजकडील मुत्सद्दी कारकून व सरदारसुद्धां वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे बराबर दिल्हे. आणि औरंगाबादेस जाण्याचा निरोप दिल्हा. ते निघोन गेले. ''

सख्यदाचा ओढा मराठ्यांकडे होताच. बरेच दिवस वाटाघाटी होऊन जुन्या सचिवाच्या मध्यस्तीनें खालील तहाच्या अटी ठरल्या.

१ शिवाजीच्या वेळचें स्वराज्य तमाम गडकोटांसह शाहूच्या स्वाधीन करावें.

२ मराठे सरदारांनीं खानदेश, गोंडवण, वऱ्हाड, हैदराबाद व कर्नाटक या प्रांतांतील नवीन जिंकलेला प्रदेश त्यांच्याकडे राहूं देऊन, तो स्वराज्यांत सामील समजावा.

३ मोंगलाच्या दक्षिणेंतील मुलुखावर मराठ्यांनीं चौथाई सरदेशमुखी वसूल करावी व त्याचा मोबदला म्हणून वेळ पडेल तेव्हां पंधरा हजार स्वारांनिशीं बादशहाचे मदतीस जावें व मोंगलाच्या मुलुखांतील चोऱ्यांचा बंदोबस्त करावा.

४ कोल्हापूरच्या संभाजीस शाहूनें उपद्रव देऊं नये.

५ मराठ्यांनीं बादशहास दरसाल दहा लाख रुपये खंडणी द्यावी.

६ शाहूची मातुश्री, कुटुंब, संभाजीचा दासीपुत्र मदनसिंह व इतर मराठे मंडळी दिल्लीस बादशहाचे कबजांत आहेत, त्यांची सय्यदानें मुक्तता करून त्यांस दक्षिणेंत पावतें करून द्यावें.

शाहूच्या मनांत बादशाहीला नमूनच पण स्वतंत्रपणें राज्यकारभार करावयाचा होता. कारण त्याचें लहानपण बादशहाकडे गेलें आणि केवळ बादशाही कृपेनें तो वांचला व वाढला, आणि त्यानें हे दिवस पाहिले. संभाजीप्रमाणें बादशहानें त्याचीहि हत्या केली असती, तर बादशहाचा कोण हात धरणार होता ? बादशहानें त्यास, मराठेशाहीच्या स्वतंत्र उद्योगाला शह देणारें प्यादें जवळ असावें या उद्देशानेंच वाढविलें, हें खरें, परंतु तें कसेंही असलें तरी बादशाहीविषयीं शाहूच्या मनांत कृतज्ञतेची भावना होती. शिवाय तो राजा झाला असला तरी त्याची मातुश्री येसूबाई मोंगलांच्या कैदेंत खितपत पडली होती. त्यामुळें त्या मंडळीच्या सुटकेविषयीं तो अत्यंत आतुर झाला होता. येसूबाईनें अत्यंत हाल अपेष्टा व अपमान सोसून त्याला वाढविलें होतें, आणि म्हातारपणीं ती आई त्याला इतकीं वर्षें पारखी झाली होती. यादवराव पारसनीस यांस शाहू लिहितो 'शंकराजीपंताच्या व तुमच्या लिहिल्यावरून चौथाई व सरदेशमुखी परवाना व स्वराज्याची सनद ऐसे तीनही मतलब तों विल्हे लागले. राहिले मातुश्री येसूबाईसाहेब व चिरंजीव रा. मदनसिंह यांचे आगमन झाले आणि स्वामीची व त्यांची भेटी जाली, म्हणजे नबाबाच्या वचनाप्रमाणें रा. शंकराजीपंत दरम्यान पडिले आणि तुम्ही कष्ट मेहनत केली त्याची सार्थकता होऊन अवघेच मतलब सिद्धीस पावले. तर मातुश्रीविषयीं व चिरंजीवाचे विषयीं प्रतिक्षणीं स्मरण देऊन त्यांचें अविलंबें आगमन होय ते गोष्टी करणें.' येसूबाई या वेळीं वृद्ध झाल्या होत्या. त्या मोंगलांच्या कैदेंत वारल्या असत्या तर शाहूला तो कायमचा कलंक लागला असता. बादशहा सुखासुखी त्यांना सोडील असा, शाहूच्या व पेशव्यांच्या कर्तबगारीला, भरंवसा नव्हता. कारण ती मंडळी दिल्लीस ओलीस असल्यामुळें, बादशहा मराठ्यांच्या दक्षिणेंतील हालचाली धाक दाखवून रोखूं शकत होता. येसूबाई तेथें सुखांत व चैनींत होत्या, फक्त अटकेचाच जांच त्यांना सहन करावा लागत होता, हें म्हणणें चुकीचें आहे. त्यांचें आयुष्य अत्यंत कष्टांत व विपत्तींत गेलें. परंतु ती बाई अतिशय थोर मनाची, म्हणून तिनें मोठ्या धीरानें पुढील ध्येयावर नजर रोखून दिवस काढले. हे कष्ट आरंभापासून अखेरपर्यंत तेच्या नशिबीं देवानें लिहिले होते. औरंगजेब जिवंत असतां खालील हृदयद्रावक पत्र तिनें चिंचवडच्या देव महाराजांना १७०५ मध्यें लिहिलें. ती प्रतिबंधांत असल्यामुळें तें पत्र दुसऱ्याच्या हातीं लागेल या भीतीनें, किंवा कदाचित् तुरुंगांतील मोंगल अधिकाऱ्यांनीं तें तपासलें ( censored ) असावें, म्हणून त्यांतील मजकुर फारसा खुलासेवार नसला तरी वस्तुस्थिति दर्शवितोः—

॥ श्री शंकर ॥

१६२७ वै. शु. ७.

राजश्री श्री देव स्वामीचे सेवेसी

॥ श्रीमत परमपूज्य तपोनिधी मुक्तिदायक सकलगुणालंकरण देवमान्य वरद-मूर्तीपरायण राजमान्य राजश्री

आज्ञाधारक सेवेसी मातुश्री येसूबाईसाहेब दोनी करकमल जोडून चरणावरी मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विनंति. उपरि. येथील क्षेम तागाईत वैशाख सुध सप्तमी गुरुवार जाणऊन मुक्काम अमदानगरीं दुर्गांत स्वामीच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे. स्वकीय कुशळ—लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेष. बहुत दिवस जाले. स्वामींनी आशीर्वाद पत्र पाठवून बालकाचा परामृश केला नाहीं. या करितां चित्तास स्वस्थता होत नाहीं. तें देव जाणें. तरी स्वामींनीं येणारा मनुश्या-बराबरी प्रतिक्षणीं आशीर्वादपत्र पाठवीत गेलें पाहिजे. विशेष. आमचे वर्तमान तरी स्वामीपासी सत्यच लेखन केलें पाहिजे. चिरंजीव दाजी तों पृथ्वीपती समा-गमें गेले. आम्हांस सार्वभोमाची आज्ञा जाली कीं ‘ अहमदनगरास जावें ’. आज्ञे-प्रमाणें आम्हांस अहमदनगरास घेऊन आले. तेथें आलियावरी आजी पांच मास जाले. परंतु खर्चाची बहुत तंगचाई जाली. काय निमित्य तरी सावभौम दूर गेले. आमचा तनखा जो दिल्हा तेथें ताम्रानीं व हरिभक्तांनीं व कांहीं काळानें करून प्रतिकूल जाली, यामुळें द्रव्य येणें राहिलें. येथें अहमदानगरीं साहुकारांचे पांच सात सहस्र ब्रम्हस्व जालें. आतां कोण्हीं देत नाहीं. मागिल्याच पैकियास तगादे लाविले आहेत. त्याच्यामुळें बहुत कष्टी होतों. तो दुःखसागर स्वामीस काय म्हणऊन ल्याहवा ! स्वामीच्या सेवेसी रायाजी जाधव पाठविला असे. तरी माहाराज कैला-सवासी स्वामी गेल्या तागाईत आपणावरी हा कसाला प्राप्त जाला. इंगळास वोळंबे लागले. बरें. होणार भविष्य त्यास यत्न काय आहे ? आतां एक स्वामी वितरिक्त आणीक कोणाचा भरवसा या समयांत नाहीं. एक स्वामीच क्लेश परिहार करितील. इतराच्यानें कांहीं होणें नाहीं. तरी सारांश गोष्टी कीं ब्रम्हस्वापासून मुक्त केलियानें बहुत कीर्ति स्वामीची आहे. आणि पाऊस पाणी जालीयावरी स्वामी ज्यापासून देवितील त्यास प्रविष्ट करून. परंतु हा समय आम्हांवरी कठीण पडला आहे. आपले कोणी येथें प्रतिपक्षी नाहीं ऐसा प्रसंग प्राप्त जाला आहे. याचे निवारण करणार स्वामी आहेत. माझी उपेक्षा केली न पाहिजे. वरकड चिरंजिवाकडील सामराज व

आमचे वर्तमान रायाजी मुखांतरी चरणापाशीं विनंति करितां स्त्रुत होईल, तें सत्यच मानणें. विशेष ल्याहावें तरी आपण अज्ञान, मूढ असे. लिहितां येत नाहीं. अथवा ज्ञानहि नाहीं. त्याहिवरी आपणा जवळीं कोण्ही शाहणा कारकून नाहीं. आवाक्षराची क्षमा केली पाहिजे. कृपा आशीर्वाद निरंतर करीत गेलें पाहिजे. कृपा आसो दीजे. जाणिजे मो.

सेवेसी सेवक बसवंतानें चरणावरी मस्तक ठेऊन सां दंडवत विनंति उपरि लि॥ परिसिजे. मी सेवक असे. आशीर्वाद पत्र पावीत जाणे, जाणिजे हे विनंति. रा छ ११ माहे मोहरम सन ४९ हे विज्ञापना. ”

* * * *

या पत्रावरून येसूबाईच्या कैदेंतील स्थितीची कल्पना येते. शाहूला राज्यावर येऊन बहुत दिवस झाले असल्यामुळें, सय्यदांच्या मार्फतीनें तह करून मातोश्रीची सुटका करण्यास तो उत्कंठित झाला होता. म्हणून खंडणीची अट पत्करून देखील बाळाजीनें हा तह घडवून आणला. शिवाय बादशाही मुलुखांतून पांचपन्नास लाखांचा ऐवज आणावयाचा व त्यांतूनच दहा लाख बादशहाच्या तोंडावर टाकावयाचे, असा पदराला खार न लावणारा हा प्रकार होता.

या तहानें शाहूचें वजन अतिशय वाढलें व त्या प्रमाणांत बाळाजीचा बोलबाला झाला. लोकांस त्याची कर्तबगारी दिसून आली. सर्वांवर वचक बसला. अष्टप्रधान व इतर सरदार बिनतक्रार त्याची आज्ञा प्रमाण मानून त्याप्रमाणें वर्तन करूं लागले. मराठे सरदार धडाडीनें सर्वत्र संचार करावयास उत्सुक झाले. मराठ्यांचें लक्ष घरगुती भांडणांतून निघून तें हिंदुस्थानांतील नवा मुलुख पादाक्रांत करण्यांत गुंतलें. आपल्या कर्तबगारीला, प्रयत्न केला व अंगीं योग्यता असली तर, हिंदुस्थानांत वाटेल तेवढें कार्यक्षेत्र सांपडूं शकेल, अशी सर्वांची खात्री पटली. डबक्यांतील बेडकांप्रमाणें पुणें—सातारा—कोल्हापूर या लहानशा पण बे-छत्रपती पट्टींतच घुटमळावयास नको, असें सर्वांना वाटूं लागलें. बाळाजी विश्वनाथानें उत्पन्न केलेल्या या नव्या भावनेमुळेंच मराठ्यांच्या हातून पुढें अचाट पराक्रम झाले व सर्व हिंदुस्थानांत त्यांचा दरारा बसला. या तहानें मराठेशाहीच्या कारभारास नवें वळण लागलें. मराठ्यांनीं याउपर बचावाचा जुना डाव त्याज्य ठरवून चढावाचें नवें धोरण अमलांत आणलें. मराठ्यांचें परराष्ट्रीय राजकारण यानंतर जोरानें चालू झालें. परराज्यांतील घडामोडीवर नजर ठेवून त्या धोरणानुसार स्वराज्यांतील कारभारांत फरक करण्याची आवश्यकता भासूं लागली.

सय्यद हुसेनअल्लीचा नक्षा उतरण्याकरितां बादशहानें अनेक अधिकारी दक्षिणेंत पाठविले, व अनेकांना गुप्त पत्रें लिहिलीं. परंतु सय्यदानें त्या सर्वांना धाब्यावर बसविलें. तेव्हां बादशहानें आपल्या मसलतीसाठीं मुरादाबादच्या सुभ्यावरून निजामला, पाटण्यावरून सरबुलंदखानाला व गुजराथेवरून अजितसिंहाला दिल्लीस बोलावलें. हे तिन्ही पराक्रमी सुभेदार बादशाही आज्ञेप्रमाणें दिल्लीस येऊन दाखल झाले. त्यांच्याबरोबर त्यांच्या फौजाही येऊन थडकल्या. हुसेन अल्लींचा भाऊ सय्यद अबदुल्ला हा दिल्लीस वजीरी करीत होता; त्यानें हा रागरंग पाहून नवीन लोक भरती करून आपली फौज वाढविली व तेवढयानें काम निभेल असें वाटेना, म्हणून धाकट्या भावास त्यानें दक्षिणेंतून आपल्या मदतीस बोलावलें. सय्यद हुसेननें आपला पुतण्या आलमअली याजवर दक्षिणचा कारभार सोंपविला व शंकराजी मल्हारच्या तंत्रानें वागण्याची त्यास सल्ला दिली. आलम अलीचा भाऊ सैफुद्दीन याजकडे खानदेशची व्यवस्था सोपवून दिली. तहाप्रमाणें पंधरा हजार फौज घेऊन बाळाजी सय्यदास जाऊन मिळाला. बाळाजीनें आपला पुत्र बाजीराव व बाळाजी महादेव भानू हीं दोन अत्यंत विश्वासांतील माणसें आपल्या बरोबर घेतलीं. कारण सिंहाच्या गुहेंत जाऊन त्याचें भक्ष त्याच्या पुढून उचलून आणावयाचें होतें. खंडेराव दाभाडे व संताजी भोंसले हे दोन प्रमुख सरदार बाळाजीच्या हाताखालीं होते. १७१८ च्या नोव्हेंबर महिन्यांत या प्रचंड फौजेनें औरंगाबाद सोडलें. १४ डिसेंबर रोजीं बऱ्हाणपूर व २६ डिसेंबर रोजीं उज्जेन सोडून, फौज पुढच्या वाटेला लागली. रस्त्यांत सवाई जयसिंह व मुहकमसिंग बुंदेला हे त्यास येऊन मिळाले. नर्मदा नदी उतरल्यापासून तों परत येईतोंपर्यंत, फौजेच्या खर्चाकरितां महिना पंधरा लक्ष रुपये देण्याचा हुसेनअल्लीनें मराठ्यांशीं करार केला, व तहाच्या कबुलीचें फर्मान व सनदा बादशहाकडून मराठ्यांस मिळवून देण्याचा व शाहूची मंडळी कैदेंतून मुक्त करण्याचा बोजा हुसेनअलीनें आपल्या शिरावर घेतला होता. अमीनखान माळव्यांत सुभेदार होता, पण तो ही फौज चालून आल्याचें वर्तमान ऐकतांच, तडक आपला कारभार सोडून हुकमाशिवाय दिल्लीस चालता झाला; इतकी धडकी बादशाही सरदारांना मराठ्यांच्या या स्वारीची बसली होती.

या भीतीमुळें हुसेनअली माळव्यांत असतांच बादशाहानें त्याच्याशीं सामोपचाराचें बोलणें लावलें, व त्यानें वर चालून येऊं नये म्हणून नाना तऱ्हा करून पाहिल्या. मराठ्यांच्या सर्व मागण्या बादशहानें एकदम मान्य केल्या.

अजितसिंहास ‘ राजराजेश्वर ’ हा किताब देऊन खान डौरानच्या जागीं त्यास गुजराथच्या सुभ्यावर नेमलें. जयसिंहास ‘ राजाधिराज ’ व ‘ राजेंद्र ’ अशा पदव्या देऊन खुश केलें. तेव्हां हुसेनअली अर्ध्या वाटेंतून परत दक्षिणेंत फिरण्याचा विचार करूं लागला. कारण बादशहाला शह लागावा व आपल्या वाटेस त्यानें पुन्हां जाऊं नये, एवढीच त्याची इच्छा होती. परंतु शाहूचीं बायकामुलें व मातुश्री प्रत्यक्ष हस्तगत झाल्याशिवाय मराठे मागें फिरतना. शिवाय बादशहा आपल्या वचनाला जागून सनदा निमूटपणें पाठवून देईल, अशी खात्रीही त्यांना येईना. हें संकट टळल्यावर ‘ गरज सरो व वैद्य मरो, ’ असलाच प्रकार होण्याचा संभव फार होता. मराठ्यांच्या या आग्रहामुळें हुसेनअलीनें दिल्लीवर चालून जाण्याचें ठरविलें.

बादशहा मातोश्री येसूबाई, मदनसिंह व इतर मंडळी यांना मुक्त करील कीं नाहीं, याबद्दल मराठ्यांना धाकधूकच होती. तेव्हां त्यांनीं मोंगल बादशाहीचा एक तोतया वारसदार बळेंच उभा केला. औरंजेबाचा मुलगा अकबर मागें औरंगजेबाविरुद्ध बंड उभारून, संभाजीकडे येऊन, पुढें तेथून इराणांत पळून गेला होता. त्याचा पुत्र मुइनुद्दीन शाहूच्या दरबारीं असून, तो आपल्या कुटुंबीय मंडळीबद्दल शाहूनें बदला ओलीस म्हणून ठेवून घेतला आहे, अशी गप उडविण्यांत आली. हुसेनअलीनें बादशहास ही हकीकत कळविली व शाहूची मातोश्री व बंधू कैदेंतून मुक्त केल्यास मुइनुद्दीनला बादशहाच्या हवालीं करण्यास शाहू तयार आहे, ही सूचना लिहून पाठविली. बादशहानें ही सूचना ताबडतोब मान्य केली व मुइनुद्दीनास दिल्लीस पाठविण्याविषयीं लिहिलें. तो तोतया अर्थातच या स्वारीबरोबर होता.

फेब्रुवारी १७१९ मध्यें हुसेनअली दिल्लीस पोहोंचला. तेव्हां त्याची कडेकोट फौजेची तयारी पाहून बादशहा अतिशय घाबरला व त्यानें निजामास पाटणाच्या सुभेदारीवर आणि जयसिंहास परत आपल्या राज्यांत निघून जाण्याचे हुकूम सोडले. अशानें सय्यद खुष होतील अशा भ्रमांत बादशहा होता. पण नशिबानें त्यास दगा दिला. तो दगलबाज असला तरी कमालीचा भित्रा होता. सय्यदावर एकदम हल्ला करण्याचा त्याच्या कांहीं राजनिष्ठ सरदारांनीं त्यास सल्ला दिला, पण तो त्यानें मानला नाहीं.

२८ फेब्रुवारी रोजीं सय्यद बंधूंनीं फरुखशायरास पदच्युत करून रफीउद्दराजत यास गादीवर बसविलें. त्या दिवशीं दिल्लींत जी गर्दी उडाली, त्या गडबडींत

निजामाचा चुलता अमीनखान व मराठे यांच्यांत भांडण उत्पन्न होऊन, सरासरी दोन हजार मराठे कापले गेले. हें भांडण त्या धुमश्चक्रींत गैरसमजानें घडून आलें. बाळाजीपंत भानू व संताजी भोसले हीं दोन प्रमुख माणसें या गर्दींत ठार झालीं. बाळाजीपंत पेशव्यांनीं आपल्याबरोबर स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखी या मातबर सनदा घेऊन जाणें दिल्लींतील लोकांस आवडलें नाहीं म्हणून त्यांनीं पालखीपदस्थ भानूवर ते पेशवे अशा समजुतीनें हल्ला केला व त्यांना ठार मारलें. इकडे पेशवे साध्या शिपायाच्या वेषानें सनदा छिपवून घेऊन आपल्या छावणींत गुपचुप येऊन पोहों-चले, आणि केवळ स्वामीकार्यासाठीं मुद्दाम पालखींत बसून व महाद्वारानें बाहेर पडून व आपण पेशवे आहोंत अशी दिल्लीशहरवासी लोकांची मुद्दाम दिशाभूल करून, बाळाजीपंत भानूंनीं मरण आपल्यावर ओढवून घेतलें, ही आख्या-यिका चटकदार असली तरी खरी दिसत नाहीं. ता. ३ मार्च रोजीं चौथाईचा व ता. १५ मार्च रोजीं सरदेशमुखीचा करार बादशहानें करून दिला, व शाहूच्या कुटुंबांतील सर्व मंडळींची मुक्तता केली. ता. २८ रोजीं घडलेल्या प्रकाराबद्दल दिलगिरी प्रदर्शित करून निजामानें मराठ्यांशीं सलोखा करण्याच्या हेतूनें त्यांना ‘ भाईचारा ’ म्हणजे मेजवानी दिली. फौजेचा खर्च व प्राणास मुकलेल्या मरा-ठ्यांच्या रक्ताची भरपाई, द्रव्याच्या रूपानें बाळाजीनें सय्यदांपासून भरपूर चोपून घेतली. शाहू छत्रपति व दक्षिणेंतील इतर मराठे सरदार यांना पोशाख देण्यांत आले व संताजीचा भाऊ राणोजी भोसले यांस ‘ सवाई संताजीराव ’ असा किताब बादशहाकडून देण्यांत आला. याप्रमाणें इच्छित कार्य उत्तम रीतीनें तडीस नेऊन, ता० २० मार्च १७१९ रोजीं बाळाजीनें दिल्ली सोडली व दरकुच दरमजल करीत तो ता० ४ जुलै रोजीं साताऱ्यास येऊन दाखल झाला.

बाळाजीनें अगदीं थोड्या अवधींत केलेला पराक्रम इतका मोठा होता कीं सर्व दक्षिण चकित झाली. एका बादशहाला पदच्युत करून दुसऱ्याला बादशाही मसन-दीवर स्थापन करण्याच्या कारस्थानांत मराठे इतक्या प्रमुखपणें भाग घेऊं शकले, ही गोष्ट कोणाला शक्य कोटींतील वाटेना. अकरा वर्षांपूर्वीं ज्या सनदांसाठीं शाहूला बादशहापाशीं व त्याच्या सरदारांपाशीं याचना करावी लागूनही त्या मिळाल्या नाहींत, त्याच सनदा बाळाजीनें दिल्लीहून मिरवीत मिरवीत साताऱ्यास आणल्या. सरासरी तीस वर्षांच्या दीर्घ बंदिवासानंतर मातोश्री येसूबाईंची सुटका होऊन त्या दक्षिणेंत आपल्या पुत्राजवळ रहावयास आल्या. खुद्द शाहूची पत्नी व बंधू आपल्या परिवारासह कैदेंतून मुक्त होऊन आपल्या घरीं आले. बाळाजीच्या

या अचाट कामगिरीनें हर्षित होऊन, कृतज्ञताबुद्धीनें शाहूराजे त्याचें स्वागत करण्याकरितां लवाजमा घेऊन त्यास सामोरे गेले व त्याचा त्यांनीं अत्यंत सन्मान केला, याबद्दल नवल वाटावयास नको. त्या मंगल व आनंदमय भेटीचें वर्णन जितकें करावें तितकें थोडेंच होईल !

बाळाजीपंतांनीं फौजेचें व सरदारांचें देणें वारून तीस लाख रुपयांचा भरणा सरकारी जामदारखान्यांत केला. महाराज अत्यंत खुष झाले. पंतप्रधानास पांच महालांचें सरदेशमुखीचें वतन महाराजांनीं करून दिलें व इतरांचाही त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें परामर्ष घेतला. 'राजश्री बाळाजी महादेव भानू, बाळाजी पंडित प्रधान यांजबरोबर मजमूनिसबतीनें फडणिसी लिहिण्याचें प्रयोजन होतें, सबब पंडित प्रधान फौजेसहवर्तमान दिल्लीस गेले तेव्हां बाळाजी महादेव स्वारीस होते. दिल्लीचे मुक्कामीं युद्ध प्रसंग झाला ते समयीं बाळाजी महादेव मृत्यू पावले. याजकरितां रामाजी महादेव व जनार्दन बल्लाळ यांचें चालविणें स्वामीस आवश्यक जाणोन, स्वामी उभयतांवरि कृपाळु होऊन मौजे बांकसई गांव इनाम दिला असे.' दिल्लीच्या स्वारीनंतर भरलेल्या पहिल्याच दरबारांत ही सनद ( २ आगस्ट ) देण्यांत आली असावी.

येसूबाईसाहेब स्वराज्यांत राजमातेचें वैभव भोगीत दहा अकरा वर्षें पुढें वांचल्या. याप्रमाणें त्यांचा शेवट सुखाचा झाला. 'मातुश्री आऊसाहेब आली हें वर्तमान अवगत झालें.' पुढें दिलेलें पत्र संभाजीनें शाहूस १७३०–३१ त लिहिलें आहे. 'श्रीमंत सकल तीर्थस्वरूप राजश्रिया विराजमान राजश्री शाहूराजे दाजी वडिलांचे सेवेशीं, अपत्य संभाजीराजे दंडवत विनंति उपरी. वडिलीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट झालें. मातुश्री येसूबाईसाहेब यांसी वेथा होऊन कैलासवास जाला म्हणोन लिहिलें, यावरून ममताविषयें चित्तास परम खेद प्राप्त झाला. हा अयत्नी मार्ग ऐसाच आहे. वडील सर्वज्ञ आहे. विवेकेंकरून चित्ताचें सांतवन होय तें केलें पाहिजे.' असे अनेक लेखी उल्लेख याविषयीं सांपडले आहेत. शाहूमहाराजांची पत्नी सावित्रीबाई मात्र दक्षिणेंत सुटून आल्यानंतर लागलींच वारली. ता. २५ जानेवारी १७२० रोजीं येसूबाईनें कऱ्हाडच्या रघुनाथभट सवलीकराला पृथ्वीप्रदक्षिणा (?) केल्याबद्दल तीस होनांचें वर्षासन करून दिलें.

बाळाजीनें राज्याच्या उत्पन्नाची वांटणी खालीलप्रमाणें केली.

**सरदेशमुखी..........खास राजाचें उत्पन्न.**
**चौथाई.........स्वराज्याचें ठोक उत्पन्न.**

चौथाईच्या एकंदर उत्पन्नापैकीं

२५ टक्के छत्रपतीचे 'राजबाबती,' म्हणजे राजकीय खर्चाकरितां.
६ टक्के ( साहोत्रा ) राजानें मनास येईल त्यास द्यावा. शाहूनें तो सचिवास दिला. हा ज्याचा त्यानें वसूल करावा.
३ टक्के ( नाडगौडा ) प्रसंगोपात कामगिरीबद्दल बक्षीस वांटण्याकरितां राजाजवळची राखीव रक्कम.

**ऐन मोकासा** ६६ टक्के सरदारांच्या सरंजामी खर्चाकरितां.

---

एकूण १००.

कलमें ( १ ) प्रत्येक सरदारानें तोडून दिलेल्या प्रांतांतील रक्कम स्वतः वसूल करावी व सरकारचा हिस्सा नियमानें सरकारांत भरावा.

( २ ) राजाची मुख्य फौज पेशवे व सेनापति यांच्या ताब्यांत रहावी व जेथें जरूर पडेल तेथें ताबडतोब जाऊन त्यांनीं बंदोबस्त करावा.

( ३ ) प्रत्येक सरदारानें आपल्या मुलुखगिरीचा हिशोब सरकारांत नियमानें पटवावा.

( ४ ) सरदारांची प्रांतवार वसुली अधिकाराची वांटणीः—
पेशवे—स्वराज्य, खानदेश व बालेघांट.
सेनापति—बागलाण व गुजराथ.
कान्होजी भोंसले—वऱ्हाड व गोंडवण.
सरलष्कर—गंगथडी व औरंगाबाद.
फत्तेसिंग भोंसले—कर्नाटक.
प्रतिनिधी—नीरेपासून वारणेपर्यंतचा मुलुख व बेदर.
आंगरे—कोंकण.

( ५ ) वाटल्यास सरदारांनीं दरसाल ठरीव रक्कम सरकार पोत्यास जमा करावी. या कलमाप्रमाणें कान्होजी भोंसले सालिना दहा लाख, फत्तेसिंह सात लाख, व आंगरे तीन लाख, अशा ठराविक रकमा सरकारी खजिन्यांत सालोसाल भरीत असत. हा भरणा एकदां केला म्हणजे हिशोब सरकारांत रुजु करण्याची कटकट मिटत असे.

या सरंजामीपद्धतीनें मध्यवर्ती सरकार विस्कळित झालें खरें, परंतु त्यामुळें प्रत्येक सरदारास आपल्या पराक्रमाच्या जोरावर आपापलें अधिकारक्षेत्र, शत्रूंच्या मुलुखावर स्वाऱ्या करून वाढवून घेण्यास व त्यायोगें आपली योग्यता प्रस्थापित करण्यास उत्तेजन व स्वातंत्र्य मिळालें, आणि मराठी राज्य जोरानें फोफावलें. कारण जेवढी कर्तबगारी दाखवावी, व जेवढा नवा मुलुख जिंकावा, त्या प्रमाणांत सरदाराचें उत्पन्न व महत्व वाढे. उत्पन्न वाढलें म्हणजे त्याला अधिक फौज ठेवतां येई व नवीन ठेवलेल्या फौजेच्या मदतीनें पुन्हा नवा मुलुख काबीज करतां येई. याप्रमाणें हें कधींही न संपणारें रहाटगाडगें चालू झालें. महाराजांच्या जवळ जे चिटणीस, फडणीस व पोतनीस असत, त्यांनींच अष्ट प्रधानांचे व प्रमुख सरदारांचे चिटणीस, फडणीस व पोतनीस हे अधिकारी नेमावयाचे. प्रधानांच्या या अधिकाऱ्यांनीं आपल्या पसंतीनें, त्यांच्या हाताखालील दुय्यम सरदारांच्या जवळ वावरणारे हे त्रिकुट नेमावयाचे. यामुळें राज्यांतील सर्व लहान मोठे मुलखी अधिकारी एका तालमींत शिकलेले व एकाच वळणानें काम करणारे असत, आणि त्यामुळें राज्यांतील सर्व दप्तराचें काम सुरळित चाले. बाळाजीनें इतक्या अल्पावधींत ही अप्रतिम राज्यव्यवस्था केल्याचें पाहून त्याच्या अष्टपैलू बुद्धिमत्तेचा चमत्कार वाटतो. आज कदाचित् हें राजयंत्र कोणास फारसें पसंत पडणार नाहीं, परंतु मराठ्यांची आपल्या वतनावरील आसक्ति लक्षांत घेतां, दुसरी नक्त नेमणुकांची पद्धति त्या धामधुमीच्या व भाऊबंदकीच्या काळांत अयशस्वी झाली असती यांत संशय नाहीं.

ही व्यवस्था लावून होते न होते तोंच बाळाजीस दक्षिणेंत जावें लागलें. दिल्लीच्या मोहिमेवर जाण्यापूर्वी त्यानें संभाजीचा व पुंडांचा बंदोबस्त केला होता. परंतु पुनः 'येरे माझ्या मागल्या' अशी स्थिति प्राप्त झाली. १७१९ च्या सप्टेंबरांत चासकराकरवीं त्यानें कल्याण भिवंडी प्रांत हस्तगत केला, व पुण्यावर कायमचा कबजा केला. नोव्हेंबरांत जातीनें फौज घेऊन तो संभाजीवर चालून गेला. थोराताकडून आष्टयाचें व येळावीचें अशीं महत्वाचीं ठाणीं काबीज करून त्याचा त्यानें पाठलाग चालविला. थोरात पन्हाळ्याकडे चालला असतां त्याची व बाळाजीची वाटेंत चकमक झडून तो मारला गेला. लगेच बाळाजीनें लगट करून कोल्हापुरास वेढा घातला. ता० २० मार्च १७२० रोजीं इसलामपुरचे उत्तरेस उरूणबहे येथें बाळाजीनें संभाजीचा पराभव केला, व त्याला समज देऊन तो साताऱ्यास शाहू महाराजांचे दर्शनास गेला. हेंच बाळाजीचें अखेरचें राजदर्शन होय. कारण

तेथून तो सासवडास गेला व ता० २ एप्रिल रोजीं मरण पावला. हिंदु लोकांच्या आयुर्मानानें त्याचें वय झालें होतें. कारण या वेळीं तो सरासरी साठ पांसष्ट वर्षांचा असावा. एवढया वृद्धापकाळीं त्यानें जी पराकाष्ठेची मेहनत करून मराठी राज्याची इभ्रत वाढविली, ती अवलोकन केली म्हणजे अतिश्रमानें त्यास मृत्यू आला असावा असें वाटूं लागतें. या उतार वयांत घोड्यावर बसतांना किंवा घोड्यावरून उतरतांना त्याला एखाद्या माणसाची मदत घ्यावी लागत असली, किंवा त्याच्या अंगीं एखाद्या उल्लू तरुणाची चपळाई दिसत नसली, म्हणून फिदी फिदी दांत काढून हसण्याचें कारण नाहीं. त्याचा कामाचा व्याप पाहिला, म्हणजे त्याचें चापल्य मी मी म्हणणाऱ्या तरुणाला लाजविणारें होतें, असेंच म्हणावें लागतें. बाळाजीला घोड्यावर देखील बसतां येत नव्हतें इतका तो स्थूल होता वगैरे आचरट गप्पा बहुधा याच सुमारास उठल्या असाव्यात व त्या रूढ झाल्यात. परंतु या थोर पुरुषाची अचाट शिपाईगिरी पाहिली, म्हणजे या बाजारगप्पांवर कोण विश्वास ठेवील ? तो उत्तम घोडेस्वार नसता तर इतक्या झपाट्यानें तडफीच्या मोहिमा मारणें त्याला शक्यच नव्हतें. म्हातारपणीं मृत्यू जवळ आला असतां व शरीर अतिश्रमानें थकलें असतां देखील, पालखीचा उपयोग न करतां घोड्यावर बसून शिपायाबरोबर मजला मारणाऱ्या या वीराचें कौतुक करावयाचें कीं त्याला हसावयाचें ?

बाळाजी केवळ सहा वर्षें पेशवा होता, परंतु त्या अल्प काळांत त्यानें स्वराज्यास संकटमुक्त करून शाहूचें सिंहासन बळकट केलें व मराठ्यांच्या वैभवाचा पाया घातला. शेवटल्या दहा बारा वर्षांत त्याला फारसें स्वास्थ्य व त्यामुळें संसारसुख लाभलें नसेल. परंतु मुलांनाआपल्या बरोबर मोहिमांवर नेऊन व त्यांना राज्यकारभाराचें आणि शिपाईगिरीचें प्रत्यक्ष शिक्षण देऊन, त्यानें आपल्या संसारसुखाची भरपाई करून घेतली व पुत्रांचा भाग्योदयाचा मार्ग निश्चित करून टाकला. बाळाजीच्या उत्तरकालीन मोहिमांत बाजीरावाच्या पराक्रमाचा वाटा पडत होता, हें सांगणें नकोच. कारण बाजीरावाचें तारुण्य व शौर्य त्या वेळीं मुसमुसत होते व पित्याच्या देखरेखीखालीं त्याला तलवार मारण्याची संधी प्राप्त झाली होती. पेशवाई मिळाल्यानंतर तीन वर्षांनीं; चिमाजी आपाचें लग्न करतांना त्याला ब्रह्मेंद्रस्वामीकडून पांच सहाशें रुपये कर्ज काढून बाजीरावाची जामीनगत लिहून द्यावी लागली. यावरून सारा वेळ राष्ट्रकार्यांत व स्वामिसेवेंत गेल्यामुळें त्याची कौटुंबिक स्थिति अत्यंत ओढघस्तीची राहिली, असें स्पष्टपणें दिसून येतें. राष्ट्रीय

कामगिरींत सारें आयुष्य गर्क झाल्यामुळें स्वतःचें घर भरण्यास अशा पुरुषाला वेळ कोठून व कसा मिळणार? याचे पराक्रमी पुत्र हीच त्याची संपत्ती व त्यांचा झालेला यशोगौरव हेंच त्याचें धन! त्यांना नाना म्हणत असत. 'महाराजांची सेवा निष्ठेनें करून, मर्द व शहाणे राज्यांत मनुष्य नाना, ऐसा लौकिक वाढवून महाराजांची कृपा संपादून प्रधानपद मिळविलें. जीवाभ्याश्रम करून शत्रू पराभवातें पाववून महाराजांच्या राज्याचा बंदोबस्त केला.' हा बाळाजीबद्दलचा अभिप्राय यथातथ्य आहे.

---

## प्रकरण ५ वें.

# 'पेशवाई कीं हिंदुपदपादशाही'



बाजीरावाला पेशवाई देण्यांत येऊं नये म्हणून प्रतिनिधी वगैरे सरदारांनीं बरीच खटपट केली, आणि शाहूचा कलदेखील प्रथम बाजीरावास पेशवाई न देण्याकडेच होता, असे उल्लेख बखरींत आहेत. परंतु त्यांत राम दिसत नाहीं. शाहूसारखा उदारमनस्क राजा बाळाजीची प्रचंड जिवापाड कामगिरी विसरणें शक्य नव्हतें. बाळाजीपंत वारल्यानंतर बरोबर पंधरा दिवसांनीं म्हणजे ता० १७ एप्रिल १७२० रोजीं बाजीरावास पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. हा समारंभ कऱ्हाडनजीक मसूर गांवीं साजरा करण्यांत आला. एवढा लहान मुलगा कानामागून आला व तिखट झाला, असें प्रतिनिधी वगैरे सरदारांना वाटलें असेल व या कोंकणस्थ ब्राम्हणाच्या नांवानें त्यांनीं खडेही फोडले असतील. जुन्या पिढीजात सरदारांना व मुत्सद्यांना भट पेशव्यांचा उदय रुचला नसेल हें संभवनीय आहे. त्यांतल्या त्यांत बाजीरावचा स्वभाव बाळाजीपंताप्रमाणें मनमिळाऊ नसून, 'बहुत उद्दाम प्रकृतीचे, अवघा वेळ शिपाईगिरींत मग्न, राज्यकारभार चालवावयास सबुरी असावी तो भाव नव्हता,' या नमुन्याचा असल्यामुळें या तरुणाची पेशवेपदावर झालेली नेमणूक पुष्कळ वृद्धांस रुचली नसावी, व त्यांनीं तशी आपल्याकडून खटपट देखील करून पाहिली असावी. त्या वेळीं बाजीरावचें वय अवघें २२ वर्षांचें होतें. परंतु त्याच्या शौर्यावर व कर्तबगारीवर शाहूचा भरंवसा बसला होता. उत्तर हिंदुस्थानांतील बाळाजीनें सुरू केलेलें नवें राजकारण तडीस नेण्याचें सामर्थ्य जर कोणांत असलें, तर तें कट्टया बाजीरावांतच

आहे, दुसऱ्या कोणाच्या अंगांत ती धमक नाहीं, असें शाहूस वाट
तडफीचीं कामें तारुण्यांतच माणसाच्या हातून होतात. शिवाय बाजीराव
पणापासून बाळाजीच्या कारस्थानांत वावरून मुरलेला होता. दिल्लीची पा
त्यानें प्रत्यक्ष अवलोकन केली होती, आणि राज्यांतील बऱ्याच थोर व
घराण्याशीं त्याचें नातें जडलेलें असल्यामुळें, त्याचा दरारा सर्वत्र बसल
बाजीरावाला पेशवाईचीं वस्त्रें दिलीं त्याच दरबारांत शाहूनें चिमाजी आपास
असा किताब, दमाजी थोराताची जहागिरी जप्त केली होती ती व सरदा
चिमाजीचें वय या वेळीं सरासरी १४ वर्षांचें होतें. या दोन्ही भावांचीं व
असलीं तरी त्यांचा पराक्रम मोठा होता, आणि मोठेपण वयापेक्षां परा
अवलंबून असतें. बाजीरावानें

'श्रीशाहू नरपति हर्ष निधान
बाजीराव बल्लाळ मुख्य प्रधान'

असा आपला शिक्का सुरू केला. 'बाजीराव बाळाजी' या नां
'बाजीराव बल्लाळ' असें रोमांचकारी अपभ्रंशित रूपांतर करण्यांत बाज
लढाऊ वृत्ति दिसून येते. 'बाळाजी' शब्दांतील पोक्तपणा 'बल्लाळ' या
नामशेष होऊन, उच्छृंखलता उचंबळलेली दिसते.

"बाजीराव व चिमणाजी बल्लाळ बहुत कर्ते शहाणे निघाले. राज्यवृद्धी
धरून बहुत पराक्रम करून दाखवावा, महाराजांची कृपा संपादावी म्हणो
णास हिंदुस्थानची चौथाई सरदेशमुखी साधण्याचा सुभा सांगावा, म्हणो
केली. हें महाराजांनीं ऐकून बाजीराव यांजवर बहुत संतोषी जाहले. म
हिंदुस्थान साध्य करावयाचे बहुत मानस. यावरून प्रतिनिधी व सर्व मुत्स
करून विचार पुसिला तेव्हां श्रीपतराव प्रतिनिधी याणीं, "पादशाहाचा त
आहे......स्वामीचा मनोदय हिंदुस्थान साध्य करण्याचा आहे तोहि घडे
आधीं कर्नाटक प्रांत थोरले महाराजांनीं साध्य केलेला गेला आहे. तो स
फौज पाठवून करावा. नंतर ही मसलत करावी. ऐसे आमचे विचारे
बोलले. यावरी ते समयीं बाजीराव याणीं उत्तर केलें कीं, "प्रतिनि
मसलत काय देतात? पादशाही कमजोर जाहली. कांहीं जीव राहिला नाहीं
बहुत जाले आहेत. पादशहा आमचे कुमकेनें पादशाही रक्षावी असें इच्छ
यांतच त्याचेहि बखेडे मोडावे. आपला स्वराज्य अंमल पूर्वीं बसला

बसवावा. किलिजखान नजीक. त्याचा तह बिघडून खटला करतील याचा हिसाब काय धरावा ? [ असें म्हटलें तर ] राज्य कसें करावें ? आणि थोरले महाराज यांणीं जातीनें औरंगजेब शहाजादेपणांत येऊन दौलताबादची पादशाही घेऊन औरंगाबाद वसवून सुभा करून राहिले. त्याचा हिसाब न धरितां विजापूर भागानगर पादशाहींतील अंमल बसविला. व त्यांचे सुभ्यांतील अंमल घेतला. यानंतरहि संभाजी महाराज यांणीं सर्व दौलत फौज बुडविली......पूर्वीं मोठीं मोठीं कार्यें वडीलीं केलीं तशीं न करावीं तरी मोठीं पदें कशास धरावीं ? आम्हांस सनदा मात्र द्याव्या. फौज खजीना सर्व स्वामीचे चरणाचे प्रतापें करून सिद्ध करितों. राज्य साध्य करितों. किलिजखान याचाहि शह राखून हिंदुस्थानची मसलत करितों. दोन्हीं आम्हीं आटोपतों. कर्नाटकची मसलत करणें त्यास पादशाही बुडविली [ आहे ]. पूर्वींचीं राज्यें विजापूर, भागानगर यांजखालील मुलूख साध्य जाहले आहेत. हे घरांतील मसलत आहे. हुजुरांत व मोठे सरदार यांतील कोणीतरी रवाना होऊन मसलत जाली म्हणजे सहज साध्य होईल. हे प्रतिनिधींनीं मसलत सांभाळावी. थोरले महाराजांचा संकल्प हिंदुस्थान काबीज करावे ऐसा राहिला. त्याजसाठीं स्वामींचा अवतार उदय झाला. पुण्यप्रतापहि तसाच आहे. यास्तव आधीं हें साध्य करावें आणि संकल्प शेवटास न्यावा. पादशहांनीं आपण होऊन बलाऊन नेऊन तह करावा थैसे दिवस श्रीनें प्राप्त केले. त्यास बाळाजीपंत नाना जाऊन सर्व राजकारणें, हिंदुस्थानचे राजे रजवाडे याचीं करून सिद्धता जाली आहे. महाराजांचा प्रताप जें कार्य मनीं धरिलें तें घडोन यावें ऐसा आहे. यास्तव या समयीं हा उद्योग करावा हें उत्तम आहे," ऐसें बोलिले. यावरून महाराज बहुत संतुष्ट होऊन बोलले जे, "बाळाजीपंत नानांच्या उदरीं तुम्हीं जन्मला तें युक्त आहे. तुम्हांसारखे कर्ते पदरीं असतां हिमालया पलीकडीलहि किंन्नरखंडीचें राज्य साधतां येईल. मग या मसलतीचें काय अशक्य आहे ? तुम्ही हिंदुस्थान प्रांतीं जावें. इकडील सर्व सरदार व हुजरात व मानकरी फौज आहे. तेव्हां निजामउन्मुलुख यांणीं शेखी केलियास पाहतां येईल व कर्नाटक प्रांतींहि फौज रवाना करून सोडितां येईल." ऐसे सांगोन महाराजांनीं बाजीराव यास वस्त्रें, बहुमान व सनदा देऊन निरोप दिल्हा."

जगांत रूपाला कांहीं किंमत नाहीं, गुणांना आहे हें तत्वज्ञान व्यवहारांत फारसें खरें ठरत नाहीं. अनुकुल रूप असलें म्हणजे गुण जडावांच्या कोंदणांत बसल्याप्रमाणें खुलावटीनें दिसतात. स्वरूपवान् माणूस प्रथमदर्शनींच आपली छाप लोकां-

वर पाडतो, व त्याच्या अंगांत गुण असले तर कालांतरानें ती छाप दृढ होते. जर यदाकदाचित् तो मनुष्य गुणी नसला, तरी देखील त्याचें खरें स्वरूप दृष्टीस येई-तोंपर्यंत त्याची छाप लोकांवर कायम राहते. एकदां पडलेली छाप पुसली जाण्यास कांहीं काळ लागतोच. उत्तम रूप असणें ही माणसाची मूक शिफारस होय.

उत्सव समारंभाचें रहस्य हेंच होय. साजशृंगारांतील रहस्य हेंच होय. उपमा-अलंकारांतील रहस्य हेंच होय. म्हणूनच कोणताही प्रसंग साजरा करतांना मांडव घालणें, त्याला छत, झालर, हंड्या झुंबरांनीं शृंगारणें, वाजंत्रीं तासे वाजविणें, गुढया तोरणें उभारणें, स्वारी काढणें, दरबार भरविणें व प्रसंग साजरा करणें, असा मार्ग पत्करावा लागतो. नाहींतर पेशवाईचीं वस्त्रें किंवा शिक्काकट्यार एका जासूदाबरोबर बाजीरावाच्या घरीं शाहूला पोंहोंचती करतां आली असती. परंतु पेशवाईचीं वस्त्रें देण्याचा समारंभ सातारा राजधानींत न होतां मसूरसारख्या आडमुक्कामीं झाला, तरीदेखील समारंभांत कांहीं न्यून उरलें नाहीं. बाजीरावाला सालंकृत पेशवाईची सनद वाजत गाजत अर्पण करण्यांत आली. बाह्याला महत्व असतेंच; परंतु अंतर्गुण साहाय्यक नसले तर बाह्य झकपकीची छाप फार वेळ टिकत नाहीं, इतकेंच !

बाजीरावाचें अंतर्बाह्य स्वरूप फारच चित्ताकर्षक होतें. बाहेरून दिसण्यांत तो जितका दिलदार, रुबाबदार व मोहक होता तितकाच अंतस्थ गुणांत श्रेष्ठ प्रतीचा होता. 'Man's outward beauty expresses the inner self' ही म्हण या असामान्य पुरुषास सार्थ लागू पडत होती. त्यास पाहिलें असतां कोणत्याही माणसाचें मन त्याजकडे सहज आकर्षिलें जात असे. गुलाबाच्या सुकोमल प्रफुल्लित पुष्पास पाहिलें असतां जसें हृदय प्रफुल्लित होतें, चंद्रिकेचा नयनरम्य विलास पाहून हृदयास जसा सहज आल्हाद होतो, फळाफुलांनीं भूषित झालेली भूमातेची आरास पाहिली म्हणजे जसा सहज आनंद होतो, अफाट व अथांग रत्नाकराचें दर्शन झालें असतां हृदयांत जशा सहज विचारलहरी उद्भूत होतात, तेजोनिधी भगवान सूर्य नारायणाचें तेज पाहून नयनांस जशी सहज दीप्ति येते, तद्वतच या तेजस्वी महापुरुषास पाहिलें असतां कोणाच्याहि मनांत सहजच सहानुभूति, प्रेम, आदर इत्यादि भावना जागृत होत असत.

सामान्य स्थितींतून पेशवेपदासारख्या अत्यंत श्रेष्ठ पदाला स्वकर्तबगारीनें पोहोंचलेल्या पित्याचें छत्र ज्यावर होतें, ज्यानें आपल्या पित्याच्या चळवळी आपल्या वयाच्या विशी बाविशीपर्यंत पाहिल्या, पित्याबरोबर राहून ज्यानें

सातारच्या राजवटीपासून तों दिल्लीच्या दरबारापर्यंत राजकीय वातावरण अनुभविलें, जो आप्त मंडळीच्याच नव्हे तर राजाच्या नजरेखालीं वाढला, तो बुद्धिमान व तेजस्वी कसा निपजणार नाहीं ? बाप पेशवा झाल्यापासून बाजीराव श्रीमंतांत मोडूं लागल्यामुळें व त्याची प्रकृति अत्यंत निकोप असल्यामुळें, त्याचा चेहरा राजबिंड्याप्रमाणें उठावदार दिसे व अंगकांति तर गोरीपान चमके. रोज नियमानें हजार बाराशें दंड बैठका मारणें, कुस्ती खेळणें, जोड्या फिरविणें इत्यादि अनेक तऱ्हेच्या व्यायामामुळें त्याचें सर्व शरीर कसलेलें दिसत होतें. पीळदार दंड व मांड्या, भरदार विशाल छाती, आजानुबाहू हात, शरीराची जवळ जवळ सहा फूट उंची, असें त्याचें कसलेलें व प्रमाणशीर शरीर पाहून कोणाही व्यक्तीच्या मनांत तो वीरमूर्ति म्हणून एकदम ठसत असे.

बाजीरावाच्या शरीराचा प्रत्येक भाग जणू रेंखीव होता. गोंडस चेहेरा, सरळ नाक, पाणीदार डोळे, उन्नत कपाळ, धनुष्याकृति ओंठ, रेंखीव भिंवया, मर्दानी मिशा व झोंकदार केंस इत्यादिकांचा सुंदर मिलाफ विधात्यानें त्याच्या ठिकाणीं घडवून आणला होता. राजतेज झळकत असलेला त्याचा प्रफुल्लित व पाणीदार चेहरा पाहून व त्याचें ऐटदार बोलणें ऐकून कोणाही माणसाला त्याजकडे क्षणभर पाहत राहावेंसेंच वाटे; व ' लाखोंमें एक ' असे उद्गार त्याच्या तोंडावाटे बाहेर पडत. अशी गोष्ट सांगतात कीं निजामउलमुलकनें त्याची तसबीर काढण्यास पाठविलेल्या एका नामांकित चित्रकारासही त्याचें सौंदर्य हुबेहुब तसबिरींत उतरतां आलें नाहीं. शेवटीं तो हताश होऊन म्हणाला, ' धिःकार असो माझ्या कसबाला ! ' सारांश, अव्यंग व अप्रतिम अशा सौंदर्याचा बाजीराव केवळ पुतळाच होता. तो श्रीमंत असला तरी, त्यास मिजास व ऐशआरामी शौक नव्हता. पोकळ डामडौल त्यास मुळींच आवडत नसे. त्याचे सर्वोत्कृष्ठ गुण म्हणजे साधेपणा, शौर्य, धैर्य व सभाधीटपणा हे होत. अनेक अलंकारांनीं व किंमती वस्त्रांनीं शरीराला शोभा येत नसते; आंगच्या अनेक गुणांनींच ती येत असते, या तत्त्वाचा आदर्श बाजीराव होता. भरजरी रंगीत दुपट्टे, मंदील, शालजोड्या अशा भपकेदार पोशाखाचा बाजीरावास तिटकाराच वाटे. तो नेहमीं पांढरा व साधा पोषाख करीत असे. त्याची काम करण्याची धडाडी विशेष होती. कित्येक लहानसहान कामें तो स्वतःच जातीनें करी. नोकरांकरतां तो अडून बसत नसे. यामुळें नोकरांवर त्याची विशेष जरब बसत असे. तो घोड्यांचा मोठा शौकी होता. ' निळा, गांगा, सारंगा व अबलख ' या चार रंगांचे घोडे त्याच्या

खास स्वारीचे होते व त्याच्यावर अस्सल क्षत्रियाप्रमाणें त्याची फार मर्जी असे. घोड्यावर खोगीर तो कधीं कधीं हातानेंच चढवी. तबेल्यांत घोड्यांजवळ जाऊन त्यांच्या अंगावर हात फिरवी, व त्यांची तो पाठ थोपटी. त्यांची चंदी, चारा, पाणी, चाकरी मोतद्दार लोक नीट करतात कीं नाहीं हें तो स्वतः पाहत असे. यामुळें खास घोड्यांस देखील त्याची चांगली ओळखी होती. लांब दौडीच्या स्वारीस मोतद्दार, शागीर्द, हुजरे, वगैरे टिकत नसत, म्हणून स्वतःच्या खिजमतीस तो पायदळ चाकरपेशा फारसा बाळगित नसे. मेखा, आघाडी पिच्छाडीचे दोर, तोबरा, शेर दोन शेर चंदी, शेरभर फुटाणे, पाणी काढण्यास दोरी व लोटा इतकी सामग्री तो नेहमीं आपल्याजवळ बाळगीत असे. स्वारीवर असतांना बाजीरावाचा जेवण-खाणाचाही खटाटोप मोठा नसे. शिपायांबरोबर तोही एक एक दोन दोन दिवस फुटाणे व हुरडा यांजवर काढी. त्याची काम करण्याची शक्ति जशी दांडगी तशीच पचनशक्ति तीव्र होती. हिरवें कच्चें कसेंही अन्न तो पचवूं शकत असे.

युद्धकलेंतही तो फार निष्णात होता. त्याला लहानपणींच अनुभविक सेनापति शूर वीर धनाजी जाधव व त्याचा शिष्य बाळाजीपंत नाना हे गुरु लाभले होते. त्यांनीं त्याला भाला, बर्ची, तरवार फेकणें, नेम धरणें, भरदम घोडा दौडवून फेरफटका करणें इत्यादि शिपाईगिरीच्या कामांत तरबेज केलें होतें. 'शिवाजी राजाच्या मागें मराठ्यांमध्यें बाजीरावासारखा नांव घेण्याजोगा पटाईत घोडे-स्वार दुसरा कोणींच झाला नाहीं. घोड्यावरची मांड तिळमात्र न हालवितां भाल्याची फेंक फेकणें; बोंथाटी फिरविणें, ढालपट्ट्याची मारपकड करणें; घोडा तीरासारखा भरधांव टाकून बंदुकीनें नेम मारणें, युक्तीनें शत्रूचा मारा चुकविणें, या सर्व कामांत तो प्रवीण होता. लढाईत घोड्यावरून तो भाला इतक्या जोरानें मारी कीं समोरचा स्वार आणि घोडा एकदम जायबंदी होत असत !'

त्याचें शरीरसामर्थ्य जबर होतें. घोड्याचा नाल तो बोटांनीं सहज वांकवी. केवढाही मस्त घोडा त्याच्या स्वारींत नम्र होई. त्याचा काटकपणा तर अवर्णनीय होता. निजामानें एकदां एका चितार्‍याला बाजीराव जसा असेल तसें त्याचें चित्र काढून आणावयास सांगितलें. तेव्हां स्वारी शेतांतील कणसें घोड्यावर बसल्या बसल्याच, तीं तोडून व हातांनीं त्यांचे दाणे काढून ते मिरच्या तोंडी लावून फाक-ण्यांत गुंतली होती. चित्रकारानें त्या प्रसंगाचें चित्र काढून निजामाला तें दाखविलें. तेव्हां हा माणूस नसून खुद्द सैतान आहे असे उद्गार निजामानें काढले. बाजीराव

हातावर तीळ घेऊन, ते दुसऱ्या हातानें दाबून त्यांतून भाकरीबरोबर खाण्याकरितां तेल काढीत असे. या सर्व दंतकथा असल्या तरी त्या त्याची कंटकवृत्ति दर्शवितात.

सर्वच पेशवे गोरेपान व नाकी डोळीं रेखीव होते. परंतु त्यांतल्या त्यांत बाजीराव व विश्वासराव यांच्या सौंदर्याची विशेष ख्याति आहे. 'सात आठ विती उंचीचा खंदा सारंगा घोडा, डोईस शिरस्त्राण, त्याजवर एक दुपेटा गुंडाळलेला; अंगांत चिलखत व वरून शिलेदारी बाण्याचा रूदार अंगरखा; तुमान, कंबरेस नंगी समशेर व जंबिया या थाटाचा गोरापान देखणा स्वार वर बसलेला, आणि तो छाती काढून डौलानें घोडा उडवीत चाललेला.' हें दृश्य कोणास मोह पाडणार नाहीं ? तोंडावरचें तारुण्य उतास चाललें होतें व ओज ठायीं ठायीं सांडत होतें. त्याच्या नजरेशीं नजर भिडतांच पाहणाऱ्याची नजर खालीं चटकन लवे. चालण्याची ऐट, बसण्याची ढब, उभें राहण्याचा झोंक व बोलण्याचा डौल यांनीं श्रोत्यास मोहिनी पडे. त्याचें भाषण सडेतोड असलें तरी त्यांत तेजस्विता भरलेली असे. त्यामुळें तेवढ्या वेळेपुरती त्याची छाप मुत्सद्यांच्या दरबारांतही पडत असे. त्याचे शिपाई व सरदार तर अर्थातच त्याला देवाप्रमाणें समजून भजत असत. त्याच्या भाषणानें त्यांच्या अंगांत वीरश्री भरे व त्यांच्या आंगरख्याचे बंद तटातट तुटत. त्याची आज्ञा ते वेदवाक्याप्रमाणें पूज्य मानीत असत. अटकेवर मराठ्यांचा भगवा झेंडा आपण एक दिवस फडकावूं, ही बाजीरावाची महत्वाकांक्षा त्याच्या शिपायांच्या मनांतही ठाणें देऊन बसली होती. 'पुढें चला' हाच त्याचा महामंत्र असे. आणि त्याची आज्ञा होतांच त्याचे शिपाई कोणत्याही संकटांत उडी घालण्यास मागें पुढें पहात नसत.

बाजीराव खराखुरा शिपाई गडी होता. जगांतील अत्यंत मोठ्या सेनापतींत त्याची गणना होईल. रा. राजवाड्यांच्या मतें, 'मराठ्यांच्या इतिहासांत शिवाजीच्या पराक्रमाच्या खालोखाल, कदाचित् कित्येक बाबतींत शिवाजीच्या पराक्रमाच्या तोडीचीं, अद्भुत कृत्यें बाजीराव बल्लाळाच्या हातून घडलीं आहेत. या महापुरुषाच्या अचाट व अद्भूत कृत्यांचें रसभरित वर्णन देण्यास प्रासादिक इतिहासकारच पाहिजे व साद्यंत वर्णन देतां येण्यास मुबलक जागा पाहिजे.' बाजीरावाच्या कोशांत नेपोलीयनप्रमाणें 'अशक्य' हा शब्दच नव्हता. स्वराज्याची कल्पना त्याच्या मोठ्या मनांत विकास पावली व भरतखंडांत 'हिंदुपदपादशाही' स्थापण्याच्या

गोष्टी तो बोलूं लागला; इतकेंच नव्हे तर तो नेटानें त्या उद्योगास लागला. त्याच्या प्रतिभेनें त्याच्या तालमींत वाढलेले सरदार, मुत्सद्दी व वकील, हिंदुपदपादशाहीच्या तजविजीस लागले, व हिंदुपदपादशाही प्रत्यक्षसृष्टींत स्थापन झाल्याचीं गोड स्वप्नें सर्वांस पडूं लागलीं. मुसलमान येण्यापूर्वी हिंदुस्थान हिंदूंचा होता व तो पुनः हिंदूंचा झाला पाहिजे, हें ध्येय बाजीरावानें आपल्या डोळ्यांसमोर धरलें, व केवळ या ध्येयानें प्रेरित होऊन त्यानें आपल्या विजयी हालचाली सुरू केल्या. चारी दिशांना मराठ्यांचें आक्रमण त्याच्या नेतृत्वाखालीं सुरू झालें. हिंदू तेतका मेळवावा व हिंदुधर्म भरतखंडांत विजयी करून दाखवावा, या उज्ज्वल महत्वाकांक्षेनें प्रेरित होऊन त्यानें रजपूतराजांशीं सख्य जोडण्याचा उपक्रम सुरू केला. जेथें जेथें मुसलमानांचा हिंदूवर जुलूम होत असेल तेथें तेथें धावून जाण्याची त्याची तयारी होती. त्याच्या मनाप्रमाणेंच त्याची कर्तबगारी महत्वाकांक्षेच्या वारूवर स्वार झाली होती. त्यानें आपल्या वीस वर्षांच्या पेशवाईत केलेल्या हालचालींचा तक्ता थोडक्यांत खालीं दिला आहेः—

| साल | महिना | स्थल |
|---|---|---|
| १७२० | एप्रिल ते जून | वऱ्हाड, खानदेश. |
| | जुलै | बाळापूर. |
| | सप्टेंबर | सासवड. |
| | आक्टोबर | बारामती. |
| | नोव्हेंबर | सातारा. |
| | डिसेंबर | मोंगलाई. |
| १७२१ | जानेवारी | सावर्डिया. |
| | फेब्रुवारी ते आगष्ट | विजापूर. |
| | सप्टेंबर-आक्टोबर | सातारा. |
| | नोव्हेंबर | पिंपरी, पुरंदर. |
| | डिसेंबर | जुन्नर. |
| १७२२ | जानेवारी | जुन्नर. |
| | फेब्रुवारी ते मे | मोंगलाई, कुरकुंब, सुपें. |
| | जुलै ते सप्टेंबर | सातारा. |
| | आक्टोबर | सासवड, सुपें. |
| | डिसेंबर | मोंगलाई. |

| साल | महिना | स्थल |
|---|---|---|
| १७२३ | जानेवारी | ब्र्‍हाणपूर, हांडिया, पिंपळोद. |
| | फेब्रुवारी | बद्कशा, झावाब. |
| | मार्च | बोरगांव, अशेर. |
| | एप्रिल ते जून | बाघेलखंड. |
| | जुलै ते आक्टोबर | सातारा. |
| | नोव्हेंबर | वांई, धोम, महाबळेश्वर, प्रतापगड, सातारा. |
| | डिसेंबर | माळवा. |
| १७२४ | जानेवारी ते जुलै | उज्जैन, बुंदेलखंड. |
| | जुलै ते आगष्ट | सातारा. |
| | सप्टेंबर ते आक्टोबर | मोंगलाई, साखरखेडलें. |
| | नोव्हेंबर ते डिसेंबर | ब्र्‍हाणपूर, माळवा. |
| १७२५ | जानेवारी ते मार्च | माळवा. |
| १७२५ | एप्रिल ते सप्टेंबर | सातारा, माहुली, अपशिंगें सातारा, पुणें. |
| | सप्टेंबर ते डिसेंबर | कर्नाटक, सुरापूर, चित्रदुर्ग, गदग, लखमेश्वर. |
| १७२६ | जानेवारी ते फेब्रुवारी | बेदवटी. |
| | फेब्रुवारी ते मे | श्रीरंगपट्टण, त्रिचनापल्ली, अर्काट. |
| | जून ते सप्टेंबर | सातारा, पुणें. |
| | सप्टेंबर ते डिसेंबर | पंढरपूर, विजापूर. |
| १७२७ | जानेवारी ते जुलै | मोंगलाई. |
| | जुलै ते आगष्ट | सातारा. |
| | आगष्ट ते डिसेंबर | औरंगाबाद, खानदेश, गुजराथ. |
| १७२८ | फेब्रुवारी | पालखेड. |
| | मार्च | मुंगी. |
| | जुलै ते सप्टेंबर | सातारा. |
| | आक्टोबर ते डिसेंबर | तुळजापूर, खानदेश. |
| १७२९ | जानेवारी-फेब्रुवारी | खानदेश, नेमाड, ब्र्‍हाणपूर. |

| साल | महिना | स्थल |
|---|---|---|
| | मार्च ते जुलै | माळवा, जैतपूर, धामोरा. |
| | जुलै ते डिसेंबर | सातारा, सुपें, फलटण, पुणें. |
| १७३० | जानेवारी | पुणें. |
| | फेब्रुवारी ते जुलै | उंबरज. |
| | जुलै ते आक्टोबर | उंबरज, सातारा, पुणें. |
| | आक्टोबर ते डिसेंबर | खानदेश. |
| १७३१ | जानेवारी ते मार्च | गुजराथ, डभई. |
| | एप्रिल | सातारा. |
| | मे | सातारा. |
| | जून ते डिसेंबर | सातारा, पुणें. |
| १७३२ | जानेवारी ते मार्च | कुलाबा. |
| | मार्च ते जुलै | माळवा. |
| | जुलै ते आक्टोबर | सातारा. |
| | नोव्हेंबर ते डिसेंबर | मोंगलाई |
| १७३३ | जानेवारी ते मार्च | मोंगलाई, निजामाशीं भेट. |
| | मार्च ते डिसेंबर | कुलाबा, जंजिरा. |
| १७३४ | जानेवारी ते जुलै | माळवा, दिल्ली, आग्रा. |
| | जुलै ते डिसेंबर | सातारा, पुणें. |
| १७३५ | फेब्रुवारी ते जुलै | जंजिरा, गोवळकट. |
| | जुलै ते आक्टोबर | सातारा, पुणें. |
| | नोव्हेंबर–डिसेंबर | खानदेश, माळवा. |
| १७३६ | जानेवारी ते जुलै | अजमीर, पुष्कर. |
| | जुलै ते आक्टोबर | सातारा, पुणें. |
| | नोव्हेंबर–डिसेंबर | खानदेश, माळवा. |
| १७३७ | जानेवारी ते जुलै | भेळशाची स्वारी. |
| | जुलै ते सप्टेंबर | सातारा, पुणें. |
| | आक्टोबर ते डिसेंबर | खानदेश, माळवा. |
| १७३८ | जानेवारी ते जुलै | भोपाळची स्वारी |
| | जुलै ते सप्टेंबर | सातारा, पुणें. |

| साल | महिना | स्थल |
|---|---|---|
| | नोव्हेंबर–डिसेंबर | उत्तर कोंकण. |
| १७३९ | जानेवारी ते मार्च | ठाणें, वसई, तारापूर. |
| | एप्रिल ते जुलै | खानदेश, वऱ्हाड. |
| | जुलै ते आक्टोबर | सातारा, पुणें. |
| | नोव्हेंबर–डिसेंबर | खानदेश. |
| १७४० | जानेवारी ते एप्रिल | खानदेश. |
| | २८ एप्रिल | समाप्ति. |

*  *  *  *

वाहतुकीचीं साधनें बेताचीं व देश मोंगलबादशहाच्या किंवा त्याच्या सरदारांच्या ताब्यांत असतांना बाजीराव विजेप्रमाणें सर्व हिंदुस्थानभर तळपत होता. त्याला कशाचीच भीति वाटत नसे. मोंगल बादशाहीचें खोड जीर्ण झालें असल्यामुळें त्यावर जोरानें घाव घातल्यास तें सहज मोडेल, व झाडाचा बुंधा एकदां उखडला म्हणजे त्याच्या फांद्या, कितीही मोठ्या, मजबुत व विस्तारलेल्या असल्या तरी त्या तेव्हांच वाळून शुष्क होतील, असा त्याचा राजकीय कयास होता, व एका अर्थानें तो बरोबर होता. शाहूला हें धोरण पसंत नव्हतें. बादशाही बुडवूं नये असें त्याला मनापासून वाटे. बेगमेनें त्याला लहानणीं वाढवून व औरंगजेबाच्या क्रोधानलांतून त्याचें रक्षण करून पुत्राप्रमाणें वागविलें, हे उपकार तो विसरला नव्हता. वैयक्तिक दृष्टीनें शाहूच्या मनाचा मोठेपणा अत्यंत प्रशंसनीय, परंतु राष्ट्रीय दृष्ट्या तो स्वराज्यास विघातक ठरला. शाहूच्या दरबारांतील इतर अकर्ते प्रधान, साताऱ्यास राहून शाहूचें मन बाजीरावाविषयीं कलुषित करीत. बाजीराव आपल्या उद्दामपणानें व बेडर वागणुकीनें स्वराज्यावर कोणत्या वेळीं कोणतें संकट आणील याचा कांहीं नेम नाहीं, अशी भीति हे बैठे सरदार व अमात्यादि मंत्री शाहूस प्रत्यहीं घालीत असत. बाजीरावाच्या विजयाची वार्ता कानीं आली म्हणजे या प्रधानांच्या पोटांत वरपांगी भीतीचा परंतु अंतरीं मत्सराचा गोळा उठे व हा कोंकणस्थ ब्राह्मण बलिष्ठ झाल्यावर कोणालाच जुमानणार नाहीं असें भय त्यांना पडे. मंत्रिवर्गाच्या व सरदारांच्या रोजच्या काथ्याकुटीनें शाहूचें मन क्षणभर चकित होई व तो बाजीरावला हुकूम देखतांच साताऱ्यास येण्याची आज्ञा पाठवी. त्यामुळें सातारा दरबारनें निकड लावली कीं हातांतलें काम अर्धेंच टाकून, त्यास आपल्या कामगिरीचा झाडा देऊन राजाचें गढूळ झालेलें मन साफ करण्याकरितां मध्येंच साताऱ्यास यावें लागे. यामुळें

त्याच्या पराक्रमाला पूर्ण वाव मिळाला नाहीं. परंतु त्या तसल्या परिस्थितींत देखील त्यानें मराठ्यांचा यशोगौरव हिंदुस्थानभर पसरविला, व हिंदुपदपादशाहीची मुहूर्तमेढ रोवली. हिंदुजातीवर कोठेंही व कोणतेंही संकट आलें कीं बाजीरावची मदत मागतांच मिळेल, व तो तीरासारखा धांऊन येऊन तें संकट दूर करील, असा सर्व हिंदूंना भरंवसा वाटूं लागला. जुन्या दौलतींतील जुनी खानदानी परंतु घरबैठीं निःसत्व व खुशालचेंडू बनलेलीं माणसें बाजीरावला अनुकूल नसलीं, तरी नवीन तरुणांची भक्ति त्याच्यावर जडून त्याच्या निशाणाखालीं ते सर्व गोळा झाले. तरुणांच्या ह्या सहाय्यावर विसंबून राहूनच बाजीरावनें जुन्या मंडळीची मुर्वत तोडून सडेतोड वांकडेपणा पत्करला.

मोंगलबादशाही व तिचे पराक्रमी सरदार त्या वेळीं हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं अधिकारानें वावरत होतेच, परंतु पोर्तुगीज, डच, फ्रेंच व इंग्रज या युरोपमधील देशांच्या लढाऊ व्यापारी वखारी ठिकठिकाणीं स्थापन झाल्या होत्या. युरोपीयन लोकांचा केवळ चंचुप्रवेशच झाला नसून, त्यांचें राजकीय अस्तित्वही सर्वांना हळुहळू जाणवूं लागलें होतें. 'पंतप्रधानाख्यान' कर्त्यानें परदेशी व परप्रांतीय लोकांचे खालीलप्रमाणें उल्लेख आपल्या काव्यांत केले आहेत.

**"ताम्रास्ताम्राननाः स्युस्तरलतरदृशः श्यामलाः श्यामलाः स्युः।**
**फैरंगाः फेरुरंगा भयभरितगिरो भंगुरा इंगराजाः॥**
**डिंडीरा डिंगमाराश्चरणशरणगा आरवा आरबाः स्युः।**
**शाहो कोटीरहीरप्रबलभुजबल वद्भुजोद्यत्प्रसंगे॥ १॥**
**तावत्सूरत-कच्छ-मच्छ-भखरा-जंगाल-बंगालजाः।**
**फराशीन-खलीन-चीन-बलख-ब्बोखार-घोगारजाः॥**
**तावत् सिंद-वलिंद-बंदर-पुरुत्कालेषु ते ते नृपाः।**
**यावत्ते नृप मौलिमंडन दृढः खड्गो न दोर्दण्डगः॥ २॥"**

विशेषतः स्वराज्यांतील कोंकणपट्टीला या लालतोंड्यांचा फार उपद्रव होत असे. सिद्दी व छत्रपति यांचें पिढीजाद वैर असलें तरी दोघांचा मुलुख एकमेकांला खेटून असलेला, प्रसंगीं एकमेकांत मिसळलेला; परंतु धर्मभिन्नत्वामुळें त्यांचें सख्य जमतां जमेना. तात्पुरतें जुळलें तरी लागलीच कांहींना कांहीं तरी क्षुल्लक कारणावरून त्यांचें भांडण जुंपे. या भांडणाचा फायदा युरोपीयन लोक घेऊं लागले. पोर्तुगीज लोकांनीं तर व्यापारवृद्धीबरोबर राज्यविस्ताराचें व धर्मप्रचाराचें काम अत्याचारी व हिंसक वृत्तीनें चालविलें होतें. औरंगजेबासारख्या कडव्या जहांबाज मुसलमानाला

दयाळू वृत्तीचा व नरम ठरविण्याइतकी नराधमता पोर्तुगीजांनीं अवलंबन केली होती. आंगरे आपल्याकडून त्यांचा शक्य तितका बंदोबस्त करीत होता, व तो भाग सांभाळीत होता. मराठ्यांत पराक्रम होता परंतु त्यांच्यांत एक जूट नव्हती. यामुळें पुष्कळ वेळां तो पराक्रम वांझोटा ठरून फळ हातांत येईना. पराक्रम आपण करावा व भाऊबंदकीच्या रोगानें फळ मात्र अचुक आयत्यावेळीं पक्व झाल्यावर गळून दुसऱ्याच्या पदरांत पडावें, असाही प्रसंग अनेक वेळां येई. परंतु आंगऱ्या-सारख्या अत्यंत पराक्रमी सरदारांना हिंदुपदपादशाहीच्या भव्य निशाणाखालीं कांहीं काळ तरी एकत्र करतां आलें व त्या ऐक्यसाधनामुळें मराठेशाहीचें वैभव वाढवितां आलें, ही बाजीरावाची विशेष कामगिरी होय.

बाजीरावची पेशवाई म्हणजे हिंदुपदपादशाहीची स्थापना होय.

**धर्मासाठीं मरावें । मरोनि अवघ्यांस मारावें**
**मारितां मारितां घ्यावें । राज्य आपलें.**

ह्या रामदासाचा महामंत्र प्रत्यक्ष कृतींत उतरवण्याकरितां बाजीरावचा अवतार झाला अशी समजूत त्या वेळीं पसरली होती. शिवाजीमहाराजांनीं गोब्राम्हणप्रतिपालना-साठीं दक्षिणेंत मराठी स्वराज्य स्थापन केलें, परंतु त्या चिमुकल्या हिंदवी स्वराज्याचा विस्तार करून त्याचें हिंदुपदपादशाहींत रूपांतर करण्याची त्यांची मनीषा अपुरी राहिली; ती पुरी करण्याकरितां बाजीरावाच्या रूपें थोरले आबासाहेब पुनः मर्त्य भूमीवर अवतरले, अशी बाजीरावाच्या अवताराची मीमांसा लोक करीत असत.

**देव मस्तकीं धरावा । अवघा हलकल्लोळ करावा**
**मुलुख बडवा बुडवावा । धर्मसंस्थापनेसाठीं**

हिंदु धर्माचीं पवित्र तीर्थस्थानें मुसलमानांच्या हातांत असावीं या गोष्टीचें पेशव्यांना फारच वैषम्य वाटे. त्र्यंबकेश्वर सोडविण्याविषयीं बाळाजीनें अट्टाहास केला, आणि उत्तरहिंदुस्थानांतील काशी, प्रयाग, मथुरा हीं क्षेत्रें मुसलमानांच्या कचाट्यांतून सोडविण्यासाठीं बाजीराव व त्याचा मुलगा नानासाहेब यांनीं प्रय-त्नांची शिकस्त केली. धर्माचा जयजयकार व्हावा म्हणून हिंदूंचे हिंदुस्थानांत पूर्व-वत् साम्राज्य स्थापलें जावें, ही पेशव्यांची महत्वाकांक्षा होती. चंद्रगुप्त, हर्ष, विक्रम व रामराजा, या काळचीं हिंदु साम्राज्याचीं स्वप्नें पेशव्यांनाच नव्हे तर अनेक भिन्न जातीय हिंदु तरुणांनाही पडूं लागलीं. ह्या आधिभौतिक महत्वाकांक्षेला धर्माचें अधिष्ठान होतें. साम्राज्य हवें, परंतु तें सत्ता व वैभव यांच्या दिमाखा-

करितां केवळ नको होतें. 'आसिंधुपर्यंता' हिंदु धर्मच या देशांत अधिकारानें नांदावा म्हणून त्या साम्राज्याची आवश्यकता होती. महाराष्ट्रांतील घोड्यांनीं अटकेवर जाऊन सिंधुनदाचें पाणी पिऊं लागावें, हीं गोड कल्पनाचित्रें बाजीरावाला दिसत होतीं. हिंदुस्थानांतील सिंधुपर्यंतचा प्रदेश परकीय व परधर्मी मोंगलांच्या हातून मुक्त करावयाचा एवढेंच नव्हे तर हिंदूंचें साम्राज्य सुरक्षित राहण्यासाठीं, जरूर पडल्यास हिंदुस्थानाबाहेरील गांधार, रुमशाम वगैरे देशांवरही हिंदूंनीं आक्रमण करावें अशी बाजीरावाची ध्येयदृष्टि होती. त्याच्या ध्येयप्रधान मनानें अनेक कर्तबगार व पराक्रमी तरुण आपल्याकडे ओढून घेतले. म्हाताऱ्यांचे जुने डोळे भांबावले व भयानें विस्तारले, परंतु तरुणांचीं मनें नाचूं लागलीं. आनंदाचा उमाळा त्यांना आला, आणि बाजीरावाच्या हांकेला त्याच्या निशाणाखालीं ते गोळा झाले. आनंदराव सुमंत, बाबूराव मल्हार बर्वे, कृपाराम, हिंगणे वगैरे अनेक वकील बाजीरावाकडून मिळालेल्या स्फूर्तीनें आपलीं कारस्थानें रचित होते. होळकर, शिंदे, पवार, गायकवाड, खरे, भोसले, कोल्हटकर, बर्वे, जोशी, पुरंदरे, घोरपडे, विंचूरकर वगैरे अनेक लहानमोठे सरदार हा राष्ट्रोद्योग सिद्धीस नेण्यासाठीं झटत होते. ब्रम्हेंद्रस्वामी, नारायण दिक्षित वगैरे देशभर तीर्थाटन करून आलेल्या पुण्यवंत साधुसंतांचा या कार्याला आशीर्वाद होता. परमेश्वराचें अधिष्ठान या प्रयत्नांना असावें, म्हणून त्यांनीं आपल्याच्यानें होईल तेवढी उपासना चालविली होती. हिंदु लोकांत असलेल्या धार्मिक भावनांचा राष्ट्रकार्याकडे शक्य तेवढा उपयोग करून घेण्याचा हा प्रचंड उद्योग व व्याप पाहिला म्हणजे मन आनंदानें भरून येतें. साधुसंतांच्या कृपादृष्टीनें सामान्य लोकांची श्रद्धा बाजीरावावर अवतारी पुण्यवंत पुरुष म्हणून बसली, हें कार्य कांहीं लहान सहान नव्हे. बाजीराव अवतारी पुरुष नसता व त्याच्या हातून हिंदुपदपादशाही स्थापन होण्याचा योग नसता तर स्वामीचा तो पट्टशिष्य झाला नसता, स्वामींनीं त्याला हाताशीं धरलें नसतें, असें लोकांना वाटे. काशी येथील नारायण दिक्षित पाटणकर यांस चिमाजी आप्पा व नानासाहेब यांनीं पाठविलेलें पत्र खालीं दिलें आहे—

'कोणी मंत्रशास्त्री भेटतील आणि अनुष्ठान करा म्हणतील तर ते गोष्ट न करणें. कोणाचा मंत्र न घेणें. शिवपूजन व विष्णुपूजन व गायत्रीचा जप व वेदोक्त अनुष्ठानें करीत जाणें.' म्हणून लिहिलें. तर आज्ञेप्रमाणेंच करीत जाऊं. 'स्वधर्मे करून आचरण करणें, कोणी दुराचरण करीत असतील त्यांस शासन करावें' म्हणून लिहिलें. त्यांस अवश्यमेव लिहिल्याप्रमाणेंच वर्तणूक करूं.

रायाचे (=बाजीरावाचे) वैभवाची वृद्धि व्हावी यास्तव आपण बहुत श्रम आजपावेतों केले. पुढें जोंपर्यंत आपण आहे तोंपर्यंत तुमच्या कल्याणास्तव श्रम करावयास अनमान न करूं' म्हणून लिहिलें; तर राऊ, स्वामीस, मातापितराचे ठायीं मानीत होते. त्यांच्या कल्याणास्तव स्वामीनीं श्रम केले तर ते गोष्टींचें अपूर्व काय आहे ? बालकाचें कल्याण इच्छावें हें मातापितरांस सांगावें लागतेंसें नाहीं. पुढेंहि आम्ही लेंकरें स्वामींचीं आहों. आमचें कल्याण व आमची बुद्धि उत्तम कार्यांच्या ठायीं दिवसेंदिवस [लागून] यशाची अभिवृद्धि होय ऐसा आशीर्वाद स्वामी देतीलच व देवाची प्रार्थना करतीलच यांत संशय नाहीं."

यावरून आपल्या कार्याला व पराक्रमाला परमेश्वरी उपासनेचा पाठिंबा मिळवून, स्वतःचें मानसिक समाधान व सामान्य जनांची प्रसन्नता मिळविण्यासाठीं पेशवे या साधुसंतांचा कसा आदरपूर्वक उपयोग करून घेत असत, हें स्पष्ट दिसून येतें. साधुसंतांचा पाठिंबा लाभल्यावर व पेशवे एवढे पराक्रमी असल्यावर हिंदुपदपादशाही हिंदुस्थानांत निश्चित स्थापन होणार, असें लोकांना वाटूं लागलें. बाजीरावानें दिलेली ही स्फूर्ति खर्ड्यांच्या लढाईपर्यंत म्हणजे जवळजवळ पाऊणशें वर्षें टिकून राहिली. कारण तोंपर्यंत मराठी मुत्सद्यांच्या पत्रांत हिंदुपदपादशाहीची उज्वल व तीव्र भावना दृष्टीस पडते.

परंतु हें सर्व साधण्यापूर्वी बाजीरावाला फारच मोठें दिव्य करावें लागलें. शाहूनें त्याला पेशवाई दिली असली, तरी त्याच्यापेक्षां फत्तेसिंग भोसले व श्रीपतराव प्रतिनिधी यांच्या शहाणपणावर शाहूचा आरंभीं तरी अधिक विश्वास असे. बाजीरावाची शिपाईगिरी शाहूला मंजूर व पसंत असली, तरी त्याच्या उतावळ्या व उद्दाम स्वभावामुळें तो स्वराज्यावर केव्हां संकट आणील व केव्हां नाहीं, ही धाकधूक शाहूच्या मनाला नेहमीं जाचत असे. कोंकणस्थांचा वाढता अधिकार व वाढतें वैभव, यांच्यामुळें कित्येकांच्या पोटांत मत्सराग्नि पेटला व शाहूच्या सरदारांचीं पुनश्च कोल्हापुरकर संभाजीशीं व निजामाशीं कारस्थानें चालूं झालीं. रघोजी भोंसले व कान्होजी आंगरे, दौलतीच्या हिताकडे लक्ष न पुरवितां आपल्या लहरीप्रमाणें तिरपगडी चाल चालून कारस्थानें रचीत, त्यामुळें ऐन आणीबाणीच्या वेळीं स्वराज्याला त्यांची मदत मिळूं शकत नसे. सरदारांचे व पेशव्याचे डाव प्रतिडाव पडून रंगारूपाला आलेलें कारस्थान बिघडून जाई व पुनश्च हरिः ॐ म्हणण्याची वेळ येई. त्यामुळें पहिलीं दहा अकरा वर्षें आपल्या अंगीं शिपाईगिरी असली,

तरी तिच्या बरोबरीनें शहाणपणही मुरलेलें आहे, हें शाहूला पटवून देण्यांतच त्याला खर्च करावीं लागलीं. निजाम व संभाजी यांना आपलें सामर्थ्य पटवून धाकांत आणावें लागलें, व आपण त्यांची यत्किंचित देखील गडबड चालूं देणार नाहीं अशी त्यांची खात्री पटवावी लागली. फत्तेसिंग, रघूजी, प्रतिनिधी व दाभाडे, यांशीं बाजीरावाची वर्तणूक फार सावधगिरीची व मुत्सद्दीपणाची असे. फत्तेसिंगास शाहूचा मानीव पुत्र म्हणून त्यानें कधीं दुखविलें नाहीं. रघूजीस स्वतंत्र मनमानेल तसा कारभार करूं दिला. प्रतिनिधीची नालायकी व नेभळटपणा सिद्ध केला, आणि दाभाड्यानें फितुरी करतांच त्याला नेस्तनाबूत केला व आपण स्वराज्यद्रोहाच्या अपराधाची कोणासही माफी देणार नाहीं, असें सर्व सरदारांना आपल्या कृतीनें बजावलें. शाहूची त्याच्या धोरणाबद्दल खात्री पटली व बाजीरावाच्या संमतीशिवाय यापुढें कोणताही नवा मनसुबा करावयाचा नाहीं, असा त्यानें आपल्या मनाशीं निश्चय केला. शाहूची खात्री पटली व त्यामुळें साताऱ्याचा जाच नाहींसा झाल्यावर, बाजीरावाच्या कर्तबगारीला तदनंतर मोकळें मैदान सांपडलें, व त्या लाभलेल्या संधीचा त्यानें भरपूर उपयोग करून घेतला.

---

प्रकरण ६ वें

## दोन मल्लांची कुस्ती



मराठी राज्याच्या उत्तरार्धांत मराठ्यांच्या हालचालीला कोणी कायमचा पायबंद लावला असेल तर तो निजामानें होय. मराठे व निजाम यांचा लढा जवळजवळ शंभर वर्षें चालला होता. निजामाचा आजा ख्वाजा आबीद हा मक्केस जाण्याकरितां म्हणून बुखाऱ्याहून हिंदुस्थानांत आला व येथेंच तो औरंगजेबाच्या पदरीं राहिला. औरंगजेब त्या वेळीं राजपुत्र असून बादशाहीवर त्याचा डोळा होता. तेव्हां त्याला बुद्धिमान व शूर माणसांची गरजच होती. परकीय माणसें नोकरींत घेतलीं म्हणजे तीं निमकहलाल राहतात, कारण त्यांच्या ओळखी दुसरीकडे झालेल्या नसतात व त्यांचे हितसंबंध इतरांशीं गुंतलेले नसतात. या तुराणी घराण्यांतील पुरुषांनीं बादशाहीचीं मोठमोठीं कामें केलीं व विपुल धन आणि पदव्या संपादन केल्या. निजामाचा बाप शहाबुद्दीन हा प्रथम दक्षिणचा व नंतर गुजराथचा सुभेदार होता. निजामचा जन्म १६७१ सालीं झाला व १७४८ सालीं तो मरण पावला. त्याला

लाभलेल्या दीर्घ आयुष्यामुळें, त्याला आपली कर्तबागारी प्रकट करून दक्षिणेंत एक प्रबल मुसलमानी राज्य स्थापन करतां आलें, आणि त्याचा पाया नीट भरतां आला. बाळाजी, बाजीराव व नानासाहेब, या तीन पेशव्यांना तो एकटा पुरला. त्यामुळें आज मराठी राज्य जवळजवळ नष्ट झालें असलें, तरी निजामाचें संस्थान सर्व हिंदुस्थानांत अत्यंत मोठें व वैभवशाली आहे.

## निजामाची वंशावळ

आलमशेख, ( समर्कंद )




औरंगजेबाच्या मृत्यूनंतर मोंगल दरबारांत जी चौचिंधी माजली, त्यांत सय्यद-बंधू व निजाम हे दोन पक्ष प्रबल, पराक्रमी व कर्तबगार होते. दोघेही महत्वाकांक्षी असल्यामुळें त्यांच्यांत विरोध असणें स्वाभाविक होतें. सय्यदांच्या मनांत दिल्लीची बादशाही आपल्या मुठींत ठेवावयाची होती व निजामाच्या मनांत वजीरीपेक्षां दक्षिणची सर-सुभेदारी घोळत होती. कारण सुभेदारीवरून स्वतंत्र राज्यपद गांठणें सुलभ होतें, इतकी मोंगल पातशाही दुबळी झाली होती. एकाचे शत्रू ते दुसऱ्याचे मित्र असत. सय्यदांनीं मराठ्यांना जवळ केलें तर निजामानें त्यांच्यावर हत्यार धरलें. परंतु सय्यद तापट व उतावळे होते तर उलटपक्षीं निजाम शांत व धूर्त होता. सय्यदांचा पक्ष जोरांत होता तोंपर्यंत त्यानें त्यांच्या विरुद्ध मुळींच हालचाल केली नाहीं. उलट त्यांच्या आज्ञा तो निमूटपणें मान्य करी. दक्षिणची बहुमानाची सुभेदारी सोडून त्यानें प्रसंगाला तोंड देऊन भागलपूर व

बिहारची कमी मानाची सुभेदारी पत्करली. दिल्लीस सय्यद हुसेनअली मराठ्यांना बरोबर घेऊन गेला, तेव्हां त्यानें सय्यदांशीं नम्रपणानें वागून माळव्याची सुभेदारी मिळविली, व मराठ्यांना खुष करण्याकरितां त्यांना मेजवानी पण दिली. सय्यदांच्या हातावर याप्रमाणें युक्तीनें तुरी देऊन तो दिल्लीहून निसटला व माळव्याचा सुभेदार झाला. त्याप्रमाणें १५ मार्च १७१९ रोजीं तो उज्जनीस गेला व तेथें पुष्कळशी मोठी फौज गोळा करून त्यानें सय्यदांशीं युद्धाची तयारी चालविली. निजामाचा चुलता अमीनखान त्या वेळीं आग्रा येथें सुभेदार होता. त्या दोघांनीं सय्यदांविरुद्ध कट केला व दोघेही सय्यदांमार्फतीनें सुटणारे बादशाही हुकूम मानेनासे झाले.

इकडे दिल्लीस बादशाहांची तर घटकोघटकीं उलथापालथ होत होती. फरुखशायरच्या पदच्युतीनंतर त्याचा लवकरच खून करण्यांत आला. त्याच्या जागीं फेब्रुवारी १७१९ मध्यें गादीवर बसलेला बादशहा रफीउद्दराजत जून महिन्यांत मरण पावला. त्यानंतर रफीउद्दौला याची बादशाहीवर स्थापना करण्यांत आली. परंतु त्यानें देखील सप्टेंबर मध्यें राम म्हटला. त्यानंतर बहादुरशहाचा नातू रोषन अख्तार महमदशहा या नांवानें तख्तावर बसविण्यांत आला. याप्रमाणें एका वर्षांत चार बादशहा पालटले. त्यांपैकीं दोघे बहुधा आजारानें मरण पावले असावेत, परंतु सय्यदांनीं त्यांचा खून केला असें लोक बोलूं लागले, आणि लोकांच्या मुखाला हात कोण व कसा लावूं शकणार ? सय्यदांविरुद्ध लोकमत खवळलें व जरी त्यांच्या भीतीनें त्यास उघड वाचा फुटली नव्हती तरी, त्यांचा सर्वत्र निषेध होऊं लागला. निजामानें या खवळलेल्या लोकमताचा फायदा घेऊन सय्यदांचे हुकूम धाब्यावर बसविण्याचें ठरविलें.

सय्यदांस मराठ्यांची मदत होती. बाळाजी दिल्लीहून परत स्वदेशीं आला, तेव्हां त्यानें बाजीरावास माळव्यांत सय्यदांच्या मदतीकरतांच ठेवलें होतें. त्यामुळें सय्यदांच्या नायबांनीं जरा विवेक केला असता तर खात्रीनें यश त्यांच्या पदरीं पडलें असतें. परंतु सय्यदांचे दुय्यम, सरदार दिलावरअली व आलमअली हे शूर असले तरी लष्करी धोरण व वागणुकीचें शहाणपण त्यांना कमी होतें.

प्रथम माळव्यांत आपल्या सैन्याची जुळवाजुळव केल्यावर निजामानें आपला मोर्चा दक्षिणेकडे वळविला. सय्यदांवर रागावलेला एक सरदार मुरहमीदखान हा त्यास मदत करीत होता. १२००० फौजेनिशीं निजामानें नर्मदा नदी ओलांडली. नर्मदेच्या दक्षिणेस ४५ मैलांवर व बऱ्हाणपूरपासून ६ मैलांवर आशिरगढ नांवाचा मजबूत किल्ला

आहे. हा किल्ला त्या काळीं दक्षिणेंत शिरण्याचा जणूं मुख्य दरवाजाच होता. तेथें तालीबखां नांवाचा एक वृद्ध किल्लेदार होता. निजामानें त्यास लांच देऊन किल्ला हस्तगत केला व तेथील बंदोबस्तासाठीं आपल्या मुलांस ठेवून तो स्वतः ब्ऱ्हाणपुरास येऊन तळ देऊन राहिला. लवकरच त्यानें सर्व खानदेश प्रांत काबीज केला.

सय्यदांनीं निजामास फक्त माळव्याची सुभेदारी दिली होती. पण तो तर आतां दक्षिणेंत चौफेर आपले हातपाय पसरूं लागला, हें पाहून सय्यदांस त्याची धास्ती वाटली. औरंगाबादेस सय्यदांची आई रहात होती व त्यांचा पुतण्या आलमअली हा तेथील सुभेदार होता. निजामाचें पारिपत्य कसें करावें याबद्दल भवति न भवति होऊन सय्यदांच्या मित्रमंडळींत असें ठरलें कीं, 'उत्तरेंतून दिलावरअली नांवाच्या सरदारास मोठी फौज देऊन निजामावर पाठवावें व दक्षिणेंतून आलमअलीस चाल करून येण्यास सांगावें. याप्रमाणें दोन जंगी फौजांच्या कचाटींत निजामास पकडल्यास तो सहज खच्ची होईल.'

त्याप्रमाणें सय्यदांनीं दोघांसही निजामावर चाल करून जाण्यास ताबडतोब हुकूम सोडले. दिलावरअली हा माळव्याच्या सरहद्दीवर होता. त्याजकडे भीमसिंग हाडा, गजसिंग नरवारी वगैरे कित्येक शूर रजपूत सरदार मदतीस पाठवून, त्याच्या ढिलाईबद्दल त्यास सय्यदांनीं टोंचून लिहिलें. दिलावरअली फार उतावळा व मानी सरदार होता. त्याजजवळ सोळा सतरा हजार फौज होती. सर्व परिस्थितीचा योग्य विचार न करतां रागारागानेंच हंडिया येथें नर्मदा नदी उतरून तो निजामावर ताबडतोब चाल करून आला.

दक्षिणेंत आलमअलीजवळ एकंदर तीस हजार फौज होती. त्यांपैकीं निम्याहून अधिक तर मराठेच होते. दिलावर व आलमअलींच्या फौजांचें मिलाफीचें धोरण ठरून एकदम निजामावर मारा झाला असता, तर त्याचा तेव्हांच फडशा उडाला असता. पण भवितव्य निराळेंच होतें.

निजामानें ब्ऱ्हाणपुरास तळ दिला, ही बातमी ऐकतांच आलमअलीनें अन्वरखान व रावरंभा निंबाळकर या दोन सरदारांस त्याजवर प्रथम पाठविलें; आपण स्वतः सर्व फौज घेऊन त्याच्यावर चालून गेला नाहीं. निजामानें दोघांसही पकडून कैद केलें व त्यांस नंतर आपल्याकडे वळवून व आपली थोडी फौज त्यांच्या बरोबर देऊन, त्यांना दिलावरचे फौजेवर चालून जाण्यास हुकूम केला. उत्तरेंतून व दक्षिणेंतून आपणांवर सारखा मारा चालू झाला आहे, हें पाहून सय्यदांचा डाव निजामानें ओळखला. त्यानें दोघांसही निरनिराळ्या ठिकाणीं गांठून तोंड देण्याचा

बेत ठरविला. त्याजजवळ उत्तम तोफखाना असून अनेक अनुभवी सरदारांची त्यास मदत होती. शिवाय कैद केलेल्या सरदारांसही तो आपल्या कामगिरीस जुंपून आपली बाजू बळकट करीत असे. अशीरगडावर योग्य बंदोबस्त करून, दिलावरअलीस तोंड देण्याकरितां म्हणून, बऱ्हाणपुरापासून उत्तरेस सोळा सतरा कोसांवर रतनपूर नांवाच्या गांवाजवळ त्यानें तळ दिला. पुढें त्यानें एक लहानशी फौज दिलावरचे सैन्यावर, त्याला हुलकावणी दाखवून चकविण्यासाठीं पाठविली, व आपण मागें मोठी फौज घेऊन दबा धरून बसला. खांडव्याजवळ हुसेनपूरचा पांढरा डोंगर आहे तेथें त्यांच्यांत मोठें युद्ध झालें. निजामानें पाठविलेल्या तुकडीवर दिलावरनें मोठ्या त्वेषानें मारा केला व तीस मागें हटवीत नेलें. त्यास प्रथम वाटलें कीं आपली सारखी जीतच चालली आहे. पण मागाहून दबा धरून बसलेल्या फौजेनें त्याजवर अवचित चाल करून त्याच्या फौजेची दाणादाण करून टाकली. दोघेही फार निकरानें लढले. पण भीमसिंग व गजसिंग लढाईंत मारले गेले. दिलावरअलीही शत्रूच्या तरवारीस बळी पडला. याप्रमाणें दिलावरच्या फौजेचा पराजय केल्यावर निजामानें आलमअलीच्या हालचालीकडे आपला मोर्चा वळविला. एका आठवड्यांच्या आंतच तो बऱ्हाणपुरास आला.

दिलावर पडल्याची बातमी पंधरा दिवसांनीं सय्यदांस कळली. तेव्हां त्यांची चिंता दुणावली. काय करावें तें त्यांस कांहींच सुचेना. त्यांचीं बायकामुलें औरंगाबादेस होतीं. तीं निजामाचे हातांत सांपडतील अशी त्यास भीति वाटत होती. शिवाय आलमअलीच्या कर्तृत्वाबद्दल त्यांस आतां खात्री वाटेना. अशा स्थितींत निजामाला चिडवूं नये व त्यास गोडीगुलाबीनें कबजांत आणावें असा पोक्त विचार त्यांनीं केला, व त्याप्रमाणें निजामास कळविलें कीं, 'दिलावरला योग्य शासन मिळालें. त्यास आम्हीं एवढाच हुकूम केला होता कीं, दक्षिणेंतून आमचा फक्त जनानखाना घेऊन यावा. पण त्यानें आमच्या हुकुमाबाहेर वर्तन केलें. तुम्हांस आम्ही सोबत बादशहाकडून एक फर्मान पाठवीत आहोंत. तुमची नेमणूक दक्षिणच्या सुभ्यावर केली आहे.' यावरून सय्यद बंधू किती घाबरले होते तें समजून येईल. आलमअलीस त्यांनीं लिहिलें; 'तूर्त तुम्हीं पडती बाजू घ्यावी. निजामाशीं गोडीनें वागावें. पण प्रसंग पडल्यास वाटेल तसा खर्च करण्यास मात्र कमी करूं नये.' अशांत सय्यदांचे शत्रू वाढत चालले. खुद्द बादशहासही त्यांचा तिटकारा आला होता. पण सर्वजण वरून तरी सय्यदांशीं मित्रभावच दाखवीत. सय्यदांच्या अशा स्तुतिपाठकांतच निजामाचा चुलता महमंद

अमीनखान याची गणना केली पाहिजे. अमीनखानाचें बादशहाजवळ फार वजन होतें. 'मधु तिष्ठति जिव्हाग्रे,' हृदयांतील हालाहल पाहतो कोण ? हृदय कोणाला दिसत होतें ?

इकडे आलमअलीनें निजामावर चाल करून जाण्याचा बेत केला. तो केवळ २० वर्षांचा तरणा बांड व अननुभवी असा सुभेदार होता. त्याजजवळ तीस हजार फौज असली तरी पन्नास वर्षें वयाच्या व राजकारणांत मुरलेल्या मुत्सद्या-पुढें तो पोरसवदाच ठरला ! आलमअलीस मराठ्यांची चांगली मदत होती. संताजी शिंदे, खंडूजी दाभाडे, शंकराजी मल्हार, कान्होजी भोंसले इत्यादि मंडळी शाहूच्या हुकमानें सतरा अठरा हजार फौजेनिशीं त्याचे मदतीस आली होती. निजामानें प्रथम आलमअलीस असें दर्शविलें कीं 'मला मुळींच लढण्याची इच्छा नाहीं. मी आतां मक्केस जाऊन राहिलेलें आयुष्य अल्लाच्या चिंतनांत घालविणार. कारण मला दक्षिणची सुभेदारी तर आतां मिळणें शक्यच दिसत नाहीं.' मक्केस जाण्याचें ढोंग करून शत्रूस फसवावयाचें व नंतर अवचित त्यास मारावयाचें, हा जुना औरंगजेबी खाक्या होता. निजामानें तो गिरविला इतकेंच. सैन्यांतील माण-सास निजामानें रजा दिली, अशी खोटीच बातमी चहूंकडे त्यानें पसरून दिली. पण त्याचें कपट न ओळखण्याइतका खुळा त्याचा विरुद्ध पक्ष नव्हता. तथापि मराठे सरदारांनीं आलमअलीस असा सल्ला दिला कीं, 'तूर्त निजामाशीं समोरा-समोर लढण्याचा प्रसंग आणूं नये. आपण सर्वांनीं कांहीं वेळ माघार घेऊन औरं-गाबादेवर किंवा अलीकडे अहमदनगरावर माघार घेऊन राहावें.' पण आलम-अलीचें उसळतें रक्त होतें. तो म्हणाला, 'छे, आपण असला नामर्दपणा मुळींच करणार नाहीं. आपण एकदम चालून जाऊन निजामाशीं समोरासमोर सामना देणार !' निजामानें आलमअलीचा तापट स्वभाव ओळखून, त्यास चीड येणारीं पत्रें लिहून मुद्दाम आगींत तेल ओतलें; आणि बऱ्हाणपुरावरून आपली छावणी दक्षिणेस पूर्णा नदीच्या कांठीं आणली. मग काय विचारावें ? आलमअलीचा तळही तेथून नजीकच 'तलाव हरताळा' येथें पडला ! पावसाळा जोराचा व रस्ते चिख-लानें दुर्गम झालेले असल्यामुळें, दोन्ही दळें नदीच्या दोन बाजूंस कांहीं दिवस आपापल्या जागीं तटस्थ राहिलीं. पूर्णा नदीस उतार मिळेना. होड्यांचा पूल तयार केला होता तो पावसानें वाहून गेला. तेव्हां नदीच्या कांठाकांठानेंच निजाम कांहीं मुक्कामावर मलकापुर पावेतों गेला. तेथून बाळापुरच्या बाजुस नदीस उतार आहे अशी बातमी कळतांच, तेथें नदी उतरण्याची तजवीज त्यानें केली. दुसऱ्या

कांठावरून आलमअलीची फौजही निजामावर गोळीबार करीत वर गेली. ता. १५ पासून २० जुलई पावेतों निजामाची सर्व फौज नदी उतरून अलीकडे आली, आणि शेवगांव नजीक छावणी करून राहिली. पावसाची संतत धार चालू असल्यामुळें लोकांस दाणा वैरण बिलकुल मिळेना. याच सुमारास नागपुरकर कान्होजी भोसल्यानें निजामाच्या फौजेवर सर्व बाजूंनीं छापा घालून त्यास हैराण केलें. रुपयास दोन शेर आटा मिळेना, अशी त्याच्या फौजेची ओढघस्तीची स्थिति झाली. जनावरांच्या दृष्टीस गवताचें पानही पडेनासें झालें. अशा स्थितींत शत्रूस झुकांडी देऊन बाळापुरास येऊन निजामानें मुक्काम केला. तेथें त्यास धान्य वगैरे मुबलक मिळालें.

निजाम व आलमअली यांचा लढा ऐन रंगांत यावयाचे सुमारास निजामास दक्षिणच्या सुभ्यावर नेमल्याचें दिल्लीहून फर्मान आलें. मग काय ? निजामाची चढती कमान झाली ! त्यानें मोठ्या समारंभानें सामोरें जाऊन फर्मानाचा आदर केला, आणि लगेच त्याची नक्कल आलमअलीकडे पाठवून, 'तूं आतां येथला कारभार सोडून तो आमचे हवालीं कर. तुला व सय्यदांचे बायकामुलांस मी सुखरूपपणें दिल्लीस जाऊं देतों,' असें त्यास कळविलें. त्यानें बादशहास व सय्यदांस लांबलचक प्रेमभावाचीं पत्रें लिहिलीं. बादशहास लिहिलें, 'मराठे शिरजोर झाल्यामुळें त्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं, आपला हुकूम नसतांना देखील एकदम माळवा सोडून दक्षिणेंत येणें मला भाग पडलें. माझ्याकडून बादशहाची यत्किंचित्‌हि अवज्ञा होणें शक्य नाहीं. मला आतां कामाचा कंटाळा आला आहे. मराठ्यांचा एवढा पक्का बंदोबस्त झाला, म्हणजे मी मक्केच्या यात्रेस निघून जाणार ! आतांच गेलों असतों, पण माझी नेमणूक दक्षिणच्या सुभ्यावर झाल्यानें, काम सोडून जाणें म्हणजे खावंदांच्या हुकुमाची अवज्ञा होते. बादशहाचे हुकूम परमेश्वराच्या आज्ञेपेक्षांही मला जास्त वंद्य आहेत.' त्यानें सय्यदांस लिहिलें कीं, 'तुमच्या बायकामुलांच्या संरक्षणाची मला अत्यंत काळजी आहे. मी औरंगाबादेस पोहोंचतांच त्यांस लवकरच बंदोबस्तानें तुमच्याकडे रवाना करतों.' निजामाचा मुत्सद्दीपणा यावरून स्पष्ट निदर्शनास येईल. सय्यदांच्या जनान्याला किंवा त्यांच्या जवळील चीजवस्तूला हात न लावतां व इतर कोणताही उपसर्ग लागूं न देतां, त्यानें सन्मानपूर्वक त्यांस दिल्लीस पाठविलें. सय्यदांचें मन यामुळें त्याच्याविषयीं पुढें थोडें फार निवळलें. राजकारणांत अशा सभ्य वर्तनाचा फार उपयोग होतो.

बाळापुरास निजामानें आपली फौज व्यवस्थेशीर रीतीनें जमविली. तिकडून आलमअलीखान, पुढें तोफखाना ठेवून व आपण स्वतः हत्तीवर स्वारी चढवून मोठ्या दिमाखानें चालून आला. मराठ्यांच्या फौजेस खोगीर भरती समजून, त्यानें दूर अंतरावर पिछाडीस ठेवून दिलें. त्यांच्या फौजेचा त्यानें नीट उपयोग न करतां, स्वतः घाईघाईनें व डौलानें तो रणमैदानांत पुढें सरला. या आचरटपणाचा व्हावयाचा तोच परिणाम झाला. निजामानें जोराचा हल्ला करून त्याचे बरेच सरदार कापून काढले. खुद्द आलमअलीस गोळी लागून त्याचा हत्ती पळत सुटला. इतक्यांत पुन्हां त्यास बाणाची जखम लागून तो खालीं पडला. लगेच निजामाच्या सरदारानें त्याचें शिर कापून नेलें. शंकराजी मल्हार जखमी होऊन निजामाचा कैदी बनला. आलमअलीचें बरेंच युद्धोपयोगी सामान निजामाच्या हातीं लागलें व त्याचे अनेक सरदार निजामास जाऊन मिळाले. त्यांत हैदराबादचा कारभारी मुबारिझखान व त्याचा भाऊ दिलावरखान हे प्रमुख होते. मराठ्यांचे मात्र फारसे लोक या लढाईंत दगावले नाहींत. त्यांनीं नंतर हिय्या करून थेट निजामाच्या मुक्कामापर्यंत चाल केली व त्याचा खजिना लुटला. आलमअलीच्या तुटक व बेछूट वर्तनामुळें मराठ्यांस निजामाचा चांगलासा समाचार घेतां आला नाहीं. ही बाळापूरची लढाई म्हणजे सय्यदांच्या नाशाचा आरंभ होय.

आलमअलीचा देखील पाडाव झालेला ऐकून सय्यदांची तर कंबर खचली. सय्यदांचा नाश करण्याचा कट दिल्लीची कित्येक सरदार मंडळी अंतस्थ रीतीनें करीतच होती. स्वतः बादशहाही त्यांचा नाश करण्यासाठीं टपलेलाच होता. त्यास या कटांत नेहमीं खुषीनें मदत देणारे प्रमुख सरदार म्हणजे, निजामाचा चुलता अमीनखान, हैदर कुलीखान व सादतखान हे होते. तेव्हां त्यांनीं वरपांगीं असा बेत केला कीं, बादशहा व हुसेनअली यांनीं शिरजोर झालेल्या निजामाच्या पारिपत्यासाठीं रजपूत राजांची मदत मिळवून दक्षिणेंत जावें, व दिल्लीस अब्दुलाखानानें राहून तेथील बंदोबस्त ठेवावा.

त्याप्रमाणें बादशहा, वरील तीन सरदार व हुसेनअली अजमीरच्या रस्त्यानें, जयपूरच्या पूर्वेस साठ मैलांवर ‘ तोडाभीम ’ येथें येऊन पोहोंचले. तेथेंच हुसेनअलीचा त्यांनीं खून केला. लगेच बादशहानें मोठा दरबार भरवून बक्षिसें वांटलीं व वरील तीन खुनी सरदारांस मोठ्या मनसबी दिल्या, व याप्रमाणें हुसेनअलीच्या खुनावर किताबांचें पांघरूण घातलें. तो परत दिल्लीस जावयास निघाला. रस्त्यांत

त्याला महंमदखान बंगश मिळाला. हळू हळू बादशहाचा पक्ष प्रबल होत गेला. निजामउल्मुल्क, राजा गिरिधर बहादुर, सवाई जयसिंग व लाहोरचा सुभा अब्दुल-समदखान या सर्वांस त्यानें खूष-खबरीचीं पत्रें लिहिलीं. त्यांनीं परत बादशहास त्याच मासल्याचीं अहोरूपमहोध्वनी उत्तरें पाठविलीं. दिल्लीस पोहोंचल्यावर साहजिकच अब्दुला सय्यदाचें व बादशहाचें फार वांकडें आलें. त्यानें दुसरा शाहजादा तख्तावर बसविण्याची खटपट चालविली व बादशहाशीं लढाई करण्याचा बेत केला. त्या दोघांत यमुनेच्या कांठीं हसनपूर येथें जंगी लढाई झाली व तींत सय्यद अब्दुल्लाचा पराभव होऊन तो कैद झाला. येणेंप्रमाणें सय्यदांची कारकीर्द संपली. सय्यदांच्या जाचांतून सुटल्याबद्दल खुद्द बादशहा व इतर मुसलमानी सरदारांस आनंदी आनंद झाला. सामान्य लोकांच्या, विशेषतः हिंदूंच्या किंवा मराठ्यांच्या दृष्टीनें सय्यदांची कारकीर्द बरीच सहानुभूतीची होती. परंतु हा मराठलेला पक्ष दुर्बल ठरून कट्टर इस्लामी पक्ष दिल्लींत प्रबल झाला. अब्दुला सय्यद बादशहाच्या कैदेंत दोन वर्षें राहिला; पुढें त्याचा खून झाला.

दिल्लीच्या राजवटींत मराठ्यांचें व रजपुतांचें प्राबल्य वाढण्यास सय्यद बंधूंचाच कारभार बहुतांशीं कारणीभूत झाला. मुसलमानांचा कडवा धर्मद्वेष त्यांचे ठिकाणीं नव्हता. उलट त्यांचें वर्तन बहुतेक हिंदु पद्धतीचेंच होतें. निजामासारखा दुसरा कोणी गृहस्थ बादशाहीच्या कारभारांत असता, तर मराठ्यांचा उत्कर्ष इतक्या सुलभ रीतीनें झाला नसता. निजामाचा चुलता महंमद अमीनखान यानें सय्यदांचा पाडाव करण्यांत प्रामुख्यानें भाग घेतल्यामुळें त्यास बादशहानें वजीरी दिली. निजामास दक्षिणचा मार्ग आतां निष्कंटक नसला, तरी मोकळा झाला. यानंतर निजाम दक्षिणचा जवळ जवळ स्वतंत्र सुभेदार झाला. ही बाब मराठ्यांच्या हितास विघातक होती. मराठ्यांना एक मोठाच शत्रू दक्षिणेंत उत्पन्न झाला. मराठेशाहीच्या दुर्दैवानें शाहू व संभाजी हे दोन राजे एकमेकांचा विरोध व द्वेष करीत होते. निजामाला हा विरोध फारच फायद्याचा वाटला, व त्यानें संभाजी, चंद्रसेन जाधव इत्यादि शाहूच्या प्रतिस्पर्ध्यांस आपल्या विश्वासांत घेण्याचा बेत केला. बाळापूरच्या लढाईंत आलमअलीला मदत म्हणून शाहूनें मराठ्यांचें एक मोठें सैन्य निजामाच्या विरुद्ध पाठविलें होतें, त्यांत बाजीरावही होता. पण या सैन्यानें बाळापूरच्या लढाईंत फारसा भाग घेतला नाहीं. बाजीरावानें निजामाच्या हालचालीवर प्रथमपासून सक्त नजर ठेवली होती. यास्तव निजाम साहजिकच शाहूच्या पक्षाचा द्वेष करूं लागला. शिवाय मागें बाळाजी

विश्वनाथानें दिल्लीच्या बादशहाकडून, दक्षिणेंतील सहा सुभ्यांतून चौथाई वसूल करण्याच्या सनदा आणल्या होत्या. बाजीराव पेशवा झाला तेव्हांपासून तो या सनदांची अंमलबजावणी मोठ्या नेटानें करूं लागला. निजामास मराठ्यांच्या या चौथाई वसुलीचा फार राग वाटत असे. पण करतो काय बिचारा ? बादशाही हुकूमच तसा होता ! त्यानें त्या सनदा मनांतून जरी नाहीं, तरी वरकरणी पाळण्याचें कबूल केलें. कारण मराठ्यांशीं सध्यांच युद्ध उपस्थित करणें त्यास इष्ट वाटत नव्हतें.

सय्यदांचा पाडाव झाल्याची बातमी जेव्हां निजामानें ऐकली तेव्हां त्यास अतोनात आनंद झाला, व आतां आपण दक्षिणेंत अगदीं स्वतंत्र रीतीनें वागूं शकूं, असा भरंवसा त्यास वाटूं लागला. त्यानें मराठ्यांशीं आपले मुत्सद्देगिरीचे डावपेंच आतां सुरू केले. त्यानें शाहूस कळविलें कीं, 'तुमच्यांत दोन पक्ष आहेत; सबब मला कोणत्याही एका पक्षाच्या मताप्रमाणें वागतां येत नाहीं.' या वेळीं आनंदराव सुमंत याचा मुलगा महिपतराव, औरंगाबाद येथें निजामाजवळ बोलणें चालणें सुरू करून, चौथाई वसूल करण्यासाठीं आपले इसम ठिकठिकाणीं नेमण्याची परवानगी मागत होता. पण निजाम ती देईना. इकडे शाहूनें दिल्लीस आपल्या वकिलामार्फत बादशहाचें अभिनंदन करून पूर्वीचे तह कायम करून घेतले व त्याबद्दलचीं फर्मानें दक्षिणेंत आलीं. शिवाय निजामावर फौज पाठविल्यावांचून निजाम वठणीस येणार नाहीं व विरघळणार नाहीं, असें जाणून गंगथडीजवळ सरलष्करचे हाताखालीं मराठी फौज बाजीरावानें जमा केली. तेव्हां निजामास पच पडून त्यानें दक्षिणेंतील सुभ्यांतून चौथाई वसूल करण्याची मराठ्यांस परवानगी दिली. सुमंतास व प्रतिनिधीस लांच देऊन शाहूची मर्जी संपादण्याचाही तो स्वतंत्रपणें प्रयत्न करूं लागला. उद्देश हा कीं, बाजीरावाला धाब्यावर बसवून त्याचें कारस्थान बिघडवून टाकावें, व त्याला मराठेशाहींतून फोडावें, व नंतर मराठ्यांना झोडावे. बाजीराव स्वराज्यांतून फुटल्यावर मराठेशाहीचा समाचार घेणें त्याला फारसें कठीण वाटत नसावें. याच सुमारास दिल्लीचा वजीर अमीनखान हा तीन महिन्यांच्या अल्प कारकीर्दीनंतर मरण पावला. त्यामुळें बादशहानें निजामास वजीरी स्वीकारण्यासाठीं दिल्लीस बोलाविलें. आतां तर निजामाचें मन फारच द्विधा झालें. दही खाऊं कीं मही खाऊं, असा पेंच त्याला पडला.

दिल्लीस जावें तर दक्षिणची सुभेदारी बुडते. न जावें तर मोंगल बादशाही निःशेष होण्याचा संभव ! निजामानें कित्येक वर्षें औरंगजेबाचे कारकीर्दींत दिल्लींत काढलीं

होतीं. त्या वेळेस तेथील दरबार विशेष भारदस्त होता. आतां त्या जागीं तेथें सर्व पोरवडा माजल्याकारणानें निजामास त्या दरबाराविषयीं मनांतून तिटकाराच वाटत होता. पण वजीरीपद स्वीकारल्यास, तेथील बादशहास आपल्या मुठींत ठेवून मागें पुढें दक्षिण, माळवा व गुजराथ हे तीनही प्रांत हस्तगत करून आपणांस पुन्हां स्वतंत्र नबाब किंबहुना प्रत्यक्ष बादशहादेखील होतां येईल, हा विचार करून औरंगाबादची सुभेदारी मुबारीजखान नांवाच्या आपल्या सरदारावर सोंपवून तो दिल्लीकडे चालता झाला. हा मुबारीजखान निजामाप्रमाणेंच वृद्ध व अनुभवी असून तो औरंगजेबाचेच तालमींत वाढला होता. त्यास अमानतखान व शाहमतखान असे किताब वेळोवेळीं मिळाल्यामुळें, इतिहासांत तो या नांवांनीं व क्वचित् कंबरजखान या नांवानें प्रसिद्ध आहे. मध्यें मध्यें निजामाशीं त्याची स्वतःची व्यक्तिशः चुरस चालू होतीच. दोन कर्तबगार पुरुषांमध्यें अशी अटीतटीची चुरस साहजिक चालू असते. निजामाप्रमाणेंच मुबारीजखानास मराठ्यांची सत्ता नाहींशी व्हावी असें मनःपूर्वक वाटत होतें; निजाम दिल्लीस जात असतां शाहूनें ती संधी साधून कर्नाटक प्रांत हस्तगत करण्याचा निश्चय केला, व तिकडे त्यानें फौज पाठवून चढाई केली. मराठ्यांच्या या चढाईस वेळींच प्रतिबंध केला नाहीं तर ते पुढें अनावर होतील, शिवाय बाजीरावानेंही विजापुराकडे चाल करून जाऊन निजामाच्या मुलखांत आपला शिरकाव करून घेतला होता. तेव्हां मुबारीजखानानें निजामास परत फिरण्याचा सल्ला दिला, व दिल्लीच्या भानगडींत पडण्यापेक्षां दक्षिणेंतच मराठ्यांचा पराभव करून कर्नाटक प्रांत हस्तगत करावा, असा त्यानें आग्रह धरला. निजामाचें मन पहिल्यापासूनच डळमळीत होतें. तो वर वऱ्हाडांत फर्दापुरच्या घांटापर्यंत गेलेला परत फिरला, व मुबारीजखानासह म्हैसूरपर्यंत दक्षिणेंत चालून आला. तोंच दिल्लीहून पुन्हां त्यास निकडीचें बोलावणें आल्यामुळें आपला बेत फिरून बदलून, तो घाईघाईनें कर्नाटकांतून परत आला व मुबारीजखानावर दक्षिणचा सर्व कारभार सोंपवून दिल्लीस जाऊन धडकला व तेथें त्यास कबुलायतीप्रमाणें वजीरीचीं वस्त्रें मिळालीं.

बादशाहींतील या घडामोडी पाहून, मिळालेल्या सनदांच्या जोरावर आपण चढाईची मुलुखगिरी करून आपली चळवळ बेधडक चालू ठेवली नाहीं व आपलें सामर्थ्य लोकांच्या नजरेस आणून आपला दरारा बसविला नाहीं, तर मराठ्यांची सत्ता दक्षिणेंत वृद्धिंगत होणार नाहीं, अशी बाजीरावाची पक्की खात्री झाली होती. त्यानें निजामास चांगलें ओळखून ठेवलें होतें. कर्नाटकाकडे गेलें तरी निजाम

आपणांस अडवितो, माळवा गुजराथकडेही आपणांस सुखानें संचार करूं देत नाहीं, हें त्याच्या अनुभवास आलें होतें. निजामास वजीरीपद मिळाल्यामुळें त्याचें जें सामर्थ्य वाढलें होतें, तें नष्ट करण्याचा बाजीरावाचा उद्देश होता. पण शाहू व दरबारच्या इतर मंडळीस हें चढाईचें धोरण प्रारंभीं पसंत पडलें नाहीं. निजाम-वजीर असतांना त्याच्याशीं सामना देणें म्हणजे दिल्लीच्या बादशाहीशींच सामना देण्यासारखें होतें, व तें स्वराज्याला अत्यंत अनर्थावह व अनिष्ट आहे असें त्यांचें प्रामाणिक मत होतें. बाजीराव पोरकटपणानें भलत्याच नादीं लागून उगीच धाडस करीत आहे, असें शाहूस प्रतिनिधी वगैरे बाजीरावाच्या नेमस्त वृत्तीच्या प्रतिस्पर्ध्यांनीं भासवून दिलें. यामुळें शाहूस बाजीरावाच्या कर्तृत्वाची देखील शंका वाटूं लागली होती. बाजीरावाच्या उपक्रमानें नवीन संकटें उत्पन्न होऊन, आपल्या राज्याची जमत चाललेली घडी विसकटून बिघडेल, अशी भीति त्यास व त्याचे सल्लागार मंडळीस वाटत होती. प्रतिनिधि व बाजीराव यांचा या चढाईच्या धोरणासंबंधानें कडाक्याचा वाद झाला. पण बाजीराव जितका बुद्धिमान, कर्तबगार व शूर होता, तितकाच उत्तम तडफीचा वक्ता असल्यामुळें, त्यानें दरबारांत इतकें उत्कृष्ट, वीरोचित व धीरोदात्त भाषण केलें कीं, त्याजविषयीं पसरलेला गैरसमज दूर होऊन, प्रत्येक मराठे वीरास प्रोत्साहन चढलें व एकजात मराठ्यांनीं बाजीरावाच्या नेतृत्वाखालीं कामगिरी बजावण्यास व मुलुखगिरी करण्यास कंबरा बांधल्या. इकडे मुबारीजखानास दक्षिणचा कारभार मिळतांच त्यानें मराठ्यांशीं निकराचें लढाऊ धोरण आरंभिलें. सय्यदांनीं केलेले करार आपण साफ पाळीत नाहीं आणि चौथाईचा वसूल देत नाहीं, असें त्यानें मराठ्यांस स्पष्टपणें कळविलें, आणि मराठ्यांशीं शक्य तितक्या नेटानें लढून व चंद्रसेन वगैरे फितुर सरदारांच्या मदतीनें त्यांच्यांत फूट पाडून त्यांस नामोहरम करण्याचा उद्योग त्यानें आरंभिला. आनंदराव सुमंत शाहूचे बाजूनें तिकडील कारस्थानें चालवीत होता. त्याजकडून मुबारीजखानाचा उद्देश वरप्रमाणें व्यक्त झालेला कळतांच, बाजीरावानें एकदम त्यास शब्दाऐवजीं कृतीचा प्रतिजबाब देण्याचें ठरविलें व माळवा, गुजराथ वगैरे दूरदूरच्या प्रांतांत आपल्या हस्तकांमार्फत एकदम उठावणी केली. आपण होऊन मुबारीजखानानें करार मोडला, हें एका अर्थी त्याचे पथ्यावरच पडलें. करार पाळून जी चौथाईची प्राप्ति मोंगलाईंतून व्हावयाची, त्यापेक्षां किती तरी पटीनें जास्त रकमा गंगथड, खानदेश, माळवा, गुजराथ, या प्रांतांतून मराठ्यांनीं उपटल्या !

निजाम वजीर झाल्यावर त्याचें व बादशहाचें मुळींच पटलें नाहीं. तो स्वतंत्र मतानें वागूं लागला. तो बादशहास कित्येक गोष्टी त्याच्या मताविरुद्ध करण्यास भाग पाडीत असे. बादशहानें गुजराथच्या सुभ्यावर हैदर कुलीखान यास नेमलें होतें. त्यास निजामानें तेथून काढून टाकून तो प्रांत आपल्या नांवावर घेतला, व आपला हस्तक हमीदखान यास तेथें ठेवून दिलें. माळव्याचाही सुभा त्यानें आपल्या नांवावर करून घेतला, व तेथें आपल्या तर्फे म्हणून अजीमुल्लाखान यास नेमलें. याप्रमाणें बादशहाच्या मर्जीविरुद्ध स्वमतानेंच गुजराथ व माळवा प्रांत त्यानें आपल्या खास अमलाखालीं आणले. बाजीरावास गुजराथ, माळवा व दक्षिण या प्रांतांवर मराठ्यांचा जम बसवावयाचा होता; पण निजामानें आपल्या अधिकाराच्या जोरावर या तीन प्रांतांवर आपली सत्ता जमविली. मराठ्यांचा विशेषतः बाजीरावाचा या प्रांतांवर डोळा आहे, व त्याच्याशींच या बाबतींत पुढेंमागें आपणास दोन हात करावे लागतील, हें निजामास कळून चुकलें होतें. बाजीरावानेंही आतां आपलें धोरण हेंच ठरविलें कीं, गुजराथ व माळवा येथें आपला जम बसवून उत्तरेंतील दिल्लीची बादशाही व दक्षिणेंतील निजामशाही, यांच्यामध्यें दोघांस विलग करणारी मराठ्यांची कायमची पाचर ठोकावी. यदा कदाचित् वजीरी सोडून निजाम दक्षिणेंत परत आलाच, तर त्यास वरून गुजराथ व माळव्याकडून व खालून कर्नाटकांतून चेपीत आणून, दक्षिणेंतून त्याचा व मुसलमानांचा कायमचा नायनाट करावा. हिंदवी स्वराज्याच्या पोटांतील भुंगा काढून लावल्याशिवाय तें निर्धास्त होणार नाहीं, असें त्याला कळून चुकलें होते.

इकडे दिल्लीस बादशहाची व निजामाची नेहमीं धुसफुस चालून त्यांच्यांत वारंवार खटके उडत असत. बाजीरावानें माळव्यांत व गुजराथेंत चढाई करून तेथील चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्यास प्रारंभ केला. त्यामुळें निजामास वजिरीपदाचा त्याग करावासा वाटून, तेथें त्यानें आपला मुलगा गाजीउद्दीन यास आपल्या तर्फे वजिरी पदावर नेमलें व आपण स्वतः दक्षिणेंत स्वमतानेंच तडक निघून आला. निजामाचें स्वैर व बेपर्वाईचें वर्तन पाहून बादशहाचें पित्त भडकलें. त्यानें गाजीउद्दीनास वजिरीवरून दूर करून, त्याचे जागीं त्याचा काका कमरुद्दीनखान यास नेमलें, व दक्षिणेंत सुभेदार मुबारीजखानास असा हुकूम पाठविला कीं, तेथें त्यानें निजामाशीं लढाई करून त्यास पदच्युत करावें, व त्यास थारा देऊं नये. याकरतां ऐवजखान वगैरे मुसलमान सरदारांना व शाहूराजे, रावरंभा वगैरे मराठे मंडळीस मुबारीजखानास साह्य करण्याकरतां बादशहानें फर्मानें पाठविलीं.

पण इकडे शाहूचा व मुबारीजखानाचा वैरभाव विकोपास गेला होता, व त्यामुळें निजाम उत्तरेंतून उतरत असतांच त्यास वाटेंत बाजीरावानें गांठलें, व त्यास सर्व परिस्थिति समजावून सांगितली. निजाम घाबरून बाजीरावास नमला, त्यामुळें बाजीरावाला उत्तरेचें राजकारण आपल्या मर्जीप्रमाणें झुलवितां आलें. शाहूनें या प्रसंगीं आपल्या मंडळीस तटस्थ राहण्याचा हुकूम दिला.

बादशहाच्या हुकूमामुळें निजाम व मुबारीजखान या दोघांत युद्ध जुंपलें. दोघेही वृद्ध, अनुभवी व धूर्त होते. दोघांचेंही बल समान होतें. दोघांनींही मराठ्यांकडे मदतीची याचना केली. जय कोणाचा होणार, याचा कांहींच अंदाज बांधतां येत नसल्यामुळें व एकाच पक्षास जवळ केल्यास आणि त्याचा पुढें पाडाव झाल्यास, विजयी पक्षाकडून आपला भरपूर वचपा निघेल अशी भीति वाटत असल्यामुळें, 'तुम्हीं फौजेची सिद्धता करून तयार असणें, निजाम व शहामतखान यांनीं युद्ध आरंभिलें आहे त्यांत तुम्ही कोणाकडेही न जाणें,' असे हुकूम ता. २९–७–१७२४ रोजीं शाहूनें आपल्या सरदारांस व सैनिकांस सोडले.

निजामानें बऱ्हाणपुरास मुक्काम करून, औरंगाबाद कबजांत घेण्याचा बेत केला, व त्याप्रमाणें तो दक्षिणेंत येऊं लागला. तेथें मुबारीजखानानें आपला सरदार ऐवजखान यास निजामास अडथळा करण्यास ठेवलें होतें. मुबारीजखानानें हैदराबादेहून आपला तळ उचलून, पूर्वदिशेच्या बहाण्यानें पण वस्तुतः उत्तरेच्या रोखानें चालून जाऊन निजामावर छापा घालण्याचें ठरविलें होतें. पण निजाम महा मुत्सद्दी, पाताळयंत्री, व बारा ठिकाणचें पाणी प्यालेला! त्यानें ऐवजखानास लालुच दाखवून आपल्याकडे फितूर करून घेतलें व युक्तीनें लढाईशिवाय औरंगाबादचा ताबा घेतला. यामुळें मुबारीजखानास पायबंद बसला. निजामानें बाजीराव व दुसरे मराठे सरदार यांस आपणांकडे युक्तीनें वळवून घेतलें. बाजीरावाचे तैनातीस आपल्या भरंवशाचा सरदार तुरुकताजखान यास दिलें. अनेक जुन्या सरदारांस मदतीस बोलावून फौज जमविली व मुबारीजखानास कळविलें कीं, 'आपसांत लढणें चांगलें नाहीं; बादशहाचे हुकूम निरर्थक आहेत. माझी नेमणूक दुसरीकडे कोठें झाल्याबरोबर मी दक्षिण सोडून ताबडतोब जाईन, परंतु आतांच मला तसें करतां येत नाहीं.' मुबारीजखानानें निजामाचा हा हितवाद मुळींच ऐकला नाहीं. त्यास त्वेष चढला. 'कान्होजी भोंसल्यास कांहीं तरी रक्कम चारून आपल्या मदतीस बोलवा व त्याची मदत घ्या,' असा सल्ला खानास त्याचे मित्रमंडळीनें केला; पण तोही त्यानें

ऐकला नाहीं. यामुळें मुबारीजखानाची बाजू अगदींच कमकुवत व लंगडी राहिली. कारण कान्होजी भोंसला पैशाचा फार लोभी होता, व पहिलेपासूनच त्यानें आपलें वर्तन मराठे मंडळांतून फुटून निघाल्याप्रमाणें ठेवलें होतें. पण मुबारीजखानाजवळ कान्होजीस चारण्यापुरते पैसे बहुधा नसावेत.

दिल्लीहून बादशाही मदत मुबारीजखानास येण्याचे पूर्वींच त्यास गांठावें, असा बेत निजामानें केला व त्यास औरंगाबादेच्या पूर्वेस सुमारें ५० मैलांवर पूर्णा नदीच्या कांठीं साखरखेडी येथें गांठलें. तेथें ९ सप्टेंबर १७२४ रोजीं मोठी निकराची लढाई झाली. मुबारीजखान व त्याचे दोन मुलगे लढाईंत मारले गेले, व १७ हत्ती पाडाव झाले. निजामानें खानाचें डोकें कापून दिल्लीस बादशहाकडे पाठविलें व लिहिलें कीं, "खावंदाच्या कृपेनें आम्हीं हा बंडवाला मारला." साखरखेडी या गांवाचें नांव बदलून फत्तेखर्डा असें ठेवलें व तेंच अजून चालू आहे. हें गांव वऱ्हाडांत जिल्हा बुलढाणा, तालुका मेहकर यांत आहे. या लढाईंत शाहूच्या हुकूमामुळें मराठ्यांपैकीं कोणीही भाग घेतला नाहीं. बाजीरावही तटस्थच राहिला होता.

या लढाईनंतर निजाम औरंगाबादेस व तेथून लागलीच हैदराबादेस आला, व आपल्या राज्याचा जम बसवूं लागला. त्यानें बादशहास एक सविस्तर पत्र लिहून दक्षिणची सर्व हकीकत कळविली व आपली बोलकी व लेखणीची राजनिष्ठा व्यक्त केली. यावर बिचारा बादशहा करतो काय? नाकापेक्षां मोतीं जड असलेला निजाम त्याच्या आटोक्याबाहेर गेलेला होता. त्यानें त्याची दक्षिणच्या सुभेदारीवर नेमणुक कायम केली; मात्र माळवा व गुजराथ हे प्रांत त्याजकडून काढून घेतले.

बाजीरावास पेशवाई मिळाल्या नंतरची पहिलीं पांच वर्षें, बादशाहीच्या अनिश्चित घडामोडीमुळें विशेष आणीबाणीचीं गेलीं नाहींत. उघड उघड निजामाशीं लढून आपली कर्तबगारी सर्वांच्या निदर्शनास तो आणूं शकला नाहीं, यास अनेक कारणें होतीं. मराठ्यांच्या मुत्सद्दी मंडळांत तो वयानें व अनुभवानें लहान व म्हणून पोरकट समजला जात असे. या बाबतींत श्रीनिवासराव प्रतिनिधि त्याजपेक्षां वरचढ मानला जात असे. शाहूच्या दरबारांतील सर्व मंडळी बाजीरावाच्या चढाईच्या धोरणाबद्दल साशंक होती. यास्तव बाजीरावास आपल्याच मंडळीशीं वाद करावा लागत असे; म्हणून त्याच्या कारकीर्दीचीं पहिलीं पांच वर्षें फुकट धरसोडींत गेलेलीं दिसतात. पण या काळांत देखील मराठ्यांच्या राज्य-

व्यवस्थेंतील अनेक दोष त्याच्या नजरेस आले. त्यानें चहूंकडे स्वतः फिरून स्वराज्याच्या सीमांत प्रदेशाची उत्तम माहिती मिळविली होती. लहानसहान चकमकी, स्वाऱ्या करणें व खंडण्या वसूल करणें, हीं त्याच्या दृष्टीनें करतलमलवत भासणारीं सार्वीं कारस्थानें, या पांच वर्षांत त्यानें तडफीनें चालविलीं होतीं. त्यांत खंड पडला नव्हताच; फक्त त्यांत एकसूत्रीपणा यावयाचा होता. या हालचालींना एखाद्या विशिष्ट धोरणाच्या सूत्रांत गुंफून, त्यांचा हार व्हावयाचा होता. त्याच्या अंगीं हिंमत, पराक्रम व तारुण्याची तडफ होती. या त्याच्या गुणामुळें कित्येक जीवास जीव देणारे, वीस पंचविशीच्या आंत असलेले असे अनेक तरुण मदतनीस त्याच्या भोंवतीं गोळा झाले होते. पण बाजीरावाचा मुलुखगिरीचा अखंड उद्योग चालू असतां, साताऱ्यास कित्येक वयोवृद्ध मंडळी शाहूपाशीं बसून, कसले तरी कुतर्क काढून बाजीरावाविरुद्ध शाहूचें मन कलुषित करीत. प्रतिनिधीचा तर हा नेहमींचाच डाव होता. या कामांत त्यास फत्तेसिंग व रघूजी भोंसलेही साहाय्य देऊं लागले. याच त्रिकुटाशीं बाजीरावास पुढें फार झगडावें लागलें. शिवाय अष्टप्रधानही त्याच्या हालचालींना मध्यें मध्यें अडथळा आणीत असत. अशा प्रकारच्या घरगुती, क्लिष्ट, साध्या पण निवारण्यास कठीण अडचणींस, बाजीरावास प्रारंभीं तोंड द्यावें लागत होतें.

मराठ्यांच्या चढाईच्या युद्धनीतीचा पहिला पुरस्कर्ता बाजीरावच होय. औरंगजेबाच्या अखेरीपर्यंत मराठ्यांचें युद्धधोरण बहुधा बचावाचें होतें, पण बचावासाठीं चढाईचीच जरूरी असते हें युद्धतत्व बाळाजी विश्वनाथानें प्रथम मराठामंडळास शिकविलें, व त्याचाच पाठ पुढें बाजीरावानें गिरविला. मोंगलांचा दक्षिणचा मार्ग माळव्यांतून आहे, हें ध्यानांत ठेवून निजामाशीं आपल्या प्रांतांत लढत बसण्यापेक्षां नर्मदेपलीकडेच मोंगलांस अटकाव करावा व तेथेंच त्यांच्याशीं दोन हात करावेत, तेव्हांच आपलें राज्य आपण सुरक्षित ठेऊं शकूं, असें त्याचें मत बनलें होतें. म्हणूनच शिंदे व होळकर यांस माळव्यांत ठेवून त्यानें निजामाचा बादशाहीशीं असलेला संबंध तोडला. माळव्यांतून त्यांनीं व त्यांच्या हस्तकांनीं दिल्ली दरबारांतील मुसलमानी व रजपुतांच्या कारस्थानांवर शह बसविला. 'शत्रूंच्या मुलखांत युद्ध चालवून त्यांस हैराण करावयाचें, आपल्या प्रदेशांत येण्यास त्यांस मुळींच अवकाश द्यावयाचा नाहीं,' असें बाजीरावाचें म्हणणें होतें; परंतु त्याच्या विरुद्धपक्षाचें विशेषतः प्रतिनिधीचें म्हणणें असें होतें कीं, 'संभाजी, चंद्रसेन जाधव वगैरे घरच्या शत्रूंचा बंदोबस्त प्रथम करून, सातारा राजधानींत राज्याची स्थिरस्थावर झाल्यावर मग

माळवा, दिल्ली, वगैरे उत्तरेकडील भागांत यथाशक्ति उद्योग करावा.' बाजीरावाच्या मतें, घरांतल्या घरांत माशा मारीत बसण्याचें कूपमंडुक वृत्तीचें धोरण ठेवलें तर तसा प्रसंग कधींच येणार नाहीं, व स्वराज्याला स्थैर्य कदापि लाभणार नाहीं. स्वराज्यास स्थैर्य लाभलें नाहीं म्हणून मोहिमा बंद, व मुलुखगिरीचा पराक्रम नाहीं म्हणून स्थैर्य नाहीं, असें कधींही न संपणारें रहाटगाडगें चालावयाचें! पण बाजीरावानें त्या वेळीं केलेला युक्तिवाद इतका लोकमान्य झाला कीं, तो सर्व मराठा-मंडळास पटून तो ताबडतोब अमलांत आणण्यासाठीं त्या वेळीं जोराची चळवळ सुरू झाली. तो युक्तिवाद असाः—(१) मूळ शिवाजीमहाराजांचा संकल्प **हिंदुपदपादशाही** ऊर्फ हिंदवी स्वराज्य स्थापण्याचा होता. (२) औरंगजेबाशीं लढून मराठ्यांनीं जय मिळविले व मोंगल बादशाही मोडकळीस आणली. (३) अशा संधीस चढाईचा उद्योग केला असतां तो यशस्वी झाल्याशिवाय राहणार नाहीं. (४) बाहेरचा पराक्रमी उद्योग यशस्वी झाल्यानेंच घरचे शत्रू आपोआप निर्वीर्य होतील. (५) आणि आपली शक्ति व पराक्रम जोंपर्यंत महाराष्ट्राबाहेर पडली नाहींत, तोंपर्यंत शत्रूचा पाडाव होणें शक्य नाहीं. सबब प्रथम माळव्यांत व पुढें इतर प्रदेशांत चढाई करून हिंदुपदपादशाही स्थापन करणें हेंच मराठमंडळाचें आद्य कर्तव्य होय.

पुढें प्रतिनिधीला राज्यांतील घडामोडी करतां येत नाहींत, कर्नाटक व कोंकण इत्यादि स्वाऱ्यांत तो हजर होता पण त्या ठिकाणीं त्याचे हातून विशेष पराक्रम झाला नाहीं, त्यानें निजामास महाराष्ट्रांत बलवान होऊं दिलें, जेव्हां जेव्हां बाजीरावानें निजामास पेचांत आणून त्याचा नाश करण्याचा योग आणला तेव्हां तेव्हां आयते वेळीं मध्यें पडून तो योग त्यानें बिघडविला. उलट बाजीरावानें जेथें जेथें स्वारी केली तेथें तेथें विजयच मिळविला. त्यानें गुजराथ, माळवा व बुंदेलखंड या प्रांतांत आपलें आधिपत्य जमविलें. या ठळक गोष्टी जेव्हां शाहूच्या नजरेस आल्या, तेव्हां शाहूनें आपली सर्व भिस्त बाजीरावावर टाकली व त्यास मनापासून तो मदत करूं लागला. यामुळें बाजीरावाच्या कारकीर्दीचे दोन ठळक विभाग पडतात, व उत्तर विभागांत त्याचा अपूर्व पराक्रम दृष्टीस पडतो.

दक्षिणच्या सुभ्यावर निजामाची कायमची नेमणूक झाल्यावर त्याची दृष्टि कर्नाटकावर पोहोंचली. याच वेळेस शाहूनेंही कर्नाटकांत चित्रदुर्ग व श्रीरंगपट्टण येथें दोन स्वाऱ्या करविल्या होत्या. कर्नाटकप्रांतावर निजाम व शाहू हे दोघेही आपापला पुरातन हक्क सांगूं लागले. मराठे आपला हक्क शहाजीशिवाजींच्या

उद्योगामुळें व राजारामाच्या त्या प्रांतावरील आधिपत्यामुळें सांगत. तर निजाम म्हणे कीं, 'कर्नाटकप्रांतावर औरंगजेबानें जिंजीच्या पाडावानंतर अधिकार जमविला व तो प्रांत दक्षिणच्या सुभेदाराच्या अंमलाखालीं तेव्हांपासून त्यानें लावून दिला, यास्तव दक्षिणचा सुभेदार या नात्यानें त्या प्रांतावर माझा हक्क आहे.' कर्नाटकांत बाजीराव, प्रतिनिधि, दाभाडे, सर लष्कर बापूजी नाईक, घोरपडे इत्यादि सरदारांस फत्तेसिंग भोंसल्याच्या आधिपत्याखालीं देऊन कर्नाटकावर स्वाऱ्या करण्यास शाहूनें हुकूम केले. त्यांनीं तेथें जावून 'तुंबलेल्या खंडण्या वसूल केल्या, सालाबाद पुढें घेण्याचा ठराव केला. हुजूरचीं ठाणीं गेलीं होतीं तीं सोडविलीं; ज्यांनीं मगरुरी केली त्यांचे प्रांतास जरब दिली; एवढीच मुलुखगिरी केली.' एकंदरींत ही स्वारी यशस्वी झाली खरी, परंतु तिचा आपसांतल्या चुरशीमुळें व्हावा तितका उपयोग झाला नाहीं. फौजांचे अतोनात हाल झाले. शाहूचें मात्र थोडेंसें वैभव वाढलें व बाजीरावाची करामतही लोकांपुढें दिसूं लागली. शाहूचे सर्व सरदार कर्नाटकांत मुलुखगिरीवर असतांना इकडे निजामानें त्यास त्रास देण्याचा प्रयत्न केला. त्यानें साताऱ्याच्या आसपासच्या भागांत धामधूम सुरू केली. शाहूचा कर्नाटकांतील विजय कोल्हापूरच्या संभाजीस पसंत पडला नाहीं. त्यानें व चंद्रसेन जाधवानें निजामास मिळून शाहूशीं उघड उघड वैरभाव आरंभिला. इकडे बाजीरावानें कर्नाटकांत अर्काटच्या नबाबाशीं तेथील प्रांताच्या बंदोबस्ताचा ठराव केला. पण पुढें त्याचें लक्ष कर्नाटकाच्या कारभारांत लागेना. कारण त्या स्वारीचें पुढारीपण फत्तेसिंगाकडे असल्यामुळें त्याच्या हाताखालीं काम करणें बाजीरावासारख्या मानी माणसास शक्य नव्हतें. तो या स्वारीवर केवळ शाहूच्या आग्रहामुळें सामील झाला होता. त्याचें सर्व लक्ष निजामाच्या उत्तरेकडील हालचालीवर होतें. इतक्यांत शाहूनेंही त्यास निजामाच्या धामधूमीमुळें निकडीनें परत बोलाविलें. तेथून परत आल्यावर पुढें बाजीरावानें कर्नाटकाकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. कारण तेव्हांपासून फत्तेसिंग कर्नाटकावर आपला हक्क सांगूं लागला. बाजीरावाच्या दुर्लक्षामुळें त्या प्रांतांत पुढें युरोपीयनांना आपलें चंबूगवाळें फेकतां आलें व घोरपडीप्रमाणें नखें खुपसून घट्ट बसतां आलें.

शाहूला कर्नाटकांत विजय मिळूं लागला, शिवाय त्याचे सरदार चहूंकडे मुलुखगिरी करून त्याचें वैभव वाढवूं लागले ही गोष्ट संभाजीस असह्य झाली. त्यानें निजामाची मदत घेतली व चंद्रसेन जाधव, निंबाळकर, घोरपडे, तोरगलकर शिंदे इत्यादि मराठे सरदारांस चहूंकडून उठवून शाहूस त्रास देण्याचा सपाटा चालविला.

शाहूकडील सर्व सरदारांशीं या प्रतिपक्षियांनीं मुद्दामच तंटा भांडण सुरू केलें. वऱ्हाडांतील निजामाच्या ऐवजखान नांवाच्या सरदारानें कान्होजी भोंसल्यास एकाएकीं कारण नसतां छापा घालून पिटून काढलें. इतक्यांत फत्तेसिंग भोंसले व चिमणाजी दामोदर कलबुर्ग्याहून कान्होजीच्या मदतीस धांवून गेले व त्यास ऐवजखानाच्या कचाट्यांतून त्यांनीं हिंमतीनें मुक्त केलें. चंद्रसेनानें शाहूच्या अनेक सरदारांसही आपले बाजूस वळविण्याचा प्रयत्न केला. संभाजीनें चिमणाजी दामोदरास आपले बाजूस वळवून व त्यास आपला प्रधान नेमून, निजामासह पुण्यावर चाल केली. चिमणाजी दामोदरासारखे सरदार शाहूस सोडून शत्रूच्या पक्षांत सामील होऊं लागले, हें पाहून शाहूचें मन फार अस्वस्थ झालें. त्यानें आपल्या सर्व सरदारांस ताकीद दिली कीं, 'संभाजी व निजाम एकत्र होऊन चालून येत आहेत, तरी सर्व गडकऱ्यांनीं सावध राहून बंदोबस्त ठेवावा, व आपापल्या फौजांनिशीं किलीच-खानाकडे पिछाडीवर जाऊन पायबंद देवून नतीजा पोहोंचवावा;' अशा अडचणीच्या प्रसंगीं बाजीरावानें निजामावर एकदम मोहीम चालवून, शाहूची बाजू अशी कुशलतेनें सांभाळली कीं त्यावर शाहूचा कायमचा विश्वास बसला. आणि याच आणीबाणीच्या प्रसंगीं प्रतिनिधि, फत्तेसिंग भोंसले, दाभाडे, कान्होजी भोंसले या सर्व सरदारांपेक्षां बाजीरावच विशेष कर्तबगार आहे हें सर्वांस समजून आलें.

निजामानें शाहूच्या पक्षांत होईल तितकी दुफळी साम-दाम-भेद या त्रिपुटी मुत्सद्देगिरीनें माजविण्याचा प्रथम प्रयत्न केला. संभाजीसंबंधी शाहूकडून वारंवार अन्याय होतो तो दूर करून दोघांत योग्य निकाल लावून देऊं व शाहूपाशीं राज्याचा अर्धा हिस्सा मागून तो संभाजीस देऊं; शाहूस कोंकणस्थांनीं फार ग्रासलें आहे, तेव्हां त्यांच्या जाचांतून त्यास मुक्त करूं; शाहू व संभाजी यांत मध्यस्थी करून दोघांचा तंटा मिटवून देऊं; ही तोंडी व लेखी पाटीलकी त्यानें दोघांजवळही पुष्कळ करून पाहिली. संभाजीचा कळवळा व न्यायाची कळकळ हीं केवळ दिखाऊ कारणें होतीं. पण शाहूच्या विरुद्ध निजाम बिथरण्याचें खरें कारण निराळेंच होतें. तें म्हणजे, बाजीरावाचें चढावाचें धोरण निजामास नडत होतें. बाजीराव माळवा व गुजराथ या दोन्ही श्रीमंतीनें खचलेल्या प्रांतांत चौथाईचे हक्क सुरळीत रीतीनें अंमलांत आणूं लागला. शिवाय मराठ्यांचे सरदार निजामाच्या दक्षिणेंतील सहाही सुभ्यांतून आपले हक्क उघड उघड पण बळजबरीनें वसूल करूं लागले. तशांत कर्नाटकांतही शाहूनें विजय मिळविलाच. यामुळें निजामाचें स्वातंत्र्य व सामर्थ्य मर्यादित झालें व त्याचें उत्पन्न बरेंच कमी झालें. यामुळें त्यानें चंद्रसेन

व संभाजी यांस जवळ केलें व शाहूच्या दरबारांतील दुफळीचा फायदा घेण्याचा विचार केला. 'प्रतिनिधि व बाजीराव यांत मतभेद आहे. प्रतिनिधि देशस्थ व बाजीराव कोंकणस्थ आहे. बाजीरावाची छाप शाहूवर व मराठेमंडळावर फार पडते. शाहू बाजीरावाविषयीं साशंक असतो,' इत्यादि इत्यादि अनेक स्वराज्यांतील घरगुती बाबींचा त्यानें विचार केला होता. मराठ्यांचे चौथाई व सरदेशमुखीचे हक्क टाळतां यावे म्हणून निजामानें प्रतिनिधीस व सुमंतास आपल्या विश्वासांत ओढून घेऊन व प्रतिनिधीस वऱ्हाडची जहागीर देऊं करून त्याच्यामार्फत शाहूशीं बोलणें करण्याचा प्रयत्न केला. प्रतिनिधीनें मग निजामातर्फें खूब वकिली केली. शाहूस प्रथम ही वकिली पटली. पण पुढें निजामानें संभाजीचे मदतीनें पुण्यावर चालून येऊन शाहूस शह दिला, तेव्हां मात्र शाहूचे डोळे खाडकन उघडले. निजामानें आपल्या घरगुती तंट्यांचा निकाल लावण्याचें काम आपणांकडे घेतलें, ही गोष्ट शाहूस फार झोंबली. बाजीराव प्रथमपासूनच निजामाचा डाव ओळखून होता. यास्तव निजामास वठणीवर आणण्याचा आपला स्पष्ट अभिप्राय त्यानें शाहूस निवेदन केला; व शाहूनेंही बाजीरावाच्या योजनेस पुढें आपली मान्यता दिली. इकडे प्रतिनिधीनें वऱ्हाडांतील जहागीर निजामापासून स्वीकारली. यामुळें तो निजामाचा हस्तकच बनला हें उघड दिसून आलें. प्रतिनिधीकडून विशेष कामगिरी होणार नाहीं, हें शाहूच्या प्रत्ययास आलें. तिकडे बाजीरावानें निजामास गनिमी काव्यानें तोंड देण्याचें ठरविलें. समोरा समोर युद्ध न करतां निरनिराळ्या ठिकाणीं हुलकावण्या दाखवून शेवटीं कोठेंतरी इष्ट व सोयिस्कर ठिकाणीं युक्तीनें शत्रूस पेंचांत पकडावयाचें, असा बेत बाजीरावानें आरंभापासून करून त्या धोरणानें मोहीम चालविली. सेनानायकाचें धोरण व युद्धाचे डावपेंच बाजीरावाचे अंगीं कसे स्वभावतः मुरलेले होते, ते याच प्रसंगीं प्रथम व्यक्त झाले. बाजीरावानें प्रथम औरंगाबाद जिल्ह्यांत शिरून तेथें लूट, वसुली व जाळपोळ करून खूब धुमाकूळ मांडला; पुढें जालना प्रांत उध्वस्त केला. नंतर वऱ्हाडांत शिरून तो वाशीम येथें गेला. तेथून लगेच औरंगाबादेस येऊन, बऱ्हाणपुरास जाऊन तें शहर जाळून टाकतों, असें चहूंकडे जाहीर करून लूट करीत करीत तो खानदेशांत आला. तेव्हां बऱ्हाणपूरचा बचाव करण्याकरतां निजाम व ऐवजखान बऱ्हाणपुरास ताबडतोब गेले. बाजीरावानें एक लहानशी टोळी त्यांना फुसलावण्यासाठीं बऱ्हाणपुराकडे पाठवून, स्वतः मोठी फौज घेऊन; नर्मदेवरून पश्चिमेकडे वळून, लूट करीत करीत तो गुजराथेंत शिरला. तेव्हांचा गुजराथचा सुभेदार सरबुलंदखान निजामाचा शत्रू

होता. त्यास बाजीरावानें कळविलें कीं, ' आम्हीं व निजाम एक झालों आहोंत. आम्हीं त्याच्याच सांगण्यावरून येथें आलों आहों.' इकडे बाजीरावानें बऱ्हाणपुरास आपणांस झुकांडी देऊन फसविलें हें पाहून निजामास फार राग आला. तो एकदम पुण्यावर येण्यासाठीं म्हणून दक्षिणेस भीमाकांठीं पेडगांवास आला. नंतर भीमा उतरून त्यानें इंदापूर घेतलें. शाहूनें देवजी सोमवंशी, साबाजी निंबाळकर या मंडळीस निजामावर पाठविलें. बाजीरावानें पाटस येथील राणोजी शिंदे यास निजामास मध्येंच वाटेंत अडविण्यास सांगितलें. या सरदारानें हिंमतीनें निजामास अडवून धरलें. निजाम पुण्याकडे गेला हें कळतांच बाजीरावानें गुजराथेंतून दक्षिणेकडे आपला मोर्चा वळवून गोदावरीच्या पूर्व तीरावरचे निजामाचे परगणे बैजापूर व गांडापूर हे लुटून फस्त केले. तेव्हां निजाम अहमदनगरास होता. तेथून पुण्याचा रोंख सोडून तो लगेच बाजीरावास गांठण्यासाठीं म्हणून गोदावरी उतरून पूर्वेकडून त्यास आडवा झाला. येथेंच पैठण व औरंगाबादचे मध्यें पालखेड जवळ एका अत्यंत अडचणीच्या ठिकाणीं निजामास बाजीरावानें मोठ्या युक्तीनें कोंडून धरलें. आसपासच्या प्रदेशांतील दाणा वैरण सर्व जाळून त्यास पाणीसुद्धां मिळण्याची बंदी केली. इकडे शाहूनेंही बाजीरावाच्या मदतीकरतां प्रतिनिधि, दौलतराव शिर्के व महादाजी निंबाळकर यांस पाठविलें, पण बाजीरावास त्यांचा फारसा उपयोग झाला नाहीं. निजाम मराठ्यांच्या गनीमी लढाईला त्रासला होता. त्याच्या बाजूस असलेले मराठे खानदानी असले तरी त्यांना युद्धाचे हे डावपेंच येत नसल्यामुळें तो अगोदरच जेरीस आला होता. इकडे संभाजीची व चंद्रसेनाची निजामास फारशी मदत होऊं शकली नाहीं. निजामानें चंद्रसेनास विचारलें कीं, 'तुम्हीं मराठे मजकडे असून गनिमी काव्यानें शत्रूंशीं कां टक्कर देत नाहीं ?' चंद्रसेनानें उत्तर दिलें कीं, ' माझ्या सैन्यांत पुष्कळच मुसलमान भरले आहेत. ' संभाजीस त्यानें तोच प्रश्न केला. तेव्हां त्यानें सांगितलें कीं, माझे कारकून विरुद्ध पक्षाला मिळाले असावेत, असा मला जबर संशय येतो. शिवाय संभाजी निजामास म्हणाला, ' फौजेस खर्चासाठीं जे पैसे द्याल ते माझ्याजवळ द्या; कारकुनांजवळ दिल्यास ते आणखी फौज फितवितील. उलट कारकुनांनीं निजामास साफ सांगितलें कीं, ' संभाजीजवळ तुम्हीं पैसे दिल्यास ते फौजेस मुळींच मिळावयाचे नाहींत. तो ते चैनींत उडवून टाकील. ' असा निजामाच्या साह्यकर्त्यांत गोंधळ माजून राहिला होता. तेव्हां आतां पुढें करावें काय ? हा मोठा प्रश्न निजामास येऊन पडला. तेथें मुक्काम करावा तर पाणीसुद्धां मिळत

नाहीं, मग अन्न तर दूरच राहिलें. यास्तव बाजीरावाशीं आतां समेट केल्याशिवाय आपली धडगत नाहीं असें त्यास कळून आलें. तेव्हां ऐवजखानामार्फत निजामानें बाजीरावाशीं तहाचें बोलणें लावलें. बाजीरावानें सांगून पाठविलें कीं, प्रथम ' दोन मातबर कारभारी ओलीस पाठवून द्यावे, म्हणजे पाण्याची वाट देऊन मुक्काम मोकळा करवितों ! त्याप्रमाणें मुंगी शेवगांवच्या बाजूस निजामास नेऊन तेथें त्यास तहाच्या अटी पुढीलप्रमाणें कळविल्याः—( १ ) संभाजीस आमच्या स्वाधीन करावें. ( २ ) मोगलांच्या दक्षिणेंतील सहा सुभ्यांवर मराठ्यांचे हक्क सुरळीत चालावेत. ( ३ ) हे हक्क बिनहरकत वसूल करतां यावेत, म्हणून ठिकठिकाणीं तटबंदीच्या जागा आहेत, त्या मराठ्यांच्या हवालीं कराव्यात.

वरील तीन अटींपैकीं निजामानें शेवटल्या दोन अटी तेवढ्या मान्य केल्या. संभाजीची अट मान्य केली नाहीं. त्याजबद्दल बरीच वाटाघाट झाली, पण तो आधींच पन्हाळ्याकडे निघून गेला होता. निजामानें सांगितलें कीं शाहूनें परभारें त्याची वाटेल ती व्यवस्था स्वतंत्र रीतीनें करावी. तेव्हां बाजीरावानें संभाजीविषयीं आग्रह सोडला व तह कबूल केला.

वरीलप्रमाणें तह ठरल्यावर बाजीरावानें निजामास मोकळें केलें. निजामानें शाहू महाराजांस पोषाख, जवाहीर, हत्ती, घोडे इत्यादि मौल्यवान सरंजाम नजर केला, व सर्व सरदारांस वस्त्रें जवाहिर देऊन मेजवानीही दिली. शाहूमहाराजांनींहि प्रतिभेट म्हणून पोषाख वगैरे निजामास दिले. निजामावर विजय मिळवून बाजीरावादि मंडळी साताऱ्यास परत येतांच शाहूनें त्यांस सामोरें जाऊन त्यांचा फार सन्मान व गौरव केला.

संभाजीस मात्र आपल्या कृतकर्माचा आतां पश्चात्ताप झाला. शाहू व बाजीराव आतां पूर्वीप्रमाणें आपणांवर दया न दाखवितां, या घरभेदीपणाच्या वर्तनाबद्दल आपल्यास खरपूस चोप देतील व आपला सरंजाम जप्त करतील अशी भीति त्यास पडली. ज्या निजामाच्या बळावर त्याच्या उड्या होत्या तो निजामच दांतीं तृण धरून पेशव्यास शरण गेला. याच सुमारास निजामाकडून पेशव्यांस रंभाजी निंबाळकरामार्फत बारा मावळें देण्यांत आलीं.

अनेक वर्षांच्या अनुभवामुळें त्या वेळच्या योध्यांत वृद्ध निजाम युद्धकलेंत फार निष्णात गणला जात असे. बाजीरावासारख्या तरुणानें त्यास चांगलेंच जेरीस आणल्यामुळें त्याचा लौकिक सर्वत्र पसरला. निजामासारखा मल्ल पेंचांत अडकवून बाजीरावानें पाहतां पाहतां चीत मारला, व आपली जगांत वाहवा करून घेतली.

निजाम कसलेला, तर बाजीराव अननुभवी. एक मुरब्बी तर दुसरा धाडसी. एक धूर्त व कपटी, तर दुसरा सरळ व मोकळा. या कुस्तींत बाजीरावाचा जय झाला व त्याचें नांव मशहूर झालें. हा तह ६ मार्च १७२८ रोजीं झाला. बाजीरावाचें वय या वेळीं पुरतें तीस वर्षांचें देखील नव्हतें. **गुणाः पूजास्थानं गुणिषु न च लिंगं न च वयः**, हेंच खरें.

या तहानंतर बाजीराव व निजाम यांची मोठ्या समारंभानें भेट झाली. बाजीराव अत्यंत देखणा आहे अशी ख्याती निजामाच्या जनानखान्यापर्यंत पसरली होती व त्याच्या पराक्रमाचा अनुभव तर ताजाच होता. तेव्हां या भेटीच्या प्रसंगीं चिकाच्या पडद्या आडून मुसलमानी राजस्त्रियांनीं बाजीरावाला प्रत्यक्ष पाहून आपलें कुतूहल पुरवून घेतलें अशी दंतकथा आहे. दिसण्यांत इतका सुंदर असलेला सडपातळ पुरुष रणांगणावर धिप्पाड पुरुषांना कसे खडे चारतो, या कोड्याचा उलगडा या भेटींत बेगमांना झाला. कारण त्याचा पाणीदारपणा कांहीं और होता व त्याचें शौर्य आणि ओज चेहऱ्यावरून नुसतें ओथंबळून सांडत होतें.

या मुलाखतीच्या वेळीं, ‘आम्हीं तुमच्याशीं दगाबाजी करून तुम्हांला येथल्या येथें कैदेंत टाकलें तर तुम्ही काय कराल? आमचा विश्वास तुम्ही फुकट धरला. या वेळीं तुमचे शिंदे होळकर कोठें आहेत? ते तुम्हांला काय मदत करूं शकतील?’ वगैरे अर्थात्मक प्रश्न निजामानें बाजीरावाला विचारले. त्या क्षणींच बाजीरावबरोबर आलेल्या हुजऱ्यांनीं आंगरख्याच्या आंत लपवून आणलेल्या आपल्या समशेरी सपासप उपसल्या व त्या उंच ललकारून त्यांनीं त्यांचें छत्र बाजीरावाच्या शिरावर धरलें. बाजीरावानें निजामाला सांगितलें कीं, ‘माझे शिंदे होळकर नेहमींच माझ्याबरोबर असतात. ते मला व मी त्यांना कधींच विसंबत नाहीं.’ बाजीरावाचे हुजरे हेच शिंदे होळकरादि थोर सरदार होत, हें निजामाला कळतांच तो आश्चर्यानें स्तंभितच झाला. प्रसंगीं असा हीन वेष धारण करून आपल्या पुढाऱ्याच्या रक्षणास सदैव सज्ज असलेले भक्त सरदार ज्याला लाभले आहेत तो बाजीराव अजिंक्य होय, अशी निजामाची खात्री झाली. निजामानें नंतर शिंदेहोळकरांचा फार गौरव केला व त्यांना मानाचीं वस्त्रें देऊन त्यांचें सत्य स्वरूप सर्वांच्या नजरेस आणलें. बाजीरावाच्या स्तुतीपर ‘एक बाजी और सब पाजी’ असें निजामानें उद्गार काढतांच ‘एक निजाम और सब हजाम’ अशी बाजीरावानें समस्या पूर्ण केली. या सर्व दंतकथा खऱ्या नसल्या तरी बाजीराव व निजाम एकमेकांची योग्यता कशी जाणून होते, हें आपणांस कळतें व त्यांच्या स्वभावचित्रांवर या दंतकथांनीं प्रकाश पडतो.

प्रकरण ७ वें.

# यादवीचा शेवट



बाळाजीनें आपल्या मृत्यूपूर्वी थोडे दिवस आधीं संभाजीवर स्वारी करून त्याचा थोडाबहुत बंदोबस्त केला होता. परंतु प्रकृति बिघडल्यामुळें बाळाजीला त्या प्रकरणाचा शेवट लावतां आला नाहीं. बाळाजीच्या मृत्यूनंतर संभाजीनें थोडी धडपड करून पाहिली, परंतु बाजीरावाची बहादुरी पाहून त्याला पुढें पाऊल टाकण्याची हिंमत होईना. त्याचा विश्वासू सहाय्यक व महासुत्सद्दी रामचंद्रपंत अमात्य निवर्तल्यावर त्याचा दरबारही पोरका झाला. भगवंतराव अमात्यावर त्याचा विश्वास बसेना. भगवंतरावाचें मनदेखील संभाजीला फारसें अनुकूल नव्हतें. ताराबाईचा मुलगा शिवाजी जोंपर्यंत कैदेंत जिवंत होता तोंपर्यंत संभाजीच्या जिवाला स्वस्थता वाटत नव्हती. ताराबाई अतिशय पाताळयंत्री बाई होती व तिचा स्वभाव संभाजी जाणून होता. अमात्याचा आंतून ओढा तिच्याकडेच होता व मराठेशाहींतील इतर जुन्या सरदारांना तिच्याविषयीं, ती राजाराम महाराजांची बायको म्हणून साहजिकच आपलेपणा वाटे. त्यामुळें ती केव्हां कारस्थान करील व आपल्यावर घाड आणील याची संभाजीला सारखी धास्ती वाटत असे. परंतु शिवाजी १७२३ मध्यें कैदेंत असतांनाच मरण पावला. तो अर्धवट वेडसर होता, आणि तरीदेखील त्याला छत्रपति करण्याविषयीं ताराबाईचा अट्टाहास पाहिला म्हणजे हंसावें कीं रडावें हें कळत नाहीं. स्वार्थामुळें कर्तबगार माणसें कशीं आंधळीं व मूर्ख बनतात याचें हें एक उत्तम उदाहरण आहे. शिवाजीच्या मृत्यूनंतर संभाजी निर्घोर झाला व निजामाशीं शाहूविरुद्ध खलबत करून, नवा डाव योजूं लागला. निजाम व त्याचे स्वराज्यद्रोही मराठे सरदार चंद्रसेन जाधव व निंबाळकर, यांच्या जोरावर त्याच्या साऱ्या उड्या चालत. परंतु १७२८ त झालेल्या मुंगीशेवगांव येथील तहानें निजामाची पाठ चांगलीच मऊ झाल्यामुळें संभाजीची कंबरही खचली. उदाजी चव्हाण हा पुंड काय तो त्याचा शेवटचा आधार उरला होता. परंतु तोदेखील बाजीरावाच्या धाकानें गप्प बसून शाहूला शरण गेला व शाहूनें आपल्या नेहमींच्या उदार स्वभावास अनुसरून त्यास अभय दिलें. परंतु त्यानें शाहूची शुद्ध फसवणूक केली होती. कारण बाजीराव व चिमाजी हे दोघेही परदेशीं मोहिमांवर गेल्याची संधी साधून त्यानें

वारणेच्या तीरावरील शाहूचा मुलूख लुटण्यास आरंभ केला. शाहू शिकारीला गेला असतां त्याच्यावर त्यानें चार मारेकरी घातले. मग त्यानें ते स्वतः घातले असोत किंवा संभाजीच्या प्रेरणेनें घातले असोत. शाहूचें राजतेज पाहून ते मारेकरी गलित धैर्य झाले व शाहूनें त्यांना दरडावून विचारतांच आपण पोटासाठीं हें नीच कार्य पत्करलें, अशी त्यांनीं कबूली दिली. त्या **अजातशत्रु छत्रपतीनें** त्यांच्या हातून घडलेल्या प्रत्यक्ष राजद्रोहाच्या अपराधाबद्दल फांशी किंवा जन्मठेप काळे-पाण्याची शिक्षा देण्याऐवजीं, त्यांना त्या भयंकर अपराधाची माफी करून त्यांना उलट जमीनी लागवडीसाठीं बक्षीस करून दिल्या.

घडलेल्या या प्रकारानंतर शाहूस स्वस्थ बसणें शक्य नव्हतें. संभाजीवर स्वारी करून या भिजत पडलेल्या घोंगड्याचा निकाल लावण्याचें त्यानें ठरविलें. शाहूनें या मोहिमेची जोरानें तयारी चालविली. शंभूसिंग जाधव, दावलजी, निंबाळकर, आंगरे, पिलाजी जाधव, बाजीराव पंतप्रधान, या सर्वांस शाहूनें पाचारण केलें. सिधोजी थोरात,दावलजी सोमवंशी, राणोजी घोरपडे इत्यादि लहानमोठ्या सरदारांना उदाजी चव्हाणावर चालून जाण्याची शाहूनें आज्ञा केली. संभाजीचे साथीदार नामोहरम करून टाकावे व त्यानें निजामाशीं पुन्हां कारस्थान करूं नये इतका काय-मचा बंदोबस्त करून टाकावा, असा शाहूचा या वेळीं बेत होता असें दिसतें. कारण त्यानें या मोहिमेची फारच जय्यत तयारी केली. श्रीनिवासराव प्रतिनिधीकडे या मोहिमेचें आधिपत्य होतें. खुद्द शाहू उंब्रजपर्यंत चालून गेला. संभाजी गर्भगळित झाला होता, परंतु उदाजी चव्हाणानें संभाजीस हिंमत देऊन लढाईची तयारी त्याच्याकडून करविली. भगवंतराव अमात्य व सेनापती व्यंकटराव घोरपडे आपल्या फौजा घेऊन हजर झाले. त्यांच्या जोरावर संभाजीनें उदाजी चव्हाण शिरोळ येथें वेढयांत सांपडला होता, त्याला सोडवून आपल्या फौजेंत आणलें. परंतु दुसऱ्या दिवशीं प्रतिनिधी व जाधव यांनीं लढाई देऊन संभाजीच्या मुख्य फौजेचाच पराभव केला. तेव्हां चव्हाणासह संभाजी सडाच पन्हाळ्याकडे पळाला. 'प्रतिनिधीनें सर्व लष्कर लुटून फस्त केलें, आणि हजारों लोक पाडाव केले. पाडाव झालेल्यांत ताराबाई, राजसबाई, संभाजीच्या बायका, भगवंतराव अमात्य व व्यंकटराव घोरपडे हे प्रमुख होते. यांपैकीं राजसबाई व संभाजीच्या बायका यांस पन्हाळ्यावर पोंचवून, बाकीच्या तिघांस घेऊन प्रतिनिधी साताऱ्यास आला. ताराबाईस परत पाठविण्याचा शाहूचा विचार होता, परंतु 'मला कोठें झालें तरी कैदेंतच रहावयाचें' त्याअर्थीं तुम्हांजवळच राहूं, असें तिचें म्हणणें पडल्या-

वरून सातारच्या किल्ल्यावर राजवाडा होता तो दुरुस्त करून, तेथें ताराबाईस ठेवलें, आणि यादो गोपाळ यास तिचा कारभार सांगितला. स्वतःच्या अब्रूकरितां संभाजीनें खंड भरून भगवंतराव अमात्याची सुटका केली; परंतु व्यंकटराव घोरपड्याबद्दल मात्र त्यानें खंड भरला नाहीं. व्यंकटराव राजनिष्ठ असल्यामुळें संभाजीसाठीं तो एकनिष्ठपणें प्रत्यक्ष आपल्या पराक्रमी शालकाशीं लढण्यास सज्ज झाला व घरांतील विरोध त्यानें सहन केला. परंतु त्याचा मेहुणा बाजीराव पंत-प्रधान त्याच्या सुटकेची तजवीज करीलच, म्हणून संभाजी त्याच्या सुटकेविषयीं निश्चिंत राहिला. राजानें आपल्या सरदाराविषयीं इतकी बेफिकिरी दाखविली तर सरदारांना राजाविषयीं प्रेमाचा उमाळा कसा यावा ? परंतु जोंपर्यंत निभतें आहे तोंपर्यंत आपण आपल्या पदरास खार कां लावून घ्या, ही संभाजीची वृत्ति त्यास नडली. बाजीरावानें खंड भरून व्यंकटरावाची सुटका केली. शाहूचे प्रतिनिधी व प्रधान यांचें एकमेकांत किती सूत होतें याचें हें एक उत्तम उदाहरण आहे. एका प्रधानापासून दुसरा प्रधान खंडणी वसूल करतो हें दृश्य पाहिलें, म्हणजे मराठी राज्य आंवळ्याची मोट बांधून तयार केलेल्या गांठोड्याप्रमाणें होतें, हें विधान पटूं लागतें.

शिरोळें येथील लढाईंत संभाजीचा पराभव झाला असला तरी मोड झाला नाहीं. १७३० सालीं उदाजी चव्हाण त्याच्यातर्फे बंडाळी करीतच होता. परंतु त्याला पराभव पावून मोंगलाईंत पळून जावें लागलें. संभाजीचे बहुतेक चांगले सरदार शाहूला वश झाले व केवळ बाजारबुणगे त्याच्याजवळ राहिले. याविषयीं भगवंतराव अमात्यानें खालील उद्गार काढले आहेत—'या करवीर राज्यांत विवेक, विचार, शहाणे लोक, सभ्य, चतुरविद्यावंत कोणी नाहींत. रा. शाहूराजे यांचे राज्यांत सरकारकून लक्षांचे लक्ष, जिल्हे, मामले खाऊन सुखरूप आहेत.' संभाजीचा स्वभाव आळशी होता व स्वतः उद्योग करून कोणतीही मसलत हिमतीनें उभारण्याचें सामर्थ्य त्याच्यांत नव्हतें. लूट मिळविण्याकरितांच केवळ तो स्वारीस जाण्यास निघे. तो अत्यंत विषयासक्त होता व व्यसनांत त्यानें आपला पैसा उडविला. त्याला सात बायका होत्या. त्यांपैकीं तोरगलच्या शिंदे घराण्यां-तील जिजाबाई कर्तृत्ववान व मनमिळाऊ स्वभावाची होती. बहुधा तिची छाप पडल्यामुळेंच संभाजीनें शाहूशीं सख्य जोडून तह केला असावा. शाहूचा गोड व उदार स्वभाव, प्रजेविषयीं त्याची कळकळ व सर्वांशीं—शत्रूंशीं देखील गोडीगुलाबीनें वागण्याची त्याची हातोटी व त्याच्या प्रधानाचा अपूर्व पराक्रम, यामुळें संभाजी त्याच्यापुढें अगदीं फिका दिसे. निजामानें मान दिला म्हणजे तो शेफारून जाई व

आपण शाहूच्या बरोबरीनें कर्तबगार आहोंत, असा क्षणभर भ्रम त्याला पडे व तो हरभऱ्याच्या झाडावर चढे. मराठेशाहींत फूट पाडून आपल्या पोळीवर तूप ओढण्याकरितां निजाम आपल्यास वेळप्रसंगीं हरभऱ्याच्या झाडावर चढवितो, हें समजण्याइतका विवेक त्याच्यांत नव्हता. तो शाहूस शरण गेला म्हणूनच त्याचें राज्य जहागिरीच्या स्वरूपांत कां होईना, पण कायम राहिलें. नाहींपेक्षां कोल्हापूरचे तीनतेरा केव्हांच झाले असते. कारण कोणतेंही राज्य पराक्रमानें टिकतें व वाढतें, मेहेरनजरेनें तें जीव धरत नाहीं.

ताराबाई शाहूकडे येऊन राहिल्यानंतर मुख्यत्वेंकरून तिच्या मध्यस्तीनें दोघां भावांचें सख्य व्हावें म्हणून प्रयत्न सुरू झाले. खालील पत्र संभाजीनें शाहूस लिहिलें—

"तीर्थस्वरूप मातुश्री साहेबीं वडिलांचे ममतेचा अर्थ व उभयपक्षीं स्नेहाची दृढता होऊन विवेक व्हावा म्हणून वडिलांचा चित्ताभिप्राय लिहिला, तरी हे गोष्टी वडिलांस उचितच आहे. परस्पर विवेक होऊन लोकोत्तर उभयपक्षीं निर्दोष कीर्ति व्हावी हेंच आम्हास अगत्य आहे. या अगोदरच मातुश्री साहेबीं राजश्री बावाजी प्रभु यांसी पाठवावयाविषयीं लिहिले होते. तेव्हांच पाठवावे तरी त्यांचे शरीरी सावकाश नव्हते. प्रस्तुत मशारनिल्हेस पाठविलें आहे. सेवेसीं आलियानंतर सविस्तर अर्थ विदित करतील." या पत्रावरून मराठी राज्यांत एकमेकांविषयीं वांकडेपणा आला असला व राजकारणांत यादवी माजून कडाक्याचे तंटे माजले असले, तरी खासगत व्यवहारांत माणुसकी राखली जाई असें स्पष्ट दिसतें. शाहूचा चांगुलपणा व अत्यंत नम्र स्वभावच या प्रेमळ व्यवहाराच्या बुडाशीं होता. कोणी सरदारानें संभाजीचा अपमान केला तर तें शाहूस मुळींच खपत नसे. चिमणाजी बल्लाळास एकदां शाहूनें याबद्दल चांगलेंच चापलें. 'राणोजी घोरपडे व भगवंतराव यांनीं संभाजी राजांची अमर्यादा केली. त्यांचें पारिपत्य ते करीत असतां, तुम्ही आपणांकडील राऊत घोरपड्यांचे मदतीस पाठविले व चिरंजिवाचे प्रांतास उपसर्ग केला, हे गोष्ट बिलकूल कार्याची नाहीं. हें उचित न केलें. पत्रदर्शनीं आपली फौज माघारीं आणविणें. पर्याय न लिहितां चिरंजिवांचे चित्तांत विपर्यास न ये तो अर्थ करणें. पत्रदर्शनीं फौज बोलवा नाहीं तर आम्ही त्यांचे साहित्य सर्वथा करूं.' आपल्याशीं लढणाऱ्या व मुसलमान शत्रूंना जाऊन मिळणाऱ्या चुलत भावाबद्दल व त्याचा सन्मान राखण्याबद्दल शाहूची ही कळकळ पाहिली म्हणजे त्या थोर राजाविषयीं व्यक्तिगत आदर दुणावतो, व त्याचें राजकारण पुचाट असलें तरी

त्याचें अंतःकरण सोन्याचें होतें ही खात्री पटून त्या मानवी रत्नापुढें मान सप्रेम व सादर नम्र होते.

१७३१ च्या प्रारंभीं साताऱ्याहून श्रीपतराव प्रतिनिधी, नारोराम मंत्री, बाळाजी बाजीराव, पुरंदरे, निंबाळकर, वगैरे थोर सरदार मंडळी आपापल्या सरंजामासह शाहूच्या हुकुमानें संभाजीस सन्मानपूर्वक पाचारण करण्याकरितां पन्हाळयास गेली. त्यांनीं संभाजीस नजराणा केला व नंतर संभाजी महाराजांना मोठ्या समारंभानें त्यांनीं आपल्याबरोबर घेतलें. कऱ्हाडजवळ जखीणवाडीच्या मैदानांत भेटीचीं जागा मुक्रर केली होती. जवळ जवळ दोन लाख लोक या समारंभासाठीं गोळा झाले होते. मराठेशाहीचें सर्व वैभव त्या वेळीं तेथें एकवटलें होतें. किनखाबी पोशाख, हिरेमाणकें, पालख्या, अबदागिऱ्या, छत्रचामरें वगैरे झळकत होतीं. दानधर्म विपुल करण्यांत आला. या राजबंधूंच्या भेटीचें फारच सुंदर वर्णन बखरींत केलें आहे त्यावरून तत्कालिन परिस्थितीची योग्य कल्पना होते. या तात्पुरत्या व वरपांगी दिलजमाईमुळें मराठ्यांच्या पायाचा दक्षिणचा पायबंद तरी निदानपक्षीं सुटला व त्यांचे पाय हिंडावयास मोकळे झाले.

“ तह जाहला त्या समयीं प्रथम स्वारी साधारण नाम संवत्सरीं सन इहिद्दे सल्लासीन माघ मासीं साताऱ्याहून श्रीमन्महाराज शाहू राजे यांजकडून श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति यांसि न्यावयास आले व नांवनिशी श्रीपतराव प्रतिनिधी व नारोराम मंत्री व अंबाजी पुरंधरे पेशव्यांचे मुतालिक व कृष्णाजी दाभाडे व निंबाळकर व पांढरे व कित्येक नामीनामी सरदार किल्ले पन्हाळियाच्या मुक्कामीं फौजसुद्धां आले. श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति साहेबांस सर्वत्रांनीं नजरा व दुस्त व जडजडाव, जवाहीर, हत्ती, घोडे नजर करून सत्के करून जोहार केले. त्या उपरि पद्धतीप्रमाणें चादरा त्यांसि देऊन विडे होऊन ते किल्ले खालीं उतरले. उपरांतिक महाराज स्वामींची स्वारी किल्ल्याखालीं होऊन देवळें नावली एथें मुक्काम जहाला. तेथून कूचदरकूच जाऊन वाठारावरी मुक्काम केला. शाहूराजे उमरजेवरी होते. श्रीपतराव व नारोराम मंत्री वाठाराहून पुढें उमरजेस गेले आणि शाहूराजे यांसह कऱ्हाडापुढें जखीणवाडीच्या नजीक माळावरी घेऊन आले. त्यांजबरोबर संपूर्ण सरकारकून व नामीनामी सरदार वगैरे फौजा लक्ष पावेतों जखीणवाडीहून रावताची कोरगिरी वाठारा पावेतों म्हणतां दोन्ही सैन्यें मिळून दोन लक्षापर्यंत जथ जाहला. श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति सोन्याच्या अंबारींत स्वार होऊन समागमें सरकारकून व सरदार व

नामीनामी खांसे सरदार दहापांच हजारापर्यंत होते. कोरगिरींतून मुजरे घेत स्वारी जहाली. श्रीमन्महाराज उभयतां बाणाचे खास्तीवरी उभे राहून मध्यें लोक फरक करून बनवा टाकिल्या. नामीनामी लोकांनिशीं शाहूमहाराज घोड्यावर स्वार होऊन आले. श्रीमन्महाराज राजश्री संभाजीमहाराज छत्रपतींची स्वारी हत्तीवरी होती ते घोड्यावरि स्वार होऊन बनवा बिछावल्या होत्या तेथें येऊन उभयतां महाराज घोड्यावरून उतरले. परस्पर संनिध येऊन ऐक्यता होऊन शाहू महाराज यांच्या पायावरि डोई श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज-छत्रपति याणीं ठेविली. महाराजांनीं परस्परें उभयतां बंधूंनीं आलिंगनें केलीं त्या वेळेस मोहरा व रुपये व सोन्याचीं फुलें व रुप्याचीं फुलें परस्पर सत्के जहाले. त्या समयीं तोफेची सरबत्ती व नानाप्रकारचीं वाद्यें व शहाजानें वाजवून आनंद जाहला. फाल्गुन शुद्ध ३ तृतीया मंदवारीं दोन प्रहरां याप्रमाणें भेटीचा समारंभ जाहला. तदनंतर शाहू महाराज यांनीं श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति यांचा हात धरून उभयतां बंधू एक अंबारीमध्यें हत्तीवर स्वार झाले, खवासखान्यांत दोन मोर्चेलें घेऊन संभूसिंग जाधवराव बसले. संपूर्ण फौजेच्या कोरगिरीमध्यें जोहार घेत कऱ्हाडापर्यंत गेले. कऱ्हाडा नजीक कृष्णातीरीं मुक्काम जाहला. दक्षिणतीरीं श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपतींचा मुक्काम, उत्तर भागीं श्रीमन्महाराज राजश्री शाहूराजांचा मुक्काम होता; त्या डेरियापर्यंत उभयतां महाराज गेले. त्या वेळेस शाहूमहाराज यांची ज्या हत्तीवर स्वारी होती त्या हत्तीस व दुसऱ्या हत्तीस व दोन रंगविलेले घोडे एक रुप्याच्या जिनाचा व एक जरी बादली जिनाचा व दुस्त बादली व जडजवाहीर व ढाल तरवार याप्रमाणें देऊन श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति नदी आलीकडे आपल्या डेऱ्याच्या मुक्कामास आले. कऱ्हाडहून उमरजेस उभयतां बंधू महाराजांची सडी स्वारी जहाली. त्यांनीं श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपतीस हजार रुपये सत्का करून बादली दुस्त व जडजवाहीर व हत्ती व रंगविलेले घोडे बादली जिनाचे दिले. शाहू महाराजांच्या आग्रहानें उभयतां ऐक्यता असून साताऱ्यासि शिमगी पौर्णिमा व्हावी म्हणून ममतायुक्त बोलून श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति यांसी घेऊन सातारियासि गेले. त्या समयीं संपूर्ण शहरचे लोक बाहेर येऊन उभयतां बंधूंचा समारंभ पाहून सत्के व खैरात बहूत झाली आणि साताऱ्यांत पेशव्यांच्या वाड्यांत मुक्काम जहाला. दोन महिने मुक्काम होता. संपूर्ण सरकारकुन व नामी नामी सरदार याणीं श्रीमन्महाराज राजश्री संभाजी

महाराज यांसी मेजवानी केली. नऊ हत्ती व चाळीस घोडे व जडजवाहीर व दुस्त असे बहुमान झाले. शाहू महाराज यांनीं रवानगी समयीं हत्ती व रंगविलेले घोडे सामानसुद्धां व ढाल तलवार व जडावाचा खंजीर व दुस्त बादली दिली व रोख दोन लक्ष रुपये दिले आणि रवानगी केली. बरोबर सरकारकून फत्तेसिंग भोसले फौजेनिशीं देऊन श्रीमन्महाराज यांची स्वारी पन्हाळियासि पावती केली. शाहूमहाराज चार कोस घालवीत येऊन माघारे सातारियासि गेले. त्या वेळेस तहनामा जाहला त्याची यादी अलाहिदा असे कलम."

या भेटीनंतर संभाजीनें साधारणपणें शाहूशीं शत्रुत्व करण्याचें सोडून दिलें. त्याला मनांतून हा प्रकार आवडला नाहीं, परंतु निरुपाय म्हणून त्यानें या समेटास अनुमति दिली. तो राजी झाला नसता तर कोल्हापूरचें राज्य नामशेषच झालें असतें; कारण बाजीरावाच्या बहादुरीमुळें शाहूचा डंका हिंदुस्थानभर झडूं लागला होता. शाहूनें संभाजीचा इतका मानपान ठेवला खरा, पण त्याबरोबर आपल्या वैभवाचें प्रदर्शन दाखवून त्याला त्यानें दिपवून टाकलें व लोकांच्या दृष्टीनें संभाजी तेव्हांपासून शाहूचा मांडलिक शोभूं लागला. खासगी पत्रव्यवहारांत व भेटीगांठींत बंधुत्वाची व बरोबरीची अघळपघळ भाषा वापरण्यांत येई, परंतु झालेल्या तहानें संभाजीला लघुत्व येऊन त्याचे हातपाय जखडले गेले. या तहाला **वारणेचा तह** असें नामाभिधान आहे. ता. १३ एप्रिल १७३१ रोजीं हा तह ठरला. या तहाचा मसूदा खालीं दिला आहे.

सातारचे शाहू छत्रपति व कोल्हापूरचे संभाजी यांच्या दरम्यान शके १६५३ च्या चैत्र वद्य २ स जो तहनामा झाला त्यांतील कलमें:—

"तहनामा चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांसि प्रति राजश्री शाहू राजे याणी लिहून दिल्हा. सुरुसन इहिदे सलासीन मया व अलफ फसली ११४० छ १६ साबान विरोधी कृत संवत्सरे चैत्र वद्य २ बि तपसीलः—

कलम १. इलाखा वारुण महाल तहत संगम दक्षिणतीर कुल दुतर्फा मुलूख दरोबस्त देखील ठाणीं व किल्ले तुम्हांस दिले असत.

कलम २. तुंगभद्रेपासून तहत रामेश्वर देखील संस्थानें निंमे आम्हांकडे ठेवून निंमे तुम्हाकडे करार करून दिलीं असत.

कलम ३. किल्ले कोपळ तुम्हाकडे दिला त्याचा मोबदला तुम्ही रत्नागिरी आम्हांकडे दिला.

कलम ४. वडगावचें ठाणें ( किल्ला ) पाडून टाकावें.

कलम ५. तुम्हांशीं जे वैर करतील त्यांचें पारिपत्य आम्हीं करावें. आम्हांशीं वैर करतील त्यांचें पारिपत्य तुम्ही करावें. **तुम्हीं आम्हीं एक विचारें राज्याभिवृद्धि करावी.**

कलम ६. वारणेच्या व कृष्णेच्या संगमापासून दक्षिणतीर तहत निवृत्तिसंगम तुंगभद्रेपावेतों दरोबस्त देखील गड ठाणीं तुम्हांकडे दिलीं असत.

कलम ७. कोंकणांत साळशी पलीकडे तहत पंचमहाल अकोलेपावेतों दरोबस्त तुम्हांकडे दिले असत.

कलम ८. इकडील चाकर तुम्हीं ठेवूं नये. तुम्हांकडील चाकर आम्हीं ठेवूं नये.

कलम ९. मिरज प्रांत विजापूर प्रांतींचीं ठाणीं देखील अथणी, तासगांव वगैरे तुम्ही आमचे स्वाधीन करावीं.

एकूण नऊ कलमें करार करून तहनामा लिहून दिल्हा असे. सदरहू प्रमाणें आम्हीं चालूं. यास अंतराय होणार नाहीं. ''

संभाजीच्या पदरांत हा तहही पुरतेपणीं पुढें पडला नाहीं. संभाजी हा या तहानंतर शिंदे-होळकर-गायकवाडाप्रमाणें केवळ एक सामान्य जहागीरदार बनला. शिंदे-होळकरांच्या पराक्रमामुळें त्यांच्या लहानशा जहागिरींची वाढ होऊन पुढें त्यांचीं मोठमोठीं संस्थानें व राज्यें बनलीं, तसा पराक्रमही करवीरकरांनीं न दाखविल्यामुळें त्यांची जहागिरी अंगठीच्या खड्याप्रमाणें चिमुकली व आटोपशीर अशीच शेवटपर्यंत राहिली. संभाजींत कर्तृत्वाचा अभाव होता. त्याच्या आळसामुळें व व्यसनी भीरुतेनें शाहूच्या दक्षिण दिग्विजयांत त्याची मदत पेशव्यांना मिळाली नाहीं. यामुळें पेशव्यांनीं कृष्णेच्या खालीं जो नवा मुलुख जिंकला, त्याची वांटणीदेखील कधीं तहाच्या कलमाप्रमाणें संभाजीला मिळाली नाहीं. कारण स्वारींत जे सरदार सामील असत व ज्यांच्या पराक्रमावर विजयाची भिस्त असे, त्यांच्यांतच साहजिकपणें नव्या जिंकलेल्या मुलुखाची वांटणी होत असे. दक्षिणेंत फत्तेसिंग उदयास येऊन त्यानें अक्कलकोट संस्थान आपल्या पराक्रमानें मिळविलें, तसाच पराक्रम करावयास संभाजीस भरपूर वाव होता. परंतु कोल्हापूरच्या पाण्यांत चैनीला पोषक अशीं द्रव्यें असलीं, तरी पराक्रमाला मारक असें हलाहलही त्यांत विरलें होतें. त्यामुळें कोल्हापुरी छत्रपतीचें छत्र महाराष्ट्रावर सावली धरूं शकलें नाहीं, व त्याच्या आश्रयाखालीं मराठ्यांची वाढहि झाली नाहीं. नामधारी छत्रपतीलाच तें कसेंबसें जेमतेम पुरलें, एवढेंच.

या तहानंतर संभाजी वरचेवर साताऱ्यास शाहूच्या भेटीस जात असे व शाहू देखील त्याचा योग्य तो मान ठेवी. मुसलमान पादशाहींत होणाऱ्या व झालेल्या भाऊबंदकीशीं तुलना करतां ही मराठी यादवी अत्यंत सौम्य ठरेल. मुसलमान पादशाहींत एक घाव व दोन तुकडे ही राजनीति प्रचलित असल्यामुळें, गादीवर बसणाऱ्या बादशहाचे जवळचे दूरचे सर्व भाऊबंद प्रथम कत्तल होत. त्यांत अघोरी क्रूरता असली, तरी नव्या पादशहाच्या मागें फितुरीचा भुंगा राहत नसे. उलट मराठ्यांचें वर्तन दयार्द्र असल्यामुळें, यादवीचा कायमचा पायबंद राजाला मोकळ्या मनानें हालचाल करूं देईना. शाहूच्या अत्यंत मृदु स्वभावामुळें अनेक पुरुषांचें कर्तृत्व त्या वेळीं फुकट गेलें व पराक्रमाच्या मानानें गहिरें फळ मराठ्यांच्या पदरांत पडलें नाहीं. कारण शाहूची मृदुता बादशाहीचें रक्षण करती झाली व त्यामुळें बादशाही इमारत किरकिरी व तकलादू झाली, तरी ती कोसळून खालीं गडगडली नाहीं. ही मृदुता राजकारणांत नडली असली, व स्वराज्याच्या वाढीला विघातक झाली असली, तरी मराठ्यांना आज इतिहासाच्या दृष्टीनें सिंहावलोकन करतांना अभिमानास्पद अशीच वाटणारी आहे. मराठे सडेतोड व रूक्ष असले तरी दयाळु वृत्तीचे व संग्राहक धोरणाचे आहेत, हें जगाला दिसून आलें, व आजही येतें.

---

## प्रकरण ८ वें.

# ‘द्रोहाचें प्रायश्चित्त’



दाभाडे मूळचे तळेगांवचे पाटील. त्यांच्या घराण्यांतील येसू पाटील हा शिवाजी महाराजांचा हुजऱ्या होता. शिवाजीमहाराजांच्या मृत्यूनंतर संभाजीनें येसाजीस राजारामाच्या तैनातींत ठेविलें व त्यांचा लोभ लागून त्यानें अत्यंत इमानानें राजारामाची सेवा केली. दुसऱ्या संभाजीचा जन्म झाला तेव्हां राजारामानें तळेगांव येसाजीस इनाम करून दिला. जिंजीहून राजाराम परत महाराष्ट्रांत येत असतां, येसाजी व त्याचे दोन पुत्र खंडोजी व शिवाजी यांनीं आपल्या जिवाची पर्वा न करतां अनेक संकटांतून महाराजांचा जनाना पन्हाळ्यास सुखरूपपणें आणून पोहोंचविला. शिवाजी वाटेंतच मरण पावला, आणि पन्हाळ्यास आल्यानंतर

येसाजीनेंही जगाचा निरोप घेतला. त्या घराण्याची ही अमोलिक सेवा लक्षांत घेऊन राजारामानें खंडेरावास 'सेना खासखेल' हें पद दिलें. खंडेराव प्रथम ताराबाईचे पक्षासच होता व तिच्यातर्फें लढण्याची त्यानें शिकस्त केली. कारण दाभाड्यांचें घराणें राजाराम महाराजांनींच मोठेपणास चढविलें होतें. परंतु ताराबाई व तिचा पुत्र कैदेंत पडल्यावर हा शाहूच्या पक्षास मिळाला. पुढें बाळाजी विश्वनाथाचा व याचा स्नेह चांगलाच जुळला आणि बाळाजीबरोबर त्यानें मराठी राज्याची मोठी कामगिरी बजावली. जाधवांच्या फितुरीमुळें रिकामें पडलेलें सेनापतीचें पद १७१७ त शाहूनें खंडेरावास दिलें व गुजराथेंत मोहीम करून तो प्रांत सर करण्याचा त्यास हुकूम केला. बाळाजीबरोबर दाभाडे दिल्लीस गेला होता, आणि तेथून परत आल्यावर महाराष्ट्राची उत्तर सीमा सांभाळून तो गुजराथ, वऱ्हाड व खानदेश या तीन प्रांतांना मधूनमधून शह देत असे. बाळापुरच्या लढाईंत तो जातीनें हजर होता. परंतु त्यानंतर त्यानें राजकारणांतून आपलें अंग काढून घेतलें व स्वग्रामीं तो रहावयास आला. घाटमाथ्यावरील तळेगांवची प्रमाणशीर थंड हवा वृद्ध माणसाला मानवेल अशीच होती. शिवाय तेथील निसर्गाची साधी सजावट त्याच्या डोळ्यांना सुखावत असावी. बहुधा वृद्धपणामुळें तो तेथें रहावयास आला असावा. कदाचित् बाजीराव बल्लाळ मुख्य प्रधान असतांना देखील तो जातीनें सेनाध्यक्षाचें काम करूं लागला, हें पाहून त्याला वैषम्यही वाटलें असावें. परंतु या वृद्ध व उदार मनाच्या सरदारानें आपल्या जुन्या मित्राच्या मुलाशीं वांकडेपणा धरला नाहीं, व वर्तनांत तो दाखविलाही नाहीं. त्याचा मुलगा त्रिंबकराव दाभाडे हा गुजराथेंतील कामकाज आटोपत होता. खंडेराव १५ मे १७२९ रोजीं मरण पावला. तेव्हां शाहूनें सेनापतिपद त्रिंबकरावास व सेनाखासखेल पद यशवंतरावास देऊन त्या घराण्याचा मान राखला. खंडेरावच्या दोन पदव्या दोघा पुत्रांत विभागल्या गेल्या. ८ जानेवारी १७३० रोजीं त्रिंबकराव सेनापती झाला, परंतु दहा वर्षांपासून सेनापतीचें प्रत्यक्ष काम बाजीरावानें आटोपलें होतें. १७२० पासून खंडेराव नांवाचा सेनापति असून प्रत्यक्ष रणांगणावरील खरा सेनापती बाजीरावच होता. हें वैषम्य त्रिंबकरावाच्या मनांत बहुधा सलत असावें. पण त्याला कोण काय करणार ? बाजीराव अत्यंत मोठा योद्धा असल्यामुळें तो स्वभावतःच सेनापती होऊन बसला होता. त्याला त्या पदानें अधिक वीरता थोडीच प्राप्त व्हावयाची होती. इतर नांवानें व पदवीनें सेनापती असले तर बाजीराव स्वपराक्रमानें सेनापति बनला होता.

गुजराथवर दाभाडे व त्याचा मुख्य हस्तक पिलाजी गायकवाड यांनीं आपली खंडणी लागू केली. पेशव्यांना उत्तर हिंदुस्थानांतील माळवा, खानदेश या प्रांतांत मुलुखगिरी करण्याचा अधिकार शाहूनें दिला होता. परंतु माळवा–खानदेश व गुजराथ यांच्या सरहद्दी एकमेकांला भिडल्या असल्यामुळें, पेशव्यांचा हस्तक कंठाजी कदम बांडे हाही गुजराथवर अधून मधून स्वारी करून खंडणी वसूल करीत असे. मराठ्यांच्या स्वाऱ्यांचा वाढता उपद्रव पाहून, त्यांचा बंदोबस्त करण्याकरितां म्हणून सरबुलंदखान या शूर सरदाराची गुजराथच्या सुभ्यावर बादशहानें नेमणूक केली. परंतु १७२३ त त्याची नेमणूक होऊन देखील तो १७२५ पयत गुजराथेंत आला नाहीं. नबाबीची धुंदी डोळ्यांवर चढल्यामुळें मुसलमान सरदार त्या-वेळीं इतके आळशी, ऐषआरामी व खुशालचेंडू बनले होते. अशा रेंगाळण्यानें राज्य कसें चालविलें जावें ? त्यानें आपल्या तर्फे सुजायतखानला गुजराथेंत पाठविलें. निजामला दक्षिणचें राज्य स्वतंत्र करावयाचें होतें, यामुळें त्याला गुजराथचा सुभा आपल्या हातांत असावा अशी इच्छा होती. कारण त्यामुळें मराठ्यावर वरून वचक बसला असता. म्हणून त्यानें आपला मामा हमीदखान यास गुजराथेंत ठेविलें. अर्थातच हमीदखान व सुजायतखान यांच्यांत युद्ध जुंपलें. बांडे या सरदाराची मदत घेऊन हमीदखानानें अहमदाबादजवळ सुजायतखानावर हल्ला करून त्यास ठार मारलें. तेव्हां सुजायतखानाचा धाकटा भाऊ रुस्तमअली यानें पिलाजी गायकवाडाची मदत मागितली. मराठे सरदारांत याप्रमाणें विरुद्ध पक्ष पडले, परंतु त्यांनीं आपसांत दिलजमाई करून घेऊन रुस्तमअलीला तोंडघशीं पाडलें. ऐन मोक्यावर आयत्या वेळीं पिलाजीनें दगा दिल्यामुळें रुस्तमअलीचा पेटलादजवळ वसो येथें पराभव झाला व तो त्या लढाईंत मारला गेला. हमीदखानानें महीच्या उत्तर प्रदेशाची चौथाई कंठाजीला आणि दक्षिण प्रदेशाची पिलाजीला देऊं केली.

सरबुलंदखान डिसेंबर १७२५ त अहमदाबादेला येऊन पोहोंचला. एप्रीलमध्यें त्यानें दिल्ली सोडली; परंतु त्याची चाल नबाबी ऐषआरामाची होती. या ढिलाईचा फायदा मराठ्यांनीं चांगलाच घेतला. हमीदखानानें केलेल्या तहाप्रमाणें मराठ्यांनीं सर्व प्रांतांत धुडघूस घातला व खंडणी वसूल करून आपला वसुली–वहिवाटीचा हक्क स्थापन केला. सरबुलंदखानाबरोबर फौजेचा जमाव चांगला होता व बादशाहाकडून त्याला पैशाची मदतही चांगली होत होती. तेव्हां एकट्या हमीदखानाचा त्याच्यापुढें टिकाव लागणें शक्य नव्हतें. त्यानें मराठ्यांची मदत मागितली. सरबुलंदखानानें आपल्या तोफखान्याच्या जोरावर मराठ्यांचा प्रथम

सोजिआ व नंतर कपडवंज येथें पराभव केला. तेव्हां हमीदखानाला निमूटपणें गुजराथेंतून पाय माघारा घ्यावा लागला. मराठे पराभव पावून छोटा उदेपूर येथें गोळा झाले. बाजीरावनें मराठ्यांवरील हा कठीण प्रसंग ओळखून अंताजी भास्कर याच्या हाताखालीं नवी फौज देऊन त्यांच्या मदतीस पाठविली. या साहाय्याच्या जोरावर कंठाजी वडनगरावर व पिलाजी बडोद्यावर चाल करून गेले. बाजीरावाच्या हालचाली इतक्या विजेप्रमाणें होत असत कीं, तो येतो ही बातमी शत्रूला कळण्यापूर्वीं त्याची फौज दारावर येऊन थडके. कर्नाटक, माळवा, खानदेश व गुजराथ या चारी प्रांतांना शह लावीत व ठिकठिकाणीं आपला चौथाईचा हक्क बजावीत तो वाऱ्यासारखा फिरत असे. मराठ्यांच्या स्वाऱ्यांमुळें त्रासून जाऊन सरबुलंदखानानें अखेरीस त्यांच्याशीं तह केला व हमीदखानानें त्यांच्यापाशीं कबूल केलेल्या अटी त्यानेंही मान्य केल्या. या तहासंबंधीं शाहूनें कंठाजी कदम बांडे व पिलाजी गायकवाड यांना २३ एप्रील १७२६ रोजीं खालील आज्ञापत्र पाठविलें—'प्रांत गुजराथ व माळवा येथील तह रा. अंबाजी त्रिंबक मुतालिक दिंमत पंतप्रधान यांनीं सरबुलंदखानापाशीं चौथाई सरदेशमुखीचा तह केला आहे, तरी तुम्ही प्रांत मजकूरचा चौथाईचा आकार होईल त्यापैकीं बाबती वजा करून राहिला ऐवज मोकासबाब निम्मे चिमणाजी बल्लाळ यांजकडे व निम्मे त्रिंबकराव दाभाडे याजकडे पावले, तरी तुम्ही त्याप्रमाणें उपसर्ग न करणें.'

शाहूनें गुजराथ प्रांताची मुलुखगिरी पूर्वीं पूर्णपणें सेनापतीकडे सोंपविली असतां अर्ध्या भागांत पेशव्यांचा हात शिरला हें पाहून दाभाड्यांना वैषम्य वाटलें. गुजराथेंत पेशव्यांनीं आपला वाटा ठेवूं नये हें त्यांचें म्हणणें पडलें. उलट पेशव्यांच्या सहाय्यानें व त्यांच्या पराक्रमाच्या जोरावर सरबुलंदखान नामोहरम झाला असल्यामुळें, त्यांना आपला हक्क सोडावासा वाटेना. कंठाजीच्या मदतीस पवार होतेच. त्यांनीं उत्तर गुजराथच्या कडी विजापूर भागावर चाल करून जाऊन, वढवाण व काठेवाडांतील इतर संस्थानांवर आपला शह लागू केला. कारण झालेल्या तहाप्रमाणें महीच्या उत्तरकांठच्या प्रदेशावर पेशव्यांच्या चौथाईचा हक्क लागू झाला होता, आणि दक्षिणभाग दाभाडे व त्याचा प्रमुख सहाय्यक गायकवाड यांच्या दिमतीस आला होता. त्यामुळें आपल्या धन्याच्या हितासाठीं उत्तर विभागाची अधिकार-मर्यादा पराक्रमानें जेवढी वाढवितां येईल तेवढी वाढविणें हें कंठाजीचें कर्तव्यच होतें. गुजराथेंतील मुलुखगिरी आपल्या वाटेस आली असून, पेशव्यांचा अधिकार तेथें आपल्यापेक्षां अधिक स्थापन होत चालला आहे, हें

पाहून दाभाड्यानें शाहूकडे तक्रार केली. परंतु शाहूनें पेशव्यांचा पक्ष घेतला व झालेला तह कायम ठरविला. मुलुखगिरीची वांटणी सनदापत्रांवर अवलंबून नसून पराक्रमावर अवलंबून असते, असें शाहूचें म्हणणें पडलें. उद्यां मोगलांच्या प्रत्यक्ष ताब्यांत असलेल्या दिल्ली प्रांताची शाहूनें एखाद्याला सनद करून दिली, तरी कागदाच्या कपट्यापेक्षां त्या सनदेला काय किंमत येणार ? कारण दिल्लीवर ताबा मोंगल बादशाहीचा. तेव्हां जो कोणी स्वपराक्रमानें दिल्ली काबीज करील तोच दिल्लीवर आपला अधिकार चालवील. खास स्वराज्यांत मोडत असलेल्या जहागिरीच्या सनदा व इनामें, यांनाच काय तें सनदा हें नांव देतां येईल. परकीय अमलाखालीं असलेल्या प्रांताच्या मुलुखगिरीच्या सनदा, म्हणजे सरदारांना उद्देशून लिहिलेलीं उत्तेजन-प्रशंसेचीं केवळ पत्रें होत. तें आमिष असलें तरी केवळ सनदेच्या जोरावर तें गिळतां येत नाहीं. पराक्रमानें जो शत्रूशीं लढून परप्रांतावर प्रत्यक्ष कबजा करील तोच त्यांचा खरा अधिकारी होईल. शाहूचा निकाल दाभाड्यांना रुचला नाहीं व त्यांनीं पेशव्यांशीं वैर मांडलें. गुजराथेंत बांडे व पवार हे पेशव्यांचे सरदार असून पिलाजी गायकवाड हा दाभाड्याचा दुय्यम होता. तेव्हां मालकांचीं भांडणें त्यांच्या सरदारांनीं उचलून ते आपसांत भांडूं लागले. बांडे व गायकवाड यांच्यामध्यें खंबायतजवळ मोठी लढाई होऊन तींत पिलाजी गायकवाडचा पराजय झाला. तेव्हां पिलाजी खेड्याकडे वळला आणि कंठाजीनें हजार रुपये तेथून वसूल केले. चिमाजीही फौजेनिशीं गुजराथेंत या संधीस उतरून अहमदाबादच्या बाजूला त्यानें खंडणी गोळा केली, व गोधरा, दोहद, चांपानेर हीं स्थळें काबीज करून नंतर माळव्यांत प्रयाण केलें. याबद्दल सेनापतीनें तक्रार केल्यावरून शाहूनें बाजीराव, चिमाजी, पवार वगैरे मंडळीस साताऱ्यास तडजोडीकरितां बोलाविलें.

बाजीराव व निजामाचा सामना संपून निजाम पुरा हैराण झाला, तेव्हां बाजीराव त्या फिकीरींतून मोकळा झाला. परंतु बाजीराव व निजामाचें युद्ध चालू असतांनाच दाभाड्यानें निजामास मदत करण्याच्या हेतूनें माळव्यावर स्वारी केली व मोठ्या धामधुमीनें तेथील खंडण्या वसूल केल्या. बाजीराव निजामाशीं लढण्यांत गुंतला असल्यामुळें त्याला त्या वेळीं दाभाड्याचा प्रतिकार करतां आला नाहीं. दाभाड्याच्या अपेक्षेप्रमाणें तो माळव्यांत गेला असता, तर निजामावर लागू झालेला त्याचा शह आपोआप सुटला असता. परंतु बाजीरावानें अत्यंत शहाणपणानें आपल्या व्यक्तिगत नुकसानीकडे दुर्लक्ष केलें व निजामाचा खरपूस समाचार

घेतला. निजामाचा पराभव होऊन त्याच्याशीं तह झाल्यावर, त्यानें शाहूकडे दाभाड्याच्या वर्तनाविषयीं तक्रार केली, आणि दाभाड्याचें वर्तन सर्वस्वी शाहूला नापसंत झालें. ३१ मे १७२८ रोजीं शाहूनें दाभाड्यास खालील जरबेचें पत्र पाठविलें—'तुम्हांस माळवे प्रांतीं धामधूम करून पैका घ्यावयास, मुलूख करावयास गरज काय? या उप्पर तुम्हीं पैका घेतला आहे तो बाजीराव पंडित यांजकडे फिराऊन देणें. नाहींतर तुमच्या महालीं मोबदला करतील. या उप्पर माळवे प्रांतीं उपसर्ग न देणें, फिरून बोभाट येऊं न देणें.' या वेळीं शाहूनें प्रतिनिधीस हातीं धरून संभाजीवर चाल केली व बाजीरावनें निजाम व संभाजी यांच्यावर नजर ठेवून मग्रूर व फितुरी सेनापतीचा समाचार घेण्याचें ठरविलें. बाजीराव दुसरीकडे लढण्यांत गुंतला आहे हें पाहून निजाम व संभाजी सारख्या हालचाली सुरू करीत व ह्या दुहेरी व्यवधानामुळें कठीण प्रसंग साहजिक ओढवे.

सरबुलंदखान या वेळीं जोरावर चढला होता. त्यानें कंठाजी व पिलाजी या दोघांचाही मोड केला. तेव्हां ते दोघे एकत्र होऊन लूट करून रयतेस उपद्रव देऊं लागले. परंतु अशानें मराठ्यांचा पाय मागें पडूं लागला. कारण रयत नाराज झाली म्हणजे जेत्यांचें नवें आसन स्थिर राहणें अशक्य. ते डळमळावयाचेंच. ही गोष्ट बाजीरावास मुळींच इष्ट नव्हती. मराठ्यांनीं परप्रांतांत एकदां रोंवलेला पाय तेथून माघारा घेऊं नये, ही त्यांची महत्वाकांक्षा! लढाया शत्रूंच्या मुलुखांत लढल्या जाव्या व त्यांना आपलें आसन संभाळतां संभाळतां नाकीं नव यावे, ही त्याची इच्छा. आपल्याच घरांत युद्ध सारखें चालू असतां दुसऱ्याच्या घराकडे वांकडी नजर करून बघण्याची फुरसत तरी शत्रूंना कशी व्हावी? त्यामुळें इच्छा नसतांही त्याला चिमाजीस मोठी फौज बरोबर देऊन पुन्हां एकदां गुजराथेंत रवाना करावें लागलें. चिमाजीनें ही १७२९ ची मोहीम मोठ्या जोरानें चालविली. पेटलाद तालुक्यांतून खंडणी वसूल करून त्यानें धोलका शहर लुटलें, आणि सरबुलंदखानाजवळ चौथाई सरदेशमुखीचे हक्क मागितले. परंतु इकडे दाभाड्याला एकट्याला सरबुलंदखान आटपेना व चिमाजी गुजराथेंत आलेला खपेना. मग बाजीरावानें काय करावें? मराठ्यांचे हितसंबंध धोक्यांत पडत असतां, त्यानें काय तें उघड्या डोळ्यानें पहावें? सरबुलंदखानानें पेशव्याच्या सर्व मागण्या कबूल केल्या. सुरत शहर सोडून तमाम गुजराथ प्रांताच्या चौथाई सरदेशमुखीचे हक्क त्यानें शाहूच्या नांवें करून दिले. अहमदाबादच्या उत्पन्नावर मात्र मराठ्यांनीं फक्त शेकडा पांच टक्केच घ्यावे, असा विशेष उल्लेख या तहांत केला होता. भिल्ल व कोळी लोकांस हाताशीं धरून पिलाजी

गायकवाड राज्यांत उपद्रव करील, तर बाजीरावनें २५०० फौज कायमची गुजराथेंत ठेवून त्याचा बंदोबस्त करावा. शाहूचे हे नवीन हक्क, सालिना दोन लाख रुपये नक्त देण्याच्या बोलीनें बाजीरावानें आपल्याकडे वळवून घेतले. त्याचा उल्लेख १७ आक्टोबर १७२९ च्या पत्रांत आहे—

'श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति स्वामीचे सेवेशीं विनंति, सेवक बाजीराव बल्लाळ प्रधान, सेवेशीं विज्ञापना. प्रांत गुजराथ व प्रांत माळवा वगैरे येथील जिल्हा बाबती व सरदेशमुखीचा अंमल आमचे स्वाधीन केला, त्याचा मक्ता साल दरसाल हुजूर पाववायाची मोईन मुक्रर केली, रुपये दोन लक्ष एक. त्यांपैकीं महाराज कृपाळु होऊन आम्ही कर्जदार मसलतीमुळें जाहलों, याजकरितां महाराजांनीं सालदरसाल सदरहू ऐवजापैकीं रुपये पन्नास हजार दिले. बाकी रुपये दीड लक्ष एक राहिले ते पावते करूं.'

या झालेल्या तहामुळें सेनापती संतप्त झाला. त्याला राग आला म्हणून कोणी त्यास दोष देत नाहीं. पण बाजीरावाचा व बाजीरावाचा पक्ष घेतल्याबद्दल शाहूचा सूड उगविण्याकरितां त्यानें निजामाशीं कारस्थान केलें, याबद्दल त्याच्याकडे कमीपणा येतो. स्वार्थ कोणालाच सुटला नाहीं. त्यामुळें दाभाडे दोषी ठरत नाहीं. परंतु केवळ स्वार्थ साधण्यासाठीं माणूस जेव्हां राजद्रोही व देशद्रोही बनतो, तेव्हां त्याचा निषेध करणें भाग पडतें. आपल्या कल्याणाकरितां देशाला आग लावणारा सेनापति काय कामाचा? दाभाडे स्वतः फुटला तेव्हां पिलाजी त्याच्याबरोबर फुटलाच, कारण तो त्याचा हस्तकच! परंतु कंठाजी कदम बांडे व पवाराला देखील त्यांनीं फोडून बाजीरावाविरुद्ध उठविलें, व सवानीं निजामाशीं संगनमत केलें. मराठ्यांचा माळवा व गुजराथ प्रांतांतील वाढता जोर पाहून त्यांच्या पारिपत्यासाठीं माळव्यांत बंगषाला व गुजराथेवर अभयसिंगास बादशहानें पाठविलें. ही संधी साधून दक्षिणेंतून निजामानें उठावणी केली. मराठी राज्यावर हें मोठेंच संकट कोसळू पहात होतें व बादशहाचा डाव त्या वेळीं मोगलांना अनुकुल पडला असता, तर त्या दानानें शाहू व पेशव्यांनीं वीस वर्षांत जी कमाई केली ती एका क्षणांत पार उधळली असती. या गंभीर प्रसंगाला तोंड देण्याचा बाजीराव मनसुबा करीत असतां कंठाजी कदम, पिलाजी गायकवाड व त्रिंबकराव दाभाडे हे पेशव्याच्या खानदेशमधील मुलुखांत उपद्रव करूं लागले. शाहूनें त्यांचा निषेध करून पाहिला, परंतु त्या निषेधाची ते पर्वा थोडीच करणार होते? निजामानें बंगषास असें कळविलें कीं, 'पिलाजी गायकवाड व उदाजी पवार यांचें बाजीरावाशीं वांकडें आलें असून ते मुसलमानांशीं

संगनमत करण्यास तयार आहेत. आपण सर्व एक झालों म्हणजे यश येण्यास विलंब नाहीं. लवकरच आम्ही नर्मदेवर आपणांस येऊन भेटतों.' २० मार्च रोजीं नर्मदेच्या कांठीं निजाम व बंगषाची भेट झाली. इकडे सेनापतीनें असें वर्तमान जाहीर केलें कीं, आमच्या राजाचें राज्य बाजीराव या ब्राह्मणानें घेतलें असल्यामुळें सर्व मराठे सरदारांनीं आमच्या निशाणाखालीं जमावें. याप्रमाणें प्रसंग मोठा आणीबाणीचा उद्भवला. छत्रपति शाहू त्रिंबकराव व बाजीराव या दोघांची तुलनात्मक योग्यता व स्वामिभक्ति पूर्णपणें ओळखून होता. सर्व गोष्टींचा विचार करून त्यानें दाभाड्यावर स्वारी करण्यास बाजीरावास अनुमति दिली. शत्रूंचें कारस्थान रंगण्यापूर्वींच बाजीरावास तें मोडून काढावयाचें होतें. १० आक्टोबर १७३० रोजीं तो चिमाजीसह पुण्याहून या स्वारीवर निघाला. कोल्हापूरचा प्रधान चिमणाजी दामोदर, कदम, पवार, दाभाडे, गायकवाड वगैरे मातबर सरदारांचा हा कट झाला होता व निजाम-बंगषांचें सहाय्य त्यांना होतें. आवजी कवडे, अंबाजी पुरंदरे, रघुनाथजी प्रभु असा सरंजाम बरोबर घेऊन बाजीराव डिसेंबरच्या सुमारास सुरतेजवळ आला. दाभाड्याशीं लढाईचा प्रसंग बनेल तोंपर्यंत न आणतां, त्याच्या फितुरीचें माप त्याच्या पदरांत घालून व त्या द्रोहापासून युक्तीनें त्याचें मन वळवून, त्याला परावृत्त करण्याचा बाजीरावाचा प्रथमपासून विचार ठरला होता. कारण या आपसांतील भांडणामुळें स्वराज्याची हानी होऊन मोंगलांचें मात्र साधणार होतें. अभयसिंगाची व बाजीरावाची अहमदाबादच्या शाहीबागेंत भेट झाली. पिलाजीचें बंड मोडून त्याचा कांटा बडोद्याहून उपटून काढल्यास मराठ्यांची चौथाईची अट पुरी करतों, असें अभयसिंगानें बोलणें लावलें. त्यानंतर बाजीराव बडोद्यास वेढा घालण्याच्या उपरी निमित्तानें, परंतु खरोखर पिलाजीचें मन वळवितां आल्यास पहावें या उद्देशानें सावळीपावेतों आला. परंतु मार्च २५ चे सुमारास त्यास अशी खबर कळली कीं सर्व बंडखोर मराठे सरदारांचें सैन्य एकत्र झालें असून, निजामाचें सैन्यही त्यांना लवकर जाऊन मिळणार आहे. तेव्हां त्या दोघांचा मिलाफ होण्यापूर्वीं प्रत्येकास एकेकटे गांठणें लष्करी दृष्टीनें इष्टच होतें. तेव्हां भिलापुर डुभईचे मैदानावर १ एप्रिल रोजीं दाभाड्यास गांठून बाजीरावानें त्याशीं सामना दिला. पहिली आगळिक दाभाड्यानेंच केली. बाजीरावाच्या फौजेची आघाडीची पहिली तुकडी, आवजी कवडे याच्या हुकमतीखालीं नर्मदा उतरते न उतरते तोंच दाभाड्यानें तिच्यावर हल्ला करून तिची विल्हेवाट लावली.

बाजीरावापाशीं त्या वेळीं सारी पंचवीस हजार फौज होती. त्याची आघाडी कापली गेली व तो अपरिचित अशा दूर देशांत आलेला. सेनापतीजवळ चाळीस हजार फौज व मातबर सरदारांचें साहाय्य. प्रांत त्याच्या रोजच्या पायाखालचा. परंतु बाजीरावानें केलेल्या जोराच्या चढाईमुळें सेनापतीच्या फौजेची पांगापांग झाली, व सेनापती बंदुकीची गोळी कानशीलास लागून मारले गेले. बाजीरावचें युद्धचातुर्य या लढाईंत चांगलेंच निदर्शनास आलें. या लढाईबद्दल प्रभू जातीचे चिटणीस लिहितात, "महाराजांचे पायांशीं सेनापतीनें बदनेद धरली तेव्हां त्यास यश कदापि यावयाचें नाहीं म्हणोन तसेच पुढें चालून आले. आम्हांस सरकारी प्रांतांत उपद्रव करावयाचा नाहीं; नवाब फौजसुद्धां पिछावरी आहेत, याजकरितां या मार्गानें जाणार असें लिहिले असतां, त्रिंबकराव सेनापती लढाईचा इरादा करून चालून आले. आपण जातीनें हत्तीवर बसून युद्धास प्रवर्तले. तीन प्रहरपर्यंत लढाई झाली. दोहोंकडील नामी माणसें रणांत बहुत पडलीं. सेनापति हत्तीवरून तिरंदाजी करतां बोटांची सालें गेलीं. बाजीराव यांनीं धारकरी यांजबरोबर जातीनें घोडा घालून तरवार केली. नामी लोक निवड करून हत्तीपर्यंत जातीनें चालून घेतलें. त्रिंबकराव जातीनें अडून उभे राहिले. बाजीराव यांनीं सांडणीस्वार पाठविला, जे 'अशी लढाई शत्रूशीं करून महाराजांस संतुष्ट करावे, आम्ही लढाई तहकूब करतों व भेटीस येतों.' परंतु वीरश्रीस पडून तसाच हत्ती पुढें चालविला. बाजीराव यांनीं आपले लोकांस ताकीद केली कीं सेनापतीस कोणी जाया करूं नये. परंतु इतक्यांत सेनापतीच्या कपाळास गोळी लागून ठार झाले, हें पाहून बाजीराव मागें सरले. 'लूट पाठलाग करूं नये, हत्ती घोडे पाडाव झाला असेल ते सोडून द्यावे, मातबर मजला करून निघून जावे.' महाराजांस येऊन भेटले. महाराजांनीं चित्तांत आणिलें जें, 'अविवेकें करून नवाबाशीं राजकारण केलें, दुर्बुद्धि धरून आगळिक करून आपणांतच लढाई केली त्याचें फळ झालें.' बाजीरावचें हें युद्धाच्या धुमश्चक्रींत स्वतां शिरण्याचें व जातीनें तरवार चालविण्याचें धाडस फारच मोठें होतें. सेनापतीचा एखादा बाण वर्मी लागून तो घायाळ होता किंवा पुण्यापासून इतक्या दूर देशांत त्याचा पराभव होता, तर पेशवाईचा शेवट तेथेंच झाला असता व हिंदुपदपादशाही गर्भांतच जिरली असती. परंतु खरा वीर असा हिशोबी वृत्तीचा नसतो. युद्धांत तो देहभान विसरूनच पडतो व म्हणूनच त्याच्या हातून अचाट पराक्रम होतात.

मल्लारदास शाहीराचा दाभाड्यावरील स्तुतिपर पोवाडा खालीं दिला आहे. त्यांतील ऐतिहासिक माहिती बिनचूक आहे. परंतु तो वाचूनदेखील बाजीरावानें चूक केली असें म्हणवत नाहीं.

**केलें नमन गणेशाला। दुसरें नमन भोवानीला॥ श्रोत्यांनीं सावधान। कडाखा सेनापतीनें केला॥ ध्रु०॥**

**खंडेराव सांगेन, धुरु। ज्याचा राज्यामधि बोलू॥ गाजीवली तरवार। शरला जाणे दाणेदारू॥ १॥**

**खंडेराव दाभाड्याचे वंशीं। एक सेनापती जन्मला॥ खासखेल सयन। यशवंतराव बाजू सांग ज्या मर्दाला॥ सवाई बाबूराव नामोस राज्यामधिं केला। प्रधान पंत बाजीराव ठाण घातलें पायाला॥ २॥**

**रचला कळीचा। आरब जमाव तळेगांवीं झाला॥ विचार ज्यात्ये स्वारीनें केला। सैनापति बोलाविला॥ ३॥**

**त्रिंबकराव दाभाडे तुम्ही बाजीरायावर चला। दीन दीन भेस्तरवार पहिला॥ नगारा सैनापतीनें केला। सरदाराच्या फौजा। डेरे इंदुलीवर दिला॥ ४॥**

**तीं दिसाचे मोकाम। हात्या घडली त्या रायाला॥ हात्या घडली त्या रायाला। घातलें वडलाचें सराद॥ सरदाराच्या फौजा डेरा कौंदुसावर दिला। शाहूराजा सदरे बैसला॥ बसवंतराव बोलाविला। जाती उमाबाई तेथ संग्राम होईल भला॥ ५॥**

**पधरा हजार घोडा पेशवा नये सातान्याला। जोडा तळेगांव आला॥ विनंती सांग उमावाला। "नको जाऊं तुम्ही हुकूम म्हाराजाचा झाला"॥ ६॥**

**दान दीन भेस्तरवार पाहिला। नगारा सैनापतीनें केला॥ सरदाराच्या फौजा डेरा नारदगांवीं दिला। मोकाम धराबीचा झाला॥ छत्रपतीच्या फौजा हणमंतपारी उतरल्या। सरदाराच्या फौजा डेरा संगमनेरीं दिला॥ ७॥**

**संगमनेरावरी तुरुज ताजखान भेटला॥ विचार सैनापतीनें केला। सुशग भोंसला पाठविला॥ कोंकण खेड्याचे बारीनें घोडा हाड त उतरला। गईबखान पठाण आडवा दाभाड्याच्या आला॥ ८॥**

मावळला दिनमान मोकाम गीर नदीवर झाला । जोडा नबाबाचा आला ॥ सैनापतीनें वाचूनी पाहिला । "घोड्यावर बैसुनी त्रिंबक-राव भेटायाला चला" ॥ ९ ॥

"कसा करावा विचार" राव पुसे जाउबाला । खासखेल सैन यश्वंत बाबुराव घेतला ॥ जावजी दाभाडे, निंबाळकर अमृतराव चालला ॥ १० ॥

नबाब किलीजखान सैनापतीला भेटला । मान त्या सैनापतीचा केला ॥ वस्त्रें चढविलीं रायाला । दिले चार घोडे मोंगल हत्ती नजर केला ॥ "झुंज पडेल बाजीरायाचे कांहीं ऐक कुमक द्यावी मला" । पठाणाची फौज कुमर मादूर जोर आला ॥ ११ ॥

हा क्या मानसिंग चिमाजी दामोदर चालिला । मावळला दिन मान मोकाम तारबाजवर झाला ॥ लष्कर चाल पेणोपेणीं घाटा हाडत उतरले ॥ १२ ॥

खबर कळली पोवाराला । राव उदाजी आनंदला ॥ पोवारमल्ल पाटील भेटला । पिलाजी गायकवाड भेटी झाल्या सरदाराला ॥१३॥

हें येवढें ऐकुनी वेढा मांडवीस घातला । कोट दुमदुम भेरी वाजती ॥ नाला तुटु बाका सोडुनी देती । कितीक होती घायाळ मुर्दे दलामध्यें येती ॥ १४ ॥

विचार सैनापतीनें केला । जोडा मल्लोजी धाडिला । मल्ल पाटील पोवार । तुम्ही चवकीवरी चला । सेनापतीची फौज बलोजी हर-पाळ चालिला ॥ १५ ॥

तडाड मल्ल पाटलानें केला । मारीत चौकीवरी गेला । तुडविती चौकी संग्राम रजपुताचा झाला । कितीक तोडील घाईघाई । कितीक पाडील धरणीठाईं ॥ १६ ॥

घोड्या राउता दाटण पाहीं पाहीं त्या मुर्कुंड्या झाल्या ॥ तीरा गोळ्यांचे ठणक होती । रजपूत निशाणसी भांडती ॥ उड्या पाण्यांत घालती । घालती मरणाभ्यानं ॥ १७ ॥

मल्लोजीनें झगडा दिला । संग्राम रजपुताचा झाला । दुर्जेशिंग वचकला । वचकला मांडवीमध्यें ॥ मोर्चा लाविला कोटाला । कोट बहुत जेर झाला । सेनापतीचा मोरचा आल्ली बुर्जाखालीं गेला ॥१८॥

कसा करावा विचार । दुर्जनसिंग वचकला । मंगळवारे दिनीं ज्यांनीं किल्ला खालीं केला ॥ क्षीणमधें नवला वर्तला । रानोमाळ संहार रजपुतांचा झाला ॥ सैनापतीचें निशाण आधीं चढविलें कोटाला । देवजी ताजपीरराव ठाण्यावर ठेविला ॥ किल्ला मांडवीचा घेतला । ठाणें दिलें पिलाजीला ॥ १९ ॥

सरदाराच्या फौजा डेरा फुलवाडीवरी दिला । सरदाराच्या फौजा डेरा खाडीवरी दिला ॥ शिमगा सैनापतीनें केला । कणौळ मांडवीचे घांटी । राव नर्मदा उतरला ॥ सरदाराच्या फौजा डेरा त्येच्या तळयावरी दिला । अवसेचे दिवशीं तारा डेऱ्यावरी पडला । पाडव्याचे दिवशीं राव आले डबईला । जोडा बाजीरायाचा आला ॥ २० ॥

सैनापतीनें वाचुनी पाहिला । घोडयावर बैसुनी सैनापती झुंजाथाला ॥ दोन दिवस भार केला । राव परतुन डेऱ्या आला । खुंटलें होतें निमित्त पुढें । कर्ण भगवानाला ॥ २१ ॥

भेस्ववारें दिनीं झगडा ज्या मर्दांनीं दिला ॥ बाजीराव कचेरीला बैसला । चिमाजी आपा बोलाविला । जाधवराव पिलाजी खबर सांगे पेशव्याला ॥ २२ ॥

भिकाजीराव चालून आला । राणोजी शिंदा पाया हाडता उतरला । ठोक या भावे शिंग बोलला । प्रधानपंत बिन्नी द्यावी मला ॥ हें एवढें ऐकुनी कोप नारायजीला आला ॥ २३ ॥

ढमढेऱ्याच बेंठ नांवें माझीया वडलाला । नामोस दिलीमध्यें केला दिलें सोन्याचें कडें ॥ आनंत नारायजी नावाजीला । मावळला दिनमान मोकाम खाडीवरी झाला. ॥ २४ ॥

सुदीन भेस्तरवार पाहिला । नगारा सैनापतीनें केला ॥ सिनगारिला हत्ती । हत्तीवर हौदा ठेविला । आंगीं घातलें डगलें, बक्तार चढविलें आंगाला ॥ २५ ॥

राव हौद्यांत बैसला । शिरीं जिरटोप घातला ॥ शिरीं बांधिलें मंदील तुरा मोत्याचा लाविला । खासकेल सैन यशवंतराव बाबुराव घेतला ॥ २६ ॥

पिलाजी गायकवाड हातीं तोंडावर दिधला ॥ कडीकोट फौजेचा मिळाला। गगनीं धुरळा लागला। दणाणली मेदिनी चंद्रसूर्य झांकोळला। आले रणभूमीला ॥ विचार सरदारांनीं केला ॥ २७ ॥

त्रिकाळ दोपारणी दोघी मिळाल्या वैरिणी। चाळीस हजार घोडा मर्द दिली उठाळणी ॥ लष्करानीं मलपानी वजीर। वजीर करत्यात धांवणी। जर फौजेला मिळते पाणी ॥ मोठी होती खगाखणी ॥ २८॥

दाभाडा सैनापति तरवार थोर करी निर्वाणी ॥ आंगिकार जाधवरायांनीं केला। जाब बाजीरायाला दिला। उजवी बाजू चिमाजीला ॥ २९ ॥

भार बाजीरायाला आला। मार करोलांनीं दिला। उदाजी आनंदराव पाडिला ॥ साठ्या होनाजी आपुण भला ॥ मर्द घोडा उचालिला ॥ भार बाजीरायाचा आला ॥ ३० ॥

मार करोलांनीं दिला उरीं बैसली गोळी साठ्या होनाजी पडला ॥ पोवार मल्ल पाटील भला। मर्द हत्ती चालविला। करी तिरंदाजी, वागूं नेदी राउताला ॥ ३१ ॥

जगताप त्रिंबकराव भला। तया मर्दानें झगडा दिला ॥ टाकली वारू हाडती उडी ॥ जगताप पाय उतारा आला। भार बाजीरायाचा आला। मार करोलांनीं दिला। ब्रह्मांडीं बैसली गोळी। पोवार मल्ल पाटील पडिला ॥ ३२ ॥

आव शिपायांनीं केला। हत्ती माघारा मुर्डीला। नास्का सीपायाचा झाला। इतक्या उपरी झगडा जाउबांनीं दिला ॥ अमृतरायाच्या लोकांनीं ॥ बिकट केली खणाखणी ॥ ३३ ॥

झगडा झाला थोर संताजी म्होयता पडला रणीं ॥ रणीरण खुर्दळ मांडला। उदाजी बेलदार पडला। म्हाडीक लुमाजीराया फुढें पुरा झाला। आंका बैसला भाला सयाजी गायकवाड पडला ॥ ३४ ॥

जाउबा लष्करी चांगला। हात फिरंग घातला ॥ तिरा गोळयाचा ठणक, गोळी ॥ लागली फिरंगला। गोरेखान पठाण भला। मारीत

ढिगांत लोटला ॥ जेणें केल्या घोड्याच्या पंथा । गोरेखान पठाण पडला ॥ ३५ ॥

बडेखान पठाण भला मर्द सर्तीनसी भांडला ॥ जखमी झाला चूर क्षेत्रीं म्हणावें तयाला ॥ रणीं निवडले रणशूर । भांडतो सैनापतीचा भार ॥ धड पाडिली दुधड, शिपाई घायाळ झाला फार । गाड वासुल्या नजरि गोजी मारमारी सिपायाला ॥ ३६ ॥

खंडेराव मल्हारराव तया मर्दानीं झगडा दिला ॥ ब्राह्मण बापू पंडित भला ॥ भाला लागला मर्दाला ॥ सैनापतीचे दिवाण, जखम झाली तयाला ॥ भार बाजीरायाचा आला । त्रिंबकराव कुर्द सैन झाला ॥ ३७ ॥

आली वीरश्री हात कमान घातला सर्जा त्रिंबकराव भला । विदीत फौजेंत चालिला ॥ किती पाडील घायाळ गणती नाहीं सांगायाला ॥ त्रिंबकराव नानाचा लष्करी । पंचमुख व्याघ्र जैसा पिंजारी। हारोळी देऊनी खासा तीर जोडी उरी ॥ द्वापार युगामध्यें एक अर्जुन होऊन गेला ॥ ३८ ॥

कलयुगामध्यें एक अर्जुन म्हणावा रायाला । दाऊद्खान पठाण होऊन गेला ॥ हत्तीच्या हौदांत भांडला । सांगाया झाली सीपत झगडा दाभाड्यानें दिला ॥ चिमठ्या रायाचा सोलला । सांवा बोटांच्या राहिल्या ॥ ३९ ॥

भार बाजीरायाचा आला । मारठोक यांनीं दिला । ब्रह्मांडीं बैसली गोळी सैनापती पुरा जाहला । इतुक्या उपरी भणाण फौजेचा झाला। त्रिंबकराव संग्रामीं पडला । बाजीराव दिलगीर झाला ॥ ४० ॥

उचलुनी मुर्दा रायें पालखींत घातला । हत्ती दाभाड्याचा फौजे म्होर चालविला ॥ थोर थोर सरदार मिळाले पाह्याला । लहान पराई होउनी शूरानें करडा हात केला । बावन उमराव मिळाले ॥ ऐसा कवण नाहीं भांडला ॥ ४१ ॥

मुर्दा डेऱ्यास आणला । येसू पाटील गहिंवरला । सैनापती गेला आतां दादा म्हणावें कोणाला । आनंदी करीतसे आत्येसा । माझ्या भणीच्या को वंशा ॥ ४२ ॥

कसें केलें जगदेशा जगदेशा नारायणा ॥ असे तिघे बंधू करिती रोदना ॥ होतें सैनापतीचें मंडण । बोल मलारदास गाईन शूरांचे प्रेमानें ॥ ४३ ॥

करी जुगदान जुगीं उद्धरण ॥ मी व्हाल सरदार पाहाला ॥ आग्न दिधली रायाला । केलें दानपून पालखी दिली ब्राह्मणाला । आखी गिरजाबाई बोलली । "आज हरपला माझा चुडा । नाहीं फिटली आसोसी देव आउक दिला थोडा" ॥ ४४ ॥

जोडा सातान्याला आला ॥ राव कृष्णाजी दाभाड्याला । बहुतां प्रकारीं संबोखिला ॥ जोडा तळेगांवीं आला । विनंति सांग उमवाला ॥ ४५ ॥

'तुमची गुजराथ तुम्हांला । पायागड तुमच्या हवाला । येसू पाटील बाबूराव हायेत तुमचे सैनेला ॥' जाब कानीं ऐकिला । उमावा बैसली सदरेला । मलारदास बोलाविला ॥ ४६ ॥

मलारदास कवीश्वर भला । ज्यानें बिरमाल गाईला ॥ सवाई बाबुराय ज्यानें घोडा बक्षिसी केला ॥ येसू पाटलानें ज्यानें हत्ती नजर केला । माता उमावान लेकाचा शिर्ताज दीधला । शूरा संग्रामाचा ज्यानें बिरमाल गाईला । हेतूनशाई दाभाड्याची र ॥ शाई दाभाड्याची र । थोर मर्द ख्याती ज्याची र । मर्द ख्याती ज्याची र ॥४७॥

या लढाईचें वर्णन खुद्द बाजीरावानें ब्रह्मेंद्रस्वामीस पाठविलेल्या पत्रांत दिलें आहे. तें पोवाड्याशीं पुष्कळ जुळतें आहे. "त्रिंबकराव दाभाडे, उदाजी व आनंदराव पवार, कंठाजी व रघूजी कदम, पिलाजी गायकवाड व चिमणाजीपंत दादा ऐसे तीस हजार फौजेनिशीं आम्हांशीं युद्धास आले. त्रिंबकराव दाभाडे, जावजी दाभाडे, मालोजी पवार व पिलाजीचा पुत्र असे चौघे ठार झाले. उदाजी पवार व चिमणाजीपंत पाडाव झाले. आनंदराव पवार, पिलाजी व कुंवरबहाद्दूर जखमी होऊन पळून गेले व बांडे पळाले. फौज लुटली. हत्ती पाडाव केले. सारांश स्वामीचे आशीर्वादें फत्ते जाहली." या लढाईसंबंधीं बाजीरावचें दुसरें एक पत्र खालीं दिलें आहे.

श्री

" राजश्री कृष्णाजी कदम गोसावी यांसः—

अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित बाजीराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद सुरसन इहिदे सल्लासीन मया व अलफ. राजश्री त्रिंबकराव दाभाडे सेनापति व बांडे गायकवाड, उदाजी पवार व निजामुलमुलकाची फौज एसी डबईस आली. आम्हीही आपले फौजेनसीं डबईनजीक दों कोसांवरी दोन रोज मुक्काम केला. नित्य सेनापति कोसावरी येऊन युद्धास उभे राहात. तेथें युद्धास न बने, यास्तव छ. ४ सवालीं कूच करून थवाई प्रांत डबई येथें आलों. सेनापति कुल फौजा जमा करून युद्धास आले. युद्ध जाले. सेनापति ठार पडले. मालोजी पवार पडले. जावजी दाभाडे पडले. पिलाजी गाईकवाडाचा लेक पडला. उदाजी पवार पाडाव आले. चिमाजीपंत धरून आणिले. पंधरा सतरा हत्ती व नगारे निशाणें पाडाव आलीं. बांडे, गाईकवाड, आनंदराव पळोन गेले. कुंवरबहाद्दर जखमी आहेत, पळाले, तुम्हांस कळावें लिहिलें असे. तेथें मुस्तफाखान आहेत त्यास व पिलाजीचे फौजेस नाराज करणें आपले अंमल मुस्त करणें, पैका मेळवणें जाणीजे. छ. ५ सवाल ता. ११ सवाल."

या लढाईंत दाभाडे पडले हें फार वाईट झालें खरें. परंतु याचा नैतिक परिणाम फार मोठा झाला. चंद्रसेन जाधव शाहूचा पक्ष सोडून निजामास मिळाला, तेव्हांपासून जरासें मनाविरुद्ध कांहीं घडलें कीं शाहूचे सरदार मोंगलास मिळण्याचा धाक घालीत. त्यांना या उदाहरणानें चांगलीच जरब घडली. राजद्रोह व देशद्रोह केल्यास त्या पापाबद्दल देहांत पायश्चित्त देण्याइतके शाहू व त्यांचे पेशवे प्रधान खंबीर आहेत हें सर्वांस कळून चुकलें. झाला प्रकार अनुचित झाला असें सर्वांसच वाटलें, परंतु बाजीरावास याबद्दल कोणीही दोष दिलेला दिसत नाहीं. फितुरीला जर कडक शिक्षा लावली नाहीं व उलट शत्रूकडून जहागिरी मिळविण्याची तिला मोकळीक दिली, तर राजनिष्ठ राहणें मूर्खपणाचें ठरेल. कदमास लिहिलेल्या दुसऱ्या एका पत्रांत " दोनही फौजांचें युद्ध बहुत इरेचें झालें. त्याची फाज व सामान बहुत होतें तें तुम्हांस ठावकेंच आहे. सारांश 'धन्याचें पुण्यें यश आलें' लोकीं मेहनत बहुत केली," असें बाजीरावनें लिहिलें होतें. तेव्हां दाभाड्यास शिक्षा लावण्याची अनुमति शाहूनें दिली होती यांत शंका नाहीं.

ही लढाई जिंकल्यानंतरही बाजीरावची परिस्थिति बिकट होती. पिछाडीस दाभाड्याची मोड झालेली फौज व आघाडीचा रस्ता निजाम व बंगषांनीं रोंखलेला.

त्यांना चुकविण्याकरितां बाजीरावनें हूल दाखवून नैर्ऋत्येस कूच केलें. बाबापिराचे उतारावर नर्मदा उतरून तो १० एप्रिलास अंकलेश्वर येथें पोहोंचला. तेथून लांब लांब मजला मारून तो मेच्या दुसऱ्या पंधरवड्यास पुण्यास येऊन पोहोंचला. वाटेंत निजामाच्या भुरट्या टोळ्यांशीं त्याची दमणजवळ चकमक झडलीच.

त्रिंबकरावाची आई उमाबाई दाभाडे हिचें शाहूनें अतिशय जिव्हाळ्यानें सांतवन केलें व पेशव्यांशीं तिचा सलोखा करून दिला. त्रिंबकरावाचा भाऊ यशवंतराव यास सेनापतीची व पिलाजी गायकवाड यास सेनाखासखेल पदाचीं शाहूनें वस्त्रें दिलीं व पिलाजीस दाभाड्यांचा कारभारी नेमलें. दोघांनीं उमाबाईच्या आज्ञेंत रहावें असें शाहूनें ठरवून टाकलें. परंतु यशवंतराव व्यसनी व अकर्ता पुरुष होता; त्यामुळें दाभाडे यापुढें नांवाचे सेनापति राहिले व गायकवाडांचें वर्चस्व गुजराथेंत स्थापन झालें. यशवंतरावास प्रोत्साहन देण्याची शाहूनें शिकस्त केली, परंतु पालथ्या घड्यावर पाणी ओतावें त्याप्रमाणें ती फुकट गेली.

इतर फितुरी मंडळीच्या पदरांत त्यांची चूक घातल्यावर बाजीरावानें त्यांच्याशीं पुढें कोणताच हेवादावा धरला नाहीं. ती सर्व मंडळी त्याच्या पुढील उद्यो-गांत उत्साहानें भाग घेऊं लागली. आपलें पाऊल सुधें पडलें तर पेशव्यांची कृपेची पांखर आपणांवर राहील, व आपलें चुकून वांकडें पाऊल पडलें तर स्वराज्याच्या कल्याणाकरितां पेशवे शाहूच्या अनुमतीनें तें छाटून टाकण्यास कमी करणार नाहीं, अशी सर्व सरदारांची खात्री पटली व पुढें ते पेशवाईचे आधार-स्तंभ झाले.

राजद्रोही माणसाचा आपणास नाइलाजानें लढाईंत आपल्या हस्तकाकरवीं वध करावा लागला, या गोष्टीची चुटपुट शाहूच्या मनाला लागली. शंभुमहादेव व जेजुरी येथील खंडोबाचें दर्शन घेऊन त्यानें हातून घडलेल्या अनैच्छिक पापाचें प्रायश्चित्त घेतलें. शाहूचा हळवा व पापभीरु स्वभाव यावरून उत्तम व्यक्त होतो. दाभाड्यांची फितुरी स्वराज्याला अत्यंक घातक असल्याशिवाय शाहूनें त्याचें पारिपत्य करण्याची आज्ञा बाजीरावास दिली नसती, असें शाहूच्या स्वभावावरून निश्चित विधान करतां येतें. शाहूनें केवळ राजकर्तव्यच केलें होतें. त्यांत पाप कशाचें होतें? परंतु त्याचा सात्विक स्वभाव राजकारणाला फारसा पोषक नव्हता. दाभाड्यांच्या मृत्यूमुळें लोकांना हळहळ वाटली असली, तरी तो आपल्या अव-गुणांनीं मेला असेंच तत्कालिन लोकमत बनलें होतें. परंतु राजद्रोही माणसाला

शिक्षा केली तरी त्याच्या संसाराचा बोजा वाहणें, त्याच्या घरच्या मंडळींची मानानें वास्तपुस्त करून त्यांचा योगक्षेम चालविणें, त्याच्या घरच्या बायकामंडळीच्या भेटीस जाऊन त्यांचें शांतवन करणें, ही त्या काळची राजनीति पाहिली म्हणजे मन आश्चर्यानें व आदरानें भरून जातें. उमाबाई दाभाडे ही फार कर्तबगार व मानी बाई होती. पुत्राच्या मरणानें तिला अतोनात दुःख होणें व पशव्याविषयीं तिचें मन घडलेल्या प्रकारानें विटणें, स्वाभाविक होतें. परंतु शाहूनें स्वतः तळेगांवास जाऊन पेशव्यांचा व बाईचा समेट केला. बाजीराव व चिमाजी यांस आपल्या पुत्राप्रमाणें लेखण्याची शाहूची विनंती बाईस अमान्य करवेना. पेशव्यांचा व बाईचा पुढें पत्रव्यवहार होऊं लागला, आणि जानेवारी १७३५ त तर बाजीराव जातीनें तळेगांवास बाईच्या भटीस जाऊन तेथें कांहीं दिवस मुक्काम करून राहिला. न्यायांतील त्या वेळची ही दयार्द्रता व कांटेखोर आणि अप्रिय व्यवहारांतील माणुसकी पाहून माणसाचें मन त्या व्यक्तींच्या नांवासमोर नमतें, आणि त्यांना सप्रेम वंदन केल्याशिवाय पुढें जाववत नाहीं. कारण आजची राजनीति अपराध्याला तर कठोर शासन करतेच, परंतु त्याच्या कुटुंबाची वाताहत झाली किंबहुना त्या घराण्याचा समूळ नाश झाला, तरी तिला त्या गोष्टीची पर्वा वाटत नाहीं.

---

## प्रकरण ९ वें

# बाजीरावचे हात.



बाजीरावच्या हातून इतक्या थोड्या अवधींत जी अचाट कामगिरी झाली, तिचें मुख्य कारण हें कीं, त्याला पुराणांतरींच्या सहस्रार्जुनाप्रमाणें हजार हात होते. भट घराण्याची प्रथमपासूनची वृत्ती अत्यंत उदार व संग्राहक स्वरूपाची होती. संकुचित जात्याभिमान त्यांना शिवला नाहीं. ब्राम्हण व ब्राम्हणेतर हा ठोकळ भेद त्यांनीं राष्ट्रसेवेच्या कार्यांत मानला नाहीं; मग ब्राह्मणांतील उपजातींकडे त्यांचें लक्ष कसें वेधणार ? त्यांच्या या उदार वृत्तीमुळें त्यांना सर्व हिंदु जातीयांचें साहाय्य लाधून त्यांची कामगिरी यशस्वी झाली. निदान पहिल्या दोन पेशव्यांच्या बाबतींत तर हें विधान खास धडकून करतां येतें. या औदार्याला

नानासाहेबांच्या कारकीर्दीत चुकून माकून गालबोट लागूं लागलें, व त्यानंतरचे पेशवे व त्यांचे कारभारी आकुंचित दृष्टीनें वागूं लागल्यामुळें बाजीरावनें स्थापन केलेल्या हिंदुपदपादशाहीचें ब्राह्मणी राज्यांत रूपांतर झालें. प्रकाशांतून छायेंत जातांना नक्की प्रकाश कोठें संपला व छायेला कोठें सुरवात झाली हें जसें सांगतां येत नाहीं, त्याचप्रमाणें या रूपांतराची गोष्ट आहे. परंतु नारायणराव, सवाई माधवराव व दुसरा बाजीराव यांच्या कारकीर्दी निव्वळ ब्राह्मणी वळणाच्या झाल्या एवढें मात्र निश्चित सांगतां येतें. त्यामुळें ज्या मुत्सद्यांनीं व वीरांनीं प्रारंभीं पेशवाईला पाठिंबा दिला तेच पुढें पेशवाईला पाठमोरे झाले.

बाजीरावाच्या उदार धोरणामुळें त्याच्याभोंवतीं कर्तबगार पुरुषांचा गराडा पडला. भानू, पुरंदरे व चिटणीस हीं तीन मुत्सद्दी घराणीं पेशव्यांना प्रथमपासून अनुकूल होतीं. त्यांपैकीं एक कोंकणस्थ ब्राह्मण, एक देशस्थ ब्राह्मण व एक प्रभू होते, आणि पहिल्या दोन पेशव्यांच्या राजवटींत भानूपेक्षां पुरंदरे व चिटणीस यांनाच अधिक मान होता. कारण दोघेही राजकारणांत मुरलेले, धोरणी, सत्यमार्गी व कमालीचे राजनिष्ठ होते. बाजीराव गुणांची किंमत करी. जातीचें महत्व त्याला वाटत नव्हतें. त्याचे श्वशुर तर बोलून चालून सावकार होते. परंतु त्यानें प्रत्यक्ष आपला मेहुणा व्यंकटराव घोरपडे याचाही बडेजाव कधीं वाढविला नाहीं. कारण तो सरदार असला तरी त्याचें कर्तृत्व सामान्य प्रतीचें होतें. बाजीरावाच्या कृपाकटाक्षानें अनेक भिन्नजातीय सामान्यांच्या द्वारीं गजांतलक्ष्मी नांदू लागली, तरी त्याचा प्रत्यक्ष मेहुणा अखेरपर्यंत सामान्य सरदारच राहिला. बाजीराव पराक्रमाचा चाहता होता आणि तो शेवटपर्यंत तसाच राहिला. ज्या धन्यापाशीं फक्त गुणांची पारख होऊन त्या परीक्षेंत उतरल्यास पारितोषिक मिळतें, त्याच्यावर त्याचे अनुयायी अत्यंत लुब्ध झाले असले तर त्यांत नवल नाहीं.

बाजीराव मुत्सद्दी नसून वीर शिपाई होता. तेव्हां त्याच्या विशेष प्रीतींतील सरदार त्याच्या सारखेच शिपाई गडी असतील, हें न सांगतांहि समजण्यासारखें आहे. उत्तर हिंदुस्थानांतील कारस्थानें ज्यांच्या साहाय्यानें त्यानें पार पाडलीं असे त्याचे प्रमुख सरदार म्हटले म्हणजे, राणोजी शिंदे, मल्हारराव होळकर व उदाजी पवार हे होत. या सर्वांच्या उदयास बाजीराव कारणीभूत झाला, व त्याच्या हाताखालीं मोहिमा मारूनच, त्यांना पुढें आपलीं स्वतंत्र पण मराठमंडळांत मोडणारीं संस्थानें स्थापन करतां आलीं. यांच्यापैकीं कोणीच ब्राह्मण नव्हते. हे सर्व जातीचे अस्सल मराठे—त्यांत थोडाबहुत डावा उजवा भेद एवढाच काय तो फरक.

सातारा जिल्ह्यांत कोरेगांव तालुक्यांत कण्हेरखेड म्हणून एक लहानसें गांव आहे. तेथें एक **शिंद्यांचें** घराणें पाटीलकी करून रहात होतें. शिंदे म्हणजे प्राचीन सेंद्रक होत. या क्षत्रिय घराण्यांतील मुलगी अंबिकाबाई शाहूस दिली होती. ती शाहू बादशाही कैदेंत असतांनाच वारली. याच घराण्यांत राणोजी जन्मास आला. घरची गरीबी असल्यामुळें त्यानें प्रथम बाळाजी विश्वनाथाच्या पागेंत बारगिराची नोकरी पत्करली. लवकरच त्याचा प्रामाणिकपणा, एकनिष्ठा व शौर्य हे गुण बाजीरावच्या नजरेस पडून त्यानें त्यास आपल्या खास दिमतींत घेतलें. राणोजी स्पष्टवक्ता व धन्याची खोटी भीडभाड न ठेवणारा पुरुष होता. पुण्याजवळच्या अनेक गांवकीच्या कारभारांत व भानगडीच्या मामल्यांत त्याच्या मतास बाजीरावाकडून फार मान दिला जाई. पेशव्यांचा हा खिजमतगार असून त्यांचे जोडे उचलून तो सांभाळून ठेवीत असे, या आख्यायिकेंत मुळींच तथ्य नाहीं. गवर्नराचा एडीक्यांप जसा नेहमीं गवर्नराच्या बरोबर राहून त्याची व त्याच्या पोषाखाची व इतर वस्तूंची काळजी घेतो, त्याचप्रमाणें राणोजी पेशव्यांच्या शरीरसंरक्षकाचें काम करीत असेल. तो पेशव्यांचा जणूं एडीक्यांपच होता. कारण तो शूर होता व त्याच्या विश्वासूपणामुळें तो शरीरसंरक्षकाच्या मानाच्या हुद्याला लायक होता, यांत शंका नाही. शिंद्यांच्या घराण्यांतील पुरुषसिंहांनीं पेशवाईप्रीत्यर्थ तलवार मारून अनेक वीरांचे बळी दिले, व मराठ्यांचा पराक्रम जगजाहीर केला. हिंदवी स्वराज्याचें स्वप्न मूळ शिवाजी महाराजांना पडलें, बाजीरावनें हिंदुपदपातशाहीचा पाया घातला, आणि महादजी शिंद्यांनीं ही आपल्या मालकाची महत्वाकांक्षा पूर्ण केली व स्वप्न सत्य सृष्टींत आणून पादशाही खरोखर भोगली.

## शिंद्यांचा वंशवृक्ष.




शिंद्यांचा शिक्का:—
**' श्री ज्योतिलिंग
चरणीं तत्पर ।
राणोजीसुत जयाजी
शिंदे निरंतर ॥**

काहीं शिक्यांत ज्योतिलिंग या ऐवजीं ज्योतिस्वरूप हा शब्द योजला आहे.

होळकरांचे पूर्वज प्रथम पुण्याजवळ वाफगांवीं राहत असून, पुढें ते पुण्यापासून ४० मैलांवर नीरा नदीच्या कांठीं होळ म्हणून खेडें आहे तेथें रहावयास गेले. त्या गांवावरूनच त्यांना होळकर हें नांव पडलें. त्यापूर्वी यांचें नांव वीरकर असें होतें. खंडूजीचा धंदा धनगराचा होता, परंतु तो त्या गांवाचा ग्रामाधिकारी 'चौगुला' होता. त्याच्या मुलाचें नांव मल्हारी. याचा जन्म १६ मार्च १६९३ रोजीं झाला. तो तीन वर्षांचा असतांच खंडोजी वारला. तेव्हां भाऊबंदांच्या त्रासामुळें त्याची आई जिवाई आपल्या छबकड्यास घेऊन खानदेशांत तळोदे गांवीं आपला भाऊ भोजराज बारगळ याच्याकडे रहावयास गेली. भोजराज हादेखील आपल्या गांवचा चौगुला असून, शिवाय कंठाजी कदम बांडे या सरदाराच्या पागेंत पंचवीस स्वारांचा नाईक होता. लहानगा मल्हारी एक दिवस शेतांत निजला असतां त्याच्यावर नागानें आपली फणा उभारून सावलीकरितां छत्र धरलें. त्याचप्रमाणें भोजराजाला एकदां लक्ष्मीचा दृष्टांत झाला व तुझा भाचा पुढें राजा होईल असें तिनें त्याला स्वप्नांत सांगितलें. या दोन मल्हारीच्या बाळपणाच्या आख्यायिका प्रसिद्ध आहेत. भोजराजानें आपली मुलगी गौतमाबाई मल्हारीस दिली, व त्यास आपला जांवई केलें. भोजराजानें आपल्या पथकांत मल्हारीस घेतलें. कंठाजी कदम बांडे हा पेशव्यांचा सरदार असल्यामुळें त्याच्या तैनातीस असलेल्या मल्हारीवर साहजिक पेशव्यांची दृष्टी गेली, व पुढें त्याच्या गुणांमुळें त्यांची मर्जी प्रसन्न झाली व बाजीरावानें त्याला आपल्या खास तैनातींत घेतलें. मल्हारी लहानपणीं अतिशय द्वाड होता. एकदां तो आपल्या घोड्याला वैरण घालण्याकरितां शेतांतील उभें धान्य कापीत असतां, बाजीरावानें त्याला धान्य तसें कापल्यानें शेतकऱ्याचें नुकसान होईल म्हणून मनाई केली. तेव्हां त्यानें रागाच्या भरांत शेतांतील एक भलें मोठें ढेंकूळ उचलून बाजीरावाच्या तोंडावर फेंकून मारलें. परंतु बाजीरावानें हंसून तो प्रकार गोड करून घेतला. तेव्हांपासून त्या दोघांची फार मैत्री जुळली. बाळापूरच्या लढाईंत होळकर सामील होता. त्याचा पराक्रम पाहून बाजीरावानें त्यास १७२५ सालीं ५०० स्वारांची मनसबदारी दिली. राणोजी, मल्हारराव व उदाजी पवार हे बाजीरावाचे लहानपणापासूनचे सवंगडी होते, अशी एक आख्यायिका आहे. ती बहुधा खरी असावी. कारण ही मंडळी बाळाजी विश्वनाथाच्या फौजेंत होती, आणि बाजीराव अगदीं लहानपणापासून आपल्या बापाबरोबर स्वारीवर जात असे. यांचीं वयें देखील जवळ जवळ सारखीं होतीं. विशेषतः शिंदे-होळकरांच्या घराण्याशीं पेशव्यांच्या घराण्याचा अत्यंत घरोब्याचा संबंध होता.

मल्हाररावानें तर आपल्या हयातींत चार पेशव्यांची कारकीर्द अवलोकन केली असल्यामुळें, पुढील पेशव्यांना तो घरांतील कर्ता व अनुभवी पुरुष वाटून त्याचा ते अत्यंत मान ठेवीत असले तर त्यांत नवल नाहीं.

**पवार** म्हणजे प्राचीन परमार या क्षत्रिय घराण्यांतील पुरुषांनीं पूर्वी मराठे-शाहीची सेवा केली होती. कृष्णाजी पवारानें शिवाजी महाराजांच्या फौजेंत राहून नांवलौकिक कमविला. त्यांचे चिरंजीव बुबाजी यांना राजारामानें **'विश्वासराव'** अशी जिंजी येथें पदवी दिली. पुढें या घराण्याला मध्यंतरीं थोडे वाईट दिवस आले होते. परंतु संभाजी पवाराचे पुत्र उदाजी, आनंदराव व जगदेव आणि काळुजीचे पुत्र तुकोजी व जिवाजी यांनीं पेशव्यांच्या पदरीं राहून मोठी मर्दुमकी गाजविली व आपल्या घराण्याचा भाग्योदय करून घेतला. माळव्यांत मराठ्यांचा प्रथम जम उदाजी पवारानें बसविला. १७२४ त त्यानें धार येथें आपलें ठाणें दिलें व शाहूकडून १७२६–२७ त तिकडे मुलुखगिरी करण्याची सनद मिळविली. उदाजीचा व बाजीरावाचा प्रथम फार स्नेह होता, परंतु त्यानें पुढें निजामाशीं कारस्थान केल्यामुळें तो पेशव्यांच्या मर्जीतून उतरला. फितुरीबद्दल पेशव्यांनीं त्यास कैदेंत टाकलें व धारचें संस्थान त्याचा धाकटा भाऊ आनंदराव यास दिलें. आनंदराव १७३६ त मरण पावला, तेव्हां त्याचा मुलगा यशवंतराव पवार हा धारचा कारभार पाहूं लागला. हा अत्यंत शूर, मानी, तापट व क्रूर वृत्तीचा होता. बाजीरावाच्या कारकीर्दीतच पवारांच्या घराण्यांत शिरलेल्या भाऊबंदकीचा निकाल करण्यांत आला, व देवासचीं दोनपाती संस्थानें वडील शाखेकडे गेलीं व धारचें संस्थान धाकट्या पराक्रमी शाखेकडे देण्यांत आलें. पेशव्यांच्या मध्यस्थीनेंच ही तडजोड घडून आली, व पुढील पेशवाईचे हे सर्व पवार आधारस्तंभ बनले.

# होळकरांचा वंशवृक्ष.




होळकरांचा शिक्का:—
**श्रीम्हाळसाकांत चरणीं तत्पर । खंडोजीसुत मल्हारजी होळकर ॥**

कांहीं जुन्या पत्रांत
'श्रीमार्तंड चरणीं दृढ भाव
होळकर मलारराव' असा शिक्का आढळतो, पण तो खरा नसावा.

# देवास-धारचे पवार.




( द....दत्तक. देवासकरांच्या घराण्यांत सुपेकराकडील व धार घराण्यांत मलठणकराकडील पुरुष बहुधा दत्तक घेतले आहेत. )

गोविंदा खेर हा जातीचा कऱ्हाडा ब्राह्मण. याचें मूळ गांव रत्नागिरी जवळचें नेवरें हें होय. याचा बाप नेवऱ्याचा कुळकर्णी होता. परंतु तो १३-१४ वर्षांचा असतांना त्याचा बाप बाळाजी वारला व गोविंदाचा स्वभाव हूड व खेळाडू असल्यामुळें त्याच्या भाऊबंदांनीं त्यास सर्वस्वी नागविलें. तेव्हां तो आपलें नशीब काढण्याकरितां कोंकण सोडून देशावर आला. बाजीरावापाशीं त्यानें शागीर्दाची नोकरी पत्करली. त्याची सचोटी, धूर्तता व कर्तबगारी पाहून बाजीरावानें त्यास वाढविलें, व मोठ्या योग्यतेस चढविलें. छत्रसालाला मदत केल्याबद्दल बुंदेलखंडाचा सुभा जेव्हां बाजीरावाच्या वांट्यास आला, तेव्हां त्या बक्षीस मिळालेल्या प्रांतावर देखरेख ठेवण्याकरितां म्हणून गोविंदपंतांची बाजीरावानें नेमणूक केली. गोविंदपंतानें त्या प्रांतांत पुढें आपला चांगलाच जम बसविला. त्यानें तिकडे नवीन किल्ले बांधले व नवीं ठाणीं हस्तगत केलीं. कुरईच्या नबाबाकडूनही त्यानें कांहीं प्रांत जिंकून घेतला. बुंदेलखंडांतील पराक्रमामुळें खेर या आडनांवाचा लोप होऊन व्यवहारांत **गोविंदपंत बुंदेले** हें नांव रूढ झालें. सागर नांवाच्या एका प्रचंड तलावाच्या कांठीं त्याच नांवाचें शहर वसवून, तें त्यानें १७३६ त आपल्या राजधानीचें ठिकाण केलें.

बाजीरावाजवळ राहूनच **बाळाजी पंडित** हे सारस्वत ब्राह्मण सरदार व मुत्सद्दी उदयास आले. बाजीराव जेव्हां उत्तर हिंदुस्थानांत स्वारीवर गेले तेव्हां हे त्यांच्या बरोबर होते. या १७३६ च्या स्वारींत बाजीरावानें दिल्लीपर्यंत पराक्रम गाजवून बुंदि, कोटा वगैरे अनेक रजपूत राजांशीं तह करून त्यांच्याकडून खंडण्या वसूल केल्या, व प्रतिवार्षिक खंडण्या त्यांच्यावर लादल्या. खंडणी कोणी कोणास खुशीनें देत नाहीं. ती सक्तीनें व जरब दाखवूनच प्रसंगीं वसूल करावी लागते. खंडण्या वसूल करण्यासाठीं बाळाजी पंडित या शूर सरदारास बाजीरावानें राजपुतान्यांतील कमावीसदार नेमलें. या कामासाठीं शूर परंतु जमाखर्चांत व राजकारणांत मुरलेला असा इसम हवा होता. बाजीराव खरा रत्नपारखी असल्यामुळें पंडितांची ह्या महत्वाच्या कामगिरीवर नेमणूक झाली. त्यांना बाळाजी पंडित कोटेकर असें म्हणूं लागले. हे १७६१ च्या सुमारास मरण पावले. कोटा संस्थानच्या आग्नेय दिशेस सारोळें म्हणून गांव आहे. तेथें या घराण्याची अजूनहि बरीच मोठी जाहागीर आहे.

प्रत्यक्ष बाजीरावच्या मेहेरनजरेनें उदयास आलेल्या या प्रमुख घराण्याखेरीज मराठेशाहींतील इतर सरदारांनीं बाजीरावास प्रसंगोपात मदत केली. बाजीरावाचा स्वभाव शाहूप्रमाणें गोडा किंवा बाळाजीप्रमाणें सर्वांशीं मिळतें घेणारा नव्हता. तो सरळ, धोपटमार्गी, खडखडीत बोलणारा स्पष्टवक्ता शिपाई गडी होता. त्यामुळें तो

उद्दाम आहे असें सर्वांना वाटे. परंतु पुढें लोकांनीं जेव्हां त्याचें शौर्य व धडाडी अवलोकन केली, तेव्हां त्याचे गुन्हे त्याला माफ झाले व या साध्यासुध्या शिपाईगड्याला आंत एक बाहेर एक असे पांचपेंच येत नाहींत, अशी सर्वांची खात्री झाली. त्याचें लष्करी धोरण, बेछूट धाडस व तळपती दौड पाहून त्याच्या मत्सरग्रस्त शत्रूंनाही त्याच्याबद्दल पुढें पुढें प्रेमादर वाटूं लागला, व त्याला साहाय्य करण्यास ते उत्सुक झाले. त्यामुळें पुढें बाजीरावाच्या आधिपत्याखालीं लढणें त्यांना कमीपणाचें वाटेनासें झालें. कारण तो जिकडे वळे तिकडे विजय ठेवलेला असे. हे इसम पूर्वी आपले शत्रू होते व आपला मत्सर करीत होते, अशी अढी बाजीरावाच्या मनांत फार दिवस कधींच वसत नसे. हिंदुपदपादशाहीच्या सेवेला जो कोणी पुढें येईल त्याची सेवा तो संतोषानें मान्य करून घेत असे. फितुरीची त्याला अत्यंत चीड होती व त्याच्या कोषांत देशद्रोहाला मात्र क्षमा नव्हती.

बाजीरावाच्या या मदतनिसांत **गायकवाडांचा** नंबर पहिला लागतो. या घराण्याचा मूळ पुरुष नंदाजी हा पवन मावळांत असलेल्या हल्लींच्या भोर संस्थानांतील भेर नांवाच्या गढीचा गडकरी होता. त्यानें मुसलमान खाटकाच्या हातून गाई सोडवून त्या गढीच्या कवाडांतून आंत घेऊन त्यांना आसरा दिला, म्हणून त्याच्या घराण्याला गायकवाड असें नांव पडलें. नंदाजीचा पणतू पिलाजी हा दाभाड्यांच्या पदरीं राहिला व त्यांच्या हाताखालीं गुजराथेंत वावरूं लागला. हा अत्यंत पराक्रमी होता, व त्याच्या पराक्रमावर दाभाड्यांची सर्व मदार होती. त्यानें गुजराथवर मराठ्यांचा शह लागू केला. त्रिंबकराव दाभाड्याच्या मृत्यूनंतर त्याला सेनाखासखेल हें पद मिळालें, व तो जवळ जवळ स्वतंत्र झाला. पुढें जोधपूरचा अभयसिंह हा मोंगल बादशहातर्फे गुजराथचा सुभा होऊन आला, व त्याची आणि पिलाजीची लढाई जुंपली. अभयसिंहानें तहाचें बोलणें लावण्याचे मिषानें पिलाजीस भेटीस बोलावलें व नंतर विश्वासघात करून त्याच्यावर मारेकरी घालून त्याला ठार मारलें. तेव्हां त्याचा मुलगा दमाजी अत्यंत संतप्त झाला व त्यानें अभयसिंहास दे माय धरणी ठाय करून सोडलें व सर्व गुजराथ काबीज केली. तेव्हांपासून गायकवाडांचें घराणें गुजराथेंत बडोद्यास नांदत आहे. दाभाड्यांचें व पेशव्यांचें वांकडें आल्यापासून, गायकवाड पेशव्यांशीं आरंभीं तरी फटकून असत, व पुढेंही बाजीरावास त्यांनीं फारशी मदत केली नाहीं; परंतु त्याच्या कार्यांत त्यांनीं अडथळेही उत्पन्न केले नाहींत. ते स्वपराक्रमानें गुजराथ सांभाळून राहिल्यामुळें स्वराज्याचा तिकडचा बंदोबस्त अनायासेंच झाला. नानासाहेबांस गायकवाडांनीं पुष्कळ सहाय्य केलें, व पुढें तर ते पेशवाईचे प्रमुख घटक मानले जाऊं लागले.

## गायकवाडांचा वंशवृक्ष




### गायकवाडांचा शिक्का

आरंभींचा:—‘ मार्तंड चरणीं तत्पर ।
पिलाजी सुत दमाजी गायकवाड निरंतर ॥’

नंतरचा:—‘ श्री राजा शाहू छत्रपति अखिल प्रौढ प्रताप पुरंदर
गोविंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बाहादूर ’

मोंगलांच्या कैदेंतून शाहू सुटल्याबरोबर दौलताबादच्या वायव्येस २५ मैलांवर पारद नांवाचें लहानसें गांव आहे तिकडे गेला असतां, तेथील पाटलानें त्याच्यावर हल्ला करून गांव झुंजविला. शहाजी लोखंडे हा त्या गांवचा पाटील होता. शाहूनें उलट हल्ला करून गांव सर केला. त्या चकमकींत लोखंडे व त्याचे सेवक मारले गेले. त्या वेळीं पाटलाच्या बायकोनें आपलें लहान मूल शाहूच्या पालखींत टाकलें व म्हटलें, 'यास वांचवावें. अन्यायी होते ते मारले गेले.' ही शुभशकुनाची खूणगांठ मनांत बांधून शाहूनें त्या मुलास व त्याच्या आईस आश्रय दिला, आणि तें पहिलें ठाणें फत्ते झालें म्हणून त्या मुलाचें नांव **फत्तेसिंह** ठेवलें. त्यास शाहूनें राजपुत्राप्रमाणें वाढवून पुढें **अक्कलकोट**ची जहागीर बक्षीस दिली.

बादशाही कैदेंतून सुटल्यानंतर शाहूस प्रथम अनुकूल झालेला मोठा सरदार **परसोजी भोंसले** हा होय. हा शिवाजीचे तालमींत तयार झालेला असून **वऱ्हाड** व **गोंडवण** प्रांतांत त्यानें मराठ्यांचा अंमल बसविला. त्यामुळें राजारामानें १६९९ त त्याला सेनासाहेबसुभा हा किताब दिला. वणी तालुक्यांतील भाम गांवीं त्यानें आपलें मुख्य लष्करी ठाणें ठेवलें होतें. परसोजी १७०९-१० त मरण पावला, तेव्हां त्याचा अधिकार त्याचा मुलगा कान्होजी याजकडे आला. कान्होजीस औरस मुलगा नसल्यामुळें, आपला चुलतभाऊ बिंबाजी याचा पुत्र रघोजी हा पुतण्या त्यानें वारस म्हणून जवळ बाळगला. पुढें त्यास मुलगा झाल्यामुळें त्याचें रघोजीवरील लक्ष कमी झालें. तेव्हां रघोजी साताऱ्यास आला व त्यानें शाहूची मर्जी संपादन केली. एका प्रसंगीं शाहू शिकारीस गेला असतां, राजाच्या अंगावर आलेला वाघ तलवारीनें छाटून त्यानें शाहूचा जीव बचावला. तेव्हांपासून शाहूची त्याच्यावर विशेष मर्जी बसली. पुढें कान्होजीचा व त्याचा तंटा होऊन कान्होजीस शाहूनें कैद केलें व वऱ्हाडचा कारभार पाहण्याचें काम रघोजीस सांगितलें. रघोजीच्या कर्तबगारीमुळें कान्होजीचा वारसपुत्र व इतर भाऊबंद मागें पडले हें सांगावयास नकोच.

फत्तेसिंग व रघोजी हे दोन्ही भोंसले पेशव्यांशीं फटकून वागत. कारण त्यांचा भाग्योदय पेशव्यांमार्फत झाला नव्हता. परंतु ते सर्व पेशव्यांचे नसले तरी शाहू छत्रपतीचे सरदार होते, आणि पेशवे मराठी राज्याचे मुख्य प्रधान होते. यामुळें शाहू त्यांना पेशव्यांच्या मदतीस जाण्याविषयीं नेहमीं आज्ञापत्रें लिही, परंतु हे बहुधा तिकडे कानाडोळा करून ते हुकूम पाळीत नसत. यांची मदत न झाल्यानें पेशव्यांच्या पराक्रमाला जसें यावें तसें पूर्ण फळ लवकर प्राप्त झालें नाहीं. कान्होजी व रघोजी भोंसले ह्यांनीं बाजीरावाला मदत केली नसली, तरी पूर्वेस त्यांनीं आपल्या

पराक्रमानें मराठी राज्याची सत्ता फैलावली, व मराठेशाहीचें वैभव वाढविलें. गुण्यागोविंदानें पेशवे व भोंसले मिळून मुलखगिरी करते व एक जुटीनें आणि एक धोरणानें वागते तर हिंदुपदपादशाही निश्चित स्थापन होऊन टिकाऊ झाली असती. फत्तेसिंगांत मात्र रघोजीचें कर्तृत्व नसून निवळ आढयता होती. परंतु शाहूनें त्याला मुलगा मानला असल्यामुळें कोणी त्याच्या वाटेस सहसा जात नसे. पण बाजीरावानें मोहिमेची एक योजना पुढें मांडतांच हा हटकून दुसरी सुचवी व अशी दुफळी पडल्यामुळें स्वारीचें धोरण बिघडे. कर्नाटकच्या स्वारीचें आधिपत्य शाहूनें त्याच्या आग्रहावरून एकदां त्याच्याकडे सोंपविलें होतें. परंतु आपल्या आढयतेंत चूर असलेल्या या सरदाराच्या हातून पराक्रम कसा होणार ? शाहू विलासी राजा व त्याचा हा पाळीव मुलगा व तोही विलासांत वाढलेला ! शाहूच्या आग्रहामुळें बाजीरावानें फत्तेसिंगाच्या हाताखालीं राहून तलवार मारली, म्हणूनच ही स्वारी अंगलट आली नाहीं. परंतु स्वारीचा हेतू व्हावा तसा सफळ झाला नाहीं, व आपापसांतील चुरशीमुळें सैन्याचे फार हाल झाले. परंतु शाहूची फत्तेसिंगावर कृपा आहे हें जाणून, बाजीरावानें त्यास वरपांगी मान देऊन युक्तीनें कर्नाटकांतून मागें पाय घेऊन मराठी राज्याची अब्रू बचावली. “ दौलतेंत कांहीं ताकद नसतां लौकिक उत्तमच केला. मुख्य गोष्ट **राजश्री रावसाहेब** ( पेशवे बाजीराव ) **पुण्यवंत त्यामुळें यश येतें.** ” हें कर्नाटकच्या मोहिमेविषयींचें पत्र वाचण्यासारखें आहे. बाबू सवाई रामा या शाहीरानें, फत्तेसिंगाच्या १७२५–२६ सालच्या या कर्नाटकांतील मोहिमेचें खालील वर्णन केलें आहे.

**“ बुधीहाळ किला बाका ॥ दुरुन टाकी तोफाचे गोळे ॥ जसा अग्नीचा दिसतो लोळ ॥ श्रीमंताचें पुण्य प्रबळ ॥ सोडी तकटी निशान ॥ जातां जातां बसे वलगण ॥ चिनक हाळ्ळी माहाबळ्ळी जेर केली मौजेनें ॥ किल्ला घेतला तमाशानें ॥ भोंवती जेर करोनी कशी घेतली विशाळ ॥ अवघा प्राक्तनाचा खेळ ॥ १ ॥**

**तेथून पुढ नंदिगड घेतलें बाळापूर ॥ नागमंगळ जागा थोर मुळबागळ ॥ किल्ला बाका घटकेंत केला जेर ॥ शहा दिला बेंगरुळावर ॥ बहिरवदुर्ग आणि मांगडी पाहातां फिरती डोळे ॥ भोंवती झाडी अती प्रबळ ॥ २ ॥**

**देवराय-दुर्ग भोंवते किल्ले घेतले प्रतापानं ॥ पुढुनी जंगल महादारुण ॥ हाला करितां बहुत पडिले लोक तमाशानें ॥ खराबी फार**

केली किल्ल्यानें ॥ मारून गोळ्या झोळिस लोळ्या लाविल्या तुंबळ ॥ शेवटीं जेर केलें स्थळ ॥ ३ ॥

नळ-वाटेनें पोटें फुगती प्राण उरतो डोळा ॥ म्हणती कसें आलें कपाळा ! ॥ हागवणेनं व्याकुळ झाले ×× वाहे बुळबुळा ॥ भारी कर्नाटक उन्हाळा ! ॥ जेव्हां घरची आठवण होतां तेव्हां रडे मुळमुळा ? ॥ कसे आठवती मुलांबाळां ॥ ४ ॥

आजपासुन कर्नाटकची नको चाकरी, हारी ! ॥ शेत करुनि राहूं घरीं ॥ रेती खातां पाणि लागतें सुख नाहीं शरीरीं ॥ मोठि माहागाइ पडली भारी ! ॥ बाबु सवाई रामापाई कवि मत-वाला खेळ ॥ जबुन हें कर्नाटकचें जळ " ॥ ५ ॥

भोंसल्यांच्या या चुरशीमुळें बाजीरावच्या दक्षिणेकडील पुष्कळ महत्वाकांक्षा लुप्त झाल्या, व उत्तरेस ज्या साध्य झाल्या त्याकरितां त्याला फार मोठी किंमत द्यावी लागली.

प्रत्यक्ष बाजीरावच्या आश्रयानें उदयास आलेल्या सरदारांत एकही कोंकणस्थ ब्राह्मण नव्हता. मराठेशाहींत **घोरपडे** (जोशी) घराणें स्वपराक्रमानें व संताजी घोरपड्याच्या कृपाप्रसादानें उदयास आलें. नारोपंत १७११ त कोल्हापूरचा सचिव झाला व त्याचा पुत्र व्यंकटराव यास बाजीरावची सखी बहीण दिली होती. परंतु तो साधारण पराक्रमी असून देखील त्याची आपल्या मेहुण्याच्या कारकीर्दीत फारशी भरभराट झाली नाहीं. फिरंग्याशीं लढतांना त्यानें चांगलेंच शौर्य प्रकट केलें, परंतु त्याची सारी कामगिरी दक्षिणेंत व तीही चिमाजी आपासारख्या निरीच्छ पुरुषाच्या हाताखालीं राहून पार पडली. त्यामुळें त्याच्या कामगिरीचें जितकें चीज व्हावयास पाहिजे होतें, तितकेंही झालें नाहीं. व्यंकटराव घोरपड्यांचे उपाध्ये **हरभटजी पटवर्धन** हे होते. यांचे पुत्र गोविंद हरी व रामचंद्र हरी यांनीं प्रथम इंद्रोजी कदमाच्या पागेंत व नंतर चिमाजी अप्पाच्या स्वारींत मोठा पराक्रम केला. परंतु बाजीरावच्या हयातींत पटवर्धनांना सरदारी लाभलेली नव्हती. चिमाजीचे सासरे व मेहुणे पेठे यांचा भाग्योदय तर फार पुढें झाला. बाजीराव बल्लाळाची कारकीर्द किती उदारमनस्कतेची होती व फाजील जात्यभिमानापासून तो किती अलिप्त होता, हें दाखविण्याकरितां या गोष्टींचा मुद्दाम उल्लेख केला आहे. वर निदर्शित केलेलीं सरदारी, संस्थानी व बडेजावी नांवें सोडून दिलीं, तरी इतर लहानमोठे भिन्न भिन्न जातींचे अनेक पाईक व नाईक बाजीरावाच्या सेवेंत हजर होते. बाजीरावची

राहणी अत्यंत साधी असल्यामुळें शिपायांशीं त्याची गट्टी तेव्हांच जुळे व त्यांना तो आपल्यापैकींच एक वाटूं लागे. त्याचें हित तें आपलें हित असें जाणून शिपाई व सरदार त्याच्या आज्ञेंत वागून शौर्याची शिकस्त करण्यांत दंग असत व आपल्या सेनापतीच्या समोर झुंजतांना आपणांस मृत्यू आला, तर ती आपल्या भाग्याची परमसीमा होय असें त्यांना वाटे. बाजीरावला मग सहस्रार्जुन कां म्हणूं नये? त्याचे हात दूरवर व चारी दिशांना पोहोंचत इतके ते लांब, बळवान व असंख्य होते.

या प्रकरणाचा शेवट इथेंच व्हावयाचा; परंतु आज निदान श्रीमंतीच्या, बडेजावीच्या व सन्मानाच्या दृष्टीनें तरी स्मृतिशेष झालेल्या एका अत्यंत पराक्रमी सरदाराचें अधिक विस्तृत चरित्र दिल्याशिवाय पुढें जाववत नाहीं. हा थोर पुरुष म्हणजे **वाघोलीकर पिलाजी जाधव** हा होय. चंद्रसेन हा माळेगांवकर जाधवांपैकीं असल्यामुळें या दोघांचे परस्पर संबंध नव्हते. बाळाजी विश्वनाथाच्या पदरीं हा एक सामान्य शिलेदार होता. बाळाजींत व चंद्रसेनांत ज्या वेळीं चुरस लागली व चंद्रसेनानें बाळाजीचा पाठलाग चालविला, तेव्हां पिलाजी जाधव व यमाजी धुमाळ या दोन शिलेदारांनीं पांडवगडच्या बिकट प्रसंगीं असा पण केला कीं, बाळाजीची व त्याच्या मुलांची शत्रूपासून सुटका करून किल्ल्याच्या माचीमध्यें त्यांना सुरक्षित रीतीनें नेऊन ठेवूं किंवा आपले प्राण धारातीर्थी अर्पण करूं. यानंतरची पिलाजीची महत्वाची कामगिरी म्हणजे दमाजी थोराताचा पराभव करून बाळाजी व पुरंदरे यांची हिंगणगांवच्या गढींतून सुटका करणें ही होय. १७२३ पासून मराठ्यांच्या प्रत्येक महत्वाच्या मोहिमेंत तो सामील असल्याचें दिसून येतें. बाजीराव व चिमाजी या दोघांचाही पिलाजीवर विशेष भरंवसा असून ते नेहमीं त्याची सल्ला घेऊन वागत असत.

इ. स. १७२८ त पिलाजी जाधव चिमाजीअप्पाबरोबर माळव्याच्या स्वारीवर गेला होता. तेथें माळव्याचा सुभेदार दयाबहादूर याच्याशीं उज्जेनीजवळ युद्ध करून त्यानें मोठें यश संपादन केलें. त्यानंतर पेशव्यांच्या सैन्याबरोबर महंमदखान बंगष याच्याशीं निकराच्या लढाया लढून जैतपूरचा किल्ला त्यानें १७२९ त सर केला. १७३० मध्यें पिलाजी फिरंगणावर चाल करून गेला व त्यानें कांबे बेट सर केलें. १७३२ व ३३ त हा पुरुष पेशव्यांबरोबर माळवा, बुंदेलखंड व हिंदुस्थान या प्रांतीं मोठमोठीं राजकारणें व मुलुखगिऱ्या करण्यांत गुंतला होता. १७३४ त शाहूची भेट घेऊन त्यांच्या आज्ञेनें तो जंजिऱ्याच्या शिद्यावर चालून गेला व त्या प्रसंगीं त्यानें बाणकोट

हस्तगत केला. १७३६ त तो दिल्लीवरील मोहिमेंत सामील होता. १७३८ त निजामाशीं झालेल्या भोपाळच्या युद्धांत त्यानें एवढा पराक्रम केला कीं, पेशव्यांच्या वतीनें तहाचीं सर्व बोलणीं त्यानें व बाबूराव बर्वे या दोन सरदारांनीं मिळून केलीं. १७३९ त वसईच्या वेढयांत तो सामील होताच व प्रकृति बरी नसतांही त्यानें पराक्रमाची शर्थ करून दाखविली. बाजीरावचे मागें नानासाहेबांच्या कारकीर्दीत पेशवाईची सेवा करून १७५१ मध्यें हा थोर पुरुष मरण पावला. राणोजी शिंदे व मल्हारराव होळकर यांच्या बरोबरीनें व अत्यंत सन्मानानें पिलाजी जाधवाचें नांव जुन्या कागदपत्रांत वारंवार उल्लेखलेलें आढळून येतें. माळव्याची सुभेदारी पेशव्यास मिळाली, तेव्हां हे तिघे पुरुष पेशव्याबद्दल बादशहाला जामीन राहिले. मल्हाररावाप्रमाणें पिलाजीस नानासाहेब पेशवे काका म्हणत असत. या पुरुषाचें चरित्र अद्भुतरम्य असूनही व बाजीराव पेशव्यास त्याचें कमालीचें सहाय्य झालें असतांना देखील त्याचें स्मरण फारसें कोणास आज राहिलें नाहीं. पिलाजीस पेशव्यांकडून या निरनिराळ्या लढायांच्या प्रसंगीं अनेक देणग्या मिळाल्या असल्याबद्दलचे उल्लेख जुन्या कागदपत्रांत आलेले आहेत. त्यांपैकीं दोन खालीं दिले आहेत. एक बाजीरावच्या कारकीर्दीच्या प्रारंभींचा व एक नंतरचा.

"राजश्री पिलाजी जाधव गोसावी यांसीः—

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री स्नेहांकित बाजीराव बल्लाळ प्रधान, आशीर्वाद सुरसन सलास अशरीन मया व अलफ. तुम्हीं कसबें सुप्याचे मुक्कामीं हुजूर येऊन विदित केलें कीं, आपण राजश्री स्वामींच्या राज्यांतील पुरातन सेवक, एकनिष्ठेनें सेवा करीत आहों. पुढेंही जिवारभ्य सेवा करावया अंतर करणार नाहीं. तरी आपणांवरी कृपाळू होऊन आपणांस नूतन जमीन इनाम करून दिल्ही पाहिजे. म्हणोन विनंति केली. ऐसीयास तुम्ही राज्यांतील पुरातन सेवक. एकनिष्ठेनें सेवा करितां. साल गुदस्तां जंजिरे कुलाबियास फिरंगी इंगरेज याचा वेढा बैसला होता. ते प्रसंगीं वेढा मारून काढावयाकरितां स्वारी कुलाबिया प्रांतें जाली. त्यास, अगोदर गनिमास शह बैसला पाहिजे म्हणोन तुम्हांस जमावानसीं पुढें रवाना केलें होतें. त्यास, तुम्हीं कुलाबियाचे खुषकीस नजीक अलीबाग जाऊन मुक्काम केला. तों फिरंगी यांनीं सख्ती करून हिरा बुरूज यावर लगट केली. ते समयीं तुम्हीं जातीनसीं अंगेजणी करून चालोन घेतलें आणि फिरंगी व इंगरेज मारून काढिला. तरवारेची शर्त करून राजश्री स्वामींच्या जागीयाचा उपराळा करून जागा जतन केला. यांकरितां तुम्हांवर कृपाळू होऊन, कसबें सुपें थळ सात भाई खेर दोरीया

२॥+३ अडीच दोऱ्या तीन परतेन, त्यापैकीं मळा करंजाचा परतेन ३। एकूण जमीन चावर ·।· पाव चावर आरा जमीन बिघे ३० तीस, बाग करावयासी इनाम स्वराज्य देखील मोगलाई दुतर्फा हल्लीपट्टी व पेस्तरपट्टी खेरीज हक्कदार व इनामदार पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम करून दिल्हें आहे तरी तुम्हीं सदरहू कसबें मजकुरीं थळ मजकूरपैकीं आपले पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें सुखरूप अनुभवीत जाणें. जाणिजे. छ ५ सफर. बहुत काय लिहिणें. '' (इसवी सन १७२२–२३)''

'वसईचे मसलतीस श्रमसाहस करून स्वामिसेवा केली' म्हणून १७४७ त मौजे सांडारे हा गांव बाळाजी बाजीरावनें पिलाजीस इनाम करून दिल्याचा एक उल्लेख सांपडतो, या मधल्या काळांत मिळालेल्या अनेक देणग्यांचे उल्लेख सांपडत असले, तरी त्यांपैकीं बराचसा जाधवांचा सरंजाम आज लुप्त होऊन इंग्रजी राज्यांत सामील झाला आहे. पिलाजी जाधवांनीं पेशव्यांना लिहिलेली व पेशव्यांकडून त्यांना गेलेलीं अनेक पत्रें उपलब्ध झालेलीं आहेत. त्यांवरून त्यांचा पराक्रम, स्वामिनिष्ठा व कर्तबगारी इत्यादि गुणांवर स्वच्छ प्रकाश पडतो.

शिंदे होळकरांप्रमाणें जाधवांचें संस्थान न राहिल्यामुळें त्यांचें नांव सतत पुढील पिढयांच्या डोळ्यांसमोर प्रामुख्यानें नाचलें नाहीं. अशा कितीतरी थोर व्यक्तींची कीर्ति काळाच्या उदरांत लुप्तप्राय झाली असेल ! या थोर पुरुषानें एकनिष्ठेनें सतत ४०–४५ वर्षें पेशवाईची व स्वराज्याची सेवा केली. पेशवाईला हजारों खांब असले तरी त्यांतील भक्कम असे चारच स्तंभ होते. शिंदे, होळकर प्रवार व जाधव. एका जाधवाचें पाप दुसऱ्या जाधवानें आपल्या पराक्रमानें व पुण्याईनें धुवून काढलें. काळ त्याची कर्तबगारी विसरला असला तरी ईश्वर थोडाच विसरला असेल! या थोर पुरुषाला मोकळ्या मनानें तिळांजलि देतां यावी एवढयासाठींच त्याच्या चरित्राचा उल्लेख प्रकरणाच्या शेवटीं मुद्दाम केला.

---

प्रकरण दहावें.

# राजधानी पुणें.



पुणें हें शहर प्रथम पेशव्यांनीं वसविलें, असा पुष्कळांचा समज आहे. परंतु तो सपशेल खोटा आहे. पेशव्यांच्या अमलांत पुण्याची भरभराट झाली व त्याचा विस्तार वाढला. मराठी साम्राज्याचीं सूत्रें खेळविणारे प्रधानपंत तेथें राहूं लागल्या-

मुळें तेथील वस्ती वाढली व त्याला राजधानीचें स्वरूप आलें. निरनिराळे कसबी लोक तेथें येऊन राहिले व त्यामुळें त्या शहराचें सौंदर्य वाढलें. चातुर्मासांत पेशवे व त्यांचे सरदार विश्रांतीसाठीं पुण्यांत येऊन राहूं लागल्यापासून, लोकांना व शिपायांना राहण्याकरितां पुरेशीं घरें मिळावींत म्हणून नव्या नव्या पेठा वसविण्यांत आल्या. पेशवाईंत पुण्याचें वैभव वाढलें. परंतु तें गांव बरेंच प्राचीन आहे व पूर्वीपासून त्याला ऐतिहासिक महत्व प्राप्त झालें होतें.

मुसलमानी अमलापूर्वी या शहराचें नांव **पूनक** असें असून तें गांव हल्लींच्या शनवार पेठेच्या जागेवर होतें. मुसलमानी अमलांत त्याला पुणेंवाडी म्हणूं लागले. शेजारीं असलेल्या खेड्यांचा पुढें पुण्यांत अंतर्भाव झाला. नागझरी पलीकडे लोहगांव म्हणून एक लहानसें खेडेगांव होतें, ती तुकारामबोवाची सासुरवाडी होती. तेथें तुकारामबोवांचीं कीर्तनें चालू होतीं तेव्हां शिवाजी लहान असतांना कीर्तनास जात येत असे. लोहगांव व इतर खेड्यांना मिळून शिवाजी महाराजांच्या पूर्वीच **कसबा पुणें** अशी संज्ञा मिळाली. शितोळे व होलप हे या कसब्याचे देशमुख देशपांडे होते. पुण्याचे जुने पाटील झांबरे व कुळकर्णी राजर्षि होत.

शहाजी राजांच्या दक्षिणेंतील जहागिरीची व्यवस्था दादोजी कोंडदेव या चतुर व प्रामाणिक गृहस्थाकडे होती. त्यानें पुणें येथें जहागिरीची मुख्य कचेरी ठेवली व कसबा पेठेंत गणपतीच्या देवळाजवळ सरकारी वाडा बांधला. या वाड्याला **राजमहाल** असें म्हणत, आणि वाड्याबाहेरील बागेस **राजबाग** असें नांव ठेवलें होतें. याच वाड्यांत शिवाजी महाराजांचें बाळपण गेलें, येथेंच त्यांचें शिक्षण झालें व येथेंच त्यांनीं स्वराज्याच्या मंत्राचा पाठ घेऊन तो अमलांत आणण्यास सुरुवात केली. पुण्याची हवा समशीतोष्ण व तेथें पाऊसही बेताचा पडतो. सह्याद्रीच्या घांटमाथ्यावर तें वसलें असल्यामुळें जवळच्या समुद्राचा थंड वारा तेथें सहजगत्या येऊन पोहोंचतो. वनश्री रमणीय व प्रदेश बराच सुपीक! समोर जवळच दिसणारे सह्याद्रीचे डोंगर व त्यांचे सुळके, व त्यांवर बांधलेले किल्ले मनुष्याचें मन सहज आकर्षित करतात. घाटमाथ्यावरील सपाटीवर हें शहर वसलेलें असल्यामुळें, स्वारी शिकारीला सोयीस्कर, आणि लष्करी हालचालींना योग्य असें हें होतें. बरें, अंगावर बेतली व बाजू उलटून कठिण प्रसंग आला, तर आश्रयासाठीं मजबुद किल्लेकोटाचें ठिकाण धुंडाळण्यास तेथून फार दूर जावयास नको.

उत्तर व दक्षिण हिंदुस्थानांतील प्रमुख ठिकाणांचें पुण्याशीं किंवा पुण्यावरून दळणवळण चालू असल्यामुळें, पुणें हें महत्वाचें केंद्र पूर्वीपासूनच समजलें जात

असे. पुण्याला मोहिमाबाद असें म्हटल्याचा उल्लेख मुसलमानी कागदपत्रांत आहे, कारण मोहिमेवर निघण्याकरितां हें ठिकाण सोयीचें होतें. पुण्याच्या मैदानांतून जे अनेक रस्ते फुटलेले होते त्यांचा तपशील खालीं दिला आहे.

(१) **पुणें ते नाशीकः**—पुणें, भांबुरी, भोसरी, भोसें, चाकण, खेड, पेठ, लिंगदेव, भोगूर, गोवर्धन, त्रिंबक, नाशीक.

(२) **पुणें ते वसई, ठाणें, पनवेलः**—पुणें, पुनावळे, तळेगांव, नाणें, माह्ल, कुसुरघाट, भिऊपुरी, वैजनाथ, नासरापुर, दहिवली, बदलापूर, कल्याण, वसई, पारशीक, ठाणें, तळेगांव, वडगांव, कार्ले, बोरघाट, खालापूर, चौक, पनवेल, मुंबई.

(३) **पुणें ते नागोठणेंः**—पुणें, भांबुडें, मुळशी, भोरकस, भोरप, पाली, नागोठणें, अलीबाग, चौक, रेवदंडा.

(४) **पुणें ते रायगडः**—पुणें, खडक वासलें, खामगाव, पाद्याचा घाट, येल्याची पेठ, बोचाघोळी, रायगड, महाड, तळें, घोसाळें, गावेल, श्रीवर्धन, बाणकोट.

(५) **पुणें ते वाईः**—पुणें, कात्रज, शिवापूर, भोर, अंबेडखिंड, वाई, बावधन, सातारा.

(६) **पुणें ते पुरंधरः**—पुणें, बोपदेवघाट, सासवड, पुरंधर.

(७) **पुणें ते साताराः**—पुणें, बोपदेवघाट, सासवड, जेजुरी, दहिगांव, माहुली, सातारा.

(८) **पुणें ते कोल्हापूरः**—पुणें, जेजुरी, कोरेगांव, न्हावी, पुसेसावळी वाळवें, कोल्हापूर, निपाणी, संकेश्वर, बेळगांव, शहापूर.

(९) **पुणें ते पंढरपूरः**—पुणें, मोंढवे, थेऊर, पाटस, मोरगांव, होळमुरूम, सांगवी, अकलूज, पंढरपूर, सांगोले, मंगळवेढे, विजापूर.

(१०) **पुणें ते श्रीरंगपट्टणः**—पुणें, पंढरपूर, विजापूर किंवा सांगोले, जत, गलगलें, बागलकोट, हुनगुंद, किल्ले, कोपल, आनजी, हरिहर, चित्रदुर्ग, शिरें, नागमंडल, श्रीरंगपट्टण.

(११) **पुणें ते सावनूरः**—पुणें, पंढरपूर, आसंगी, कवतगी, गळतगे, बागलकोट, बदामी, कुरुतकोटी, लक्ष्मेश्वर, सावनूर बंकापूर.

(१२) **पुणें ते नगर–औरंगाबादः**—पुणें, कोरेगांव, रांजणगांव, घोड-नदी, जातेगांव, खेरगांव, अहमदनगर, कायगांवटोकें, सातारा, औरंगाबाद.

(१३) **पुणें ते दिल्लीः**—पुणें, औरंगाबाद, अजंटा, बऱ्हाणपूर, हांडिया, सिहूर, सिरोंज, नरवर, ग्वालेर, ढवळपूर, आग्रा, मथुरा, दिल्ली, पानपत, कुरुक्षेत्र.

(१४) **पुणें ते उज्जैनः**—पुणें, नाशीक, मालेगांव, सेंधवे, महेश्वर, उज्जैन.

(१५) **पुणें ते भडोच–सुरतः**—पुणें, नाशीक, बागलाण, खानदेशच्या बाऱ्या, कासारबारी, वगैरे.

(१६) **पुणें ते नागपूरः**—पुणें, औरंगाबाद, दाभाडी, जाफराबाद, बाळा-पूर, एलिचपूर, नागपूर.

(१७) **पुण ते धारूरः**—पुणें, गारपीर, थेऊर, करखंब, साळूमाळूचे पार-गांव, वाळकी, मांडवगण, आडळगांव, भोंसेगांव, सिंगवी, फकराबाद-धानोरे, बार्शी, खर्डें, पानगांव, गारदौंड, पेडगांव, परिंडा, बीड, धारूर.

(१८) **पुणें ते हैद्राबादः**—पुणें, सुपें, बारामती, तुळजापूर, कल्याण, बेदर, भालकी, उदगीर, गोवळकोंडा, भागानगर.

पुण्याहून जाणारे हे मोठे मार्ग होत. हे रस्ते अर्थातच कच्चे असत. खडीच्या सडकांची सुरवात त्या वेळीं युरोपांत देखील झाली नव्हती. हे रस्ते कच्चे असले तरी प्रशस्त व रुंद असत व त्यामुळें ते फौजेच्या रणगाड्याला चांगले उप-योगी पडत. मध्यवर्ती ठिकाण असल्यामुळें पुणें राजधानीला लायक होतें यांत शंकाच नाहीं. कारण डाकेचा बंदोबस्त येथून चांगला राखतां येई व देशोदेशींच्या खबरा तडक आणतां येत असत. याच कारणास्तव बहुधा पेशव्यांनीं पुण्यास आपली राजधानी केली असावी.

बाळाजीच्या वेळीं व बाजीरावाच्या कारकीर्दीच्या प्रारंभीं पेशव्यांची कायमची वस्ती पुरंदरास असे. ते पुण्यास अधूनमधून येऊन रहात असत. १७२१ त बाजी-रावानें बापूजी श्रीपत याच्याकडे पुण्याची सुभेदारी सोंपविली. बापूजीचा कारभारी रंभाजी जाधवराव यानें उदमी लोकांना कौल देऊन पुण्यांत आमदानी केली व त्यानंतर पेशवे व पुरंदरे यांनीं मध्यवर्ती व सोईचें ठिकाण म्हणून पुण्यास कायमचें राहण्याचें ठरविलें. नदीकांठीं किल्ले हिसार नांवाची आरबांची गढी होती ती मोडून त्या जागेंत पुरंदरे यांचा वाडा बांधला. एकदां तेथें राहण्याचें ठरविल्यानंतर

दुसऱ्या कोणाच्या ताब्यांत असलेले व प्रसंगीं आपणास मारक होणारे गढीकोट तोडून टाकणें जरूरच होतें. कसब्याची मावळवेस होती तेथें पेशव्यांनीं आपला वाडा बांधला. तेथें पूर्वीं कोळी व कोष्टी लोकांची वस्ती होती, ती उठवून त्यांना मंगळवार पेठेंत मोबदल्या दाखल रहावयास जागा दिली. त्या वेळीं बहुतेक पेठांना मुसलमानी नांवें होतीं. शहापुरा (सोमवार पेठ), शाहिस्तेपुरा (मंगळवार); माहिनाबाद (बुधवार), मुरजुदाबाद (शनवार), शेरबत (भवानीपेठ) वगैरे पेठांचीं नांवें मुसलमानांच्या अमलांत पडलीं होतीं. यावरून हें शहर प्राचीन होतें याबद्दल शंका राहत नाहीं. पेशवाईंत वारांवरून पेठांचीं नांवें शहराच्या या भिन्न भिन्न भागांना लाभलीं. रामजोशांनीं पुणें शहरावर लिहिलेला वर्णनात्मक पोवाडा खालीं दिला आहे. हें वर्णन अर्थातच उत्तर पेशवाईंतील पुण्याला लागू आहे. परंतु पुण्याच्या या वैभवाचा प्रारंभ बाजीरावाच्या कारकीर्दींतच झालाः—

"श्रीमंत पेशवे प्रधान बहु प्रीतीचे। अष्टप्रधानांमध्यें उतरले मर्जींत महाराजाचे॥ वसविलें त्यांनीं पुणें शहर टुमदारीचें। जागोजाग बांधले दाट नळ पाण्याचे॥ ठायीं ठायीं शोभती हौद एक फर्म्यांचे। धनी कृपावंत प्रभु कल्याण करी रयतेचें॥ लंकाच पुण्यामध्यें लेश न दारिद्र्याचें। शहरांत घरोघर सावकार गबर घरचे॥ सरदार एकाहून एक श्रीमंताचे। लढणार शिपाई किती सांगुं मी वाचे॥ हत्ती घोडे रथ अंबारी थवे पालख्यांचे। सरकारवाड्याभौतालीं झुलती बहारीचे॥ जागोजाग वस्ती भरदार, गर्दी बाजार, कमती नसे कांहीं। पुणें शहर अमोलिक रचना दुसरी नाहीं॥ ब्राह्मणी राज्य जोरदार घोड्यावर स्वार होते शिपाई जबर सद्दी कैकांनीं पाहिली शत्रु ठेविले नाहीं॥ ध्रु॥ १॥

उत्तम पुण्याच्या भोंवतीं शोभती बागा। शहरांत हजारों स्वार घोड्यांच्या पागा॥ भले भले धनंतर वाडे हवेल्या जागा। आळोआळीं झळकती एकसारख्या रांगा॥ वर्णितां गोड वाटतें किती तरि सांगा। शहरांत सुखी अवघे क्वचितची भीकमागा॥ तेही गेले कोठे धर्मास करिनारे जागा। शिंद्याचा जान बत्तीस फ्रेंचना लुंगा॥ गाईकवाड सरदार येती प्रसंगा। धांवती रणांगणीं मानकऱ्यांचा चुंगा॥ सिरकेल कोणता काळ कोरण्यास भुंगा। सहजांत जिरविती

सर्व तयाचा मुंगा ॥ गोखले बापू तलवार बहाद्दर लढाईंत जाई । शत्रूची फौज जरजर करितसे लवलाही ॥ ब्राह्मणी राज्य० ॥ २ ॥

साक्षात विष्णु अवतार पेशवे कूळ । संपूर्ण महिचे भूप कांपती धाक दरारा प्रबळ ॥ सगोपंत देवराव विठ्ठल नाना काळ । शहाण्यांत साडेतीन शहाणे बुद्धिचे सबळ ॥ सेवेंत सर्वदा श्रीमंतांच्या जवळ । होळकर, भोंसले, शिंदे, मानकरी सकळ । तलवार बहाद्दर करीत शत्रूची राळ । स्वारीच्या भोंवतीं पटवर्धन मंडळ ॥ युद्धांत रणांगणीं जसा आगीचा लोळ । बहुनामी पल्लेदार तोफांचा कल्लोळ ॥ जेजाल जंबुरे बाण करी वळवळ । सरदार सभोंवती दाट पसरती तळ । घोरपडे रास्ते सरदार पुरंधरे स्वार पानसे पाहीं । फडणवीस नानाची जरब भूमंडळीं राही ॥ ब्राह्मणी राज्य० ॥ ३ ॥

पर्वतावरती पर्वती स्थान वरती चौघडा । पाहिल्या तळापर्यंत जावे धडधडा ॥ अनुष्ठान पंचपक्कान्न पडेना खाडा । पुजारी पुजीती उमामहेश्वर जोडा । पीतवर्ण सोन्याच्या मूर्तीं नव्हे बा वाडा ॥ पहाऱ्यास शिपाई उभे पेटवूनी तोडा । रमणाही ब्राह्मणासाठीं बांधिला केवढा ॥ श्रावणमासीं खर्च तो कोट्यावधी तोडा । पुढें तळें त्यामध्यें लहान बेटाचा तुकडा ॥ गणपती त्यांत पलिकडेस आंबील ओढा । ग्रामांत तुळशी बागेंत बेतही जाडा ॥ बुधवार पेठ बेलबाग नजीकची वाडा । जागोजाग मौज अनिवार नसे अंतपार वर्णू तरी काई ॥ कविराय म्हणे धन्य धन्य पेशवाई ॥ ब्राह्मणी राज्य० ॥ ४ ॥

नानासाहेब पेशव्यांचें लग्न झालें तेव्हां वाडा तयार झाला नव्हता. त्यामुळें जुन्या कोटांत मंडप घालून त्यांत लग्न उरकावें लागलें. वाड्याकरितां व भोंवतालच्या बागेकरितां म्हणून एकंदर पांच एकर जागा व्यापली गेली. कात्रज येथें तलाव बांधून त्यांतून पाणी शहरांत आणून तें वाड्यांत खेळविलें होतें. पाणी आणण्याकरितां प्रथम खापरी नळ वापरण्यांत आले होते. पाणी पुरवठ्याच्या या योजनेचें काम १७२९ पासून १७३७ पर्यंत चाललें होतें. १७३७ त ही योजना पूर्ण झाली. पुढें नानासाहेबांनीं जुने खापरी नळ काढून टाकून त्या जागीं पक्के दगडी नळ बसविले. सांडपाण्याच्या मोऱ्याही पक्केपणीं बांधल्या असून त्या वाटांनीं तें नदींत नेऊन सोडलें

होतें. यावरून स्वच्छता व व्यवहार इकडे पेशव्यांचें किती बारीक लक्ष होतें हें दिसतें. ठिकठिकाणीं पिण्याच्या पाण्याचे हौद बांधले असून त्यांतून पाणी सर्वत्र खेळविण्यांत आलें होतें. खास वाड्यांतील बहुतेक नळ तांब्याचे असून ते गंजूं नयेत म्हणून त्यांच्यावर राळ, नंतर खादी, वर ताग, आणि शेवटीं चुना, अशीं लपेटणें देऊन नंतर ते जमीनींत गाडले होते.

इंद्रप्रस्थ येथील पुराणप्रसिद्ध पांडवांच्या प्राचीन वाड्याबरहुकुम बांधलेला पुणें येथील पेशव्यांचा जो इतिहासप्रसिद्ध मुख्य राजवाडा होता त्यास 'शनिवारवाडा' किंवा 'शनवारवाडा' असें म्हणतात. हा वाडा कसब्याचे गणपतीपासून अगदीं थोड्या अंतरावर आहे. कसबा पेठ ही पुण्यांतील अतिशय जुनी असून, ती पूर्वीची मुख्य वस्तीची जागा होती. हिच्या मध्यभागीं छत्रपति शिवाजी महाराज व त्यांच्या मातोश्री जिजाबाई ह्यांचा 'रंगमहाल' नांवाचा वाडा असे. तो गणपतीच्या देवळापासून जवळ असून, त्यांपैकीं 'अंबारखाना' या नांवाचा राहिलेला शेषभाग अद्यापि अस्तित्वांत आहे. 'शनिवारवाडा' हा, छत्रपति शिवाजीचे वाड्यापासून थोड्याच अंतरावर बांधलेला आहे, ही एक लक्षांत घेण्यासारखी गोष्ट आहे. 'शनिवारवाडा' हा श्रीमंत थोरले बाजीरावसाहेब पेशवे यांनीं इसवी सन १७३० मध्यें बांधण्यास सुरवात केली. हा वाडा बांधावयास मुहूर्त, माघ शुद्ध तृतीया शके १६५१, रोज शनिवार, इंग्रजी तारीख १० जानेवारी इ. स. १७३०, मुसलमानी तारीख छ १, रजब सन सलासीन मया व अलफ, या दिवशीं केला. त्याबद्दल दीड रुपया दक्षिणा थोरले बाजीराव पेशवे यांचे रोजकीर्दीमध्यें खर्चीं पडली आहे ! हा वाडा बांधण्यास जी जागा पसंत केली होती, तेथें श्री० थोरले बाजीराव साहेब पेशवे एकदां रपेटीस घोड्यावरून चालले असतांना एक ससा कुत्र्याच्या मागें लागून त्यास पळवीत होता, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. अर्थात् ज्या जागीं ससा कुत्र्यावर तुटून पडतो, ती जागा अत्यंत यशस्वी असली पाहिजे असें समजून, तेथें त्यांनीं स्वतःस राहण्यासाठीं वाडा बांधण्याचा निश्चय केला. ही आख्यायिका फारशी विश्वसनीय नसावी. कारण चांदा येथें गोंड राजांनीं मोठा किल्लेकोट बांधला आहे, त्यासंबंधीं अशीच गोष्ट रूढ आहे. सशाचा पाठलाग करीत त्याच्या मागें कुत्रा लागला होता, परंतु एखाद्या ठिकाणीं ससा उलटून कुत्र्याच्या मागें लागे. ज्या ज्या ठिकाणीं ससा कुत्र्यावर उलटला तेथें गोंड राजानें बुरुज बांधून कोटास विशेष मजबुती आणली. आणखी अशाच स्वरूपाच्या दंतकथा अनेक गढयांसंबंधीं गोंडांच्या राज्यांत रूढ आहेत. बाजीराव पेशवे

यांनीं वाड्याचें काम सुरू करून सुमारें दोन वर्षांत तें पुरें केलें. ही इमारत इ. स. १७३१ सालच्या अखेरीस पुरी झाली व तिची वास्तुशांति माघ शुद्ध ७ शके १६५३ रोज शनिवार, इंग्रजी तारीख २२ जानेवारी १७३२, या दिवशीं झाली. ज्या दिवशीं पायाचा दगड बसविला, त्या दिवशीं शनिवार होता; व ज्या दिवशीं वास्तुशांति झाली त्या दिवशींहि शनिवार होता, हें लक्षांत घेण्यासारखें आहे. वास्तुशांतीस दक्षिणेप्रीत्यर्थ वगैरे फक्त १५॥ रुपये खर्च झाला, व एकंदर वाड्यास खर्च १६११० रुपये लागले, अशी माहिती सांपडते. शनवार हा पेशव्यांचा भाग्यवार असावा.

बाजीराव पेशव्यांनीं बांधलेला वाडा हा दोन मजली असून त्यास सुमारें दोन तीन चौक होते. ह्या वाड्यांत, विशेषेंकरून बाळाजी बाजीराव ह्यांनीं पुष्कळ फेरफार करून त्याचें स्वरूप बदललें व तें अतिशय प्रचंड व भव्य केलें. थोरले बाजीराव यांच्या मनांतून ह्या वाड्यास कोट बांधावयाचा होता, परंतु छत्रपति शाहूमहाराज यांस तसें करणें पसंत वाटलें नाहीं, म्हणून त्यांनीं त्यांस कोट न बांधण्याबद्दल आज्ञा केली. त्यावरून त्यांनीं तें काम तसेंच अपुरें ठेवून बंद केलें.

१७३१ मध्यें साताऱ्याहून पुरंदरे यांनीं बाजीराव व चिमाजी आप्पा यांना यासंबंधीं उद्देशून लिहिलेलें पत्र खालीं दिलें आहे:—

" तीर्थरूप राजश्री राऊ तथा राजश्री आप्पा स्वामीचे सेवेसी. विनंति. आजि मंदवारीं प्रातःकाळीं दरबारास गेलों होतों, राजश्रीच्या आणीकहि कित्येक लोक मुजऱ्यास आले होते. तेव्हां राजश्री स्वामी बोलले कीं, ' राजश्री प्रधानपंत पुण्यास कोट बांधितात, येविषयीं पहिले हुजरे व कागद पाठविले. परंतु ते गोष्ट न ऐकतां आपलाच हेका करून किल्ला बांधितात. तस्मात् मोगलांचें पुण्याचें ठाणें बसावें असें त्यांच्या मनांत आहे कीं काय ? सिंहगड किल्ला जवळ; तेथें चिरेबंदी कोट; पक्कें काम करितात. द्वाही हुजरे याणीं दिल्ही, तथापि मानीत नाहींत आणि कोट बांधितात. राजश्री सचीव पंताचा किल्ला सिंहगड जवळ आहे. ऐशीयास सचिवाकडील किल्ल्यास मोंगलांचा मोर्चा बसवावा असें त्याचे चित्तांत आहे [ कीं काय ] हें कांहींच कळत नाहीं. तैसेंच जागा जागा किल्ले वाघोली व नांदेड व वाडी व आंबी वगैरे जागीं किल्ले बांधितात. मोंगलाची आवाई जहाली तरी यांतून एकहि जागा झुंजणार नाहीं; आणि आपलें आपल्यासच प्रतिबाधक कर्म कां करितात ? व वडीलही उगेच डोळे झांकितात. परंतु एकमेकांचा गळफास बसेल. पूर्वीं पिलाजी

जाधव वाडी बांधीत होते, तेव्हां आम्हीं मनाई करीत होतों. परंतु राजश्री चंद्रसेनराव जाधव थोराताची पाठ राखीत यामुळें वाडीस कोट जाला. शेवटीं राजश्री बाळाजीपंत धरिले. तेव्हां तीच वाडी पुरंदरास मोर्चा जाहला व मुलूख हैराण जाहला. आम्हीं सांगत होतों तें न ऐकिलें. शेवटीं त्याच गोष्टीस आलें. तसेंच हेंही कर्म आहे. राजश्री प्रधानपंतांनीं कांहीं पुण्यांत कोट बांधावा असें कांहीं नाहीं.' म्हणून बहुतश्रमी होऊन बोलले. चोरपाळतीनें बातमीहि पाठविणार आहेत. किल्ला कसा बांधितात? असें आहे. तरी स्वामीनीं राजश्री स्वामीचे आज्ञेप्रमाणें किल्ला न बांधावा. हवेली भोंवती बुरुज न घालितां चार दिवाळा मात्र करावी. जुनें काम आहे तें कांहीं फार पक्कें तो नाहीं. परंतु उगीच भयासुर दिसतें. त्यास पांढरे मातीनें भिंतीचे बाहेरील अंग सारवावें म्हणजे डोळेफोड दिसणार नाहीं. सूचनार्थ लिहिलें आहे. स्वामी खावंद आहेत. खातरेस येईल तें करावें विदित झालें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

दुसऱ्या एका बखरींतही खालील उल्लेख सांपडतो—"शके १६५२ विरोधकृतनाम संवत्सरे फसली सन ११४१ या सालीं, शाहूमहाराज छत्रपति यांजकरितां बाजीराव बल्लाळ पेशवे प्रधान यांनीं पुणें मुक्कामीं सरकारास न विचारतां वाड्याचें काम चालविलें होतें. हें वर्तमान महाराज छत्रपति यांस समजलें. मग महाराज छत्रपति यांनीं आज्ञापत्र लिहून पाठविलें कीं, 'तुम्हीं फौजेचा कोट बांधावा.' नंतर पेशवेप्रधान यांनीं स्वामीआज्ञा प्रमाण मानून वाड्याचें काम तहकूब केलें. तें अद्याप तसेंच कायम आहे."

'नव बुरजी कुसूं वाड्यास घालून आंत इमारत केली. उत्तरेस थोर करीत होते त्यास छत्रपतींनीं मनाई केली सबब दरवाजाचे खिंडार राहिलें. पुणें आहे तों शहर करावें म्हणोन आज्ञा केली.'

'चिरेबंदी कोट बांधावयास प्रारंभ केला. महाराजांनीं पत्रे व हुजरे पाठवून किल्ला गढी बांधण्याची मनाई केली. त्यावरून फिरून परवानगी घेऊन राहिले काम तें वीटबंदी केलें.'

शकावली व बखरींतील या उल्लेखावरून पेशव्यांनीं पुण्यास बंदोबस्तानें स्वतंत्र राहूं नये, अशी छत्रपतींची इच्छा होती असें दिसतें. शहराला कोट बांधल्यानें शहराची वाढ खुंटते, आणि माणूस राजधानीच्या संरक्षणाविषयीं बेफिकीरी राहून आळशी बनतो. राजधानीला कोट बांधून तिचें संरक्षण करण्यापेक्षां शत्रूला दूर

त्याच्या देशांतच डांबून धरून चेंचणें फार बरें. त्याला आपल्या राजधानीजवळ येऊं न देणें हें अधिक बरें. त्याला आपलें सांभाळतां सांभाळतां नाकीं नऊ आले म्हणजे दुसऱ्याच्या राजधानीकडे तो ढुंकून पाहतो कशाला? बाजीरावाचें लष्करी धोरण असें चढाऊ असल्यामुळें त्याला शाहूची आज्ञा अमलांत आणणें भाग होतें, व कदाचित् त्याला ती मनांतून पटली देखील असावी.

सांप्रत शनिवारच्या वाड्यास जो भव्य कोट दिसत आहे तो नानासाहेब पेशवे यांनीं आपले कारकीर्दीत शाहूमहाराज मृत्यु पावल्यानंतर बांधिला. तो इ. स. १७५५ मध्यें पुरा झाला.

शनिवारवाड्याचे आंतील इमारत सहा मजली उंच असून, तिचे चार मुख्य चौक होते व त्यांशिवाय लहान लहान चौक बरेच होते. मुख्य दरवाजे व चौक ह्यांस वेगळीं वेगळीं नांवें दिलीं होतीं. सर्व वाड्याचें काम उत्तम सागवानी लांकडाचें असून त्यांतील मुख्य दिवाणखाने व निरनिराळे महाल यांचें नक्षीकाम फार प्रेक्षणीय होतें.

हे दिवाणखाने कलमदानी आकाराचे असून, त्यांमध्यें मुख्य सभामंडप व चारी बाजूंस चार दालनें असत. सभामंडपाचें काम सुरूदार नक्षीचें असून त्याच्यावर लांकडी नक्षीदार कमानी असत. त्याच्या मध्यभागीं पक्षी व फळें ह्यांचीं लांकडी चित्रें कोरलेलीं होतीं. ह्या प्रत्येक दिवाणखान्यामध्यें सुबक तक्तपोशी केलेली असून, तिच्यावर रंगीत चित्रें काढलेलीं असत. विशेषेंकरून गणपतिरंगमहालामध्यें चित्रांचें काम फारच प्रेक्षणीय होतें. त्यांमध्यें रामायण व महाभारत ह्यांतील कथांचीं सुंदर चित्रें कोरलीं होतीं व त्यासाठीं भोजराज नांवाचा कुशल चित्रकार जयपुराहून मुद्दाम आणला होता. गणपतीच्या मखरामध्यें हस्तीदंती नक्षीकाम होतें, तें फारच मूल्यवान् होतें.

ह्या वाड्याचे सर्व चौक उत्तम चिरेबंदी बांधले असून, त्यांच्या मध्यभागीं हौद व कारंजीं असत. त्यांमध्यें हजारी कारंजें म्हणून जें होतें, तें दरबारचे वेळीं उडवीत असत. त्या वेळीं फार उत्कृष्ट शोभा दिसत असे. ह्याच कारंजावर सवाई माधवरावांनीं उडी टाकून प्राणहत्या केली! हें कारंजें उत्कृष्ट कमलाकृति असून त्याचा घेर सुमारें ८० फूट होता. त्यांत १६ पाकळ्या असून प्रत्येक पाकळींत १६ अशीं २५६ कारंजीं एकंदर उडत होतीं. रोम शहराखेरीज इतकें प्रचंड व अनेक तोट्या असलेलें आकारबंद सुंदर कारंजें दुसरीकडे कोठें आढळत नाहीं, असें तज्ज्ञ म्हणतात.

ह्या वाड्याचे मुख्य दरवाजे पांच होते. त्या दरवाज्यांचीं नांवें येणेंप्रमाणें:— मुख्य दिल्ली दरवाजा, गणेश दरवाजा, नाटकशाळेचा दरवाजा किंवा मस्तानी दरवाजा, दक्षिण दरवाजा, व खिडकी दरवाजा. हा वाडा उत्तराभिमुख असून त्याचा मुख्य दरवाजा त्या दिशेलाच होता. मराठ्यांच्या हिंदुपदपादशाहीचें ध्येय दिल्ली असल्यामुळें, त्या ध्येयाची वारंवार आठवण व्हावी म्हणून मुद्दामच मुख्य दरवाजाचें नांव **दिल्ली दरवाजा** ठेवण्यांत आलें. ह्या वाड्यामध्यें दिवाणखाने व महाल पुष्कळ होते. त्यांपैकीं जे सुप्रसिद्ध व प्रेक्षणीय होते त्यांचीं नांवें:—गणपतीचा रंग महाल, नाचाचा दिवाणखाना, आरसेमहाल, जुना आरसेमहाल, दादासाहेबांचा दिवाणखाना, थोरल्या रायाचा जुना दिवाणखाना, मुख्य दिवाणखाना, हस्तिदंती दिवाणखाना, नारायणरावाचा महाल, अस्मानी महाल इत्यादि. यांशिवाय 'मेघडंबरी' बंगला म्हणून एक लहानशी सुंदर व सुबक इमारत नाना फडणविसांनीं बांधिली होती. तिच्यामध्यें सवाई माधवराव पेशवे दुपारीं विश्रांति घेत असत. वाड्यांतील जे मुख्य चौक होते, त्यांचीं नांवें:—हौदाचा चौक, मधील चौक, बाहेरील चौक इत्यादि होतीं. 'पुणें गॅझिटीयर' मध्यें कित्येक चौकांचीं नांवें, फडाचा चौक, ताक चौक, मुदपाक चौक, पक्वान्न चौक, सावित्रीबाई व यमुनाबाई ह्यांचे चौक, इत्यादि दिलीं आहेत. परंतु त्यांचा जुन्या कागदपत्रांतही कोठें उल्लेख सांपडत नाहीं. फक्त 'फडाचा चौक' एवढें नांव नाना फडणविसांच्या कारकीर्दीमध्यें प्रसिद्ध होतें. दिवाणखाने व चौक यांशिवाय, नारायणरावांचें देवघर, रावसाहेबांचें देवघर, हीं फार प्रसिद्ध होतीं. याशिवाय जामदारखाना, जिन्नसखाना, दप्तरखाना, पुस्तकशाळा, गोशाळा, जवाहीरखाना, शिलेखाना, वैद्यखाना, मुदपाक कोठी, इत्यादि कारखान्यांची जागोजाग सोयीनें व्यवस्थित रीतीनें योजना केली होती. सर्व राजवाड्याचा बंदोबस्त उत्कृष्ट तऱ्हेचा असून, त्याच्या रक्षणासाठीं व व्यवस्थेसाठीं स्वतंत्र लोक नेमून दिलेले असत. सरकारचे वाड्यांत व वाड्याबाहेर हशम लोक व स्वार स्वतंत्र नेमून दिले होते. इ. स. १७७९ सालीं वाड्यांत बंदोबस्तासाठीं ४८० हुजूर हशम, २२९ पुरंदरकरी लोक, ३२५ कानडी प्यादे, ३४ खिजमतगार खास जिलेबी, ८२ खास बारदार, २२८ प्यादे दिंमतहाय, ७६ शागीर्दपेशा, १६९० शिलेदार व बारगीर, एकंदर मिळून ३१४४ लोक तैनातीस होते असा दाखला सांपडतो. याशिवाय वाड्यांत व वाड्याबाहेर सुमारें ३०० स्वार असत, ते वेगळेच. त्यांपैकीं १०६ स्वार वाड्याबाहेर छबिन्यास सकाळपासून सायंकाळपर्यंत असत. ही संख्या पुढें ५०० पर्यंत वाढली होती.

पुणें येथें पेशव्यांची राजसत्ता पूर्णपणें नांदत असतांना ह्या वाड्याची भरभराट व तेथील ऐश्वर्य ज्यांनीं पाहिलें असेल, त्यांचे नेत्र खरोखर दिपून गेले असतील यांत शंका नाहीं. मुख्य वाडा सातमजली होता, परंतु प्रत्येक मजल्याची उंची सरासरी ८–९ फुटांपेक्षां अधिक नव्हती. वाड्याच्या पूर्वांगास काढलेले हौदही सुंदर होते. एका हौदाच्या चारी भिंतींना कोनाडे ठेवलेले असून, त्यांत ठेवलेल्या रंगीबेरंगी दिव्यांच्या प्रकाशानें हौदांतील कृत्रिम धबधब्यावर अंधाऱ्या रात्रीं देखील इंद्रधनुष्याचा देखावा दिसण्याची योजना केली होती. बागेंत इतरत्रही लहानमोठीं कारंजीं सोडलीं होतीं. अर्थात्‌च, पेशवाईच्या वाढत्या वैभवाबरोबरच या शनवारवाड्याचें सौंदर्य हळूहळू वाढलें. बाजीरावानें प्रथम वाडा बांधला तेव्हां तो इतका भव्य व सुंदर नसला, तरी तो सर्वतोपरी सोयीस्कर, सुखावह व ऐसपैस होता. सर्व आयुष्य रणांगणावर घालविणाऱ्या या पराक्रमी पेशव्यानें पाणी पुरवठ्याची इतकी सुंदर व नमुनेदार योजना आंखून ती अमलांत आणली हें पाहून आश्चर्य वाटतें व त्याच्या चतुरस्रतेबद्दल आदर वाटूं लागतो. शनवार वाड्याचें काम पुरें होण्यापूर्वी बाजीराव पुण्यास थडफळे यांच्या वाड्यांत राहत असे. १७३६ त बाजीरावानें नवा दिवाणखाना बांधून तो उत्तर हिंदुस्थानांतील बादशाही महालाप्रमाणें जयपूरच्या कारागिरांकडून शृंगारला. मस्तानीसाठींही त्यानें जवळच स्वतंत्र महाल बांधला.

हा वाडा जळल्यामुळें याची कल्पना करण्याकरितां जुन्या शब्दचित्रावरच अवलंबून रहावें लागतें. नाहीं म्हणावयास सवाई माधवरावांच्या वेळच्या गणपति-महालांतील एका दरबाराचें चित्र छापलें गेलें आहे, त्यावरून थोडीबहुत प्रत्यक्ष ओळख पटते, व हल्लीं वाड्यांतील उकरून काढलेल्या जोतीं, कारंजीं वगैरे अवशेषावरून वाड्याची कांहीं कल्पना बांधतां येते. एका मुसलमान सरदाराच्या पत्रांत, 'बाहेरून पाहतां हा वाडा नरकासारखा दिसतो व आंत स्वर्गासारखा भासतो,' असा या वाड्याविषयीं सूचक उल्लेख आहे. बाहेरच्या भपक्यापेक्षां आंतील सुखसोयींकडे पेशव्यांचें विशेष लक्ष होतें यांत शंका नाहीं. पारसनिसांच्या इतिहाससंग्रहांत साहेब लोकांनीं केलेल्या या वाड्याच्या वर्णनाचे एकदोन उतारे आहेत. सन १७९१ सालीं सर चार्लस मॅलेट यांजबरोबर मेजर प्राइस हा वाड्यांत गेला होता. त्याच्या उल्लेखांतून खालील वाक्य घेतलें आहे. "वाड्यांतील दिवाणखाना खूप प्रशस्त व जंगी होता; पण आंत अत्यंत साधेपणा होता. लाकडांतील खोदीव कामापेक्षां शोभादायक असें त्यांत कांहींएक नव्हतें. सर्व बैठकीवर पांढरी

शुभ्र चादर एकजात पसरली होती." १८०३ सालीं लॉर्ड व्हॅलेंशिया ह्यानें दुसऱ्या बाजीरावाची गांठ शनिवार वाड्यांत घेतली, तेव्हां त्यानें केलेल्या वर्णनांतून खालील वाक्यें घेतलीं आहेत. "आम्ही जिन्याच्या तोंडाशीं पालख्यांतून उतरलों. वर चढून गेल्यावर एका लहानशा खोलींतून दरबारच्या दिवाणखान्यांत प्रवेश केला. आम्हीं जाऊन थोडा वेळ उभे राहिल्यावर पेशवे येऊन गादीवर बसले. * * * हा वाडा सामान्यरीत्या सुंदर आहे. मात्र तो अत्यंत स्वच्छ दिसतो. दरबारचा दिवाणखाना फार मोठा आहे. लांकडी खांबावर सुंदर नक्षीकाम कोरलेलें आहे." १८१८ सालीं कर्नल फिट्झ क्लॅरेन्स यानें दुय्यम रेसिडेंट मि. कोट्स याचे बरोबर जाऊन वाडा पाहिला. या वेळीं पेशव्यांची वस्ती वाड्यांतून उठली होती. तो म्हणतो—"××× आंतील चौकाच्या भिंतींवर पौराणिक देवता, हत्ती, घोडेस्वार वगैरेंचीं वेडींवांकडीं बरींच चित्रें काढलेलीं आहेत. वाड्यांतील मोठा चौक नागपूरकर भोंसल्यांच्या वाड्याच्या चौकापेक्षां अधिक सुंदर आहे. सर्व वाडा तुळतुळीत दिसतो. बाजीराव विशेष प्रसंगाशिवाय येथें येत नसल्यामुळें सर्वत्र अव्यवस्था दिसते. एका सुंदर दालनांत मार्क्विस वेलस्लीची उभी तसबीर टांगलेली आहे. दोन मोठे रंगित ग्लोब ( खगोल, भूगोल ) जवळच होते. त्यावर लॅटिन अक्षरें लिहिलेलीं असून क्षितिजें दाखविणाऱ्या पट्या रुप्याच्या होत्या. १७८८ च्या पूर्वीं इंग्लंडच्या राजानें पेशव्यांना हे ग्लोब नजर केले होते. गणपतीच्या दिवाणखान्याचें लांकडी छत गोल आहे. दालन सुमारें ५० फूट लांब व खूप उंच आहे. उंचावर चौफेर गॅलरी (मखरदारी) आहे. ही इमारत आरसेमय आहे. इंग्रजी बिलोरी झुंबरें पुष्कळ आहेत. सर्व शोभिवंत वस्तूंना गवसण्या घातल्या होत्या. वाड्यांत एक मोठें इंग्रजी घड्याळ होतें. तें मात्र बरोबर चाललें होतें! चित्रांचीं अनेक इंग्रजी पुस्तकें होतीं. जवळच एक खगोलयंत्र मोडून पडलें होतें. त्यांत सूर्यग्रहमाला वगैरे यथाप्रमाण गोलकांनीं दाखवलीं होतीं. देशी नकाशेवाल्यांनीं काढलेला एक नकाशा होता. पण बापू गोखल्याजवळ यापेक्षां अधिक चांगला नकाशा असावा, कारण त्याशिवाय इतके दिवस तो आम्हांला झुकांडी देऊन कसा पळूं शकतो!"

बाजीरावाच्या उदाहरणानें पेशवाईतील दुसऱ्या सरदारांना हुरूप चढला व त्यांनीं शनवार वाड्याच्या जवळच आपापले वाडे बांधले. मराठी राज्याचीं सूत्रें याप्रमाणें साताऱ्याहून पुण्यास आलीं. हा प्रकार ठीक झाला नाहीं. पेशवे हे छत्रपतींचे मुख्य प्रधान असल्यामुळें त्यांना छत्रपतीजवळच नेहमीं राहणें इष्ट

होतें. प्रतिनिधि, सचिव वगैरे सरदारांनीं यापूर्वींच आपापले प्रपंच निराळे थाटले असले, तरी त्यांपासून स्वराज्याचें फारसें नफानुकसान होण्यासारखें नव्हतें. कारण ते दुर्बळ झाले होते. परंतु पेशवे हे पराक्रमी, कर्तबगार व दौलतीचे मुख्य आधारस्तंभ होते. तेव्हां त्यांनीं पुण्यास आपला स्वतंत्र संसार थाटल्यामुळें राजाची व मुख्य प्रधानाची फारकत झाली. स्वराज्याच्या वाढलेल्या पसाऱ्याला सातारा हें सोयीचें राजधानीचें ठिकाण नव्हतें हें खरें. मोंगल अत्यंत प्रबल असतांना समुद्रकिनाऱ्यालगत असलेला रायगडसारखा अभेद्य किल्लाच राजधानीला योग्य होता. शिवाजीमहाराजांचें चातुर्य या निवडींत देखील दिसून येतें. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर मोंगल बादशाहीच्या पडत्या काळांत जेव्हां स्वराज्याची विस्कटलेली घडी जुळवावयाची होती, तेव्हां शत्रूपासून दूर अंतरावर एका बाजूस असलेलें सातारा शहर राजधानीकरतां सोयीचें होतें. परंतु स्वराज्याचें हिंदुपदपादशाहींत रूपांतर होत असतांना साताऱ्यापेक्षां पुणें अधिक सोयीस्कर व मध्यवर्ती होतें, हेंदेखील तितकेंच खरें. पेशव्यांना तसें वाटलें असल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. त्यांनीं केलेला फरक इष्ट व हितावह होता. परंतु त्यांनीं एकट्यांनींच पुणें येथें निराळा संसार थाटावयास नको होता. त्यांनीं शाहू छत्रपतीलाच साताऱ्याहून पुण्यास आणावयास हवें होतें. म्हणजे मराठ्यांची नवी राजधानी सोयीस्कर ठिकाणीं स्थापली जाऊन राजा-प्रधानांचा संबंध पुढें जो तुटला, तसा तुटला नसता, व पेशव्यांनीं छत्रपतींच्या राज्याचा अपहार केला हा प्रवादही बऱ्याच अंशीं टळला असता.

---

## प्रकरण ११ वें.

## ‘ माळव्याची मोहीम ’



दक्षिणेंतील स्वराज्याला बळकटी आणावी हा बाजीरावाचा विचार, परंतु ती बळकटी कोणत्या मार्गानें येईल याविषयीं शाहूच्या दरबारांत मतभेद झाला. मोंगलांचा वरून जोर झाला म्हणजे आणखी दक्षिणेंत खालीं सरकून बचावाचा बंदोबस्त करतां यावा, या उद्देशानें शिवाजी महाराजांनीं शहाजीचें तंजावरकडील राजकारण पुढें चालवून, तंजावरची गादी आपल्या नजरेखालीं ठेवली. त्यामुळें राजाराम महाराजांना जिंजीस तात्पुरता आसरा मिळून संकटकालीं मराठेशाहीचा बचाव

झाला. दक्षिणेंत निजाम स्वतंत्र होऊन बराच प्रबळ झाला होता. तेव्हां कर्नाटककडील राजकारण पुढें नेटानें चालवून निजामाला हतप्रभ करून सोडावें असें म्हणणारा एक पक्ष दरबारांत होता. प्रतिनिधि व फत्तेसिंग भोंसले हे या पक्षाचे अध्वर्यू होते. थोरल्या महाराजांची परंपरा पुढें चालवावी असा या पक्षाचा आग्रह होता. दक्षिण प्रथम निष्कंटक केल्याशिवाय दुसरीकडे लक्ष देऊं नये असें या पक्षाचें म्हणणें पडलें. परंतु दक्षिणेंत इतक्या पक्षोपपक्षांचे हितसंबंध एकमेकांत गुंतले होते कीं, दक्षिण निष्कंटक होण्यास फार काळ लागला असता व अनेक अडचणी उपस्थित झाल्या असत्या. कदाचित् यादवी जुंपून नवें हातीं येण्याऐवजीं हातचें देखील सुटण्याचा संभव होता. निजामाच्या पदरचे जाधव, निंबाळकर वगैरे मराठे सरदार निदान आपल्या जहागिरीच्या रक्षणाकरितां तरी निकरानें लढले असते. तेव्हां अशा स्थितींत जिकडे कोणाचेच जुने हितसंबंध गुंतले नव्हते, असा उत्तर हिंदुस्थानांतील नवा मुलुख काबीज करून मराठेशाहीचें वैभव वाढवावें व या राज्यवर्धनकारक मोहिमेंत देशांतील पराक्रमी सरदारांना गुंतवून यादवीचा संभवच अजिबात नाहींसा करावा, अशी बाजीरावाची योजना होती. चिटणीसकृत शाहू महाराजांच्या चरित्रांत या राजकारणी झगड्याचें फार सुंदर व मार्मिक वर्णन आहे.

" बाजीराव बल्लाळ व चिमणाजी बल्लाळ बहुत कर्ते शाहणे निघाले. राज्यवृद्धीची उमेद धरून बहुत पराक्रम करून दाखवावा. महाराजांची कृपा संपादावी म्हणोन 'आपणास हिंदुस्थानची चौथाई सरदेशमुखी साधण्याचा सुभा सांगावा' म्हणोन विनंति केली. हें महाराजांनीं ऐकून बाजीराव यांजवर बहुत संतोषी जाहले. महाराजास हिंदुस्थान साध्य करावयाचा बहुत मानस. यावरून प्रतिनिधि व सर्व मुत्सद्दी जमा करून विचार पुसिला. तेव्हां श्रीपतराव प्रतिनिधि याणीं 'पादशाहाचा तह जाला आहे......स्वामीचा मनोदय हिंदुस्थान साध्य करण्याचा आहे तोहि घडोन येईल. आधीं कर्नाटक प्रांत थोरले महाराजांनीं साध्य केलेला गेला आहे. तो साध्य सर्व फौज पाठवून करावा. नंतर ही मसलत करावी. ऐसे आमचे विचारें दिसतें' बोलले. यावरी ते समयीं बाजीराव याणीं उत्तर केलें कीं, 'प्रतिनिधि अशी मसलत काय देतात? पादशाही कमजोर जाहली. कांहीं जीव राहिला नाहीं. बखेडे बहुत जाले आहेत. पादशहा आमचे कुमकेनें पादशाही रक्षावी असें इच्छून आहे. त्यांतच त्याचेहि बखेडे मोडावे.

आपला स्वराज्य अंमल पूर्वी बसला नाहीं तो बसवावा. किलिजखान नजीक. त्याचा तह बिघडून खटला करतील याचा हिसाब काय धरावा? राज्य कर्से

करावें ? आणि थोरले महाराज याणीं जातीनें औरंगजेब शहाजादेपणांत येऊन दौलताबादची पादशाही घेऊन औरंगाबाद वसवून सुभा करून राहिले. त्याचा हिसाब न धरितां विजापूर भागानगर पादशाहींतील अंमल बसविला. व त्याचे सुभ्यांतील अंमल घेतला. यानंतरहि संभाजी महाराज याणीं सर्व दौलत फौज बुडविली......पूर्वीं मोठींमोठीं कार्यें वडिलीं केलीं तशीं न करावीं तरी मोठीं पदें कशास धरावीं? आम्हांस सनदा मात्र द्याव्या. फौज, खजीना सर्व स्वामीचे चरणांचे प्रतापें करून सिद्ध करितों. राज्य साध्य करितों. किलिजखान याचाहि शह राखून हिंदुस्थानची मसलत करितों. दोन्ही आम्ही आटोपतों. कर्नाटकची मसलत करणें त्यास पादशाही बुडविली. पूर्वींचीं राज्यें विजापूर भागानगर याजखालील मुलूख साध्य जालेच आहेत. हे घरांतील मसलत आहे. हुजुरांत व मोठे सरदार यांतील कोणीतरी रवाना होऊन मसलत जाली म्हणजे सहज साध्य होईल. हे प्रतिनिधींनीं मसलत संभाळावी. थोरले महाराजांचा संकल्प हिंदुस्थान काबीज करावे ऐसा राहिला. त्याजसाठीं स्वामींचा अवतारउदय जाला. पुण्यप्रतापहि तसाच आहे. यास्तव आधीं हें साध्य करावें आणि संकल्प शेवटास न्यावा. पादशहानीं आपण होऊन बलाऊन नेऊन तह करावा येसे दिवस श्रीनें प्राप्त केले. त्यास बाळाजीपंत नाना जाऊन सर्व राजकारणें, हिंदुस्थानचे राजे रजवाडे याची करून सिद्धता जाली आहे. महाराजांचा प्रताप जें कार्य मनीं धरिलें तें घडोन यावें ऐसा आहे. यास्तव या समयीं हा उद्योग करावा हें उत्तम आहे." ऐसे बोलिले. यावरून महाराज बहुत संतुष्ट होऊन बोलले जे "बाळाजीपंत नानाच्या उदरीं तुम्हीं जन्मलां तें युक्त आहे. तुम्हांसारखे कर्ते पदरीं असतां हिमालयापलीकडीलहि किंन्नरखंडीचे राज्य साधता येईल. मग या मसलतीचें काय अशक्य आहे? तुम्ही हिंदुस्थान प्रांतीं जावें. इकडील सर्व सरदार व हुजरात व मानकरी फौज आहे. तेव्हां निजामउन्मुल्ख याणीं शेखी केलियास पाहतां येईल व कर्नाटक प्रांतींहि फौज रवाना करून सोडितां येईल." ऐसें सांगोन महाराजांनीं बाजीराव यास वस्त्रें बहुमान व सनदा देऊन निरोप दिला."

बाजीरावाची योजना अत्यंत मार्मिक होती. नर्मदा व विंध्याद्री यांच्यामधला रानटी व अवघड प्रदेश आपल्या ताब्यांत घेऊन व विंध्याद्रींतून दक्षिणेंत येणारे सर्व घाट आपल्या कबजांत घेवून दक्षिणची पक्की नाकेबंदी करावी. म्हणजे उत्तरेकडून शत्रूचा स्वराज्यावर हल्ला होणें अशक्यप्राय होईल. बाहेरील शत्रूंचा येणेंप्रमाणें बंदोबस्त केला म्हणजे निजामासारख्या अंतर्गत शत्रूचा केव्हांही समाचार घेऊन बंदोबस्त करतां

येईल. हें सरहद्दीवरील राजकारण साधलें, म्हणजे यापुढें दक्षिणेंत मराठेशाही व उत्तरेस बादशाही अशा दोनच प्रबल सत्ता हिंदुस्थानांत नांदतील. त्यांपैकीं पुढें कोण कोणाला खाईल हा पराक्रमाचा व कालगतीचा प्रश्न. हिंदुपदपादशाहीच्या कल्पने-मुळें बादशाहींतील हिंदू प्रजाजन व मांडलिक रजपूत राजे बाजीरावाला साहाय्य करण्यास मनापासून उत्सुक झाले होते. मोंगलांनीं त्यांचा केलेला छळ व त्यांच्यावर बसविलेला जिझीया कर ते विसरले नव्हते. त्यामुळें बाजीरावाला धडाक्यासरशीं सरहद्दीचा बिकट टापू व घाट तर सर करतां आलेच, परंतु त्याशिवाय गुजराथे-पासून तों पूर्वकिनाऱ्यापर्यंतचा शत्रूच्या मुलखांतील सर्व पट्टा जवळजवळ आपल्या ताब्यांत घेतां आला.

दक्षिणेची उत्तर सीमा फार कठीण आहे. आज जसा वायव्य सरहद्दीचा प्रश्न बिकट वाटतो त्याचप्रमाणें रेलवे होण्यापूर्वी ही दक्षीण व उत्तर हिंदुस्थानांतील सरहद्द दुर्गम वाटे. प्राचीन काळीं या बिकटतेमुळेंच **दक्षीण व हिंदुस्थान** असे आजच्या हिंदुस्थानचे दोन भाग पडले होते. उत्तरेस राज्यक्रांति झाली तरी दक्षिणेस तिची झळ क्वचितच लागे. प्रथम तापी नदी, नंतर सातपुड्याचा भुल-भुलावणीचा डोंगरी प्रदेश, नंतर नर्मदा नदी व अखेर विंध्याद्रीची उभी भिंत, अशा नैसर्गिक मर्यादा दक्षिण देशाच्या उत्तरेस आहेत. निसर्गानेंच हे भव्य कोट व खंदक निर्माण केले आहेत. हा कठीण प्रदेश मराठ्यांच्या ओळखीचा झाला होता. कारण ज्या वेळीं औरंगजेब बादशाहा मराठी राज्य बुडविण्याकरितां दक्षिणेंत आसन मांडून बसला होता, तेव्हां त्याला चिमटे घेण्याकरितां व त्रास देण्याकरितां म्हणून, मराठे सरदार त्याची नजर चुकवून वर माळव्यांत थोडीशी जाळपोळ लुटमार करून तडक आपल्या घरीं परत येत असत. औरंगजेबाचें त्यामुळें फारसें वांकडें होत नव्हतें. परंतु त्याच्या मनाची मराठ्यांच्या या चोरट्या उपद्रवानें चलबिचल होई, व मराठ्यांचा उद्देशही हाच होता. मराठ्यांचा हा मागचा अनुभव बाजीरावाच्या चांगलाच उपयोगीं पडला. स. १७२२–२३ सालीं तो माळव्यांत घुसला व त्याचे सरदार होळकर, पवार व जाधव यांनीं झटक्यासरसे तांडा, नालछा, भैरव वगैरे विंध्याद्रीचे घाट काबीज केले. बाळाजीपंतांच्या कारकीर्दीच्या अखेरीसच मल्हारराव होळकरानें पवाराच्या मदतीनें माळव्याचें राजकारण सुरू केलें होतें. बाळाजीनें दिल्लीहून परत येतांना बाजीरावास मुद्दामच उत्तरेंत ठेवलें होतें. तेव्हांपासूनच हें माळव्याचें राजकारण आंतल्या आंत शिजत होतें. परंतु त्याला रंग १७२३ पासून

पुढें चढला. १७२३-२४ च्या दरम्यान केव्हां तरी मल्हाररावानें आपलें ठाणें इंदुरास दिलें व उदाजी पवारानें धारचा कबजा केला.

आग्रा व माळवा हे दोन सुभे या वेळीं जयसिंगाकडे वहिवाटीला होते. आग्रा जयपूरच्या लगत असल्यामुळें, तो त्यानें खास आपल्या दिमतीखालीं ठेवला व माळव्यावर त्यानें आपल्या तर्फे राजा गिरधरची नेमणूक केली. परंतु पुढें गिरधर व त्याचा भाऊ दयाबहाद्दुर हे स्वतंत्रपणें माळव्याचा कारभार पाहूं लागून जयसिंगाचें ऐकेनासे झाले. हे दोघेही बंधू पराक्रमी होते व पादशाहीच्या इतर लहानमोठ्या सुभेदाराप्रमाणें पराक्रमाच्या जोरावर आपलीं स्वतंत्र राज्यें माळव्यांत स्थापण्याचा त्यांनीं उपक्रम केला. जयसिंगाचें व गिरधरचें त्यामुळें वांकडें आलें. तेव्हां इंदूरचा प्रसिद्ध जमीनदार चौधरी राव नंदलाल मंडलोई याच्या मार्फत जयसिंगानें मराठ्यांशीं बोलणें लावलें. मराठे अशाच एखाद्या अनुकूल संधीची वाट पहात होते. नंदलाल मंडलोईप्रमाणें बढवाणीचा ठाकूर अनुपसिंग याची जानेवारी १७२३ त बाजीरावानें भेट घेऊन त्याला आपल्या बाजूला अनुकूल करून घेतलें. मराठ्यांची व राजा गिरधरची सारंगपूर येथें फार मोठी लढाई होऊन गिरधर लढाईंत मारला गेला. या लढाईंत चिमाजी अप्पा जातीनें हजर होता. बाजीराव राखीव फौज घेऊन, मल्हाररावांचा वेळ पडल्यास पाठपुरावा करतां यावा, म्हणून माळव्यांतून दक्षिणेस जाणारी वाट रोखून उभा होता. होळकरांच्या कैफियतींत खालील वर्णन आहे.

"रजपूत रजवाडे यांचा इरादा, कसेंहि करून, सर्वांनीं एकदिल होऊन बादशाहीस धक्का द्यावा. सवाई जयसिंगास पुढें करून दक्षणी घोडेवाले यांस बगलेंत घेऊन, देवदर्शनाचें मिसें उज्जनीस आले. एकाएकी उघड होतां नये. सबब इंदुरकर मंडलोईस मल्हारजी होळकरांकडे पाठविलें, कीं, तुम्हीं जुवामर्दीचा इरादा धरला आहे त्यापक्षीं तुम्हांस तमाम राजेरजवाडे लहानमोठे सामील करून देऊं. दयाबहादुर, सुभा-उज्जन पादशाही आहेत, त्यांचें पारिपत्य करून धारा उज्जन येथें अंमल तुमचा होऊन पुढें चाल चालू झाली म्हणजे एक समयावच्छिन्न लहान मोठे रजवाड्यांचे वकील तुम्हांपाशीं आणतो. अशी मसलत करून इंदूरचे जमीनदार मल्हारजीकडे पाठविले. मल्हारजी व बाजीराव यांनीं मसलत करून बाजीरावास माघारे पुण्यास रवाना करून, आपण सडा, घोडा राऊत मर्दांना उतरावयाचे उद्देशांत, तो नंदलाल मंडलोई दोनशें स्वारानीशीं येऊन दाखल झाले. भेटी झाल्या. सवाई जयसिंगांनीं रवानगी करते–समयीं ते पर्याय बोलण्यांत आले, ते सर्व बोलून आशा दुराशाही विशेष दाखविली. त्यास मल्हारजींनीं आज्ञा केली 'आम्हांस

घांटांतील वाट निटोप्याची दाखवावी. दोनप्रहरचे संधीस आम्हांस त्याजवर नेऊन सोडावे, इकडे दयाबहाद्दर धारचे मुक्कामीं येऊन घाटाचा बंदोबस्त करून होते. परंतु इंदूरकर जमीनदार व वढवाणीकर या उभयतांनीं अनोळखी घांटवाट काढून सुभ्याकडील बंदोबस्त जागचे जागींच राहून, नर्मदा उतरून, सूर्योदयापूर्वी घाट चढोन गेले. उदाजी पवारहि त्याच वाटेनें उतरून घांटावर होळकरांस सामीळ झाले. उन्हाळ्याचे चैत्राचे दिवस अदकोशावरून 'हर हर महादेव' करून घोडे घातले. बाहेरचे बाहेर एकसहा कत्तल केली. तोफखाना आपलासा केला. पायदळ कडब्यासारखें कापलें. दयाबहादर पांचहजार स्वार घेऊन आला ते नाहींसें करून दयाबहाद्दुराचें डोकें हत्तीवर कापलें. विठोजी बुळे याजपाशीं दोन हजार स्वार मागें ठेवून मल्हारराव आठहजार स्वारांनिशीं उज्जनीस येऊन अंमल चालू केला. कांहीं एक अवघड पडलें नाहीं. एवढा सुभा एका छाप्यांत बुडविला. हा दक्षण्यांचा बेत काळ श्रीमंतांचा, **प्रताप मल्हारजींचे तलवारीचा.** रजवाड्यांचे वकील आले त्यांस घेऊन पुण्यास आले, तेथें वकीलांचीं बोलणें होऊन बाजीराव यांजला समागमें घेऊन माळव्यांत आले ''

राजा गिरधराच्या मृत्यूनंतर कांहीं थोडे दिवसपर्यंत त्याचा मुलगा भवानीराम, व नंतर त्याचा भाऊ दयाबहाद्दुर यास बादशहानें माळव्याचे सुभेदार नेमलें. बाजीराव या वेळीं निजामाशीं लढण्यांत गुंतला असल्यामुळें त्याला ताबडतोब माळव्यांत जातां आलें नाहीं. तरी माळव्यांतील लढाई होळकर व पवार यांनीं नेटानें पुढें चालविली व आपलें आसन ढळूं दिलें नाहीं. मंडलोई वगैरे माळव्यांतील प्रमुख जमीनदारांना आपल्या बाजूला वळविण्यासाठीं त्यांनीं शिकस्तीचे प्रयत्न केले. दयाबहाद्दुर अत्यंत शूर होता. दक्षिणेंत निजामाशीं घनघोर युद्ध चालूं असल्यामुळें बाजीरावला माळव्याकडे फारशी कुमक पाठवितां येईना व स्वतः त्याला उत्तरेस जातां येईना. तरी त्यानें चिमाजीस १७२८, ३० व ३१ या तीन सालांत माळव्याच्या स्वारीवर पाठविलें. चिमाजीची स्वारी झाली म्हणजे प्रत्येक खेपेस दयाबहाद्दुरचें पाऊल मागें पडे. १७२८ पासून माळव्याच्या हालचालींत होळकर-पवारांच्या बरोबरीनें राणोजी शिंद्याचें नांवही तत्कालिन कागदपत्रांत प्रामुख्यानें आढळतें. यावरून माळवा जिंकण्याच्या कामीं होळकरांची तरवारच १७२८ पूर्वी तरी विशेष चमकली असें दिसतें. १७३१ सालच्या स्वारींत दयाबहाद्दुर मारला गेला. ३० नोव्हेंबर १७३१ रोजीं ही लढाई धारजवळ तिरला गांवीं झाली. ही बातमी कळतांच बाजीराव नर्मदा उतरून माळव्यांत गेला व तेथील कारभाराची त्यानें

व्यवस्था लावली. 'निमें स्वराज्याचा अंमल पेशव्यांचे मार्फत हुजूर सरकारांत यावा, निमेंत फौजेचा खर्च करून, पेषकशी येईल ते हुजूर यावी ऐसे तह करून दिले. शिंदे, होळकर व पवार या स[illegible]शीं तह केला कीं, जो मुलुख सरकारांत येईल त्याचे हिस्से करून फौज जमा करून एक विचारें चालावे. हिस्से केले त्यांत शेंकडा ३१ रु. सरकार एक हिस्सा, शिंदे रु. ३० एक हिस्सा, होळकर रु. ३० एक हिस्सा, पवार रु. ९ याप्रमाणें करार करून फौजा ठेवून दिल्लीस जयसिंग राजासुद्धां जाऊन पादशहाचे दौलतीविषयीं चाकरींत उणें पडो देऊं नये.' माळवा जिंकतांना पेशव्यांना जयसिंगाचें फार साहाय्य झालें यांत शंकाच नाहीं व म्हणूनच बाजीरावनें केलेल्या अधिकारपत्रांत शिंदे, होळकर, पवारांनीं जयसिंगाची चाकरी वेळ पडल्यास बजवावी असें नमूद केलें आहे. बादशहापासून तर राजरोस माळव्याची सुभेदारी मागून घ्यावयाची असें बाजीरावचें धोरण ठरलें होतें. बादशाही बुडवूं नये, ही शाहूची इच्छा अशानें मानली जात होती, व लोकांत बादशाहीबद्दल जो आदर वसत होता त्यालाही धक्का न लावल्यासारखें अशानें होत होतें. प्रथम जबरीनें बादशाही मुलुख जिंकून आपल्या ताब्यांत घ्यावयाचा व मग उजागरीनें बादशहाजवळ त्या प्रांताच्या सनदा मागून, वरपांगी बादशाहीचे कुलमुखत्यार म्हणून परंतु अंतर्यामीं स्वतंत्र म्हणून, त्या प्रांताचा कारभार हांकावयाचा हें शहाणपणाचें धोरण बाजीरावनें अमलांत आणलें. त्या परिस्थितींत दुसरा मार्गच त्याला मोकळा नव्हता.

१७३२–३३ सालीं होळकर व शिंदे यांच्या ताब्यांत माळव्यांतील जो मुलुख होता त्याची याद खालीं दिली आहे. पांच परगणे व १३॥ सरकारें पेशव्यांच्या ताब्यांत या वेळीं आलीं असून तीं त्यांनीं शिंदे व होळकर या प्रमुख सरदारांत वांटून दिलीं. पवारांचा हिस्सा यांतच सामील असावा.

" यादी XXX सन सलास सलासीन (इ. स. १७३२–३३) जमा साल मजकूर महालानिहाय सुभा प्रांत माळवा, दफाते पत्रें छ. १० सफर, सरंजाम राजश्री मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे दिंमत राजश्री चिमणाजी बल्लाळ महाल बितपशील:—

**५ किता परगणे मजकूर.**

१ परगणे डोंगरपूर याचे वांटणीपैकीं एकूण महाल.

१ परगणे दोहाद.

१ परगणे झालोद.
१ परगणे सुप.
१ परगणे आळी.

५

१३॥ कित्ता सरकारें.

१ सारंगपूर व उज्जेन.
१ सरकार मंदोसर.
१ सरकार पिंडावा कोळी गागुर्णी.
१ सरकार भेलसें.
१ सरकार मांडवगड.
१ सरकार चंदेरी बुदरुक व खुर्द.
१ सरकार आढयाबाद.
१ सरकार अलमगीरपूर.
१ सरकार धाकोणी.
१ सरकार गढें.
१ सरकार शाहाबाद
०॥० सरकार हांडेपैकीं महाल ७ एकूण निमे.
१ सरकार कोटे.
१ सरकार बुंदी.

१३॥०

राजा गिरधर व दयाबहाद्दुर यांच्या सुभेदारींत माळव्याची रयत फार गांजली होती. विंध्याद्रीच्या टापूंत पूर्वीपासून भिल्ल लोकांचें वास्तव्य. वाटमारी हा पोटाचा धंदा व लुटालूट हें त्यांच्या उपजीविकेचें मुख्य साधन! सुभेदार कमी असला म्हणजे घांट चढून प्रांत लुटावयाची हिंमत या भिल्लांना होत. परंतु दयाबहाद्दुरच्या कारकीर्दीत त्याचेच लहानमोठे अधिकारी व शिपाई-राजरोस प्रजेला लुटूं लागले. मग पेंढाऱ्यांचें फावलें असलें तर त्यांत नवल. या नामधारी बादशाही अंमलाला कंटाळलेल्या प्रजेनें मराठ्यांचें मोठ्या नें स्वागत केलें. मराठ्यांनीं प्रांताचा बंदोबस्त उत्तम ठेवला व बादशाही

धारे कायम केले. जमीनदार व ठाकूर यांच्या हक्कांचें संरक्षण केलें व त्यांच्या वंशजांस मान्यता देऊन त्यांना संतुष्ट केलें. ज्या जमीनदारांनीं मराठ्यांचा अधिकार मानला नाहीं, त्यांच्या जहागिरी जप्त करून त्या आपल्या हाताखालील अधिकाऱ्यांस दिल्या. त्यामुळें मराठी सत्तेला अनुकूल असलेला व मराठ्यांशीं हाडामांसांचा संबंध असलेला घरंदाज वर्ग माळव्यांत निर्माण झाला. मराठ्यांच्या यशावरच या वर्गाची ठाकुरकी असल्यामुळें, त्यांनीं मराठ्यांच्या पुढील राजकारणाला चांगली मदत केली. सर्व प्रांतभर मात्र त्यांनीं जुने मोंगल व रजपूत अंमलदार काढून टाकून त्यांच्या जागीं आपले विश्वासाचे दक्षिणी अंमलदार नेमले. हें नवें राज्ययंत्र निर्माण झाल्यामुळें मराठ्यांच्या ताब्यांत माळवा प्रांत पुरतेपणीं आला. बादशाहातर्फे नेमला गेलेला माळव्याचा नवा सुभेदार इतका नामधारी बनला कीं, माळव्याच्या बाहेर राहूनच त्याला आपले हुकूम सोडावे लागत, व सोडलेले हुकूमही दप्तरांतील कागदांतच कायमचे वस्ती करून राहत. शिंदे-होळकरांच्या पराक्रमी फौजा देशांत नांदत व मिरवित असतां मोंगल सुभेदाराच्या हुकुमाची तामिली तरी कोण व कशी करणार ? उलटपक्षीं माळव्यांत कायमचें ठाणें देऊन राहिलेलें मराठी सैन्यच मधून मधून माळव्याच्या उत्तरेस झांशी, ग्वालेर—आग्रा प्रांताकडे पैशाअडक्याची अडचण पडल्यास, फेरफटका मारून येऊं लागलें. आपणच आधीं शत्रूच्या मुलुखावर चढाई करून जाऊन, शत्रूंना घरच्या बंदोबस्तांत गुंतवून ठेवणें व आपल्याकडे वांकडा डोळा करून पाहण्याची संधि देखील त्यांना लाभूं न देणें, यांतच मराठ्यांची रणनीति सांठविली आहे. त्यांच्या आरंभींच्या मोहिमा पळत्या स्वरूपाच्या असून थोड्याबहुत लुटीपेक्षां त्यांच्या पदरांत अधिक कांहींच पडत नसे. परंतु त्यामुळें शत्रूंना त्यांचा धाक बसे व ध्यानीं, मनीं, स्वप्नीं सर्वत्र त्यांना मराठे दिसूं लागत. आणि याप्रमाणें एकदां चंचुप्रवेश झाल्यानंतर क्रमाक्रमानें आपलें सर्व चंबूगवाळें आंत टाकण्याची विद्या ब्राह्मणी अमलांत सर्व मराठे सरदारांना ठाऊक झाली होती.

## प्रकरण १२ वें.

# छत्रसाल बुंदेला



बुंदेलखंड प्रांत फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे. यमुना व नर्मदा या दोन नद्यांमध्यें त्याचा विस्तार आहे. काशी येथील एका सूर्यवंशी राजानें या प्रांतांत महोबा येथें आपली गादी स्थापन केली. त्याच्या वंशांत रुद्रप्रताप नांवाचा एक महा पराक्रमी पुरुष होऊन गेला. त्यानें ओर्छा हें नवीन शहर वसवून बुंदेल्यास विशेष महत्व आणलें. ह्याला बारा पराक्रमी व तेजस्वी पुत्र होते. या पुत्रांनीं बुंदेलखंडांत आपापलीं स्वतंत्र राज्यें स्थापन केलीं. परंतु मोंगल अंमलाखालीं त्यांचें स्वातंत्र्य मर्यादित झालें. मोंगल बादशाहा त्यांच्या राज्यकारभारांत वाटेल तशी ढवळाढवळ करूं लागले. उदाहरणार्थ, १६०६ सालीं जहांगीर बादशहानें रामचंद्रसा यास गादीवरून काढून ओर्छाचें राज्य त्याचा धाकटा भाऊ वीरसिंहदेव यास दिलें. पुढें रामचंद्रसानें आपली मुलगी जहांगीर बादशहास अर्पण करून त्याची मर्जी प्रसन्न करून घेतली. त्यामुळें बादशाही कृपा होऊन रामचंद्रसाला चंदेरीचें राज्य मिळालें. वीरसिंहाचा व शहाजादा सेलीम यांचा स्नेह फार जुना होता. सेलीमनें अकबराविरुद्ध बंड केलें तेव्हां त्याला वीरसिंहानें साहाय्य केलें होतें. त्याचप्रमाणें अबूल फजल यास सेलीमच्या आज्ञेनें पकडून ठार मारण्याची कामगिरीही वीरसिंहानें बजावली होती. या महत्वाच्या कामगिरीबद्दल त्याला सेलीमनें बादशाहा होतांच ओर्छाचें राज्य बक्षीस दिलें. वीरसिंहाचा चुलतभाऊ चंपतराय हा महोबा येथें त्या वेळीं राज्य करीत होता. सारांश, एकाच कुळांतले पुरुष त्या वेळीं बुंदेलखंडांतील निरनिराळ्या भागांवर राज्य करीत होते. या सर्वांत चंपतराय अत्यंत शूर, स्वदेशाभिमानी आणि स्वधर्माभिमानी होता.

जहांगीर मरण पावल्यानंतर सर्व बुंदेले राजांनीं एकत्र होऊन दिल्लीपतीचें सार्वभौमत्व झुगारून देण्याचा निश्चय केला. या संघाचें पुढारीपण चंपतरायानें घेतलें होतें. शहाजहान बादशाहानें बाकीखान नांवाचा सरदार त्याच्यावर पाठविला, परंतु चंपतरायानें अद्वितीय पराक्रम करून बादशाही फौजेचा पराभव करून त्यास पिटाळून लावलें. या लढाईंत चंपतरायाचा मुलगा सर्वाहन मारला गेला. पुढें शहाजहानानें बुंदेलखंड जिंकण्याचे अनेक डाव टाकून पाहिले,

परंतु ते सिद्धीस गेले नाहींत. तेव्हां त्यानें चवताळून आगरा येथून महाबतखान, दक्षिणेंतून खानजहान लोदी, आणि अलाहाबादेहून अबदुल्ला खान, असे तीन मोठे खान तीन बाजूंनीं एकदम बुंदेलखंडावर रवाना केले. हे तिघेहि नामांकित सेनापती असून त्यांच्याजवळ जंगी फौज होती. त्यांच्याशीं समोरासमोर सामना घेणें चंपतरायला शक्य नव्हतें. त्या प्रसंगीं बुंदेल्यांनीं पहाडांचा व दऱ्याखोऱ्यांचा आश्रय घेऊन मुसलमानांस त्राहि भगवान करून सोडलें. शेवटीं शहाजहानानें कंटाळून बुंदेले राजांशीं तह केला व वीरसिंहाचा मुलगा पहारसिंह यास ओर्छाचा राजा म्हणून कबूल केलें, व चंपतरायास कुंच परगण्याची जहागीर बक्षीस दिली. दुर्दैवानें पुढें बादशाहीच्या भांडणांत या बुंदेल्यांची एकी भंग पावली. शहाजहान आजारी पडला तेव्हां त्याच्या पुत्रांत जो भयंकर कलहाग्नि भडकला, त्या वेळीं पहारसिंहानें दाराचा पक्ष उचलला तर चंपतराय औरंगजेबास जाऊन मिळाला. सामूगड येथील लढाईंत चंपतरायानें पराक्रमाची शिकस्त केली. त्यामुळें औरंगजेबानें बादशाहा झाल्यावर त्यास बाराहजार स्वारांची मनसबदारी देऊन पहिल्या दर्जाच्या उमरावांत त्याचें नांव दाखल केलें. परंतु औरंगजेबाच्या कपटी स्वभावाला काफर हिंदूंचा उत्कर्ष व पराक्रम मनांतून कधींच सहन होत नसे. त्यामुळें कांहीं तरी निमित्त काढून त्यानें चंपतरायाचा एकदां भर दरबारांत अपमान केला. ह्या अपमानाचा सूड घेण्याकरितां चंपतराय बुंदेलखंडांत परत गेला व त्यानें सैन्याची जुळवाजुळव चालविली. परंतु त्याची तयारी होण्यापूर्वींच औरंगजेबानें त्याच्यावर स्वारी केली, आणि बुंदेल्यांत युक्तीप्रयुक्तीनें फूट पाडून त्यांना झोडून काढलें. १६६४ त एका जंगलांतून आपल्या लहानशा फौजेनिशीं लपतछपत चंपतराय जात असतां वाटेंत त्यास मोंगलांनीं गांठलें. चंपतरायानें व त्याच्या मोजक्या अनुयायांनीं जिवावर उदार होऊन बादशाही फोजेशीं लढाई दिली. त्या प्रसंगीं तो स्वातंत्र्येच्छू महावीर धारातीर्थीं शयन करता झाला.

त्याच्यामागें त्याचा पुत्र छत्रसाल यानें हें स्वातंत्र्ययुद्ध नेटानें पुढें चालविलें. चंपतराय मरण पावला तेव्हां तो केवळ १४ वर्षांचा होता. परंतु दक्षिणेंत प्रथम शहाजी व नंतर त्याचा पुत्र शिवाजी यांनीं मुसलमानांशीं जें स्वातंत्र्ययुद्ध चालविलें होतें त्याची हकीकत त्याला ऐकून ठाऊक झाली होती. शहाजी व शिवाजी यांच्या आयुष्याशीं चंपतराय व छत्रसाल यांची तुलना करतां ती उपमा पूर्णोपमा ठरते. चंपतराय व शहाजी यांनीं मुसलमानांशीं युद्ध केलें, परंतु अखेरीस मानाची तडजोड करून अर्धवट स्वतंत्र अशी जहागिरीवजा राज्यें त्यांनीं कमावलीं व आपणांस बादशाहीचे

मनसबदार म्हणवून घेतलें. शिवाजी व छत्रसाल यांनीं स्वातंत्र्याचें कंकण बांधून मुसलमानांशीं धर्मयुद्ध चालविलें व प्रायः त्यांत यश मिळविलें. छत्रसालाची स्वदेश-भूमि दिल्लीच्या फार जवळ असल्यामुळें, शिवाजी महाराजांसारखें उज्वल व कलंक-रहित यश त्यास प्राप्त झालें नाहीं हें खरें, परंतु त्यामुळें त्याला व त्याच्या प्रयत्नांना कमीपणा येत नाहीं.

महाराष्ट्रवीर शिवाजी याची कीर्ति श्रवण करून छत्रसालास त्यास भेटण्याची अत्यंत उत्कंठा लागली. प्रथम पत्रव्यवहार करून भेटीची जागा व वेळ निश्चित करून, नंतर त्यानें ठरलेल्या संकेतानुरूप शिवाजीमहाराजांची भीमा नदीच्या कांठीं मोठ्या प्रेमानें भेट घेतली. छत्रसालाचा उत्साह, स्वातंत्र्यप्रीति आणि धर्मप्रेम पाहून महाराजांना आनंदाचें भरतें आलें व त्याला आपल्या बंधूप्रमाणें लेखून महाराजांनीं अमोल उपदेश केला, व युद्धनीति सांगितली. यवन फार माजले असून ते धर्माचा उच्छेद करीत आहेत; तेव्हां त्यांचा युक्तीनें संहार केल्याशिवाय स्वातंत्र्य लाभणार नाहीं, व धर्मावरचें संकट टळणार नाहीं. महाराजांनीं छत्र-सालाला याप्रमाणें शिकवणी देऊन एक सुंदर तलवार इनाम दिली व प्रेमपूर्वक त्याची बुंदेलखंडांत परत रवानगी केली. छत्रसालाला महाराजांपासून स्फूर्ति लाभली व त्याचे बाहू स्फुरण पावूं लागले. तो परत बुंदेलखंडांत आला व त्यानें मोंगलांशीं निकराचा सामना घेतला. त्याचे गुरु श्रीप्राणनाथ प्रभु त्यास वारंवार प्रोत्साहन देत व बुंदेल्यांच्या मनांत उत्साह व क्षात्रतेज उत्पन्न करीत. त्यांच्या उपदेशामुळें बुंदेलखंडांतील अनेक लहानमोठे जहागीरदार छत्रसालानें सुरू केलेल्या स्वातंत्र्य-युद्धांत सामील झाले. छत्रसाल बादशाही मुलखांत लुटमार करून एकामागून एक डोंगरी किल्ले सर करूं लागला. थोड्याच अवधींत छत्रसालाची सत्ता व सामर्थ्य फार वाढलें. तेव्हां औरंगजेबानें बुंदेलखंड जिंकण्याची कडेकोट तयारी केली. रणदुल्ला खानास फौजेवरील अधिकार दिला, व त्यास बुंदेलखंडाच्या स्वारीवर पाठविलें. गड-कोटा येथें उभय सैन्याची गांठ पडून शर्थीची झुंज झाली. मोंगल सैन्य उधळलें व रणदुल्लाखान पाठ दाखवून रणांगणांतून पळून गेला. तेव्हां बुंदेले दिल्लीवर चालून येतात कीं काय अशी बादशहास भीति पडली, व त्यानें तुहवरखाननामक शूर व चतुर सरदा-राची बुंदेल्यांवर रवानगी केली. परंतु त्याचें चातुर्य कामीं न पडतां त्याचा मोड झाला. कारण त्याला बुंदेल्यांत भेद पाडतां आला नाहीं. छत्रसाल बुंदेलखंडाचा सार्वभौम राजा समजला जाऊं लागला व बुंदेले सरदारच नव्हे, तर आसपासचे मुसलमान सरदारदेखील त्याला करभार देऊन आपल्या मुलखांत स्वास्थ्य राखूं लागले.

इतका त्याचा सर्वत्र वचक बसला. बादशहानें यानंतर शेख अन्वरखानावर बुंदेलखंडाची मोहीम सोंपविली. परंतु तोदेखील युद्धांत पराभव पावून छत्रसालाच्या हातीं लागला. त्यामुळें सवा लाख रुपये दंड भरून त्याला कैदेंतून आपली सुटका करून घ्यावी लागली. बादशहानें भर दरबारांत अन्वरखानाची विटंबना केली व बुंदेल्यांचा समाचार घेणारा एकही सरदार दरबारांत नाहीं कीं काय, असा निकराचा प्रश्न सरदारांपुढें टाकला. बादशहाचा वैताग पाहून मिरझा सदरुद्दीन यानें ती कामगिरी आपल्या शिरावर घेतली, परंतु त्याच्या दरबारांतील गर्जना अखेर वल्गनाच ठरल्या. औरंगजेबाचीं साम-दाम-दंड-भेदादि सर्व कारस्थानें फुकट गेलीं, आणि मुसलमान सरदार छत्रसालापुढें टेंकीस आले. अखेर दिलेरखानानें त्याच्या बरोबर बादशहातर्फे दोस्तीचा तह केला. औरंगजेबासारखा रावण छत्रसालापुढें निरुपायानें नमला. औरंगजेबाच्या मृत्युनंतर बहादूरशहानेंही छत्रसालचें स्वातंत्र्य मान्य केलें. यानंतर छत्रसालानें पन्ना येथें आपली राजधानी केली व मोंगल बादशाहीवर आपली छाप ठेऊन स्वतंत्रपणें बुदेलखंडाचा कारभार त्यानें सुरू केला. छत्रसालाला दीर्घायुष्य लाभल्यामुळेंच त्याला आपलें ध्येय तडीस नेतां आलें. या वीरानें शिवाजी महाराज, संभाजी महाराज, राजाराम महाराज, धाकटा शिवाजी व शाहू महाराज, अशा एकामागून एक पांच मराठे छत्रपतींच्या कारकीर्दी आपल्या डोळ्यांनीं पाहिल्या. तो वृद्ध झाला होता व नवी दगदग त्याच्यानें अगदीं होत नव्हती. परंतु बाजीराव पेशव्यानें मोंगल बादशाहीवर यशस्वी व जोरदार आक्रमण केलेलें पाहून त्याला अत्यानंद झाला. आपलीं हिंदुपदपादशाहीचीं स्वप्नें खरीं होणार असें त्याला वाटूं लागलें. बाजीरावाविषयीं त्याच्या मनांत प्रेम उत्पन्न झालें. संभाजीच्या वधाचा सूड मोंगल बादशाहीवर उगविल्याखेरीज बाजीराव राहणार नाहीं, अशी त्याची खात्री झाली. जयसिंगाप्रमाणें त्यानेंही मराठ्यांशीं गुप्त करार करून त्यांच्या उत्तरेंतील कारस्थानाला आपली अनुकूलता दर्शविली. उघड करार किंवा तह कोणीच केले नव्हते. कारण बादशहाची भीति दोघांनाही वाटत होती.

रजपूत राजे व मराठे यांची एकी होऊन ते बादशाही बुडविण्याचा विचार करूं लागले. मराठ्यांच्या स्वाऱ्या दिल्लीच्या रोखानें होऊं लागल्या, आणि रजपूत राजे बादशाही आज्ञा धुडकावून लावूं लागले. प्रत्येक रजपूत राजा आपला राज्यविस्तार करून स्वतंत्र होण्याच्या मार्गास लागला. भोंवतालच्या बादशाही मुलुखावर प्रत्येकजण हळूहळू आक्रमण करूं लागला. तेव्हां बादशहानें महंमदखान बंगष या शूर अफगाण सरदारास माळव्याची सुभेदारी सांगून, मराठ्यांना व रजपुतांना

शिक्षा लावण्याचें काम त्याच्यावर सोंपविलें. बादशहाच्या नांवानें फर्रुखाबाद नांवाचें नवें शहर स्थापन करून तो तेथें स्वतंत्र नवाब बनला होता. हाताखालीं पांच सात हजार अफगाण लोक वागवून, तो ज्याच्याकडून भाकरी मिळेल त्याची चाकरी बजावीत असे. सय्यदांच्या कारकीर्दींत त्यानें अनेक जहागिऱ्या संपादन केल्या असून तो गबर बनला होता. परंतु पुढें तो सय्यदांवरच उलटला आणि त्यानें अलाहाबादेची सुभेदारी नव्या बादशहाकडून मिळविली. अलाहाबादची सुभेदारी प्राप्त झाल्यामुळें बुंदेलखंड–आग्रा प्रांतांत त्याचा शह लागू झाला. त्यामुळें बुंदेलखंडच्या छत्रसाल राजाशीं त्याचा सामना होणें क्रमप्राप्त झालें. कारण छत्रसालानें पन्ना येथें आपली राजधानी स्थापन करून मोंगल बादशाहीच्या उतरत्या काळांत आपलें राज्य वाढविण्याचा सपाटा सुरू केला होता. कोणीही त्या वेळीं हिंदुस्थानांत आपलें राज्य वाढविलें, म्हणजे त्या प्रमाणांत बादशाही मुलुख कमी व्हावयाचा. तेव्हां प्रत्येक सुभेदाराची व मांडलिक राजाची वाढती महत्वाकांक्षा बादशाहीच्या वैभवावरच घाव घालीत असे. त्यांतल्या त्यांत एखाद्या मुसलमान सरदारानें असा राज्यवर्धनाचा व स्वातंत्र्याचा प्रयत्न केला म्हणजे बादशहाला वाईट वाटत असलें, तरी त्याला व इतर मुसलमान सरदारांना एवढें समाधान लाभत असे कीं, ताटांतलें वाटींत सांडलें काय व वाटींतलें ताटांत सांडलें काय, एकच ! कारण प्रदेशाचा ताबा कोणातरी मुसलमानांच्या हातीं राही. शिवाय एकाला नवा घास गिळून पचवितां आला म्हणजे इतर मुसलमान सरदारांना त्याचें अनुकरण करण्यास व उदाहरण गिरविण्यास उत्तेजन येई. परंतु एखाद्या हिंदू राजानें तोच प्रयत्न केला म्हणजे बादशहा तर क्रुद्ध होईच, पण बादशाहीचे इतर बंडखोर मुसलमान सरदार देखील संतापून त्या हिंदू राजावर चाल करून जात व आपल्या ऐक्याच्या जोरावर त्याचा पराभव करीत. बादशाही मुलुख काफर हिंदूंच्या हातीं गेलेला त्यांना कसा रुचावा व उघड्या डोळ्यांनीं तो असह्य भासणारा व पूर्वी अशक्य गणला गेलेला अत्याचार त्यांनीं कसा सहन करावा ? द्वेषाच्या भरांत पूर्वी ह्याच मुलुख हिंदूंचा असे, ही गोष्ट ते साहजिकच विसरत.

बुंदेलखंडांत छत्रसाल व बंगष यांचें युद्ध सुरू झालें. छत्रसालानें प्रथमारंभीं तरी बंगषास चांगलाच हात दाखविला. कारण या वेळीं रजपुत राजांची एकी झाली होती. कोणी उघड तर कोणी लपून छपून छत्रसालास मदत करूं लागला. बंगषाचा मुलगा पीरखान यास एका लढाईंत बुंदेल्यांनीं ठार मारलें, व त्याच्या फौजेचा धुव्वा उडविला. त्यानंतर महंमदखान बंगषानें आपला दुसरा मुलगा

काईमखान व सरदार दलेलखान यांच्या हाताखालीं मोठी फौज देऊन त्य बुंदेल्यांवर चालून जाण्याची आज्ञा केली. या लढाईंत देखील कडव्या अफगाणां बुंदेल्यांनीं पराभव केला व दलेलखानास ठार मारलें. तेव्हां बंगषानें न मोहीमेची फारच कडेकोट तयारी केली. दिल्लीपति व त्याचा वजीर खानडौर यांनीं त्यास सर्वतोपरी मदत केली. उलटपक्षीं, छत्रसालाची फौज पूर्वी लढायांत यश मिळवून पातळ झालेली. अशा विषम युद्धांत त्याचा पराभव हें साहजिक होतें. रेवाच्या दक्षिणेस वीस मैलांवर असलेल्या जैतपूर गांवानज दोन्ही फौजांची अत्यंत निकराची लढाई झाली. बंगषाचा सेनासागर लोटल्यामु बुंदेल्यांनीं कच खाल्ला. छत्रसाल इतका वयोवृद्ध झाला असूनही सैन्याच्या अग्रभा भीष्माचार्यांप्रमाणें स्वतः जातीनें लढत होता. तो जखमी झाला व त्याच सैन्याची पांगापांग झाली.

बाजीराव या वेळीं आपल्या सैन्यासह माळव्यांत असल्यामुळें छत्रसाल त्याची कुमक मागितली. मराठे व रजपूत यांच्यांत वेळ प्रसंगीं एकमेकांना मद करून बादशाही बुडविण्याचा करार पूर्वीपासून झाला होता, त्याला अनुसरून छत्रसालानें ही मदत मागितली. छत्रसालानें या वेळीं बाजीरावास शंभर दोह्यां मोठें करुणरसास्पद पत्र लिहिलें. त्या दोह्यांपैकीं खालील दोहा प्रसिद्ध आहे.

**‘ जो गति ग्राह गजेंद्रकी सो गत भइ है आज**
**बाजी जात बुंदेलकी राखो बाजी लाज ’**

**‘ जी गति झाली गजेंद्राची ॥**
**तीच आज अमची साची ॥**
**बाजी जाते बुंदेलाची ॥**
**राखीं बाजी राजया ॥ ’**

या करुण पत्रांत छत्रसालानें, ‘मी गजेंद्र आज दुर्दैवानें बंगष नक्राच्या तडा क्यांत सांपडलों असून तूं विष्णूप्रमाणें धांवत येऊन याला मारून माझी सुटक करशील, या आशेवर केवळ धीर धरून आहें,’ असा निरोप बाजीरावास पाठविला याला कल्पित कादंबरी समजण्याचें कारण नाहीं. पुराणांतरींचे दाखले जुन्या काळ पत्रांतून देण्याची वहिवाटच होती. ठरलेल्या कराराप्रमाणें त्याच्या मदतीस जाणे बाजीरावचें कर्तव्यच होतें. कारण त्यांतच मराठ्यांचें हित होतें. बादशाही मुसल मान सरदारांना चेंचल्याखेरीज हिंदुपदपादशाहीची स्थापना कशी झाली असती !

तेव्हां या चालत आलेल्या प्रसंगाचा पूर्ण फायदा घेण्याचें बाजीरावनें ठरविलें. शिवाय त्यामुळें रजपूत राजांवर त्याची छाप पडून मराठ्यांविषयीं कृतज्ञता बुद्धीही त्यांच्या मनांत जागृत होणार होती. या प्रसंगामुळें दिल्लीच्या जवळ मराठ्यांचें पाऊल पडणार होतें, व ईश्वरानें खैर केल्यास तेथें तें पक्केपणीं रुजणार होतें.

बाजीरावनें चिमाजीवर कोंकणांतील कामगिरी सोंपवून त्याची दक्षिणेंत रवानगी केली व आपण स्वतः जातीनें लष्कर घेऊन बंगषावर चालून गेला. फेब्रुवारी १७२९ मध्यें बाजीरावनें माळवा सोडला व महोबा येथें छत्रसालाची भेट घेतली. या मुलाखतींत तहाचें सुतोवाच करून, बाजीरावनें मोहिमेचा नकाशा तयार केला. नंतर उभयतां बंगषावर चालून गेले. जैतपूर येथील विजयामुळें बंगष फारच शेफारून गेला होता. छत्रसालाचें कंबरडें कायमचें मोडलें असें समजून तो मोठ्या आनंदांत होता. परंतु तेथेंच त्याला बाजीरावनें ३० मार्च रोजीं गांठलें. लढाई पुष्कळ दिवस एकसारखी चालली होती. जैतपूरचा किल्ला फार मजबूत होता; त्यास मराठ्यांनीं वेढा घातला. बंगष आंत कोंडला गेला. बाजीरावच्या हाताखालीं मल्हारराव होळकर, पिलाजी जाधव, दावलजी सोमवंशी व विठ्ठल शिवदेव विंचुरकर हे प्रसिद्ध सरदार होते. बाजीराव स्वतः घोड्यावर बसून व सारखी रपेट करून सर्वांस जातीनें हुकूम देत वेढयाचें काम चालवीत होता. या कडक बंदोबस्तामुळें किल्ल्यांत अन्नाचा दुष्काळ पडला व मुसलमानांनीं आंतील सर्व जातीचीं गुरें कापून खाल्लीं. बंगषाला सोडविण्याकरितां त्याचा मुलगा कायमखान हा मोठी फौज घेऊन त्याच्या मदतीस आला. पिलाजी जाधवानें या मोहिमेसंबंधीं खालील पत्र आपल्या इंदूर येथील वकीलाला पाठविलें.

" महंमदखान बंगष प्रयागचा सुभा, छत्रसाल राजस्थान बुंदेलखंड यांजवर मसलत करून चालोन आला होता. त्यास आम्हीं व ते एकत्र होऊन वेढा घालून बसलों होतों. इतक्यांत बंगषाचा लेक कायमखां तीस हजार फौजेनिशीं छ. ९ ( २९-३-१७२९ ) रोजीं आम्हांवर चालून आला. त्यांशीं लढाई झाली. ईश्वर इच्छेनें फौजेनिशीं हा बुडविला. तीन हजार घोडे व तेरा हत्ती पाडाव केले. अंताजी माणकेश्वर व दावलजी सोमवंशी सरलष्कर यांजकडे दोन हत्ती आले. वरकड आमच्या लष्करांतील सुखरूप आहेत. झुंजांत ठार झाले त्यांची यादी लेहिली आहे. त्याप्रमाणें ज्याच्या त्याच्या घरीं वर्तमान पावतें करणें. आम्हींही दरमजल येतों."

३० एप्रिल रोजीं जैतपूरचा किल्ला बाजीरावाच्या हातीं येऊन बंगषाचा पुरा मोड झाला. जून १७२९ पर्यंत बाजीरावचा मुक्काम त्या बाजूसच होता. छत्रसालानें या विजयप्राप्तीनंतर बाजीरावास मोठ्या समारंभानें आपल्या राजधानीस नेऊन त्याचा मोठा गौरव केला. या मदतीबद्दल छत्रसालानें एक किल्ला व तीन लाखांचा मुलुख बाजीरावास बक्षीस दिला. पुढें चार वर्षांनीं छत्रसाल मरण पावला तेव्हां त्यानें आपल्या राज्याचे तीन सारखे हिस्से केले, व ते प्रत्येकीं आपले दोन पुत्र हरदेश व जगतराजजी, आणि बाजीराव यांना वांटून दिले. कारण जैतपुराच्या युद्धापासून छत्रसाल बाजीरावला आपला पुत्र मानीत होता. आपल्या मुलांशेजारीं बाजीराव-सारख्या पराक्रमी बंधूचें राज्य असलें म्हणजे त्यांच्यावर प्रत्यक्ष बादशाहा चालून आला तरी तो त्यांचें वांकडें करूं शकणार नाहीं, हें जाणूनच छत्र-सालानें आपल्या राज्याची ही व्यवस्था केली. याप्रमाणें त्यानें बाजीरावशीं कायमचा स्नेह जोडला. परधर्मी व परकीय चोरांपेक्षां आपलें राज्य एका हिंदूनें खाल्लें तर तें शतपट बरें, अशी त्याची भावना होती. ह्या वांटणीमुळें निदान हिंदूंची संपत्ती हिंदूंच्याच घरांत राहिली. या देणगीमुळें बुंदेलखंडांतील बराच मोठा प्रदेश खास बाजीरावच्या मालकीचा झाला. काल्पी, हट्टा, सागर, झांशी, सिरोंज, कुंच, गडकोटा आणि हरदेनगर, असा मातबर प्रांत बाजीरावच्या ताब्यांत आला. मिळालेल्या या देणगीबद्दल बाजीरावनें खालील अटी कबूल केल्या. ‘ तुमचा व्यवहार, बढाई, मरतीब आहे तो कधीं कम होणार नाहीं. तुमचे किल्ल्यांची व जागांची रदबदल करणार नाहीं. तुम्हांस गैरराजी होतील त्यास आम्ही ठेवणार नाहीं. आमची फौज तुमचे मुलखांतून गेल्यास तिचा खर्च आम्हीं भागवूं. पादशाही फौज तुमचेवर चढाई करून आल्यास तुमचे राज्याचें संरक्षण करूं; आणि आम्हांवर आल्यास तुम्ही मदत करावी. तुम्ही पांच लाखांची जहागीर आम्हांस दिली आहे त्याशिवाय जास्त रुपयांची किंवा गांवांची रदबदली करणार नाहीं. यास दरम्यान चिमाजी आपा, नाना, पिलाजी जाधव, मल्हारराव, राणोजी व यशवंतराव पवार व जानोजी समशेर आहेत.’ छत्रसालाच्या पुत्रांशीं बाजीरावचा हा जो करार झाला, त्यावरून दोन्ही पक्षांचे अंतस्थ हेतू स्पष्ट दिसून येतात. राज्याची देणगी देऊन छत्रसालानें ही कायमची मदत आपल्या पुत्रांना जोडून घेतली. बाजीरावनें त्यांना आश्रय देण्याचें कबूल केलें. या नवीन मिळालेल्या प्रदेशाचा बंदोबस्त राखण्याकरितां बाजीरावनें गोविंदराव खेर या कऱ्हाडा ब्राह्मणाची नेमणूक केली.

खास दिल्लीजवळ स्वतःच्या मालकीचा बराच प्रदेश, या प्रसंगीं लाभल्यामुळें, बाजीरावच्या दृष्टीपथांत दिल्ली नित्य येऊं लागली. कारण बुंदेलखंडांत प्रथम मुक्काम करून, तेथेंच सैन्याची जुळवाजुळव करून व स्वारीची इतर सर्व तयारी सिद्ध करून, दिल्लीवर चालून जाणें फारसें कठीण राहिलें नाहीं. याउपर उत्तर हिंदुस्थानांत स्वारीवर असतांना जरूर पडल्यास, मदतीकरितां दूर साताऱ्याकडे पहावयास किंवा वळावयास नको. आपल्या मालकीच्या बुंदेलखंडातील आरंभबिंदूपासून वाटेल तिथें तावडतोब कुमक येण्याची चांगली सोय झाली.

बुंदेलखंडांतील या मोहिमेमुळें मराठ्यांचा पाय उत्तर हिंदुस्थानांत कायमचा रुतून बसला. त्यांना तेथून हालविणें आतां अशक्य झालें. माळवा व बुंदेलखंड हा यापुढील राजकारणाचा पाया झाला. या पायावर मराठेशाहीची भव्य इमारत पुढें लवकरच उभारली गेली. बाजीरावचें उत्तर हिंदुस्थानांतील हें राजकारण शाहूला फारसें पसंत पडण्यासारखें नव्हतें. कारण बादशहाच्या फौजेविरुद्ध त्याच्या एक बंडखोर मांडलिकातर्फे बाजीरावनें झुंज घेतली, व बादशाही फौजेचा युद्धांत पराभव करून कांहीं नवा प्रांत पादाक्रांत केला. बादशाही फौजेशीं उघडउघड मुळींच सामना घेऊं नये असें शाहूचें धोरण होतें. चौथाई व सरदेशमुखीच्या सनदा घेण्याकरितां बादशहाला थोडाबहुत शह दिला तर तें त्याला चालत होतें. कोणत्याही प्रांताच्या चौथाई सरदेशमुखीच्या सनदांचा प्रश्न उपस्थित झाला नसतांना, बादशाही कारभारांत पडणें, शाहूला रुचत नव्हतें. त्यामुळें मी आपल्या हक्काच्या वसुलीकरितांच ही मोहीम करीत आहें असें त्यास बाजीरावनें भासविलें असावें. शाहूला या वेळीं बाजीराव अवश्य दक्षिणेंत हवा होता. कारण ब्रम्हेंद्रस्वामीनें गो-ब्राह्मण-प्रतिपालक असें शाहूला सारखें संबोधून व आपल्या झालेल्या अपमानाची सारखी टोंचणी त्याच्यामागें लावून त्यास इरेस घातलें होतें, आणि छत्रपतीकडून शिद्यावरील मोहीम सुरू करविली होती. बाजीराव दक्षिणेंत आल्याशिवाय जंजिऱ्याची मोहीम चांगली चालवितां येणार नाहीं, ही शाहूला कल्पना असल्यामुळें तो बाजीरावला तडक दक्षिणेंत येण्याविषयीं सारखा आग्रह करीत होता. परंतु बाजीरावच्या दृष्टीनें उत्तर हिंदुस्थानांतील राजकारण जंजिऱ्यापेक्षां अधिक महत्वाचें असल्यामुळें त्याचा तेथून लौकर पाय निघेना. शिवाय शिद्यावरील मोहीम फळाच्या दृष्टीनें वांझोटी ठरण्याचा बराच संभव होता. मनांत तेढी ठेवून वागणाऱ्या, प्रतिनिधी व फत्तेसिंग भोंसल्यासारख्या सरदारांच्या मिलाफींत राहून युद्ध करणें बाजीरावला फारसें आवडत नसे. त्यामुळें त्यानें चिमाजीला दक्षिणेंत लावून दिलें, व आपण ही महत्वाची मोहीम आपल्या मनाप्रमाणें शेवटास नेली.

बुंदेलखंड माळव्याच्या उत्तरेस असल्यामुळें व बुंदेलखंडांतील ३६ लक्ष रुपये वसुलाचा व पांच लक्ष रुपये मुनाफ्याचा विस्तीर्ण प्रांत पेशव्यांच्या ताब्यांत आल्यामुळें, माळव्याचें माणिक मराठ्यांना आपोआप गिळतां आलें. माळवा प्रांतावर मोंगल बादशहाची हुकमत असली तरी तो प्रांत मराठ्यांनीं यापूर्वींच पूर्णपणें व्यापून टाकला होता. जैतपूरच्या लढाईंत बंगषाचा पराभव झाला तरी १७३१ व ३२ या दोन सालांत त्यानें मराठ्यांना माळव्यांतून हुसकून लावण्याचे निकराचे प्रयत्न करून पाहिले. मराठे सरदारांत त्या वेळीं दुर्दैवानें फाटाफूट पडून सेनापति दाभाडे व त्याचे इतर स्नेहीसोबती निजामाला सामील झाले होते. बंगषानें पवारापासून १० एप्रिल १७३१ रोजीं चिखलदा हें ठाणें काबीज केलें, व मल्हाररावांवर तो चालून गेला. परंतु मल्हाररावानें त्याच्याशीं प्रत्यक्ष लढाई घेण्याचें टाळून त्याला छापे घालून त्रास देणें सुरू केलें. जून महिन्यांत अंताजी माणकेश्वराचा बंगषानें पराभव केला, आणि सिरोंज येथें पावसाळ्याकरितां छावणी केली. बंगषानें योजलेला डाव मात्र फारसा साधला नाहीं. कारण बाजीरावनें दाभाड्याचा पराभव करून राजद्रोही सरदारांना ताबडतोब वठणीवर आणलें. दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे पेशव्यांचे मुख्य सरदार शिंदे व होळकर हे इमान राखून बंगषाशीं चिकाटीनें लढले. तिसरी गोष्ट ही कीं, शाहूनें बंगष किंवा इतर मुसलमान सरदार यांच्याशीं स्वतंत्रपणें तहाचें बोलणें करण्याचें नाकारलें आणि "आम्हीं सर्व कारभाराची मुखत्यारी बाजीरावाकडे दिली आहे. त्यांच्याशींच तुम्ही काय तें बोलणें करा," असा बंगषाला सडेतोड जबाब दिला. बंगषास अपयश आल्यामुळें त्याची सुभेदारी काढून घेऊन त्याला बादशहानें परत बोलाविलें. १७३२ सालच्या आक्टोबर महिन्यांत तो आग्रा येथें परत गेला आणि जयसिंह माळव्याचा नामधारी सुभेदार झाला. मराठ्यांनांच बादशहानें माळव्याची सुभेदारी द्यावी अशी खटपट मराठ्यांचा वकील महादेवभट हिंगणे हा दिल्लीस राहून करीत होता, इतकेंच नव्हे, तर खुद्द जयसिंगानेंही बादशाहाला तीच गळ घातली. परंतु हा शाब्दिक वाद सोडून दिला, तर १७३२ नंतर माळव्यावर मराठ्यांचा पूर्णपणें ताबा बसला हें निश्चित खरें आहे. मराठ्यांची तेथील कारकीर्द मोंगलाईपेक्षां प्रजेला फारच सुखाची झाली.

## प्रकरण १३ वें.

# ब्रह्मेंद्रस्वामी गुरुमाउली.

महाराष्ट्रांतल्या अनेक सरदारांच्या व राजांच्या खाजगी, धार्मिक व राजकीय उलाढालींत लक्ष घालणारे साधुपुरुष श्रीमत् ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर हे शाहू महाराज व बाजीराव पेशवे यांच्या कारकीर्दीत 'महापुरुष' म्हणून विशेष प्रसिद्धीस आलेले होते. महाराष्ट्राच्या हाडींमासीं भक्ति-सांप्रदाय खिळलेला असल्यामुळें साधारण स्त्री पुरुषांपासून तो राजा-राण्यांपर्यंत, सर्व आबालवृद्ध सदैव ईश्वर-चिंतनांत वाहिलेल्या साधुसंतांना व योगी संन्याशांना वंद्यच मानीत आले आहेत. तशांत जे जे भक्तिवान् पुरुष, एकाद्या साधूच्या किंवा योग्याच्या आशीर्वादानें किंवा एकाद्या निर्जीव मूर्तीच्या कृपाप्रसादानें आपला उदय झाला असें समजतात, ते ते त्या साधूची, योग्याची किंवा मूर्तीची प्रतिष्ठा वाढविण्यास कारणीभूत होतात, यांत नवल नाहीं. ब्रह्मेंद्रस्वामींच्या कृपाप्रसादामुळें अनेक मराठे सरदार उत्कर्ष पावल्यामुळें, निदान तसा त्यावेळीं त्यांचा भाव असल्यामुळें—या स्वामींची प्रतिष्ठा फार वाढली होती. प्रत्यक्ष शाहू महाराज व बाजीराव पेशवे हे त्यांस सन्मानानें वागवून गुरुस्थानींही मानीत. ते त्यांच्याशीं अनेक बाबतींत विचारविनिमय करीत व त्यांचा एकमेकांशीं पत्रव्यवहार चालू असे. हा त्यांचा पत्रव्यवहार बराचसा उपलब्ध झाल्यामुळें तो मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांत महत्वाचा गणला जातो. स्वामींचा लौकिक राजपुरुषांच्या व सरदारांच्या या गुरुशिष्यसंबंधामुळें फार वाढला होता. या स्वामीची माहिती जी काय थोडीथोडकी मिळते ती खालीं दिली आहे.

ब्रह्मेंद्रस्वामीचें जन्मस्थान वऱ्हाडांतील दुधेवाडी नांवाचें लहानसें खेडें होय. तें श्रीगणपतीचे राजुरीजवळ आहे. तेथें महादेवभट नांवाचा ऋग्वेदी ब्राह्मण राहत असे. तो दुधेवाडी व राजुरी ह्या गांवीं भिक्षुकी करून आपला चरितार्थ चालवीत असे. त्याच्या पत्नीचें नांव उमाबाई. ह्या दंपतीला बरेंच वय होईपर्यंत संतति झाली नाहीं. महादेवभट साठ वर्षांचे म्हातारे झाले तेव्हां त्यांस पुत्र झाला. त्याचें नांव त्यांनीं विष्णु ठेवलें. त्याचा जन्म इ. स. १६४९ सालीं झाला असावा, असें अनुमान करावें लागतें. सबळ पुरावा मिळत नाहीं. विष्णूचे आईबाप फार

गरीब होते. त्यांनीं चोहोंकडे भिक्षा मागून थोडेंसें द्रव्य जमविलें व त्याच्या सातव्या वर्षीं त्याचें मौंजीबंधन केलें. महादेवभटांनीं विष्णूस लहानपणापासून वेदपठन करावयास लाविलें. तो फार कुशाग्र बुद्धीचा होता. पण मुलाच्या गुणांचा विकास पाहण्याचें भाग्य त्या वृद्ध जोडप्याच्या कपाळीं सटवीनें लिहिलें नव्हतें. विष्णू बारा वर्षांचा झाला तोंच त्याच्या मातापितरांनीं परलोकचा मार्ग धरला व विष्णू अनाथ झाला. बालपणापासून त्याच्या मनाचा ओढा ईश्वरभक्तीकडे असल्यामुळें तो राजुरी येथील गणपतीच्या देवळांत जाऊन राहिला. हें महासिद्ध स्थान समजलें जात असल्यामुळें, तेथें अनेक भक्त सिद्धी मिळविण्यासाठीं राहत असत. विष्णूनेंही श्रीची आराधना करून श्री मंगलमूर्तीस प्रसन्न करून घेण्याचा निश्चय केला. त्यानें अन्न वर्ज्य केलें, व फक्त फलाहार, आणि गोमूत्र प्राशन करून अनुष्ठान चालविलें. संकष्टी चतुर्दशीच्या दिवशीं अगदीं पहांटेस नित्यकर्म व स्नानसंध्या आटोपून सकाळपासून संध्याकाळपर्यंत त्यानें एका पायावर उभें राहून जप करावा, व दरवर्षी श्रावण शुद्ध प्रतिपदेपासून तों भाद्रपद शुद्ध चतुर्थीपर्यंत एकांतीं समाधिस्थ बसावें. असें कडक व्रत त्यानें सतत चालू ठेवलें. एकतपानंतर श्रीगणपति त्यास प्रसन्न झाले व त्यांस स्वप्नांत दृष्टांत दिला कीं, " तुझी कार्यसिद्धि झाली. अतःपर अनुष्टान करूं नकोस. ब्रह्मचर्य वृत्तीनें राहून माझी आराधना करीत जा. तूं लोकांत मान मान्यता मिळविशील." लोक त्याला यानंतर **विष्णु बावा** या नांवानें ओळखूं लागले.

यानंतर विष्णुबावास अशी इच्छा झाली कीं, आपण काशीक्षेत्रीं जाऊन एकाद्या महापुरुषाच्या सहवासांत राहावें व परमार्थविषयक वेदांतपर ज्ञान मिळवावें. म्हणून पायींच चालत जाऊन सात आठ महिन्यांनीं ते काशीस येऊन पोहोंचले. तेथें त्यांस अनेक साधू, योगी व विद्वान् पुरुषांचें दर्शन झालें. त्यांच्या सहवासांत विष्णुबावांच्या मनावर धर्माचा विलक्षण संस्कार झाला. पुढें येथेंच ज्ञानेंद्र सरस्वती नामक एक महाविद्वान् व वेदांतज्ञानी असे सर्वांत श्रेष्ठ गणले जाणारे पुरुष होते, त्यांस बोवांनीं गुरू केलें. ज्ञानेंद्र स्वामींनीं विष्णुबावावर अनुग्रह करून त्यांस परमहंस दीक्षा दिली व **ब्रह्मेंद्रस्वामी** असें नव्या आश्रमींचें नांव ठेवलें. त्यांस ब्रह्मज्ञान प्राप्त झालें व त्यांनीं तेथेंच चतुर्थाश्रम स्वीकारला. याप्रमाणें ज्ञानप्राप्ति झाल्यानंतर उत्तर मानस व दक्षिण मानस या तीर्थांचे ठिकाणीं जाण्याचा त्यांनीं संकल्प केला. आपल्या गुरूची आज्ञा घेवून अनेक तीर्थें व सुप्रसिद्ध स्थळें पहात पहात ते बद्रिनारायणास गेले. तेथून ते परत काशीस आले. तेथें प्रेमानें आपल्या

गुरुमाउलीस भेटून त्यांनीं काशीक्षेत्राचा शेवटचा निरोप घेतला, व श्रीओढया जगन्नाथाकडे येऊन तेथून पूर्व किनाऱ्यानें रामेश्वरास गेले. वाटेंत मध्येंमध्यें अनेक प्रेक्षणीय स्थळें पाहत त्यांनीं प्रवास केला. तेथून कर्नाटकांच्या वाटेनें महाराष्ट्रामध्यें इ. स. १६९० च्या सुमारास ते कृष्णातीरीं आले. याप्रमाणें हिंदुस्थानांत बहुत ठिकाणीं प्रवास केल्यामुळें अनेक तीर्थें, निरनिराळीं देवस्थानें, नाना प्रकारचे लोक, त्यांची राहणी व आचार, बहुविध सृष्टिसौंदर्य, विविध राज्यपद्धति इत्यादि अनेक गोष्टी दृष्टीस पडल्यामुळें, त्यांच्या ज्ञानांत बरीच भर पडली व त्यांची बुद्धी प्रौढ व प्रगल्भ झाली.

स्वामी महाराष्ट्रांत आले तेव्हांचा काळ महाराष्ट्राच्या संकटाचा व अत्यंत धामधुमीचा असा होता. शिवाजीनें मिळविलेलें स्वराज्य बुडतें कीं काय, अशी सर्व मराठा मंडळीस धास्ती पडली होती. कारण नुकताच संभाजी महाराजांचा अमानुष वध औरंगजेबानें केला होता. एकामागून एक मराठ्यांचे किल्ले व प्रांत मोंगलांनीं काबीज करण्याचा सपाटा सुरू केला होता. मराठ्यांचें शौर्य या संकटसमयीं चांगलेंच कसास लागलें. राजाराममहाराजांस जिंजीस जाणें भाग पडून तेथून मोंगलांच्या हातून आपला प्रांत सोडविण्याचा उद्योग ते करूं लागले होते. अशा आणीबाणीच्या वेळीं ब्रम्हेंद्रस्वामी सातारा प्रांतांत रहावयास आले. त्यांना तेथील परिस्थिति धर्मकार्यास भीतिदायक व प्रतिकूल वाटली, म्हणून ते सह्याद्रि उतरून कोंकणप्रांतांत गेले. तेथें चिपळुणाजवळ मौजे पेढें नामक गांवीं श्री परशुरामाचें अत्यंत प्राचीन व सृष्टिसौंदर्यानें सुशोभित असें रमणीय व पवित्रस्थान होतें. ह्याच्या आसपास डोंगर व दाट जंगल असल्यामुळें ती तपश्चर्येस योग्य अशी निवांत जागा होती. तेथें अखंड वाहत असलेल्या निर्मळ पाण्याच्या झऱ्याकाठीं एक गुंफा पाहून स्वामींनीं तेथेंच कांहीं वर्षें तपश्चर्येंत घालविण्याचा निश्चय केला व पुष्कळ दिवसपर्यंत लोकांच्या फारसें दृष्टीस न पडतां ते तेथें एकांतवासांत राहिले.

स्वामी या रानांत बरेच दिवस राहिल्यावर एके दिवशीं पेढें गांवच्या बाळगौळी नामक गुराख्यास ते दिसले. बाळगौळी आपलीं गुरें तेथेंच चरावयास आणीत असे, व स्वामीच्या दर्शनास नित्य येऊन त्यांना कंदमुळें खाण्यास व गोमूत्र प्राशनास आणून देत असे. एके दिवशीं बाळगौळ्यानें स्वामीस कांहीं पाडाचे आंबे आणून दिले. ते त्यांनीं एका खळीमध्यें पिकावयास टाकले. दोनचार दिवसांनंतर बाळगौळ्याच्या समक्ष स्वामी ते आंबे खळींतून बाहेर काढीत असतां त्यांच्या हातास एका मोठ्या सर्पानें दंश केला, व त्यांच्या हातांतून

भळभळां रक्त वाहूं लागलें. बाळगौळी तो प्रकार पाहून भयभीत होऊन पळून गेला. त्याला वाटलें कीं हा साधू आतां वांचणार नाहीं. दुसरे दिवशीं तो त्या गुंफेजवळ येऊन पाहतो, तों स्वामी सुखरूप असून जप करीत बसलेले दिसले. त्यांस पाहून गौळ्यास आनंद वाटला व हा कोणी तरी अलौकिक साधु पुरुष आहे, अशी त्याची खात्री पटून त्यानें त्यांचा चहूंकडे बोलबाला केला.

ही गोष्ट चिपळुणास आवजी बल्लाळ व बाळाजी विश्वनाथ भट श्रीवर्धनकर यांस कळली. चिपळूण हें उत्तम बंदर असून तें त्या वेळीं जंजिऱ्याच्या हबशांच्या ताब्यांत होतें. त्यांच्या तर्फे चिपळूणच्या सुभ्यावर आवजी बल्लाळ या गृहस्थाची नेमणूक झाली होती. मीठ बंदराचा कारभार बाळाजी विश्वनाथ भट यांजकडेस होता. त्यांनीं स्वामीचें दर्शन घेतलें व त्यांची विद्वत्ता, निस्पृहता व तेजस्वी मुद्रा पाहून त्यांच्या मनांत स्वामीविषयीं आदरभाव वाटला. तेव्हांपासून ते स्वामीच्या दर्शनास वारंवार येऊं लागले. बाळाजी विश्वनाथाची विशेष भक्ति त्यांच्यावर बसली. स्वामीचीही त्यांजवर कृपा जडली व त्यांनीं त्यांस, "श्री गजानन व भार्गव तुला महत्पदास चढवितील," असा आशीर्वाद दिला. बाळाजी विश्वनाथ त्यानंतर देशावर आपलें नशीब काढावयास निघून गेला. मीठ बंदराचा अधिकार त्याच्यामागें त्याच्या घराण्यांतच राहिला. त्यामुळें तो देशावर नोकरीकरितां गेला तरी त्याचा कोंकणाशीं असलेला संबंध कायमचा तुटला नाहीं. तो अधूनमधून कोंकणांत फेरी मारून जाई.

चिपळूणचे सुभेदार व मीठ बंदरचे मुख्य अधिकारी स्वामीची भक्ती करतात ही गोष्ट गांवांतील सर्व लोकांच्या कानीं गेली; तेव्हांपासून आबालवृद्ध सर्व त्यांच्या दर्शनास जाऊं लागले. म्हणून त्यांपुढें गुप्तपणें न राहतां परशुराम क्षेत्रींच जाऊन उघडपणें राहणें स्वामीस योग्य वाटलें. तेथें ते सन १६९८ ह्या वर्षीं पौष शुद्ध पौर्णिमेस प्रकट झाले असा उल्लेख सांपडतो. परशुरामक्षेत्रांत प्रकट झाल्यावर त्यांनीं तेथील देवालयाचा जीर्णोद्धार केला. त्यांचें मुख्य दैवत श्रीगणपती असल्यामुळें पूर्वींप्रमाणेंच संकष्टी चतुर्थीस सूर्योदयापासून तों चंद्रोदयापर्यंत एका पायावर एकसारखे उभे राहून ते उपासना करीत असत. श्रावणमासांत एकवीस दिवसपर्यंत ते एकासनीं गुंफेमध्यें बसून जप करीत व भाद्रपद महिन्यांत गणेशचतुर्थीस बाहेर येऊन श्री गणपतीचा मोठा उत्सव करीत असत. या उत्सवांत वरील स्थानिक अधिकारी मोठ्या उत्साहानें भाग घेत असत. तें पाहून इतर बरीच मंडळी स्वामींस भक्तिभावानें मदत करूं लागली.

स्वामींचा भक्तसांप्रदाय वाढूं लागला; व भक्तांच्या मदतीनें भार्गवरामाचें (परशु-रामाचें) देऊळ मोडकळीस आलें होतें, तें नीट सुधारण्याचा त्यांनीं निश्चय केला. याकरतां त्यांनीं द्रव्य प्राप्तीस्तव उद्योग सुरू केला. श्रीगजाननाचें तांबडें निशाण व एक कर्णा बरोबर घेऊन, इ. स. १७०७ मध्यें भिक्षेप्रीत्यर्थ जी स्वामींची स्वारी बाहेर पडली, ती विशाळगडापर्यंत जाऊन पुष्कळसें द्रव्य मिळवून परत आली. भिक्षा द्रव्य सांभाळण्याकरतां, त्यांनीं उद्धव नामक एक गुजर आपला शिष्य म्हणून ठेवला व देवस्थानाला मिळालेल्या गाई सांभाळण्याची कामगिरी बाळगौळी यास सांगितली. याप्रमाणें त्यांनीं देवालयाचा जीर्णोद्धार करण्याचें काम हातीं घेतलें.

स्वामी परशुरामक्षेत्रीं आले त्या सुमारास राजाराम महाराजांनीं जिंजीहून परत येऊन सातारा किल्ल्यावर आपली गादी स्थापन केली. पण लवकरच म्हणजे इ. १७०० च्या मार्च महिन्यांत, राजाराम महाराज वारल्यावर त्यांची बायको ताराबाई हिनें आपला अल्पवयी मुलगा सिंहासनावर बसवून सर्व राज्यसूत्रें आपल्या हातांत घेतलीं. पुढें इ. स. १७०७ सालीं औरंगजेब वारल्यानंतर शाहूची दिल्लीहून सुटका झाली, तेव्हां ताराबाई व तिच्या पक्षांतील मंडळीला शाहूनें आपलें हक्काचें राज्य आपल्या स्वाधीन करण्यास सांगितलें. पण शाहूनें आपणां-पासून राज्य घ्यावें हें तिला रुचलें नाहीं. शाहू संभाजीचा मुलगा म्हणून राज्यावर आपला हक्क सांगत होता; परंतु शाहू बादशहाचे कैदेंत असतां राजारामानें अनेक संकटें सोसून राज्य सांभाळलें म्हणून ताराबाई त्यावर आपला हक्क सांगूं लागली. याप्रमाणें दोन्ही पक्षांत भांडणें जुंपून यादवी सुरू झाली. धनाजी जाधव, त्याचा दुय्यम बाळाजी व खंडो बल्लाळ, ताराबाईचा पक्ष सोडून शाहूच्या सत्पक्षास येऊन मिळाले. परशुरामपंतप्रतिनिधि मात्र ताराबाईच्या पक्षांत होता. त्यानें चंदनवंदन किल्ल्याजवळ फिरून शाहूस अडथळा केला. शाहू महाराजांस बरेच दिवस प्रतिनिधीशीं झुंजावें लागलें. हें वर्तमान स्वामींस कळलें, तेव्हां त्यांनीं आपलें कटिसूत्र व लंगोटी शाहुमहाराजांस प्रसाद म्हणून पाठविली, व त्यांना "तूं यशस्वी होवून राज्याराम करशील" असा आशिर्वाद दिला. शाहूमहाराजांनीं तो प्रसन्नचित्तानें ग्रहण केला. पुढें लवकरच शाहुमहाराजांस विजय प्राप्त झाला व त्यांस सातारची गादी मिळाली. तेव्हांपासून शाहूमहाराज स्वामींस पूज्य मानूं लागले.

इ. स. १७०७ मध्यें जंजिऱ्याचा हबशी सिद्दी कासीम मरण पावला; व त्याचे गादीवर याकूदखान सिद्दी सुरूर ऊर्फ बडेखान हा बसला. बडेखान कट्टर हिंदुद्वेष्टा नव्हता. ब्रम्हेंद्रस्वामींची कीर्ति ऐकून स्वामींस त्यानें दर्शनास बोलावलें. बडेखान

व स्वामी यांची भेट दंडाराजपुरी येथें झाली. त्यावेळीं स्वामी केळीच्या पानावर बसून खाडी ओलांडून गेले असें म्हणतात. हा चमत्कार पाहून खानास फार आश्चर्य वाटलें व त्यांस सामोरे जाऊन व मोठ्या अदबीनें पादशाही कुर्निसात करून "गुन्हा माफ! गुन्हा माफ!" अशी त्यानें प्रार्थना केली. स्वामींनीं त्यास "चित्तांत कांहीं भय न धरणें. समुद्र तरणें आमची सहज वृत्ति असे. यांत कांहीं अगाध नाहीं" असें समजावून अभय वचन दिलें. या दंतकथेंत बरीच अतिशयोक्ति असावी. परंतु खानानें स्वामींस त्या वेळीं देणगी दिली हें मात्र खरें. खानानें स्वामींची समबुद्धि व थोरपणा पाहून त्यांचा फार गौरव केला. त्यांस खानानें किल्ल्यांतील राजवाड्यांत नेलें व तोफांची सलामी दिली आणि बहुमूल्य वस्त्रें अर्पण केलीं. स्वामींनींही त्यास प्रसाद दिला. स्वामींच्या मनांतून पेढें व आंबडस हे दोन्ही गांव आपल्या देवस्थानास इनाम असले, म्हणजे श्रीची पूजा अर्चा व उत्सव महोत्सव निर्वेधपणें चालेल आणि मुसलमानांचा त्रास देवस्थानास पोहोंचणार नाहीं. म्हणून त्यांनीं खानसाहेबांकडून दोन्ही गांवच्या इनाम सनदा करून घेतल्या, व देवस्थानाच्या नवीन इमारतीचें काम चालू केलें होतें त्याची देखरेख करण्याकरतां, बापूजीपंत तांबे, यास कारकून म्हणून मागून घेतला. याप्रमाणें स्वामींनीं बडेखानावर आपली छाप बसविली.

स्वामींजवळ आतां थोडा बहुत परिवार जमूं लागला. बापूजीपंताच्या मागोमाग त्यांची बहीण व तिचा पुत्र चिमणाजी हे स्वामींजवळ येऊन राहिले. स्वामींनीं चिमणाजीची पोटशुळाची व्यथा नाहींशी केली; यामुळें मायलेकांची स्वामींवर फार भक्ति बसली. स्वामींनीं देवालयाच्या कामावर चिमणाजीपंतास लावून दिलें व पुढें त्याचें लग्नही स्वतः करून दिलें. यानंतर बापूजीपंताचे बंधु धोंडो भास्कर तांबे यासही आपल्या पदरीं चिटणीस म्हणून आणलें. याप्रमाणें पदरची आश्रित मंडळी व भक्त मंडळी वाढून, पेढें येथील परशुरामाच्या देवालयाचा आणि त्याबरोबरच स्वामींचा उत्कर्ष होऊं लागला.

स्वामींजवळ परिवार जमूं लागला तसतसा त्यांचा कामाचा व्यापही वाढूं लागला. स्वामी जशी स्वधर्माबद्दल कळकळ बाळगीत, तशीच स्वराज्याबद्दलही बाळगीत असत. स्वराज्याच्या प्रतिष्ठेबरोबर साधुसंतांची प्रतिष्ठा वाढते ही गोष्ट त्यांना माहीत होती. राज्यांतील सरदारांच्या ओळखी फायदेशीर असतात व प्रबल सरदार शिष्य असले म्हणजे लोकांवर गुरूची छाप सहज पडते, ही गोष्ट ते जाणून होते.

शिवाजी, संभाजी व राजाराम ह्या तिन्ही छत्रपतींच्या कारकीर्दींची त्यांस उत्तम माहिती होती. महाराष्ट्रांत कोणकोणते पक्ष कसकसे झटत आहेत याचें सविस्तर ज्ञान त्यांस होतें, असें त्यांच्या पत्रांतील उल्लेखांवरून दिसून येतें. औरंगजेब, शिवाजी, चंद्रराव मोरे, मौनीबोवा गोसावी, इत्यादिकांचीं ऐतिहासिक उदाहरणें त्यांनीं आपल्या पत्रांतून प्रसंग विशेषीं दिलेलीं आढळतात.

स्वामींनीं आपल्या देवस्थानाचा कारभार वाढविला. त्याबरोबरच महाराष्ट्रांतील सर्व सरदारांशीं पक्षाभिमान न धरतां आपला व्यवहार वाढविला. हिंदु मुसलमान, नबाब व त्यांचे सर्व धर्मी सरदार यांच्याशीं बळेंच संबंध जोडून आपलें वैभव व प्रतिष्ठा वाढेल असेंच धोरण त्यांनीं आंखलें व तें कायम ठेवलें.

त्यांनीं जंजिऱ्याच्या याकूदखान हबशाकडून पेढें, व आंबडस हीं गांवें आपल्या देवस्थानाकरतां इनाम म्हणून मिळविलीं. त्यांपैकीं 'पेढें' हें गांव सिद्दीच्या पूर्णपणें ताब्यांत असल्यामुळें तें गांव त्यांना संपूर्ण इनाम मिळालें; परंतु आंबडस गांवाचा अर्धा भाग सिद्याचा व अर्धा प्रतिनिधींचा असल्यामुळें, त्यांस हबशाच्या वांट्याचा अर्धा भागच काय तो मिळाला होता. तेव्हां बाकीचा हिस्सा देण्यासाठीं स्वामींनीं प्रतिनिधींस विनंति केली. प्रतिनीधींची व स्वामींची ओळख पूर्वीं झाली होती व त्यांची योग्यताही त्यास समजली होती. तेव्हां त्यांच्या विनंतीस मान्यता देऊन उरलेला हिस्सा प्रतिनिधीनें त्यांस इनाम करून दिला. पुढें स्वामींचा व प्रतिनिधींचा स्नेह-संबंध वाढल्यामुळें, व त्यांस राजकारण प्रसंगीं मदत केल्यामुळें मौजे डोर्ले व महाळुंगे हीं दोन नवीं गांवें त्यांना प्रतिनिधीतर्फे इनाम मिळालीं.

याप्रमाणें सर्व कोंकण प्रांतामध्यें स्वामींची कीर्ति पसरूं लागली व त्यांचें देवस्थानाचें उत्पन्न व वैभव वाढूं लागलें. श्री क्षेत्र परशुराम येथील देवालय, रेणु-केचें देवालय, गणपतीचें देवालय, मारुतीचें देवालय, धर्मशाळा, भोंवतालचा आवार, दीपमाळा व मुख्य देवालयाचा सभामंडप, इतकीं कामें त्यांनीं पूर्ण केलीं. श्री परशुरामक्षेत्रीं हिंदूंची वस्ती वाढूं लागली. स्वामींचा खाजगी परिवार वाढत चालला. इनाम गांवावर देखरेख करण्याकरितां स्वामींचे कारभारी चिमणाजीपंत व धोंडोपंत नेमले गेले. त्रिंबक कृष्ण मोघे व त्यांचे चुलतबंधु संभाजी नारायण ह्यांस स्वामींनीं आपले पदरीं ठेवलें. अंताजी नारायण ह्यांस आंबडस येथें नेमलें. तेथें स्वामींची बाग होती. तेथील देखरेख व जाबसाली कागदपत्रांची ने आण त्यांजकडे सोंपविण्यांत आली. याप्रमाणें स्वामींचा कारखाना वाढला. देवस्थानची

पूजाअर्चा मोठ्या थाटानें होऊं लागली. दरवर्षी नियमाप्रमाणें त्यांची श्रावणमासीं यथासांग समाधि होऊन समाप्तीचे दिवशीं मोठा समारंभ होऊं लागला. भाद्रपद शुद्ध ४ चे दिवशीं स्वामी आपल्या समाधिस्थानांतून बाहेर येत असत. त्या दिवशीं त्यांचें दर्शन घेण्याकरतां आंग्रे व हबशी यांजकडील सरदार व केव्हां केव्हां खाशा स्वाऱ्या येत. त्या दिवशीं आंग्रे व हबशी यांजकडील दोन तीनशें बरकंदाज व सिद्दी शिपाई स्वामींस बंदुकांची सलामी देत असत. नंतर स्वामींस पालखींत बसवून मोठ्या आनंदोत्सवानें मिरवून श्री परशुरामीं देवासन्निध आणीत. नंतर तेथें कीर्तनादि उत्सव होऊन व दुसरे दिवशीं अन्नसंतर्पण होऊन समाधीची सांगता होत असे. आंग्रे व हबशी यांचें नेहमीं वैर असे, पण ह्या प्रसंगीं ते एकदिलानें व प्रेमभावानें स्वामींचा प्रसाद घेण्यास जमत असत.

याप्रमाणें इ. स. १७२५ पर्यंत स्वामींचा उत्सव श्रीपरशुराम येथें उत्तम प्रकारें चालला. पुढें स्वामी सातारा प्रांतीं विशेष येऊं जाऊं लागले व त्यांचें दळणवळण शाहू महाराजांशीं व सातारच्या दरबारी मंडळीशीं विशेष होऊं लागलें. स्वामी साताऱ्यास प्रथम आले तेव्हां शाहू महाराजांनीं त्यांचा फार आदर सत्कार केला व वाड्यांत नेऊन व त्यांची पूजा अर्चा करून, त्यांस धावडशी तर्फ परळी, मौजे वीरमाडें प्रांत कऱ्हाड व मौजे अनेवाडी तर्फ कुडाळ, हे तीन गांव राजांनीं दरोबस्त कुलबाब इनाम देऊन त्यांबद्दल सनदा लिहून दिल्या. त्यानंतर बाजीराव पेशव्यांकडून पिंपरी हा गांव स्वामींनीं इनाम करून घेतला. याप्रमाणें थोड्याच अवकाशांत स्वामींनीं कोंकण प्रांतांत पेढें व आंबडस, माहुळुंगे, डोरले, कळंबुसी, नायसी अशीं सहा व वरघांट प्रांतांत वीरमाडें, अनेवाडी, पिंपरी व धावडशी अशीं चार, एकूण १० गांवें इनाम करवून घेतलीं. धावडशीस आल्यावर स्वामी एक छोटेसे जहागीरदारच बनले. या जहागीरदाराजवळ फक्त सैन्यच तेवढें नव्हतें, बाकी सर्व थाटमाटाचा संच एखाद्या राजदरबारासारखा जमला. जवळ कारकून, शिपाई, प्यादे, वगैरे सर्व सरंजाम होता. हे जहागीरदार मात्र विरक्त तपस्वी असून त्यांना संसारविषयक सर्व गोष्टी वरपांगीं तरी तुच्छ वाटत असत, पण त्यामुळें त्यांच्या कामाचा व्याप मात्र कमी नव्हता.

शाहुमहाराजाकडून मिळालेल्या धावडशी, अनेवाडी आणि वीरमाडें या तीन गांवीं अनुक्रमें त्या गांवचेच रहिवासी असलेले बाळाजी हरी अंतूरकर, जानो महादेव जोशी आणि हरि टिळक असे तीन इसम देखरेख करण्याकरतां स्वामींनीं नेमले.

इ. स. १७२६ नंतर हबशी सिद्दी सात ह्याचा व स्वामींचा, हत्तीच्या कारणामुळें तंटा उत्पन्न झाला व त्यामुळें ते कोंकण प्रांताचा त्याग करून धावडशीस कायमचे येऊन राहिले. आपल्या आयुष्याच्या अंतापर्यंत ते तेथेंच होते. शाहूमहाराजांनीं त्यांना जीं तीन इनामी गांवें दिलीं, त्यांपैकीं धावडशी हें गांव निसर्गतःच शांत व रम्य असल्यामुळें स्वामींस हेंच फार पसंत पडलें. येथें त्यांनीं एक वाडा, एक मोठा तलाव आणि एक लहानसें देवालय बांधलें व त्याजवळ एक लहानशी बाग लावली. स्वामींची जी ख्याति कोंकणांत पसरली होती ती साताराप्रांतीं फारशी माहीत नसल्यामुळें स्वामींस प्रथमप्रथम फार त्रास झाला. स्वामींनीं जे कारकून तीन गांवीं नेमले होते, त्यांना गांवकरी लोक जुमानीत नसत. इतकेंच नव्हे, तर त्या प्रांताचे सुभेदार बाबाजी शिवदेव, यमाजी शिवदेव व भवानीशंकर हे देखील स्वामी कोणीतरी उपटसुंभ आहेत असें समजून, त्यांच्या गांवास उपद्रव करीत. तेव्हां स्वामींनीं शाहु महाराजांकडे तक्रार नेली कीं, " हबशांच्या त्रासामुळें कोंकण सोडून इकडे आलों. तों येथेंही आमचे मागें उपद्रव आहेच. ह्या करतां आपलें राहणें येथें होत नाहीं." यावर शाहुमहाराजांनीं स्वामींचें समाधान करून असें उत्तर पाठविलें कीं, "यमाजी शिवदेव व भवानीशंकर यांस स्वमुखें रुबरू आज्ञा करणें ते केली. या उपरी त्यांकडून कांहीं उपसर्ग होणार नाहीं. स्वामींनीं स्वस्थ चित्त करावें. उदासीनता सर्वथा न आणावी. स्वामीपेक्षां दुसरें अधिकोत्तर आहे असें नाहीं. स्वामी देवालयें, वापी, कूप, तडागे, झाडझाडोरा लावितात, हे किर्ति अक्षय करीजे ती. यापेक्षां उत्तम काय आहे ! आम्हांस या गोष्टीचा बहुतसा संतोश आहे." ह्याप्रमाणें शाहू महाराजांनीं स्वामीच्या चित्ताचें समाधान केल्यावर, स्वामींनीं आपल्या तिन्ही गांवीं देवालयें, विहिरी, तलाव वगैरे बांधण्यास सुरवात केली आणि जागीजाग फुलझाडें व फळझाडें लाविलीं. स्वामींस फलपुष्पांचा फार नाद होता. त्यांनीं धावडशी येथें एक सुंदर बगीचा तयार केला. त्यामुळें त्या गांवास फार रमणीयत्व प्राप्त झालें. शाहू महाराज व त्यांच्या राण्या व सरदार, हे स्वामींच्या दर्शनासाठीं वारंवार धावडशीस जाऊं लागले. तेथील स्वामींचा पवित्र मठ, सुंदर व भव्य तलाव आणि रमणीय व मनोहर पुष्पवाटिका पाहून त्यांचें मन प्रफुल्लित होत असे.

पुढें स्वामींची कीर्ति चहूंकडे पसरत चालली. स्वामींच्या दर्शनाकरतां लोकांच्या झुंडीच्याझुंडी येऊं लागल्या. आपला भाग्योदय इच्छिणारा प्रत्येक तरुण मराठा गडी स्वामींचा आशिर्वाद मिळविण्यासाठीं मोठ्या उत्सुकतेनें त्यांच्याकडे येत असे. राजकारणाच्या प्रत्येक महत्वाच्या बाबतींत शाहू महाराज व बाजीराव पेशवे स्वामींचा

सल्ला घेत. स्वामींही निर्विकार बुद्धीनें तो देत. जो जो त्यांस भेटावयास येई, तो तो स्वामींस फुल ना फुलाची पाकळी म्हणून, कांहीं ना कांहीं तरी द्रव्य अर्पण करीत असे. यामुळें स्वामींचा खजीना द्रव्यानें व भांडार अनेक उपयुक्त वस्तूंनीं, पूर्ण भरला. स्वामी सर्व उपयुक्त वस्तूंचा सांठा करून ठेवीत. केशर, चंदन, कृष्णागर, कस्तुरी वगैरे सुगंधी द्रव्यें त्यांच्या भांडारखान्यांत भरपूर सांठवून ठेवण्यांत येत असत. स्वामींजवळ नगद रुपये, मोहरा, होन, पुतळ्या वगैरे द्रव्यही बरेंच शिलकी खात्यांत पडून राही. तें ते लोकांना व्याजानें देत असत. शाहूमहाराज व विशेषतः बाजीराव पेशवे त्यांचे ऋणको असत. स्वामींचा व्याजाचा दर भारी असे. परंतु सरदार तो आपखुशीनें पत्करीत व त्यांचें कर्ज काढीत.

शाहू महाराज व त्यांच्या राण्या सकवारबाई, सगुणाबाई व विरुबाई ह्यांची स्वामींच्या ठायीं फार भक्ति जडली. उलट स्वामीही त्यांजवर फार लोभ करीत. त्यामुळें स्वामींस छत्रपतींची मर्जी प्रसन्न राखून हळूच त्यांजकडून वाटेल तें कार्य करून घेतां येऊं लागलें. स्वामींची छाप शाहूमहाराजांवर आहे असें पाहून कित्येक सरदार स्वामींशीं प्रथम वशिला बांधीत व त्यांच्या मार्फत आपलें काम साधण्याकरितां म्हणून महाराजांकडे पोंचत असत. त्यामुळें स्वामीकडून अनेक लोक आपलीं कार्यें घडवून आणण्याचा प्रयत्न करूं लागले व त्यांच्या विचारानें आपलीं राजकारणें चालवूं लागले. ह्याच कारणास्तव पेशवे, प्रतिनिधि, सचिव, शिंदे, होळकर, पवार, जाधवराव, पुरंधरे, आंग्रे आदिकरून मोठे मोठे सरदार व इतर सर्व सामान्य लोक स्वामींकडे अनेक खेटे घालीत असत. स्वामीही प्रत्येकाच्या पोटांत शिरून त्याचें अंतःकरण वेधूं शकत असत. यामुळें अनेक लोक त्यांच्या भजनीं लागले. शाप व आशीर्वाद हीं स्वामींचीं प्रमुख अस्त्रें असत. त्यांचा ते धूर्तपणें उपयोग करून आपली छाप लोकांवर कायम ठेवीत.

इ. स. १७२८ पासून १७४५ पर्यंत महाराष्ट्रांत जीं जीं राजकारणें झालीं त्या सर्वांत प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें स्वामींचें अंग होतेंच होतें. बहुतेक सरदारांस नांवारूपास आणण्यास, त्यांची शिफारस करण्यास, त्यांच्या शौर्याचा गौरव करण्यास, त्यांना प्रोत्साहन देण्यास, व त्यांची योग्य कामावर योजना करण्यास स्वामीच अनेक वेळां लुडबुड करून कारणीभूत होत व तेणेंकरून स्वतांस मोठेपणा प्राप्त करून घेत. स्वामी सरदारांच्या केवळ राजकीय बाबतींतच लक्ष घालीत असें नाहीं, तर ते त्यांच्या खाजगी घरगुती गोष्टींतही लक्ष घालीत असत. कित्येक सरदारांच्या बायका, आपल्या पतींस, किंवा

मुलांस स्वामींनीं आशिर्वाद द्यावा, त्यांचें कल्याण चिंतावें, त्यांची उन्नति करावी, व इतर मनोकामना पूर्ण कराव्या म्हणून त्यांच्याशीं संधानें लावीत. बाळाजी विश्वनाथाची बायको राधाबाई, मल्हारराव होळकराची बायको गौतमाबाई, पिलाजी जाधवरावाजी आई हंसाई, रघूजी भोसल्यांची आई काशीबाई, मानाजी आंग्र्याची आई मथुराबाई, इत्यादि वीरपत्न्या व वीरमाता स्वामींशीं अत्यंत घरोब्यानें व भक्तिभावानें पत्रव्यवहार करीत असत व आपल्या कुटुंबीय माणसांचें कल्याण साधण्याकरतां स्वामींच्या आशीर्वादाची रात्रंदिवस याचना करीत असत, असें त्यांच्या अनेक पत्रांवरून दिसून येतें.

स्वामींच्या अंगीं व्यवहारचातुर्य विशेष असल्यामुळें, निरनिराळ्या माणसांस खुष ठेवून त्यांजकडून आपला कार्यभाग कसा साधून घ्यावा हें त्यांस उत्तम रीतीनें अवगत होतें. त्यांस माणसांची पारखही चांगली करतां येत असे व त्यामुळें त्यांनीं शिफारस केलेल्या माणसास शाहू महाराजांच्या व पेशव्यांच्या दरबारांत योग्य स्थान मिळत असे. महाराष्ट्रांत पुढें प्रसिद्धीस आलेले अनेक कर्तृत्ववान पुरुष त्यांच्याच शिफारशीनें उदयास आले. बाजीराव पेशवे व इतर मराठे सरदार ह्यांची शाहू-महाराजांजवळ वारंवार शिफारस करून, त्यांचे वास्तविक गुण व योग्यता स्वामी महाराजांच्या नजरेंत भरवीत. उदाजी पवार, जगजीवनराव पवार, दत्ताजी कनोजे ह्याचा पुत्र सयाजी कनोजे इत्यादिकांची शिफारस शाहूंजवळ स्वामींनीं केली होती, असा दाखला मिळतो. स्वामींच्या या गुणामुळें अनेक होतकरू मंडळी त्यांचा वशिला लावण्यास त्यांच्याकडे येत. प्रत्येकास आशीर्वाद द्यावा व त्याचें कार्य सिद्धीस गेलें म्हणजे त्याजकडून श्री भार्गवाच्या नांवानें दक्षिणेप्रीत्यर्थ द्रव्य मागावें, हा स्वामींचा नित्याचा परिपाठ असे. स्वामींच्या आशीर्वादाचा ज्यानें द्रव्यद्वारा मोबदल्यादाखल लाभ करून घेतला नाहीं असा त्या वेळचा एकही मराठा सरदार सांपडणें कठीण आहे. अशाच सरदारांकडून स्वामींनीं देवस्थानाकरतां वर्षासनें ठरवून घेतलीं होतीं. त्यांची एक यादी खालीं दिली आहे. ती येणेंप्रमाणें:—

## श्री भार्गवराम.

यादी वर्षासनें श्री स्वामी संस्थान धावडसी. श्रीस्वामींचे कारकीर्दीत पावत आलें:—

६१०० श्रीमंत कै. नाना यांनीं करार करून दिले.

१००० रा. महादाजी अंबाजी, तीन वर्षांनीं सहस्र रुपये द्यावे.

२००० महाराज छत्रपतींकडील वर्षासन.
५००० रा. होळकर, तीन सालांनीं.
१२०० रा. जाधव, तीन सालांनीं.
१५०० रा. फत्तेसिंग भोंसले.
५००० रा. शिंदे, तीन सालांनीं
५००० रा. पवार, तीन सालांनीं
१००० रा. आनंदराव सुमंत वकील, तिसांला.
१००० नारबा शेणवी ( मंत्री ) ,,
५०० राणोजी डुबल. ,,
५०० रत्नाकर पंत. ,,

याप्रमाणें स्वामींची प्रतिवर्षाची भिक्षा १५८३३ रुपये, फक्त छत्रपति, पेशवे व कांहीं मराठे सरदार ह्यांची मिळून ठरली होती. ह्याशिवाय जी जी बडी मंडळी स्वामींच्या दर्शनास येत तीं सर्व आपापल्या सामर्थ्याप्रमाणें जास्त कमी दक्षिणा देत असत. स्वामींवर सर्वांची भक्ति असल्यामुळें त्यांस कधीं कोणी विन्मुख पाठवीत नसत किंवा रिक्तहस्तांनीं त्यांची भेट घेत नसत. अशा तऱ्हेनें स्वामींनीं अगणित संपत्ति संपादन केली. तिचा उपयोग त्यांनीं देवालयें विहिरी, तलाव, समाधि, कोट, घाट इत्यादि बांधकामांत, वार्षिक उत्सव, ब्राह्मणभोजनें व गरीबांस अन्नदान करण्यांत, छत्रपति, पेशवे इत्यादि बडी मंडळी त्यांजकडे येऊन उतरली म्हणजे त्यांची बरदास्त राखण्यांत, लढाई व अडचणीच्या प्रसंगीं छत्रपति, पेशवे व इतर मराठे सरदार यांना व्याजानें कर्जाऊ रकमा देण्यांत केला. हें कर्ज ते सव्याज वसूल करीत. कित्येक वेळां तें कर्ज बुडतही असे. याप्रमाणें स्वामींनीं आपल्या आयुष्यांत लाखों रुपये जमविले व लाखों रुपये खर्च केले. तरी त्यांच्या निधनसमयीं त्यांजवळ १६०६३७॥ू। रु. शिल्लक होती. त्यांपैकीं ऐन शिल्लक ५७१०८॥ॅ। व लोकांकडे कर्जाऊ येणें पैकीं १०३५२९८ॅ इतके रुपये होती. ह्यावरून 'भिक्षापति तो लक्षापति' ही म्हण स्वामींस यथार्थ लागू पडते.

स्वामींनीं जीं अनेक बांधकामें आपल्या दक्षिणेच्या द्रव्यबळावर संपूर्ण केलीं, त्यांपैकीं मुख्य मुख्य खालीं दिलीं आहेत:—

| | | |
|---|---|---|
| **श्री-परशुराम, वास्तव्य पेढें** | | १००००० |
| **धावडशी येथील कामें** | | २२२००० |
| मुख्य समाधि | २००००० | |
| वाघजाईचें देवालय | ५००० | |
| मारुतीचें देवालय | ५००० | |
| वाड्याचा कोट | १०००० | |
| श्री जनीचें देवालय | ५०० | |
| श्री गणपतीचें देवालय | ५०० | |
| श्री एकवीर ,, | ५०० | |
| श्री काळकाई ,, | ५०० | |
| | २२२००० | |
| **तलाव**, धावडशी | | ३०००० |
| तलाव, गणेशखिंड नजीक पाल | | ३०००० |
| तलाव, इंदापूर | | ४०००० |
| तलाव, नातें पुतें | | १०००० |
| श्री रामेश्वर कृष्णातीर नजीक मरढें देवालय | | ५०००० |
| **श्री भुलेश्वर नजीक माळशिरस** | | १००५०० |
| महादेवाचें देवालय जीर्णोद्धार | १००००० | |
| समाधीची जागा | ५०० | |
| | १००५०० | |
| श्री मेरूलिंग नजीक धावडशी डोंगरावर देवालय, कोट व तलाव | | १००००० |
| पुण्याचे वाटेवर { खांबटकीचा घाट व विहिर अंधारवाडी } | | ४७००० |
| गणपतीचें देवालय, राजुरी | | २०००० |
| विहिरी मौजे माळशिरस | | ७०००० |
| बारळ पांवस | | ८००० |
| बारव कुरकुंभ | | ७००० |
| विहीर येवत | | ४००० |
| देवालय मौजे गोठणें, ता. राजापूर | | १००००- |

एकूण ८८४५०० रु.

ह्या सर्व ठोक बांधकामांच्या खर्चाची रक्कम ८८४५०० रु. असून, शिवाय जागोजाग लहान लहान किरकोळ विहिरी वगैरे स्वामींनीं बांधल्या, त्यास ४३००० रु. खर्च आला. एकंदर ९२७५०० रुपयांचा हिशोब मिळतो.

यावरून असें दिसून येईल कीं, स्वामींनीं आपल्या हयातींत अनेक लोकोपयोगी बांधकामें केलीं. प्रवासी लोकांच्या सुखाकरतां डोंगरांचे घांट बांधून उत्तम रस्ते तयार केले व कांहीं ठिकाणीं तर नदीवर पूलही बांधण्याचा स्वामींनीं उपक्रम केला होता.

स्वामींचें लक्ष राजकारणांत होतें हें वर अनेक ठिकाणीं सांगितलेंच आहे. स्वामी आपल्याजवळ युद्धसंबंधीं शस्त्रास्त्रांचा संग्रह करून ठेवीत व महाराष्ट्रवीरांना युद्धांत जातेवेळीं प्रसाद म्हणून त्यांपैकीं कांहीं हत्यारें ते देत असत. सरदार लोक अर्थातच या हत्यारांना पूज्य व फार मौल्यवान् समजत. कारण तो स्वामींचा प्रसाद म्हणून! बाजीराव व इतर मराठे सरदार ह्यांना लिहिलेल्या अनेक पत्रांत स्वामींनीं त्यांच्याजवळ बंदुका व लढाऊ घोडे मागितल्याचे अनेक उल्लेख आले आहेत. तसेंच त्यांनीं उदाजी पवार वगैरे कांहीं सरदारांस बंदुका व लढाऊ घोडे बक्षीस दिल्याचे दाखलेदेखील सांपडतात. ह्यावरून हे स्वामी महाराज भिक्षा मागून, ती केवळ चिक्कणमामाप्रमाणें न सांठवितां, सरदारांस प्रसादादाखल वांटून आपला बोलबाला करीत असत. त्या काळचा मराठा वीर रणसंग्रामाकरतां सज्ज होऊन निघाला, म्हणजे तो प्रथम स्वामींकडे भेटीस येत असे. त्यावेळीं स्वामी त्यास शुभदायक असें उंची वस्त्र व त्याबरोबर एखादें उत्तम शस्त्र आणि आपला प्रेमपूर्ण आशिर्वाद देत असत. स्वामी आपल्या प्रसादवस्त्रास **वज्र कवच** म्हणत असत.

लोकांकडून भिक्षाद्रव्य संपादन करून त्याचा सत्कारणीं विनियोग करण्यास देखील चातुर्य लागतें. तें स्वामींच्या ठिकाणीं पूर्ण होतें असें वरील गोष्टीवरून दिसून येईल. स्वामींनीं आपली बरीच रक्कम कर्जांत गुंतविली होती, व ती वसूल करतांना त्यांस हरहमेश कडक भाषा वापरावी लागत असे. स्वामींचें कर्ज महाराष्ट्रांतील प्रमुख सरदारांकडे थोडें फार होतेंच, पण बाजीराव पेशव्यांकडे तर त्यांचे लाखों रुपये गुंतले होते. पेशव्यांस निरनिराळ्या लष्करी मोहिमांमध्यें मनस्वी खर्च करावा लागत असे. अशा वेळीं मागणीबरहुकूम कर्ज देणारा सावकार स्वामीशिवाय दुसरा कोणीच नसे. स्वामींही पुढें कर्जाची भरपाई करण्याची पेशव्यांस निकड लावीत. बाजीराव पेशवे कर्जापायीं किती वैतागले होते हें त्यांच्या पत्रावरून आपणांस समजून

येतें. एका पत्रांत बाजीराव स्वामींस लिहितात, "आम्हांस कर्जानें बुडविलें! एवढे गोष्टीकरतां प्राण जाता तर बरें होतें!! विष खाऊन मरावें इतकेंच, किंवा स्वामींचे पाय धरून बसावें इतकाच पदार्थ उरला आहे. दरबारीं सर्व साहित्य आमचें करणार सर्व आपल्यास विदितच आहे. तरी स्वामींस कृपा येईल तरी आम्ही कर्जापासून मुक्त होवूं. लोकांचे नरकवासापासून दूर होऊं तो पदार्थ करावा. तरीच मज बाळकावर पूर्ण कृपा आहे." दुसऱ्या पत्रांमध्यें तर वतागाची परमावधि दिसते. "आतां नित्य उठोन कर्जदारांचे पायां पडावें! शिलेदारांचे पायां पडतां पडतां कपाळ छिनत चाललें!! आतां हीं सुखें आम्हांस नकोत. तुम्ही या आणि आपला कारभार सांभाळा. अगर टाकून द्या म्हणाल तरी टाकोन उठोन येतों. वरकड तुम्ही आपल्या पैशासाठीं लिहिलें, तरी स्वामीनें कांहीं चिंता न करावी. आमचा जीव आहे तों पैकियाची काय चिंता आहे? कोणें समयीं पाहिजे तें आम्हांसही मिळतें. पैका पावता करूंच. आतां प्रस्तुत तो आमचा जीवच आहे. येथें येऊन घेणें, अगर तेथें बोलावशील तरी सर्व संग टाकून येतों. तुम्ही थोर देव. तुम्हास वचनास धरावें. तें वचन खरें न झालें म्हणून आम्ही लेंकरांनीं तुमची रड तुम्हांपाशीं रडावी, आणि रडतियाची अशी तुम्ही पुसोन परिणाम त्याचा कराल तो कराल. तुमचें झाड लाविलें. तोडाल तरी आतां तोडा. वाढवाल तरी वाढवा. या गोष्टीस नादर कोण आहे? तुमचे दबावणीस आम्ही कां भिऊं? मारशील तरी तूंच बावा मारशील. यांतही कीर्ति तुझीच आहे. आणि आम्हां लेंकरांचें लडिवाळ चालवून कीर्तिरूप होशील तरी तूंच होशील." वरील दोन्ही पत्रें खुद्द बाजीराव पेशवे यांच्या हातचीं आहेत. यांत आपण कर्जापायीं वैतागून गेलों हें तर त्यानें कळविलें आहेच, पण स्वामींनीं कर्ज भरपाई करून देण्याचा निकराचा तगादा लावला, त्या मागणीसही त्यानें खूब मुत्सद्देगिरीचें उत्तर दिलें आहे. स्वामींच्या भरल्या पिशवीचा बाजीराव उत्तम तऱ्हेनें कसा उपयोग करून घेत असे व स्वामींस आपल्या नम्र परंतु सडेतोड प्रत्युत्तरानें कसें संतुष्ट ठेवीत असे, हेंही यावरून दिसून येईल.

स्वामी स्वतः विरक्त होते व संसारविषयक गोष्टी त्यांना सर्व तुच्छ होत्या. लोककल्याणार्थ मात्र त्यांनीं बाह्यात्कारीं सांसारिक वृत्ति धारण केली होती. स्वामींची महत्वाकांक्षा जबर होती व शाहू महाराजांसारख्यांशीं त्यांचा गुरुशिष्य संबंध येत असल्यामुळें, त्यांनीं आपला थाटही एखाद्या राजदरबारासारखा ठेवला होता. त्यांच्या जवळ दासदासी, सेवा करण्याकरतां परिचारिका, कारकून, शिपाई, प्यादे

वगैरे जय्यत सरंजाम होता. त्यांची कोठी व पाकशाळा फार प्रचंड होती. रोज हजारों पात्रें त्यांच्या देवस्थानांत पडत असत. गोरगरीबांस यथेच्छ अन्नदान तेथें मिळे. राजापासून रंकापर्यंत सर्वजण त्यांचे येथें जात येत असत व सर्वांचा स्वामी यथायोग्य परामर्ष घेत. शाहू महाराज व त्यांच्या राण्या हजारों लोकांच्या लव्याजम्यानिशीं धावडशीस जात, तेव्हां स्वामी त्यांची बरदास्त उत्तम तऱ्हेनें राखीत. स्वामींच्या कोठीचे २०० लमाणी बैल कोंकणांत जाऊन तिकडून सामान आणीत असत. त्यांचे उमाण व्यापारी धोरणानें कोंकणच्या खेपा करीत व किंमतीचा आणि मुनाफ्याचा मेळ घालून खरेदी विक्री करीत. त्यांना सर्व राज्यांत जकात माफ असे. निरनिराळ्या वस्तूंचा संग्रह करण्याच्या कामीं स्वामी फारच दक्ष असत. केशर, कृष्णागर, चंदन, अष्टगंध, कस्तुरी वगैरे परिमळ द्रव्यें त्यांच्या पूजेस नेहमीं लागत. त्यांच्या जवळ हेमगर्भ, नारायण तेल वगैरे मात्रा व इतर औषधांचा संचय बराच असे. उत्तम मध ते घागरीच्या घागरी जमवून लोकांस वांटीत. तसेंच भरजरी शालजोड्या, बादली मंदिल, चांदणी दुपट्टे, अष्टगोली शेले, उंची ताफजे, व तलम मलमली इत्यादि परोपरीचीं उंची वस्त्रें त्यांच्या संग्रहास विपुल असत. तीं भेटीच्या समयीं ते सरदार लोकांस अर्पण करीत. ह्या सर्व जिनसा स्वामी आपल्या भक्तवृंदांकडून जमवीत असत व त्याकरतां केव्हां केव्हां त्यांच्यावर रुष्टही होत असत, आणि प्रसंगविशेषीं हट्टही धरून बसत. एकाकडून उकळावें व दुसऱ्याला वाटावें, ही स्वामीची हातोटी अपूर्व होती.

स्वामींचा स्वभाव एरवीं फार गोड व प्रेमळ असे. परंतु त्यांचा कोणी आज्ञाभंग किंवा अपमान केला तर तो त्यांस अगदीं सहन होत नसे. ते क्रोधांत असले म्हणजे खाणें-पिणें सोडून देत. नित्यशः ते ताक व गोमूत्रच पीत, पण तेंही सोडून ते कोठेंतरी शांत व निर्जन ठिकाणीं जाऊन उपाशीतापाशी तप करीत. अशा स्थितींत ते कित्येक दिवस काढीत. क्षौर वगैरे कांहींएक न करतां ते दाढी वाढवीत. त्या स्थितींत ते प्रत्यक्ष जमदग्निसारखे भासत व कोणाशीं बोलत नसत किंवा भेटत नसत. त्यांच्या क्रोधाची बातमी शाहूमहाराज अथवा पेशवे ह्यांस कळली, म्हणजे ते त्यांच्या भेटीस जात, व विनवणी करून त्यांच्या रागाचें निराकरण करीत. तेव्हां कोठें स्वामीमहाराज आपल्या मठांत परत येत. स्वामींचा राग अगदीं वरकरणीं असे, व त्याचा उद्देश उन्मत्त लोकांस शासन करण्याचा किंवा इष्ट कार्य साधण्याचा असे. स्वामींवर शाहूमहाराज व त्यांच्या राण्या ह्यांची पराकाष्ठेची भक्ति असल्यामुळें,

स्वामींस कोणी राग आणलेला त्यांस खपत नसे. ते तेव्हांच त्याचें पारिपत्य करीत असत. त्यामुळें स्वामी रागावले म्हणजे सर्वांची फार त्रेधा उडत असे. स्वामींच्या विश्वासाचीं व अंतःकरणाच्या अंतर्भागांतलीं जीं माणसें असत, त्यांना स्वामींच्या स्वभावाचे हे सर्व आविर्भाव पूर्ण माहित असत. त्यामुळें तीं स्वामींच्या मर्जीचा नोक झोक पाहून वागत असत. स्वामींचे पट्टशिष्य चिमाणाजी भागवत ह्यांच्यावर स्वामींची पूर्ण कृपा असे. त्यामुळें तेही केव्हां केव्हां स्वामींचा कोप शमवीत. शाहूमहाराज त्यांस समजाविण्यास गेले म्हणजे आणा शपथा घालून, परोपरीनें आर्जव करून, किंवा एखादा गांव इनाम देण्याचें कबूल करून त्यांचें समाधान करीत असत. कधीं त्यांस समजूतीचीं पत्रेंही लिहीत. स्वामी कधींकधीं छत्रपतींच्या राण्यांवरही रागावत, व मी " तुमचें गांव सोडून वाटेल तिकडे जाईन असें म्हणत. " तेव्हां नम्र भाषणानें त्यांचा राग शमवावा लागे.

स्वामींच्या अद्भुत चमत्काराबद्दल फारशा गोष्टी प्रसिद्ध नाहींत किंवा त्यांचा उल्लेखही फारसा नाहीं. महाराष्ट्रांतील सर्व साधु-संतांबद्दल कांहींना कांहीं तरी लोकोत्तर व अमानुष शक्तीच्या चमत्कारिक कथा प्रसिद्ध आहेत. त्याप्रमाणें फक्त दोनच चमत्कारांबद्दल ब्रम्हेंद्र स्वामींची प्रख्याति आहे. पहिला हा कीं ते केळीच्या पानावर बसून समुद्राची खाडी तरून गेले; व दुसरा म्हटला म्हणजे पेशव्यांच्या राज्यांत पाऊस पडला नाहीं तर स्वामी अनुष्टान करून पाऊस पाडीत. खाडी तरून जाण्याबद्दल बखरींत व पाऊस पाडण्याबद्दल दोन उल्लेख चिमाजी आप्पांच्या व पिलाजी जाधवांच्या पत्रांत सांपडतात. ह्या गोष्टींच्या सत्यासत्यतेबद्दल आज कोण चर्चा करील ? चमत्कारावर कोणाचा विश्वास बसेल ? पण भक्त आपल्या गुरूच्या सामर्थ्याबद्दल अशा कंड्या नित्य उठवीत असतात. यावरून हेंच सिद्ध होतें कीं, त्या वेळचे लोक फार देवभोळे व धर्मभोळे होते. तसेच भूतपिशाच्चावर विश्वास वगैरे लोकभ्रम व अज्ञानजन्य विचार, लोकांत हल्लींपेक्षां फार मोठ्या प्रमाणांत जारी होते. स्वतः स्वामींचा भुताखेतांवर विश्वास होता. तसेच ते देवभोळेही होते. धावडशीकर अंबाजी पाटील ह्यांचें व स्वामींच्या नोकरचाकरांचें वांकडें झालें, तेव्हां त्यानें स्वामींच्या वाड्यांवर व कारकुनांवर भुतें घातलीं. त्यामुळें कारकून लोक आजारी पडले व गुरेंढोरें मेलीं. तेव्हां स्वामींनीं स्वतां संत असतांना देखील, भगत नांवाचा एक देवऋषि आणून त्याच्याकडून भुतांचा निवाडा केला. त्यांत दोन भुतें निघालीं. त्यामुळें स्वामी वाडा सोडून मोठ्या रागानें कृष्णेच्या कांठीं रागानें जाऊन राहिले. ह्या प्रसंगीं त्यांनीं वाड्याचा

बंदोबस्त करण्याकरतां यमाजी शिवदेव मुतालिक यांस लिहिलेलें पत्र उपलब्ध आहे. देवीस कौल लावणें, मंत्रसिद्धी करणें, धागे दोरे मंतरणें, ताईत व कवच बनविणें, देवास नवस करणें इत्यादि भोळसर कल्पना त्या वेळीं फार प्रचलित होत्या. त्या अझुनही कांहीं फारशा कमी नाहींत हें आपण पाहतोंच. ब्रम्हेंद्रस्वामींचाही क्रम, देवास नवस करून लोकांची कार्यसिद्धी करून देण्याचा, किंवा एखाद्यानें आज्ञाभंग केला तर देवाची शपथ त्यास घालण्याचा, किंवा देव तुझें बरें करणार नाहीं वगैरे श्राप देण्याचा होता. याबद्दलचे अनेक उल्लेख त्यांच्या पत्रांत आढळतील. वसईचा नवस फेडण्याकरतां भुलेश्वरास पुतळ्या व रुपये पाठवून दिल्याचा उल्लेख चिमाजीआप्पांच्या पत्रांत आहे.

स्वामींचा पत्रव्यवहार जसा महाराष्ट्रांतील सर्व सरदारांशीं होता तसाच त्यांच्या स्त्रियांशींही होता. शाहू महाराजांच्या राण्या सखवारबाई, सगुणाबाई व विरुबाई ह्या फार चतुर व राजकारणी स्त्रिया होत्या. त्यांचा स्वामींशीं झालेला बराचसा पत्रव्यवहार उपलब्ध आहे. आंग्र्याच्या स्त्रिया मथुराबाई व लिंबाई, होळकरांची पत्नी गौतमाबाई, दाभाड्याची उमाबाई, पेशव्याची राधाबाई, ह्यांचींही पत्रें उपलब्ध झालीं आहेत. त्याचप्रमाणें राजाराम महाराजांची पत्नी ताराबाई हिचें, तशीच राजसबाई निंबाळकर हिचेंही पत्र उपलब्ध आहे. या स्त्रियांच्या मार्फत स्वामी आपलीं इच्छित कार्यें करून घेत. ह्या स्त्रिया त्यांस राजकारणाच्या गोष्टी, व युद्धवार्ता कळवीत व उलटपक्षीं आपल्या मुलांबाळांस त्यांचा आशीर्वाद मागत.

इंग्रजांविषयीं ब्रह्मेंद्रस्वामींचें मत फार अनुकूल होतें. त्यांच्याशीं ते स्नेहभाव ठेवूं इच्छित होते. या बाबतींत फार थोडा उल्लेख त्यांच्या पत्रव्यवहारांत मिळतो. इंग्रजांचा व स्वामींचा प्रत्यक्ष पत्रव्यवहार उपलब्ध नाहीं व असणें फारसें शक्यही नाहीं. कारण स्वामींचे आशीर्वाद मराठ्यांना कार्यप्रेरक असले, तरी ख्रिस्ती इंग्रजांना त्यांचें काय होय ? जंजीऱ्याच्या शिद्दीचें व मराठ्यांचें युद्ध चाललें असतां, इंग्रजांनीं शिद्यास न मिळतां मराठ्यांस साह्य करावें व त्याकरतां स्वामींनीं इंग्रजांकडे प्रयत्न करावा, अशा अर्थाचें एक सखवारबाईचें पत्र उपलब्ध आहे.

स्वामींचें प्रेम शत्रू व मित्र या दोघांचे ठायीं सारखेंच होतें, हें त्यांच्या पत्रव्यवहारावरून दिसून येतें. स्वामींचा व हबशांचा राजकीय बाबतींत कितीही बेबनाव झाला, तरी त्यांच्यामध्यें घरोब्याचा पत्रव्यवहार व प्रेमाच्या भेटी-नजरा अखेरपर्यंत चालत असत. स्वामी धावडशीस येऊन राहिल्यावरही हबशांच्या भेटी झाल्याचे व परस्परांस नजर नजराणे पाठविल्याचे उल्लेख मिळतात. संभाजी राजे,



ब्रम्हेंद्रस्वामी धावडशीकर.



ज़ंजिऱ्याचा किल्ला.

ताराबाई, इत्यादि शाहूच्या विरुद्धपक्षी मंडळीशींही स्वामींचा प्रेमाचा पत्रव्यवहार आहे. स्वतः स्वामींचें कोणत्याही व्यक्तीशीं खाजगी वैर नसे, हें यावरून दिसून येतें. खुद्द स्वामींजवळ सुलतानभाई नांवाचा मुसलमान नोकर होता. हिंदुधर्माचा द्वेष करणाऱ्या लोकांनीं सुद्धां स्वामीविषयीं पूज्यबुद्धि व भक्तिभाव दाखवावा हें स्वामींच्या योग्यतेचें लक्षण समजलें पाहिजे. स्वामींनीं मुसलमानांना जवळ करून त्यांच्याकडून देणग्या घ्याव्यात, हें त्यांच्या परमहंस वृत्तीला साजेल असेंच आहे.

स्वामी स्वतःस सर्व महाराष्ट्रांतील सरदारांच्या गुरुस्थानीं मानीत व त्यांना पुत्रवत् मानून योग्य उपदेश व सल्लामसलत देत, हें त्यांच्या पत्रव्यवहारांवरून दिसून येतें. स्वामींनीं चिमाजीआप्पांस एका पत्रांत लिहिलें आहे कीं, "चिरंजीव बाजीराव यास लिहून पाठविलें जे, त्या प्रांतें गेले आहां. ज्येष्ठ मास पावेतो कोणाचा विश्वास न धरणें. कोणा परकीयाचे हातचें व त्याचे घरीं जेवण पाणी, विडा कांहींच न घेणें, तैसेंच तुम्ही व तुमचे उभयतांचे पुत्र देखील, याप्रमाणें कोणाचा विश्वास न धरणें. बहुत सावधपणें असत जाणें. ज्येष्ठ मास गेलिया वरी मग पुढें तुम्हांस बहुत दिवस कोणाचें भय नाहीं. राज्याराम चिरकाल कराल." दुसऱ्या एका पत्रांत स्वामी लिहितात, " कित्येकांस कित्येक प्रकारें दगे करणारांनीं केले आहेत. या करतां सावध राहत जाणें. शामलाकडील कोणी येत जाईल त्याचा विश्वास धरीत न जाणें. " हा उपदेश त्यांच्या सोवळ्याला साजेल असाच आहे. स्वामी दुसरें काय सांगणार ? असाच संभाजी आंग्रे ह्यांसही त्यांनीं एके ठिकाणीं उपदेश केला आहे. स्वामींनीं कित्येक सरदारांचीं आपसांतील भांडणें, उपदेश करून मिटविण्याचा प्रयत्न केलेला दिसून येतो. छत्रपति व त्यांच्या राण्या यांच्या प्रेमकलहांतही त्यांनीं मध्यस्ती केली आहे. छत्रपतींच्या राण्यांस उद्देशून स्वामी लिहितातः—" तुम्ही आपले गुरुचे पायाची क्रिया केली आहे. छत्रपतीशीं भांडोना. तर तुम्ही निरवानिरव केली आहे. भांडल्यास हा देश टाकीन. राजांशीं तुम्ही भांडिलांत नाहींत, म्हणजे विश्वजन सुखी होईल. ऋषीश्वराचे पायाची क्रिया केली आहे. तुम्ही जें जेवण कराल तें राजास अमृतसमान लागेल. आणि तुमचे व राजाचें एकचित्त नाहीं, म्हणजे तुम्हीं सोन्याचा ग्रास केला तरी राजास विषासमान वाटेल. " ह्यावरून कलहाचें बीज नाहींसें करून सर्वांचा ऐक्यभाव वाढविण्याचें स्वामींचें विशेष धोरण होतें हें स्पष्ट आहे. बंधुबंधु व नवरा-बयको ह्यांच्या गृहकलहांत स्वामींची जशी मध्यस्ती दृष्टीस पडते, त्याप्रमाणें माता-पुत्र ह्यांच्या भांडणांतही स्वामींचा हात प्रसंगीं शिरून शांतता झाली आहे. जेथें प्रेमळ

व गोड शब्दांनीं काम होत असे, तेथें तसे शब्द स्वामी योजीत. पण जेथें त्या शब्दांचा उपयोग होत नसे तेथें कठोर व मर्मभेदक शब्द स्वामी उपयोगांत आणीत. त्यामुळें त्यांच्या त्या क्रोधयुक्त शब्दांनीं तेव्हांच इष्ट परिणाम घडून येत असे. या बाबतींत जगजीवनराव पवारास तो आईशीं भांडल्याबद्दल लिहिलेलें पत्र फारच कडक आहे. “ तुजला नशेद ( निषेध ) करून लिहिलें जे, मायेचे पाया-वर डोई ठेवून तिचे आज्ञेत राहणें—त्यास, तूं आम्हांस लिहिले जे, मायेचे श्राप पुत्रास लागत नाहींत. तरी तिजला तूं शिवी दिलीस तरी तिचें श्रापें तुझें भस्म होईल. तिजजवळ तूं बेअदबी, कितेक लहान माणसांच्या बोलें तुफान होऊन तिजला कष्टी केलें आहे. तुला पुढें वाचोन नांवरूप करणे असेल तरी तिचे पाया-वर डोई ठेवून झाले अन्याय बक्षीस करून घेणें. न घेस तरी तुझें बरें होत नाहीं. दारू खावून बेअदबी, माता ती, तिजजवळ करतोस, हें बरें नव्हे. पाजी तूं आहेस ! काय आमचें वचन मोडशील ? तेव्हां बाजीचे बटकी कडून धरून आणून तुजला चाकर केलें जाईल हें पुरतें मनांत आणून आणि आनंदीचे समजा-विसी करून, तिचा कागद आला तरच तूं वाचलास. नाहीं तरी तुझा मुलाहिजा होत नाहीं, हें पुर्ते समजणें.’’ ह्या चरचरीत अंजनानें जगजीवनाचे डोळे खाडकन् उघडले असतील. स्वामी आपल्या मंडळीच्या कल्याणाकरतां किती कळकळीनें झटत हें यावरून दिसून येईल.

इकडे बाजीरावनें मोंगलांचा व निजामाचा चांगलाच पिच्छा पुरवून त्यांस जेरीस आणलें होतें व मराठ्यांची सत्ता खानदेश, माळवा, बुंदेलखंड, गुजराथ व राजपुताना या प्रांतांत पसरवून, निजामापासून तों दिल्लीच्या बादशहापर्यंत सर्वांवर आपली जरब बसविली होती. त्यामुळें बाजीरावाची कीर्ति कळसाला पोहोंचली होती. ह्याच सुमारास चिमणाजी आप्पानेंही वसई येथें अपूर्व विजय मिळवून उज्ज्वल यश संपादन केलें होतें. स्वामींस या दोघांही शिष्यांची कामगिरी ऐकून अत्यंत संतोष झाला. बाजीरावास या कामगिरीपायीं स्वामीचें फार कर्ज झालें होतें, तें फेडण्यास सध्यां तो समर्थ नव्हता. म्हणून मोठ्या दिलगिरीचें पत्र स्वामींस त्यानें लिहिलें. त्यावर स्वामीनें सुंदर उत्तर लिहून त्यांस स्वस्थचित्त केलें व त्याच्या कामगिरीबद्दल गौरविलें. त्यांनीं लिहिलें कीं, “लक्ष कोटी रत्ने माणकें मजला दिली यानें कांहीं माझी कीर्ति वाढत नाहीं. उभयतां दोनी बंधु राम लक्ष्मण तुमची फत्ते झाली, म्हणजे त्रैलोक्यांत माझी कीर्ति झाली. हेचि मी इच्छा रात्रं-दिवस श्रीपाशीं इच्छितों. पैका नामर्दाचा; इज्जत व यश मर्दाचें.’’ पुढें एके प्रसंगीं

त्यांनीं लिहिलें, "यश संपादोन सुखी आलेत, हें वृत्त अवगत होऊन कोटिशः संतोष जाहला. आम्हांस द्रव्याची इच्छा नाहीं. तुमची कीर्ति ऐकोन परम सुखी आहों." यावरून स्पष्ट होईल कीं, स्वामी बाजीराव व चिमणाजी यांस किती चाहत असत. पण पुढें लौकरच बाजीराव रावेर मुक्कामीं एकाएकीं मरण पावले. तें दुःखदायक वर्तमान स्वामींनीं ऐकल्यावर त्यांस अंगावर वीज कोसळल्याप्रमाणें अत्यंत दुःख झालें. शोकसागरांत बुडून अन्नपाणी फार काय गोमूत्रसुद्धां त्यांनीं घेतलें नाहीं. त्यांनीं चिमणाजीस मोठ्या उद्वेगानें लिहिलें कीं, "बाजीरावासारखा शिष्य गेला. या उपर या मुलुखांतून जावें किंवा प्राण सोडावा, काय करावें तें लिहीणें." या हृदयद्रावक पत्रास चिमणाजीनें समयोचित उत्तर पाठविलें व स्वामींचें चित्त स्थिर केलें. पुढें चिमणाजी आप्पाही लवकरच वारले व स्वामींचा कारभारी चिमणाजी कृष्ण भागवत मृत्युवश झाला, तेव्हां स्वामींची दुःखानें कंबरच खचली. त्यांचें वयही आतां शंभराचे जवळपास येऊन पोहोंचलें होतें. त्यांची वृत्ति स्वाभाविकपणें अधिक सौम्य व विरक्त झाली. आपलें पृथ्वीवरील इतिकर्तव्य संपलें असें जाणून,आपल्या देवस्थानाची व आश्रितजनांची व्यवस्था लावून व चिमणाजी कृष्णाचे जागीं जगन्नाथपंतास कारभारी नेमून सर्व कामकाज स्वामींनीं त्याजकडे सोंपविलें. स्वामींचा वृद्धापकाळ झाला व शरीर अगदीं कृश झालें, असें पाहून शाहू व राणी सगुणाबाई वारंवार त्यांच्या दर्शनास येत. शाहू महाराजाचे एकाहून एक-असे दिव्य मोहरे गेले व गुरुस्थानीं असलेले स्वामीही आतां लवकर सोडून जाणार, हें पाहून त्यांस अत्यंत काळजी वाटूं लागली. स्वामी त्यांजजवळ नित्य आपल्या निरवानिरवीच्याच गोष्टी बोलत असल्यामुळें, त्यांचा वियोग होणार म्हणून राजाराणीच्या मनास चिंता उत्पन्न झाली.

शके १६६० ह्या वर्षीं स्वामीमहाराज श्रावण महिन्यांत आपल्या प्रतिवार्षिक नियमाप्रमाणें श्री कृष्णातिरीं समाधीस बैसले. रीतीप्रमाणें समाधीची सर्व व्यवस्था जगन्नाथपंतांनीं लावून दिली व रक्षणास दोन शिपाई त्यांच्याजवळ ठेवले व आपण देवस्थानाकडे निघून आले. इकडे नववे दिवशीं स्वामी आकस्मिक बाहेर आले, व गुंफेंतील दर्भासन बाहेर आणून, कृष्णास्नान करून, त्यावर येऊन ईश्वर स्मरण करीत बसले. समाधीचा काल पूर्ण न होतांच स्वामी गुंफेंतून बाहेर आले यानें शिपायांस फार आश्चर्य वाटलें. स्वामींनीं त्यांस जगन्नाथपंतास बोलावून आणण्याबद्दल आज्ञा केली, व दर्भासनावर लांब मृगासन पसरून शालीच्या पदरीं जपाची माळ बांधून ती उशाकडे ठेवली, व शालजोडी पांघरून घेऊन श्री

रामनामाचा उच्चार करीत ते झोंपी गेले, आणि नामस्मरण करीत असतांच ब्रह्म-स्वरूपांत विलीन झाले. इकडे धावडशी येथें जगन्नाथपंतास निरोप पोहोंचतांच ते तांतडीनें स्वामींजवळ निघून आले. त्यांनीं स्वामींच्या तोंडावरील शालीचा पदर काढून पाहिला तों त्यांची प्राणज्योति केव्हांच निघून गेली होती. तें पाहून त्यांस फार दुःख झालें व त्यांनीं शाहूमहाराजांकडे निरोप पाठविला. स्वामींची निधनवार्ता चहूंकडे वणव्याप्रमाणें पसरली.

हां हां म्हणतां कृष्णेच्या कांठीं प्रचंड जनसमुदाय जमला. शवाचें दर्शन घेऊन सर्व लोक अश्रु ढाळूं लागले. शाहूमहाराजांनीं स्वामीचें कलेवर स्वतःचे पाल-खींत ठेवलें व त्यावर भरजरी चादर घालून व त्याची सुगंधी द्रव्यांनीं पूजा करून मोठ्या समारंभानें ती पालखी धावडशी येथें आणली. तेथें त्यांनीं स्वामींच्या सर्व सेवकजनांचें यथोचित समाधान करून, आपल्या सरदार लोकांस " महाराज गेले आणि स्वामी आहेत, असें समजून पूर्ववत् निष्ठा धरून चालावें. वर्षासनें सर्वांनीं पहिल्याप्रमाणें द्यावीं. त्यांत अंतर करील त्यास शपथ असे. शिवाय पारिपत्य होईल, " अशी ताकीद दिली. नंतर समाधीचा व देवस्थानाचा उत्तम बंदोबस्त करून महाराज साताऱ्यास निघून गेले. ब्रम्हेंद्रस्वामीचें देऊळ सुमारें सव्वालक्ष रुपये खर्चून त्यांच्या समाधीस्थानावर इ. स. १७५८ सालीं बांधण्यांत आलें.

पारसनीसांनीं ब्रम्हेंद्रस्वामींचें विस्तृत चरित्र लिहून प्रसिद्ध केले व त्यांचे गुणा-नुवाद गाईले. 'रामदास हा शिवाजी महाराजांचा गुरु होता, त्याप्रमाणें ब्रम्हेंद्र हा बाजीराव व शाहूचा गुरु असून त्यांना राजकारणी सल्लामसलत देत असे. त्याचें शाहू, बाजीराव, चिमाजी व इतर मराठे सरदार आणि त्यांच्या कुटुंबांतील मंडळीवर फार वजन होतें. आपल्या वजनाचा उपयोग तो राज्यवर्धनाच्या कामीं करीत असे. तो मराठेशाहीचा निस्सीम उपासक व हितचिंतक होता, आणि आपलें वजन त्यानें बाजीरावाच्या कल्याणाकरितां खर्च करून लोकसंग्रह केला. बाजीरावला अडीअडचणीच्या प्रसंगीं द्रव्यसहाय्य करून त्याची स्वामींनीं बाजू सांभाळली. शाहूच्या दरबारांत आपलें वजन खर्च करून बाजीरावच्या गैरहजेरींत त्याचा बोज राखला व त्याच्या शत्रूंचा नक्षा उतरवला. या पुरुषाच्या दैवी काम-गिरीचा बाजीरावच्या व्यवहारी उद्योगाला पाठिंबा मिळाल्यामुळें, त्याला नतिक जोर चढला व त्याची कामगिरी लोकांना पटली. राजकारणांतले चोहोंकडचे धागेदोरे स्वामीनें सूत्रबद्धतेनें हालविल्यामुळें, मराठ्यांचा राज्यविस्तार सुरळित होऊन स्वराज्याचें साम्राज्यांत रूपांतर झालें. याच्या धार्मिक धोरणानेंच ठिकठिकाणचे

सरदार शिरजोर झाले नाहींत, व स्वार्थाकरितां मराठेशाहीला व बाजीरावला प्रतिकूल झाले नाहींत.

जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति ॥
देह कष्टविती उपकारें ॥

अशा थोर संतमालिकेंत बसण्याजोगीं ब्रम्हेंद्राची योग्यता होती. शिवशाहींत जी रामदासाची तीच पेशवाईत ब्रम्हेंद्राची पायरी होती.'

पारसनीसांचें विवेचन या अर्थाचें आहे. रामदास व ब्रम्हेंद्र यांची तुलना पारसनीसांनीं केल्यामुळें राजवाडे अत्यंत क्रुद्ध झाले व त्यांनीं ब्रम्हेंद्राचा व त्याच्याबरोबर पारसनीसांचा खरपूस समाचार घेतला व दोघांचाही अत्यंत कडक शब्दांत निषेध केला. त्या संतापाच्या भरांत ब्रम्हेंद्र व रामदास यांची तुलना करून खालील मुद्दे राजवाड्यांनीं पुढें मांडले, व ब्रम्हेंद्राची तुच्छ म्हणून रेवडी उडविली. ते म्हणतात:—

"( १ ) राष्ट्रीय व वैयक्तिक ह्या दोन्ही नीतींच्या दृष्टीनें ब्रह्मेंद्राचें आंग्र्यांशीं वर्तन अत्यंत निंद्य होतें. रामदासस्वामींनीं असें निंद्य वर्तन कोणाहि सरदाराशीं केलें नाहीं.

( २ ) पाटील, महार, कारकून वगैरे लहानसहान माणसांशीं ब्रम्हेंद्र क्षुल्लक कारणावरून भांडत असे. रामदासस्वामींना भांडण हा पदार्थ माहीतच नव्हता.

( ३ ) महत्त्वाकांक्षा हा ब्रम्हेंद्राचा मुख्य हेतु होता. निजामुन्मुलुखाला भेटावें, इंग्रजांशीं मैत्री करावी, शाहूनें पालखी आणावी, वगैरे मानाची हाव भार्गवरामास अतिशय होती. रामदासस्वामींस ही हाव बिलकूल नव्हती.

( ४ ) इस्टेट करण्याचा ब्रम्हेंद्राला नाद होता. रामदासांना इस्टेटीची वार्ताहि नव्हती.

( ५ ) ब्रम्हेंद्राला, पुण्यांतील काळबोवासारखी अचकटविचकट शिव्या देण्याची संवय होती. रामदासांना तो प्रकार माहित नव्हता.

( ६ ) ब्रम्हेंद्राला हठयोग व समाधि ह्यांची आवड असे. रामदासांनीं ही तालीम केली नाहीं.

( ७ ) पाऊस पाडणें, शाप देणें, संतानार्थ वोशध देणें, भुतें काढणें, वगैरे बीरविद्या ब्रम्हेंद्राजवळ असे. ह्या ढोंगाची उपासना रामदास तुच्छ मानीत असत.

( ८ ) ब्रम्हेंद्र खुनशी व तिरसट स्वभावाचा असे. रामदास केवळ शांतीची मूर्ति असे.

( ९ ) सुवासिक तेलें, उत्तम प्रावरणें व चमचमीत भोजन यांचा ब्रम्हेंद्र भोक्ता होता. रामदासस्वामींना ही देहसंतर्पणाची चाड नव्हती.

( १० ) ब्रम्हेंद्र व्होलटेयराप्रमाणें, व्याजबट्टा व सावकारी करी. रामदासांना व्यवसाय करण्यास वेळ नव्हता.

( ११ ) ब्रम्हेंद्र इतर साधूंचा मत्सर करी. रामदास सर्व स्वामींचा स्नेही असे.

( १२ ) ब्रम्हेंद्र छत्रपतींपाशीं इनाम गांवें मागे. रामदासांनीं शिवाजीनें समर्पिलेलें राज्य परत केलें.

( १३ ) ब्रम्हेंद्र लहानसहान शिफारशी करी. रामदासांना ह्या क्षुल्लक गोष्टींत पडणें आवडत नसे.

( १४ ) ब्रम्हेंद्राला एक वाक्य सरळ व शुद्ध लिहितां येत नसे. रामदास मराठी सारस्वताचे उस्ताद आहेत.

( १५ ) समर्थांनीं रामदासीपंथ काढून भरतखंडांत बाराशें मठ स्थापिले. ब्रम्हेंद्रांचा पंथहि नाहीं व शिष्यहि नाहीं.

( १६ ) रामदासस्वामी उत्तम कवि, स्पष्टवक्ता व नेमस्त कार्यकर्ता होता. ब्रह्मेंद्र ह्यांपैकीं एकहि नव्हता.

( १७ ) रामदास सृष्टिसौंदर्याचा भोक्ता होता. चाफळा इतकी धावडशी सुंदर नाहीं.

( १८ ) रामदासाच्या शिवाजीनें सुंदर यवनी, मातुःश्री म्हणून परत पाठविलेली आहे. यवनी ठेवणारा बाजीराव ब्रह्मेंद्राचा आवडता शिष्य होता.

( १९ ) रामदास भगवीं वस्त्रें लेई, ब्रम्हेंद्र पुरभय्यी टोपी व मलमली झगा वापरी. असे आणीकहि कित्येक भेद दाखवितां येतील. परंतु सर्वांत मोठा भेद म्हटला म्हणजे राष्ट्रीय नीतिमत्ता वाढविण्याचा बाणा रामदासांच्या सर्व संस्थांत, लेखांत, भाषणांत व वृत्तींत दिसतो व ब्रह्मेंद्राच्या दिसत नाहीं. रामदासांच्या सर्व व्यवसायांचें मुख्य धोरण म्हटलें म्हणजे महाराष्ट्रधर्म होय. ह्या महाराष्ट्रधर्माचें नांव देखील ब्रह्मेंद्राला माहीत नव्हतें. ब्रह्मेंद्राच्या वेळीं हें नांव लोपत चाललें होतें असा कदाचित् कोणास संशय येईल. परंतु तसा प्रकार नाहीं. शाहूराजाच्या रोजनिशींतील शाहूच्या एका पत्रांत महाराष्ट्रधर्म हा शब्द आलेला आहे. सदर ठिकाणीं इंग्रजी भाषांतरकारानें महाराष्ट्रधर्म म्हणजे Religion of महाराष्ट्र असें भाषांतर केलें आहे. परंतु तें बरोबर नाहीं. त्या स्थलीं महाराष्ट्रधर्म या शब्दाचा

**अर्थ मराठ्यांचें कर्तव्य** असा स्पष्ट आहे. शाहू छत्रपतीला महाराष्ट्रधर्म माहीत असावा व ब्रह्मेंद्राला नसावा, ह्यावरून ब्रह्मेंद्राच्या राजकीय ज्ञानाचा अंदाज करतां येतो. शाहूचें हें पत्र येणेंप्रमाणें:—

[ १६५७ मार्गशीर्ष व. ९

राजश्री फोंड सावंत भोंसले सरदेसाई प्रांत कुडाळ यांसी पत्र कीं ' राजश्री गोपाळ रामराव याचा कबिला तुम्ही अटकावून ठेविला आहे. त्यासी निरोप देऊन पाठवणें ' म्हणून पूर्वीं तुम्हांस लिहिलें होतें. परंतु ते गोष्टी न केली. ब्राह्मणाचा कबिला अटकेंत ठेवावा हा महाराष्ट्रधर्म नव्हे. प्रस्तुत हे स्वामीसन्निध आहेत, तरी त्याचा कबिला त्यास मुक्त करून पाठवून देणें म्हणून पत्र १ सीत सलासीन मया व अलफ, रजब २२.

राजवाड्यांनीं काढलेल्या एकोणीस मुद्यांत आणखी एकाची गंमतीनें भरती सुचवितां येईल.

( २० ) **रामदासाचें** नांव नम्रतादर्शक आहे. **ब्रम्हेंद्राचें** नांवदेखील घमेंडखोर आहे !

ही कलमवार तुलना वाचूनही ब्रम्हेंद्रावर राजवाड्यांनीं निष्कारण कोरडे ओढलेत असें वाटतें. ब्रम्हेंद्र दांभिक होता, लोकांना शिव्याश्राप देऊन भस्म करून टाकण्याचा वारंवार तो धाक घाली व शिष्यांकडून निरनिराळ्या रूपानें देणग्या उकळी, हे आरोप खरे आहेत; परंतु कोणत्याही संताळ्याला किंवा महाराजाला, तेव्हांच काय परंतु आजमितीस देखील हे आरोप शब्दशः लागू पडतील. कोणत्या महाराजांचे अद्भुत चमत्कार त्यांचे शिष्य शपथेवर ग्वाही देऊन प्रत्यक्ष पाहिल्याचें सांगत नाहीं ? कोणते भक्त आपल्या गुरुमाउलीच्या अंगांत शत्रूंना शापून भस्म करण्याचें सामर्थ्य आहे, असें निक्षून सांगत नाहीं ? **भाबडेपणा व धर्मभोळेपणा हा हिंदूंचा राष्ट्रीय दुर्गुण आहे.** या विसाव्या शतकांत देखील अनेक गुरुमहाराज पूर्वजन्मींचे इतिहास सांगून बायकांना लुबाडतात व त्यांचे पूर्वजन्मींचे नवरे बनून त्यांना अनीतीच्या गर्तेत लोटतात, आणि शहाणे सुर्ते लोक या गुरुबाजीच्या जाळ्यांत सांपडतात. आपला लाख रुपयांचा फायदा झाला तर देवाला सत्यनारायणाचा नवस करणारे किंवा गुरुमहाराजांच्या मंदिराला ओटा बांधून देण्याचा नवस करणारे अनेक सुशिक्षित मूर्ख आजही सांपडतील. देवाला वा गुरूला कोण लांचलुचपत देऊं करीत नाहीं ? हिंदूंच्या तेहतीस कोटी देवता पुऱ्या न पडून पिराला भजणारे हिंदू आज काय कमी आहेत ?

ब्रम्हेंद्रस्वामी हे एक महाराज होते. या साधुमहाराजांचे राजयोगी व हटयोगी असे जे दोन वर्ग आहेत, त्यांपैकीं ब्रम्हेंद्र हे राजयोग्यांच्या वर्गांतले होते. बडेजावीची त्यांना फार हौस होती व शिष्यांच्या मागें तगादा लावून ते द्रव्य उकळीत हें खरें. परंतु या द्रव्याचा विनियोग देवळें, धर्मशाळा, विहिरी, व तलाव बांधण्यांत त्यांनीं खर्च केला हें लक्षांत ठेवलें पाहिजे. त्या धामधुमीच्या काळांत हीं लोकोपयोगी कामें करण्याकडे राजांचें लक्ष नसे व लोक सुखासुखी अशा कार्यासाठीं पैसा देत नसत. यांत ब्रम्हेंद्राचा वैयक्तिक स्वार्थ कोणता साधला ? त्याला कीर्ति लाभली, असें कोणी म्हणतील; परंतु हें म्हणणें मान्य केल्यास कोणताही अपूर्व स्वार्थत्याग हीणकस ठरेल. कारण स्वार्थत्यागी माणसाला कीर्ति लाभणारच ! तो सरदारांना अडीअडचणीच्या प्रसंगीं मदत करी व मग त्यांच्याकडून आपलें कर्ज सव्याज परत फेड करून घेई. ब्रम्हेंद्रानें कर्ज दिलें नसतें तर तिकडूनही लोकांनीं त्याला नांवें ठेवलीं असतीं कीं, गाठीला पैसे असूनदेखील हा स्वराज्याची नड भागवीत नाहीं. बरें, दिल्यानंतर तगादा केल्याशिवाय कर्जाची परत फेड सुखासुखी आपण होऊन कोण करणार ? त्यानें सुरू केलेलीं लोकोपयोगीं कामें अर्धवट होऊन पडलीं होतीं, तीं द्रव्याशिवाय त्याला कशीं पुरी करतां येणार !

तो महाराज होता व मुत्सद्दी नव्हता; यामुळें त्याच्या दर्शनाला सर्व लोक येत असत व सर्वांशीं त्याचा संबंध पडे. मुसलमान सरदारही त्याला देणग्या देत असत; परंतु तेवढ्यावरून त्याला दोष देणें रास्त होणार नाहीं. मुसलमानांच्या देणग्या स्वीकारून त्यामुळें तो त्यांचा मिंधा बनून, त्यानें कधीं स्वराज्यविरोधी कट केला कीं काय हें पाहिलें पाहिजे. उलट शाहू व बाजीराव, विशेषतः बाजीराव याच्यावर त्याचें फार प्रेम असे. त्यांना यश यावें म्हणून तो अनुष्ठानें करी, त्यांच्या विजयानें त्याचें अंतःकरण सद्गदित होई, त्यांना प्रत्यहीं आशीर्वादपत्रें लिहून तो प्रोत्साहन देई. आज कोणाला युद्धांत यश मिळविण्याकरितां आशीर्वाद व अनुष्ठान यांची महती वाटत नसेल, परंतु खुद्द बाजीराव व चिमाजी यांची स्वामींवर किती श्रद्धा होती, हें पाहिलें पाहिजे. स्वामींनीं त्यांना प्रोत्साहन दिलें नसतें तर त्यांचें चित्त विकल झालें असतें. गेल्या महायुद्धांत विजयलाभासाठीं ख्रिस्तीधर्ममंदिरांत कांहीं कमी प्रार्थना करण्यांत आल्या नाहींत. ख्रिस्तीलोकांच्या मानानें बहुजन हिंदुसमाज अत्यंत धर्मभोळा आहे व तेव्हांही होता. त्यामुळें आजच्याप्रमाणें साधुबोवाला लोक शरण जाऊन त्याची करुणा भाकीत असत, व बोवाही

मग त्यांच्यावर अनुग्रह करीत. शाहू व बाजीराव हे दोघे महापुरुष ब्रह्मेंद्राचे शिष्य असल्यामुळें, त्याच्या इतर अनेक भक्तांनीं आपलें कार्य साधण्यासाठीं त्याला गळ घालणें स्वाभाविक होतें व तोहि त्यांच्या शिफारशी करीत असे. परंतु हा सामान्य व्यवहार मानवी स्वभावाला धरून आहे ! यांत स्वार्थाचा संबंध नाहीं. आजही अधिकारी माणसाला, गरजूंना मनांत असून नसून प्रशंसापत्रें द्यावीं लागतात. तेव्हां ब्रह्मेंद्रानें शिष्यांच्या शिफारशी करण्यांत कांहीं गुन्हा केला असें मानतां येणार नाहीं. बाजीरावनें यवनी ठेवली म्हणून ब्रह्मेंद्र टाकाऊ हा राजवाड्यांचा मुद्दा अत्यंत पोरकट आहे. बाजीरावजवळ काशीबाई व मस्तानी ह्या दोन स्त्रिया असल्या, तर शिवाजी महाराजांनाही सहा स्त्रिया होत्या. बाजीरावनें कांहीं कोणा मुसलमान सरदाराची बायको पळवून आणली नव्हती. ती मुसलमान कुमारिका असून तिच्या व तिच्या पित्याच्या संमतीनें बाजीरावनें तिचा स्वीकार केला व पत्नीधर्मानें तिचें पालन केलें. आणि इतक्याउपर बाजीरावचा यांत गुन्हा मानला, तरी शिष्याच्या अपराधाबद्दल गुरूला दंड करणें कितपत न्याय्य होईल ? ब्रम्हेंद्राच्या शिष्यमंडळींत अनेक सरदार मंडळी व त्यांचे कुटुंबीय मोडत असल्यामुळें, राजकारणाशीं त्याचा संबंध येई. कारण हे सरदार आपलीं खासगी व राजकीय गाऱ्हाणीं त्याच्या कानावर घालीत व त्या संकटांचें निवारण करण्याविषयीं त्याला विनंति करीत. आपल्या शिष्याचें संकट वारण्याचा प्रयत्न करणें हें त्याचें कर्तव्य होतें, व तें बजावल्याबद्दल 'तो राजकारणांत लुडबुड करी' असा आरोप त्याच्यावर करणें कितपत योग्य होईल ? कधीं त्याच्या प्रयत्नांना यश येऊन भांडणें मिटविण्याचें श्रेय त्याच्या पदरीं पडे, तर कधीं त्याचे प्रयत्न अपुरे ठरत. त्याच्या भोळ्या भावाप्रमाणें त्याचे प्रयत्न चालू असत. आजच्या तार्किक चष्म्यांतून ते पाहून, त्याबद्दल ब्रम्हेंद्राला दोष लावणें न्याय्य होणार नाहीं.

सारांश, ब्रम्हेंद्रस्वामी रामदासाइतका मोठा संत नसला तरी त्याच कोटींतील होता. त्याला रामदासाची प्रतिभा नव्हती व त्यानें ग्रंथकर्तृत्वही दाखविलें नाहीं हें अगदीं खरें. तो एक साधुबोवा होता, आणि संतांचे गुणावगुण त्याच्यांत कमी जास्ती प्रमाणांत होते. आज जे शेंकडों साधुमहाराज समाजांत वावरत असतात व त्यांचे भक्त त्यांचे गुणानुवाद सारखे गात असतात, तसलाच तो एक होता. पण बाजीराव व चिमाजी यांच्यावर त्याचें निस्सीम प्रेम होतें, स्वराज्य व शाहूछत्रपति यांच्या कल्याणाची त्याला कळकळ होती, आणि त्या काळच्या अनेक

कर्तबगार व नामांकित पुरुषांची सहकुटुंब त्याच्यावर दृढ श्रद्धा होती. त्याच्या शापानें आपलें अकल्याण होईल व आशीर्वादानें आपला फायदा होईल, असा विश्वास असल्यामुळें मराठे सरदार त्याला दक्षिणा देऊन संतुष्ट करीत व तो हें द्रव्य लोकोपयोगी कार्यांत खर्च करी, किंवा त्यानें बाजीरावची तात्पुरती नड भागवी. त्याच्यावर राजवाड्यांनीं निष्कारण कडक आग पाखडली आहे. राजवाड्यांची कसोटी लावली तर कोणताच साधु त्या परीक्षेंत उतरणार नाहीं. त्यांचा आवडता रामदास देखील अशा कडक परीक्षेंत उतरणार नाहीं. तो देखील कीर्तिलोलुप व भिक्षांदेही वृत्तीचा आणि राजकारणी लुडबुड्या ठरेल. परंतु जुन्या संतांचें चरित्र-चित्र त्या काळांत रंगून जाऊन तपासलें पाहिजे व तत्कालिन मनुष्यांच्या तुलनेनें व तत्कालिन कल्पनांच्या प्रमाणांत त्यांची योग्यता ठरविली पाहिजे. आणि त्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे रामदासांच्या पंक्तींतच पण बऱ्याच खालच्या नंबरास ब्रम्हेंद्रास बसवावें लागेल.

---

## प्रकरण चौदावें.

# 'जंजिरा पडला पण कायम राहिला'



बाळाजी विश्वनाथाशीं तह केल्यानंतर कान्होजी आंगरे यांनीं शाहूचा पक्ष सोडला नाहीं. मराठ्यांची देशावरील फौज कबुलायतीप्रमाणें आंगऱ्यांच्या मदतीला आली. त्यामुळें कोंकणपट्टींतील बरेचसे किल्ले त्याला सिद्दीपासून जिंकतां आले. विजयदुर्ग उर्फ घेरिया आणि कुलाबा हे त्यांपैकीं प्रमुख होत. आपल्या मुलुखाचें संरक्षण करण्याकरितां त्याला बरीच मोठी फौज पदरीं बाळगावी लागली. कोंकण-पट्टीचें उत्पन्न बेताचें असल्यामुळें त्याला आपल्या सैन्याचा खर्च चालविण्याकरितां अरबीसमुद्रांतून व्यापार करणाऱ्या जहाजांजवळून चौथ वसूल करावी लागे. इंग्रजांना ही चौथ देण्याचें जिवावर येई, व आंगऱ्यांचा हा न्याय्य कर चुकवण्याचा ते नेहमीं प्रयत्न करीत. त्यामुळें पुष्कळ वेळां त्याला त्यांचीं जहाजें काबीज करून जहाजांवरील अधिकाऱ्यांना पकडून ओलीस ठेवावें लागे. कारवारचा गव्हर्नर चौन हा आपल्या पत्नीसह कारवार येथें जात असतां आंगऱ्यानें त्या जहाजावर हल्ला केला. त्या लढाईत चौन मारला गेला व त्याची बायको आंगऱ्यांनीं पकडली. ईस्ट इंडिया

कंपनीनें तीस हजार रुपये भरून पुढें तिची सुटका केली. आंगऱ्यांच्या भीतीनें इंग्रजांचा व्यापार कमी झाला व त्यामुळें आंगरे त्यांच्या डोळ्यांत सलूं लागला. त्याला त्यांनीं चांचा, लुटारू अशीं नांवें आपल्या इतिहासांत दिलीं आहेत. दुसऱ्यांच्या राज्यांत व्यापारासाठीं जबरीनें घुसावयाचें, तेथील कायदे पाळावयाचे नाहींत, कर भरावयाचे नाहींत आणि राजानें शिक्षा लावण्याचा प्रयत्न केला तर अन्याय अन्याय म्हणून बोंब ठोकावयाची, हा इंग्रजांचा नेहमींचा प्रघात आहे. आंगऱ्यांची चौथ इंग्रजांनीं निमूटपणें दिली असती तर त्यांचीं व्यापारी गलबतें लुटलीं गेलीं नसतीं. १७१५ सालीं चार्लस् बून हा मुंबईचा गव्हर्नर होऊन आला. त्यानें तीन चार मोठीं जहाजें सुरतच्या वखारींत बांधलीं आणि त्यांच्यावर जंगी तोफा चढविल्या. या जहाजांच्या मदतीला त्यानें आपला सर्व काफिला दिला व विजयदुर्गवर हल्ला चढविला. आंगऱ्यानें इंग्रजांना खरपूस मार दिला आणि त्यांचीं पुष्कळ जहाजें बुडविलीं. त्यानंतर एक वर्षभर इंग्रजांनीं आणखी जय्यत तयारी केली, व म्यॅनुअल क्यॉस्ट्रो या पोर्तुगीज अंमलदाराची मदत घेऊन खंदेरीवर हल्ला केला. हा क्यॉस्ट्रो अतिशय बदमाश व हलकट मनुष्य होता. मुसलमानी धर्म स्वीकारून त्यानें आंगऱ्यांची नोकरी पत्करली होती, आणि तेथील किल्ल्यांची पूर्ण माहिती करून घेऊन, तो विश्वासघातकी इसम इंग्रजांना जाऊन मिळाला. मराठेसरदारांच्या पदरीं जे जे यूरोपियन लोक नोकरीस राहिले त्यांनीं ऐन वेळीं आपल्या मालकांना असाच दगा दिला आहे. व खाल्ल्याघरचे वासे मोजून निमकहराम हें अढळपद मिळविलें आहे. परंतु इतका विश्वासघात करूनही त्यांना खंदेरीहून काळें तोंड करून पळावें लागलें.

इंग्रजी आरमाराचा आंगऱ्यांनीं धुव्वा उडविल्याची बातमी विलायतेस पोहोंचतांच तेथून चार जंगी लढाऊ जहाजांचा काफिला मुंबईस पाठविण्यांत आला. या काफिल्याचा अधिकारी मॅचेझ म्हणून होता. इंग्रज व पोर्तुगीज यांनीं आपसांत तह केला व पोर्तुगीजांचें आरमार इंग्रजांच्या मदतीस आलें. कुलाब्यापासून दहाबारा मैलांवर चौल येथें ही यूरोपियन फौज उतरली व खुष्कीनें आणि समुद्रमार्गानें असा दुहेरी मारा त्यांनीं कुलाब्यावर चालविला. परंतु कान्होजी आंगरे हा अत्यंत शूर पुरुष होता. त्याचे सैनिक दर्यावर्दीपणांत कसलेले होते. त्याच्या माणसांनीं हिंदुस्थानांत बांधलेलीं जहाजें मजबूत व चपळ आणि विलायती गोद्यांत बांधलेल्या जहाजांपेक्षां अधिक सरस असत. आणि पेशव्याची फौज जमिनीवर युद्धाचा

प्रसंग आल्यास त्याच्या पाठीशीं सज्ज होती. त्यामुळें त्यानें इंग्रज व पोर्तुगीज यांना चांगला चोप देऊन पळवून लावलें. इ. स. १७२४ मध्यें डच लोकांनीं आपल्या प्रचंड आरमारानिशीं विजयदुर्गवर हल्ला करून पाहिला, परंतु त्यांनाही फजीत होऊन परत जावें लागलें. आंगऱ्यांना हीं तिन्ही यूरोपियन राष्ट्रें थर थर कांपूं लागलीं. अरबीसमुद्रांत आंगऱ्यांची अप्रतिहत सत्ता सुरू होती. व्यापार करणाऱ्या सर्व जहाजांपासून तो हक्कानें चौथ वसूल करीत असे, आणि कोणी गुण्यागोविंदानें ती दिली नाहीं, तर तो सबंध जहाज लुटून फस्त करी. १७२७ सालीं ईस्ट इंडिया कंपनीचें डर्बी नांवाचें एक मातबर व्यापारी जहाज त्यानें लुटलें. इंग्रजांच्या व्यापाराचें त्यानें फार नुकसान केलें असल्यामुळें त्यांनीं आपल्या ग्रंथांतून त्याला लुटारू, वाटमाऱ्या, डाकू अशा शेंकडों शिव्या दिल्या आहेत. परंतु एलिजाबेथ राणीच्या कारकीर्दींतील सर फ्रँसीस ड्रेक, हॉकिन्स वगैरे लुटारूंपेक्षां आंगरे अधिक सभ्य व कायदेशीर होता, यांत शंका नाहीं. ज्या कोंकणपट्टीवर त्याचा ताबा होता तेथें व्यापार करणाऱ्या जहाजांपासून तो उघड उघड, सांगून सवरून चौथाईचा कर घेई. दूरदेशच्या समुद्रांत केवळ लूटमारीसाठीं इंग्रजांप्रमाणें तो कधींच जात नसे.

इ. स. १७२९ सालीं तो मरण पावला, तेव्हां सर्व यूरोपीयन राष्ट्रांना हायसें वाटलें. तो होता तोंपर्यंत पेशव्यांना आणि शाहूछत्रपतीला कोंकणपट्टीच्या संरक्षणाची फिकीरच करावी लागली नाहीं. बाळाजीशीं १७१४ मध्यें तह केल्यापासून कान्होजीनें तो तह इमानदारीनें पाळला, आणि मराठ्यांची आब पश्चिम किनाऱ्यावर चांगलीच बसविली. वसुलाची फेड मात्र त्याच्या हातून वेळेवर होत नसे. त्याबद्दल शाहूनें त्याची बऱ्याच वेळां कान उघाडणी केल्याचे उल्लेख आहेत. कदाचित् यूरोपीयन लोकांशीं झालेल्या युद्धांत त्याचा बराचसा पैसा खर्च झाल्यामुळें त्याला वक्तशीर वसूल देतां आला नसावा. इतर मराठे सरदारांशीं त्याचा फारसा संबंध पडत नसल्यामुळें तो सर्वांशीं फटकून वागे. मनांतून त्याला पेशवे किंवा शाहू यांच्याविषयीं फारशी सहानुभूति वाटत नसावी. परंतु वरपांगीं तो सरळ वागे. बाळाजी विश्वनाथाच्या मदतीनें त्याला मागें शिद्याचा पराभव करतां आला व त्याचा बराच मुलुख लाटतां आला. बाळाजीनें त्याचा व शिद्याचा तह करून दिल्यानंतर दहा वर्षें त्याला शिद्यापासून कटकट झाली नाहीं. त्यामुळें त्याला आपली सत्ता कोंकणांत बळकट करून शिवाय वाढवितां आली. छत्रपती व पेशवे यांच्या प्रत्यक्ष कुमकेनें नसलें, तरी त्यांच्या नैतिक पाठिंब्याच्या व हिंमतीच्या

बळावर त्याला इंग्रज, डच व पोर्तुगीज या तिघांनाही धुडकावून देतां आलें. कान्होजी या पेशव्यांच्या स्नेहाची व आधाराची किंमत जाणून होता. त्यामुळें तो होता तोंपर्यंत पश्चिम किनाऱ्यावर कोणाची डाळ शिजली नाहीं. इंग्रज तर डोळ्यांत तेल घालून त्याच्या मृत्यूची वाट पहात होते.

कान्होजीला मथुराबाई, लक्ष्मीबाई व गहिनाबाई अशा तीन बायका असून इतर कांहीं रक्षाही होत्या. त्याला औरस व अनौरस मिळून बरीच संतति होती. यांपैकीं पहिल्या दोघींचीं ब्रम्हेंद्रस्वामींला गेलेलीं बरींच पत्रें उपलब्ध झालीं आहेत. त्यावरून त्या चतुर, कर्तृत्ववान व घराण्याच्या लौकिकास जपणाऱ्या होत्या असें दिसतें. मथुराबाई तर मराठी राज्याची विशेषच अभिमानी होती. हबशांच्या युद्धांत तिनेंच आंगऱ्यांच्या तर्फे पुढाकार घेतला होता. तिचे पुत्र सेखोजी व संभाजी हे बहुधा कान्होजीचे वडील पुत्र असावेत. कान्होजीच्या मागून सेखोजी हा मराठी आरमाराचा सरखेल झाला. हा आपल्या आईप्रमाणें राजनिष्ठ व इमानी असून मराठी राज्याचें हित चिंतणारा होता. शौर्याची आवड, भारदस्तपणा व नम्रता हे गुण सेखोजीच्या कर्तबगारीला शोभा देत. त्याचें व बाजीरावचें सख्य होतें. १२ फेब्रुवारी १७३२ रोजीं बाजीराव कुलाब्यास गेला होता, तेव्हां 'त्यांच्या आमच्या परस्पर भेटी झाल्या. उत्तम प्रतीनें सौरस्य झालें,' असे त्या भेटीबद्दल सेखोजी लिहितो. पण मराठ्यांच्या दुर्दैवानें तो सप्टेंबर १७३३ मध्यें एकाएकीं मरण पावला. त्याचा धाकटा भाऊ संभाजी हा त्याच्यामागून सरखेल झाला. सेखोजीचें वर्तन सर्वांशीं गोड असे. कान्होजीची वक्रता त्याच्यांत नव्हती. तो आपल्या भावाबंदांची विशेष काळजी वाही. सावत्र-आयांशीं देखील त्याचें वर्तन प्रेमळ व सलोख्याचें असे. त्याच्या अगदीं उलट संभाजीचा स्वभाव होता. तो तिरसट, उतावळा व लहरी होता. सेखोजीनें आपल्या कारकीर्दींत त्याला सांभाळून घेतलें व त्याचा तऱ्हेवाईकपणा घातुक होऊं दिला नाहीं. परंतु तो सरखेल झाल्यावर त्याला आपल्या भावांना संभाळून घेतां आलें नाहीं. आंगऱ्यांच्या घराण्यांत भाऊबंदकी सुरू झाली. या दोघांशिवाय कान्होजीला, येसाजी, मानाजी, तुळाजी, व धोंडजी असे निदान चार पुत्र होते. शाहू व बाजीरावला या भांडकुदळ भावांचें सख्य करतां आलें नाहीं हें मराठेशाहीचें दुर्दैव होय. या भाऊबंदकीमुळें पुढें इंग्रजांचें चांगलेंच फावलें. नानासाहेबांच्या कारकीर्दींत तर पेशव्यांचें व आंगऱ्यांचें भांडण जुंपून, इंग्रजांचा शिरकाव झाला, आणि त्यांच्या सहाय्यानें आंगऱ्यांची सत्ता कमी झाली व पश्चिम किनाऱ्यावर इंग्रजांची पकड बसली.

त्या वेळीं वसईपासून सावंतवाडीपर्यंतची कोंकणपट्टी निरनिराळ्या सत्तांच्या ताब्यांत होती. वसई, ठाणें, चेऊल येथें पोर्तुगीज, मुंबईस इंग्रज, जंजिरा येथें हबशी, अलीबागेस आंगरे, सावंतवाडीस सावंत, मावळणापासून पन्हाळ्यापर्यंत कोल्हापूरकर व गोवें येथें पोर्तुगीज. या सर्वांत आंगरे प्रबल असल्यामुळें त्यांच्यावर बाकी दांतओठ खाऊन चडफडत असत. शिद्याचें व आंगऱ्यांचें अहिनेकुलाप्रमाणें वैर, तेव्हां इंग्रज व पोर्तुगीज हे नेहमींच शिद्याला मदत करीत. १७१५ च्या तहानंतर शिद्दी स्तब्ध होता, परंतु इंग्रजांच्या चिथावणीनें त्यानें कोंकण प्रांतांत १७२७ पासून खाजवून खरूज वाढविण्यास सुरवात केली. आफ्रिकेंतील निग्रो म्हणून शिद्दी, इजिप्तच्या बाजूनें आले म्हणून हबशी व सोमालिल्यांड हा यांचा देश म्हणून शामल, अशीं अनेक नांवें शिद्यांना लाभलेलीं होतीं. अहमदनगर येथील निजामशाही अमलांत हे हिंदुस्थानांत आले व जंजिऱ्याचे अधिपति होऊन बसले. निजामशाही बुडाल्यानंतर हे आपणांस दिल्लीपतीचे अंकित म्हणवून घेऊं लागले. याकूदखान हा यांचा किताब होता. शिद्याचा कांटा स्वराज्यांतून उपटून काढावा म्हणून शिवाजी महाराजांच्या वेळेपासून मराठ्यांची सारखी खटपट चालली होती. परंतु कोणालाच यश आलें नाहीं. कांहीं ना कांहीं तरी कारणानें कोणतीच मोहीम शेवटास गेली नाहीं व मराठी राज्य नाहींसें झालें तरी कोंकणांतील शिद्यांचा कांटा आजदेखील कायमच आहे.

इ. स. १७०७ पासून १७३१ पर्यंत सिद्दी रसूल याकूदखान हा जंजिऱ्याचा नबाब होता. त्याच्या हाताखालीं अंजनवेल येथील अधिकारी सिद्दीसात होता. हा सिद्दीसात मोठा क्रूर होता. याच्या मानानें सिद्दी रसूल बराच चांगला म्हटला पाहिजे. १७२६ सालीं पावसाळा संपल्यानंतर ब्रम्हेंद्रस्वामी नित्य नियमाप्रमाणें कर्नाटकांत भिक्षांदेही करितां निघाला. सिद्दीसातानें त्याला परत येतांना, सावनूरच्या नबाबानें शिद्याला देऊं केलेला हत्ती बरोबर घेऊन येण्यास सांगितलें. स्वामीनें ती गोष्ट तावडतोब मान्य केली. स्वामीचा स्वभाव फार घमेंडी होता. प्रत्येकावर आपली छाप पाडून आपला मोठेपणा दाखविण्याचा त्याचा प्रयत्न असे. शिरस्त्याप्रमाणें ही विनंति ब्रम्हेंद्रानें मान्य केली. अशीं दहापांच फालतू कामें बगलेंत घालून बाहेर पडण्याची स्वामीला जन्माची खोडच होती. लग्नें, मुंजी, जवाहीर, हत्ती, घोडे वगैरे बाबी ठरविण्यांत, विकण्यांत व विकत घेण्यांत आपला हातखंडा आहे, अशी स्वामीला घमेंड असे. आपल्याला कोणी फसवूं शकणार नाहीं असाहि स्वामीचा बाणा असे. हातीं घेतलेल्या कामांत आपल्या आड

येण्याचें कोणाला सामर्थ्य नाहीं अशीही अहंता स्वामीच्या ठायीं वसत होती. ह्या अहंतेच्या भरांत दंग होऊन स्वामी कर्नाटकांत दिग्विजय करण्यास व हबशांचा हत्ती तेथून बरोबर घेऊन येण्यास निघाला. प्रांतोप्रांतींच्या सरकारांचीं दस्तकें (अधिकारपत्रें) घेतल्यास हत्ती सुरक्षित आणतां येईल अशी सल्ला त्यास हबशानें दिली. " परंतु तुमचे काय हत्ती असतील ते समागमें येतील, कोणाचें दस्तकाचें प्रयोजन नाहीं, " असें स्वामीनें हबशास फुशारकीचें उत्तर दिलें. सामान्य कायदे सामान्य माणसांस लागू, आपल्यासारख्या अलौकिक महापुरुषास कायद्यांचें बिल्कुल बंधन नाहीं, असें ध्वनित करण्याचा स्वामीचा मनोदय होता. शत्रु असो, मित्र असो, मराठा असो, इंग्रज असो, किंवा पोर्तुगीज असो, वाटेल त्यांचीं कामें, लढाई असो अगर नसो, करावयाचीं, असा स्वामींचा बेगुमान स्वभाव असे. हबशांशीं लढाई चालली असतांना आंग्र्यांची परवानगी विचारल्यावांचून यवनाचा हत्ती सुरक्षित आणण्याचा उद्योग कितपत यशस्कर होईल ह्याचा विचार करण्याची स्वामींस बिलकूल पर्वा नव्हती. १७२६ च्या हिंवाळ्यांत कर्नाटकांत भिक्षा मागून १७२७ च्या प्रारंभीं स्वामी हत्तीसमागमें कोंकणांत उतरले, व कांहीं लोकांबरोबर हत्ती हबशांकडे दस्तकावांचून मार्गस्थ करते झाले. माखजनच्या मेटापर्यंत हत्ती सुरक्षित आला. परंतु त्या मेटावर (नाक्या) कान्होजी आंग्र्याची चौकी होती तेथें हत्तीला मज्जाव झाला. विशाळगडच्या घांटावर हत्तीला येतांना अटकाव झालाच होता. परंतु स्वामींच्या शिफारशीवरून किल्लेदारानें हत्ती पुढें जाऊं दिला. परंतु हत्ती हबशांचा आहे व त्याला दस्तक नाहीं असें कळल्याबरोबर, माखजनच्या नाक्यावरील आंग्र्यांच्या चौकीदारांनीं हत्ती पकडून ठेवला. इतक्यांत, जवळच हबशांचे चौकीदार होते त्यांस बातमी लागून ते हत्तीचा कबजा घेण्यास आले. आंग्र्यांच्या लोकांची व हबशांच्या लोकांची लढाई झाली. हबशांचे लोकांनीं माघार खाल्ली व हत्ती जयगडच्या किल्ल्यांतील आंग्र्यांच्या सैनिकांनीं आपल्याबरोबर नेला. ही बातमी सिद्दीसातास गोवळकोटास कळली. स्वामीनें कांहीं तरी निमित्त करून आपला हत्ती आंग्र्यांच्या हातीं मुद्दामच जाऊं दिला अशी भलतीच कल्पना करून घेऊन, त्या बेहोष यवनानें गेलेला माल वकिलाच्या मार्फत यादी पाठवून परत आणण्याचा किंवा लढाई संपेपर्यंत वाट पाहण्याचा, किंवा शत्रूला लढाई देऊन आपला हत्ती पकडण्याचा सीधा व सरळ मार्ग सोडून, सिद्दीसातानें ब्रम्हेंद्रस्वामींचें परशरामचें गांव व देवालय लुटून फस्त केलें आणि गांवांतील व देवळांतील बायकामाणसांची

अब्रू घेतली. हा दुर्घट प्रसंग १७२७ च्या फेब्रुवारींत शिवरात्रीस झाला. आंग्र्यानें हत्ती नेला व शिद्यानें गांव व देऊळ लुटलें, हा दुहेरी घात स्वामींच्या हृदयाला दुभंग करता झाला. बिगरपरवाना हत्ती आणिला म्हणून आंग्रे रागावणार व तो गमावला म्हणून स्वामींच्या नांवानें सिद्दी हाका मारणार अशा विवंचनेंत ब्रम्हेंद्र पडला. ह्या बाहेरच्या विवंचनाहूनहि महत्तर अशी जी देवालयो-ध्वंसनाची घरची विवंचना; तिनें तर स्वामीच्या काळजाचा भेदच केला. एका चुकीचा, एका घमेंडीचा, एक अधिकारपत्र बरोबर न नेल्याचा हा सर्व खेळ झाला ! सर्व अनर्थ कान्होजीनें केला. हबशांचा हत्ती आणावयास सावनुरास जावें किंवा न जावें ह्याची परवानगी ब्रह्मेंद्रानें जर आधींच कान्होजीला विचारली असती, तर हें तिहेरी संकट कशास ओढवतें ? परंतु होणाराला उपाय काय ? शेवटीं ओढवलेल्या प्रसंगाची परीक्षा करतां स्वामीस एक रामबाण उपाय सुचला. स्वामीनें आपल्या झोळींतून शिव्यांचें व शापांचें अमोघ अस्त्र काढिलें. "हत्ती सोडून देणें, नाहींतर तुझें कल्याण होणार नाहीं," असा निर्वाणीचा शापांकित मसुदा ब्रह्मेंद्रानें कान्होजीकडे पाठविला. झाली मजा येवढी बस झाली असा विचार करून व स्वामीच्या मसुद्याचा आदर करून, हत्ती बेदिक्कत सोडून देणें म्हणून सरखेलांनीं आपल्या माण-सांस हुकूम सोडिला. हबशांचा हत्ती स्वामीनें हबशांकडे पाठविला. जंजिरेकर हबशी याला सिद्दीसाताचें हें दुष्कृत्य कळतांच त्यानें त्याला निषेधपत्र पाठवून स्वामींची लुट-लेली जिनगी स्वामींकडे परत पाठवून देण्यास सांगितलें. यद्यपि स्वामींची चीजवस्त स्वामीला मिळाली, तत्रापि देवस्थानाचा जो उध्वंस झाला होता तो कांहीं कोणत्याहि उपायानें नीट होण्यासारखा नव्हता. तशांत सिद्दीसातानें स्वामींवर अनेक बालांटें घेतलीं. जंजिरेकर हबशांचें सिद्दीसात ऐकत नाहीं, स्वतः सिद्दीसात आपल्यावर तुफानें घेतो, व कान्होजी आंग्रा आपली मस्करी करतो, अशा त्रिविध अडचणींत स्वामी ह्या वेळीं सांपडला. सर्व लोकांनीं आपल्याला मान द्यावा, ही जी स्वामींची मनापासूनची इच्छा, तिचा ह्या वेळीं सर्वस्वी भंग झाला. याकुतखान व सिद्दी-सात ह्यांच्यावरील स्वामींचा विश्वास उडाल्यामुळें, त्याच्या प्रांतांतील परशराम ह्या गांवीं रहाणें स्वामींस शहाणपणाचें वाटेना. कान्होजीसारख्या थट्टेखोर व पाताळ-यंत्री माणसावर तर स्वामींचा विश्वास बिलकूल बसेना. यवनांसारख्या बोलून चालून दुष्ट माणसांच्या व कान्होजीसारख्या आंतल्या गांठीच्या मतलबी मरा-ठ्यांच्या सहवासांत आपल्यासारख्या सीध्या व साध्या माणसाचा बोज रहाणार नाहीं, अशी पक्की खात्री होऊन स्वामीनें कोंकणाचा त्याग करून वरघांटीं जाण्याचा

विचार केला. कान्होजीनें स्वामींस वरघांटीं न जाण्याची शपथ घातली. शाप, शिव्या, शपथा, मंत्र, तंत्र, भुतें, ह्यांचा प्रभाव स्वामींच्या मनावर अतिशय असल्यामुळें, वरघांटीं जाण्याचा विचार स्वामींस कांहीं दिवस तहकूब ठेवावा लागला. वरघांटीं न जाण्याची कान्होजीची शपथ सुटली नसल्यामुळें, त्यांनीं कर्नाटकांत गुत्तीकडे जाण्याचा बहाणा केला. कोणी-कडून तरी कोंकणपट्टीच्या बाहेर होतां होईल तों लवकर पडण्याचा स्वामींचा मनोदय होता. कोंकणांतील दुष्टांचा व धूर्तांचा सहवास क्षणभरहि न व्हावा हा त्यांचा मुख्य विचार होता. तदनुरूप गोव्यांहून ते कोल्हापुरास गेले. परंतु वाटें-तील दगदगीनें त्यांना ज्वराची व्यथा झाली. तेव्हां कर्नाटकांत जाण्याचा रोख सोडून देण्यास ही सबब समर्पक आहे, असें पाहून, त्यांनीं पालीवरून धावडशीचा रस्ता धरला. शपथेला भीक न घालतां स्वामी कांहीं तरी बहाणा करून वरघांटीं जाणार हें कळून चुकल्याबरोबर, कान्होजीनें आपण घातलेली आण मोकळी केली. येणेंप्रमाणें शपथेच्या कचाट्यांतून सुटल्यावर स्वामी धावडशीस येऊन सुखरूप पोहोंचले. तेथें त्यांची व शाहूमहाराजांची गांठ पडली. कोंकणांत झालेली सर्व हकीकत त्यांनीं शाहूस इत्थंभूत सांगितली, व कान्होजीला छत्रपतीच्या भेटीचें साद्यंत वर्णन लिहून पाठविलें. शाहूनें आपली भेट किती मर्यादेनें व निष्ठेनें घेतली, ती हकीकत लिहून कान्होजीला दरडावि-ण्याचा स्वामींचा बेत होता. स्वामींच्या ह्या लिहिण्याचा अर्थ कान्होजी समजला व ‘ जो कोणी स्वामीस न मानी, तोच अविवेकी आहे, असें वरकांतीं नम्रता-पूर्वक उत्तर त्यानें त्यास पाठविलें. जंजिऱ्याचा हबशी अविवेकी, स्वामींना न मानणारा आहे, व आपण स्वतः स्वामींचे एकनिष्ठ सच्छिष्य आहों, असा हें पत्र लिहिण्यांत कान्होजीचा मनोदय होता. स्वामीचें प्रस्थ दहा वीस वर्षें कोंकणांत माजूं दिल्यानें स्वामी आपल्याला जुमानीनासा झाला, व दस्तकावांचून शत्रूचा माल प्रांतांतून नेऊं लागला, हा स्वामीचा अत्याचार आहे, असें ध्वनित करण्याचा कान्होजीचा हेतु होता. अंगीं विशेष कर्तृत्वशक्ति, राजकारण कौशल व सारासार विचार नसणारीं माणसें जेव्हां कार्यकर्त्या पुरुषांच्या राजकारणांत लुडबुड करूं पाहतात, तेव्हां त्यांच्या पदरांत जशास तशी संभावना पडल्यास त्याबद्दल यमनियमादि अष्टांग सिद्धि झालेल्या परमहंसांनीं, कान्होजीच्या म्हणण्याप्रमाणें खरोखरीच खेद मानून घेऊं नये. परंतु हत्तीमुळें झालेल्या नुकसानीबद्दल, कान्होजीला दिलेल्या कर्जाबद्दल व हत्तीमुळें झालेल्या अपमानाबद्दल स्वामींना

आमरण किती वाईट वाटत होतें, ह्याचे दाखले स्वामींच्या अनेक पत्रांतून आहेत. हा शोक ब्रह्मेंद्रांनीं स्वीकारिलेल्या संन्याशी वृत्तीला अगदीं विसंगत होता.

हें हत्तीचें प्रकरण १७२७ फेब्रुवारींत घडलें. स्वामी १७२८ च्या मार्चांत धावडशीस जे आले ते बहुतेक कायमचेच आले. ह्यापूर्वीं बरींच वर्षें स्वामी धावडशीस येऊन जाऊन रहात होते व १७१६ च्या हिंवाळ्यांत १७१७च्या जानेवारींत स्वामी देशावर होते. १७२१ पासून १७२५ पर्यंत बहुतेक प्रत्येक वर्षी स्वामी देशावर येत असत. लिंब येथील विहिरीचें काम १७२१ पासून १७२५ पर्यंत चाललें असतांना विरुबाईनें ब्रह्मेंद्रापाशीं पाथरवटांची मागणी केलेली आहे. १७१६ त देशावर आल्यावर बाळाजी विश्वनाथानें ब्रह्मेंद्रास पिंपरी हें गांव इनाम दिलें. बाळाजी विश्वनाथाकडून पिंपरी गांव मिळाल्यानंतर १७२१ त शाहूनें स्वामींस धावडशी गांव इनाम दिलें. तेथें असतांना विरुबाईनें ब्रह्मेंद्रापाशीं पाथर-वट मागितले. १७२८ च्या मार्चांत धावडशीस आल्यावर स्वामीनीं आपलीं दुःखें शाहुमहाराजांस सांगितलीं. शिवाय स्वामींच्या संकटांचा वृत्तांत बाजीरावास परस्परें कळलाच होता. आपल्या परमपूज्य गुरूचीं गाऱ्हाणीं ऐकून त्यांचा परिहार करण्याची इच्छा दोघांची होती. परंतु कान्होजी जिवंत असेतोंपर्यंत आंग्र्याला तंबी पोहोंचण्याचा संभव फारच थोडा होता. स्वामींचा छळ आंग्र्यानें इतका दुरून, अप्रत्यक्ष रीतीनें व चतुराईनें केला होता कीं, त्याला राजरोस रीतीनें नांवें ठेवण्यास बिलकूल जागा नव्हती. स्वामींजवळ परवाना नसल्यामुळें हत्ती अडका-वून ठेवणें लढाईच्या नियमांना सर्वस्वी अनुसरूनच होतें. आपला हत्ती आंग्र्यानें अडविला म्हणून स्वामींच्या देवालयाची व गांवाची राखरांगोळी करणें मात्र हबशाला केव्हांही शोभण्यासारखें नव्हतें. हिंदूंच्या धर्मांची व त्यांच्या धर्मगुरूंची अशी मानखंडणा शाहूमहाराजांसारख्या राजाला व बाजीरावासारख्या लढवय्याला बिलकूल खपण्यासारखी नव्हती. तेव्हां हबशाशीं लढाई करून गोब्राम्हणांचा प्रतिपाल करण्यास शाहूला व बाजीरावाला ही सबब उत्तम सांपडली. परंतु बाजीराव व शाहू हे त्यावेळीं निजाम, संभाजी व दाभाडे यांच्यावरील महत्वाच्या मोहिमांची तड लावण्यांत गुंतले असल्यामुळें त्यांना हें युद्ध लागलींच हातीं घेतां येईना. सिद्दी व आंगरे यांची सारखी धुसफुस चालली होती व त्यांच्या मधुन मधुन चकमकीही झडत असत. कान्होजीच्या मृत्यूनंतर आंग्र्यांचा पक्ष जरा ढिला पडला, तेव्हां सेखोजीनें शाहूची मदत मागितली.

आंगऱ्यांच्या परगण्या शेजारील जो मराठ्यांचा प्रांत, त्याची व्यवस्था श्रीनिवासराव प्रतिनिधीकडे असे. तेव्हां शामळाशीं लढण्याचा मक्ता त्याजकडेस शाहूमहाराजांनीं सोंपविला, व फिरंग्यांवर मोहीम करण्यास पिलाजी जाधवराव यांस सांगितलें. पिलाजी जाधवराव व श्रीनिवासराव प्रतिनिधि साताऱ्यास बसून बाजीरावाविरुद्ध मसलत करीत असत. तेव्हां त्यांचा रोग साताऱ्याहून उखडून काढण्यास ही कामगिरी सांगण्याची अक्कल बाजीरावानें शोधून काढली. १७२९ च्या जून महिन्यांत गद्देकोट येथें पिलाजी जाधवराव याची सरदारी बाजीरावानें तगीर केली होती. तेव्हांपासून १७३० च्या मेपर्यंत पिलाजी घरींच बसून होता. त्यास १७३० च्या मेंत कोळवणांत फिरंग्यांवर पाठविलें, व त्याच सुमारास श्रीनिवासरावास कुलाबा-रत्नागिरीकडे रवाना केलें. लढाईचा सराव नसल्यामुळें श्रीनिवासराव कोंकणांत केवळ माशा मारीत बसला. पिलाजी जाधवरावानें मात्र गेल्याबरोबर कोहज किल्ला सर केला. श्रीनिवासरावास मदत करण्यास सखोजी आंग्र्याला शाहूराजाची आज्ञा होती; परंतु श्रीनिवासरावाचा स्वभाव तऱ्हेवाईक पडल्यामुळें सेखोजीचें व त्याचें पटेना. १७३० व १७३१ अशीं सबंध दोन सालें कोंकणांत राहून प्रतिनिधीच्या हातून शामळाचें पारिपत्य जेव्हां यत्किंचित्‌हि होईना, तेव्हां सेखोजी व संभाजी आंग्र्यास शाहूनें साताऱ्यास बोलाविलें. साताऱ्यास जाण्याच्या पूर्वी सेखोजीची व बाजीरावाची गांठ १७३२ च्या जानेवारींत कुलाब्यास पडली. ह्या मुलाखतींत बाजीरावाचें व सेखोजीचें पूर्ण सौरस्य झालें. अर्थात्, श्रीनिवासराव प्रतिनिधीच्या विरुद्ध वागण्याची निदान त्याला मदत न करण्याची सल्ला बाजीरावाकडून सेखोजीस मिळाली. १७३१ त दाभाड्याचा डभईस पराभव बाजीरावानें केल्यापासून प्रतिनिधीचा पक्ष साताऱ्यास दुर्बळ होत चालला होता. तो सेखोजीच्या व बाजीरावाच्या ह्या १७३२ तील भेटीनें अगदींच पंगू झाला. १७३२ च्या मार्च महिन्यांत श्रीनिवासरावानें अंजनवेलीस मोर्चे लाविले. त्यांच्या सहाय्यास सेखोजीनें बकाजी नाईक महाडीक यास पाठविलें. बकाजी नायकाचें व सिद्दीसाताचें चिपळूणाजवळ मोठ्या कडाक्याचें युद्ध झालें. बकाजीनें सिद्दीसाताला कुल मारून काढून किल्ल्यांत घालवून दिलें. सिद्दीसाताची अशी तारांबळ केल्यावर, बकाजी नायकाच्या मनांत गोवळकोटास मोर्चे देऊन ती जागा एकदम घ्यावी असें होतें. इतक्यांत पंतप्रतिनिधीची स्वारी गोवळकोटासन्निध येऊन पोहोंचली. गोवळकोटास येऊन पोहोंचण्याच्या अगोदर प्रतिनिधीची व सिद्दीसाताची काशी बंदरावर मुलाखत झाली. बकाजी नायकाकडून पराभव पावल्यावर, सिद्दी-

सातानें प्रतिनिधीची काशी बंदरावरहि मुलाखत घेतली. तींत त्यानें असें बोलणें घातलें कीं, आंग्र्यास तुम्ही येथून घालवा, म्हणजे लढाईची गोष्ट सोडून देऊन, शाहूराजांच्या भेटीस मी सातान्यास येतों व आपल्या म्हणण्याप्रमाणें सर्व कांहीं करून देतों. सिद्दीसाताच्या ह्या थापांना भुलून, प्रतिनिधीनें बकाजी नायकाशीं असें बोलणें लावलें कीं, तुम्ही आम्ही मिळून गोवळकोट घेऊं. परंतु हें बोलणें बकाजीस मान्य होईना. प्रतिनिधीचें युद्धकौशल्य कितपत आहे हें बकाजीस पूर्णपणें कळलें होतें. बकाजीच्या सहाय्यानें गोवळकोट घ्यावा व प्रतिनिधीनें लढून गोवळकोट घेतला अशी सर्वत्र ख्याती व्हावी, असा प्रतिनिधीचा बेत होता. तो अर्थातच बकाजीस मान्य झाला नाहीं. त्यामुळें बकाजी प्रतिनिधीस सोडून कुलाब्यास सेखोजीपाशीं परत आला. बकाजी निघून गेल्याबरोबर, सिद्दीसातानें आपलें खरें स्वरूप प्रकट केलें. सातान्यास येण्याच्या ज्या नरम गोष्टी तो आतांपर्यंत बोलत होता त्या त्यानें अजिबात सोडून दिल्या व प्रतिनिधीशीं दोन चार तुंबळ युद्धें घेतलीं. त्यांत प्रतिनिधि केवळ हैराण झाला. पुढें पावसाळा सुरू झाल्यामुळें गोवळकोट घेण्याचें काम पुढील सालावर टाकून देणें भाग पडलें.

१७३२ मधील ह्या कोंकणांतील मोहिमेच्या वृत्तांतावरून, प्रतिनिधीच्या हातून शामळास तंबी पोहोंचणें शक्य नाहीं, हें शाहू महाराजांस पक्कें कळून चुकलें. सेखोजी आंग्रे व बकाजी नाईक महाडीक यांचें व प्रतिनिधीचें स्वारस्य नसल्यामुळें त्यांच्याहि हातून तें काम होईल अशी शाहूची खात्री नव्हती. ती गोवळकोटची मसलत फसल्यामुळें, प्रतिनिधीच्याच कर्तव्यशून्यतेचा तेवढा अंदाज शाहूस करतां आला असें नाहीं, तर आंग्र्यांच्या संबधींहि त्याच्या मनांत विकल्प आले.

इतक्यांत १७३२ चा पावसाळा संपून कोंकणांतील मोहीम नेटानें चालू करण्याचे दिवस येऊन थडकले; शाहूमहाराजांना तर शामळाचें पारिपत्य करण्याची बेसुमार उत्कंठा लागून राहिली. केवळ आंग्र्यांच्या किंवा प्रतिनिधीच्या हातून ही कामगिरी उलगडून येईल असा रंग दिसेना. तेव्हां शाहूनें बाजीरावाला व फत्तेसिंग भोंसल्याला कोंकणच्या मोहिमेवर जाण्यास आज्ञा केली. ते १७३३ च्या एप्रिलांत कोंकणांत उतरले. बाजीराव बल्लाळ कोंकणांत उतरल्याबरोबर तीन वर्षें खितपत पडलेल्या ह्या मोहिमेच्या मंदगतीस आळा पडून, शत्रूला तंबी पोहोंचविण्याचें काम जारीनें सुरू झालें. रायगड, मंडणगड, विजयगड, गोवळकोट, अंजनवेल,

उंदेरी व जंजिरा अशीं मोठमोठीं बिकट स्थळें शामळाचे हातांत होतीं. त्या सर्वांवर एकदम हल्ला करण्याचा बाजीरावानें बेत केला. उंदेरीवर व इंग्रजांवर सेखोजीस पाठविलें. बाणकोट व मंडणगड ह्यांच्यावर बकाजी नाइकास धाडिलें. प्रतिनिधि व आनंदराव सोमवंशी ह्यांच्याकडे अंजनवेलीची कामगिरी सोंपविली; व स्वतः बाजीराव व फत्तेसिंग शामळाच्या जंजिऱ्याला शह देऊन बसले. यावेळीं जंजिऱ्याच्या आंतील खानजाद्यांची स्थिति फारच विचित्र झाली होती. बाजीराव कोंकणांत उतरण्याच्या पूर्वीं जंजिऱ्याचा मुख्य सिद्दी रसूल याकूदखान १७३३ च्या फेब्रुवारींत मरण पावला होता. ह्या सिद्दी रसूलानें १७३३ च्या फेब्रुवारीपर्यंत राज्य केलें. ह्याच्या कारकीर्दींत मराठ्यांशीं हमेशा लढाया चालूच होत्या. त्या सर्व लढायांत कान्होजी आंग्र्याच्या कारकीर्दींत १७२६ त जी लढाई सुरू झाली, व जी चालू असतां ब्रम्हेंद्रस्वामींची कोंकणांतून उचल बांगडी झाली ती विशेष प्रख्यात आहे. ही लढाई १७२६ त सुरू होऊन, १७३३ च्या फेब्रुवारींत तर ऐन रंगांत येत होती. सात वर्षें सारखें लढून सिद्दी रसूल पादाक्रांत होण्याचीं चिन्हें बिलकुल दिसेनात. कान्होजी आंग्र, सेखोजी आंग्रे, संभाजी आंग्रे, बकाजी नाईक महाडीक, श्रीपतराव प्रतिनिधि, जिवाजी खंडेराव चिटणीस, यशवंतराव महादेव, पिलाजी जाधवराव वगैरे अनेक दुय्यम प्रतीच्या माणसांनीं सिद्द्यांची रग जिरविण्याची वेळोवेळीं खटपट केली; परंतु एकाचें मत दुसऱ्याला पसंत नसल्यामुळें, ह्यांपैकीं एकालाही म्हणण्यासारखें यश कधींच आलें नाहीं. सिद्दी सात, सिद्दी अंबर, सिद्दी संबूल, सिद्दी याकूब, सिद्दी बिलाल, सिद्दी मसूद वगैरे जंजिरेकर सिद्द्यांच्या स्नेह्यांनीं व सुभेदारांनीं मराठ्यांचे बहुतेक प्रयत्न निष्फळ करून टाकले, व कोंकणांतील हिंदू लोकांना भ्रष्ट करण्याचा तडाका चालविला. सात वर्षें लढून ह्या लहान माणसांच्या हातून कार्यसिद्धि लवकर होण्याचीं चिन्हें दिंसत नाहींत, असें पाहून शाहूराजानें बाजीराव बल्लाळाला १७३३ च्या प्रारंभीं जंजिऱ्यावरील मोहीम हातीं घेण्याचा हुकूम केला. बाजीरावाच्या सद्दीचा जोर विशेष म्हणा किंवा जंजिरेकर हबशाचें दैव फिरलें म्हणा, जंजिऱ्यावर स्वारी करण्याचा बाजीरावाला हुकूम होण्याला व सिद्दी रसूल याकूदखान मरण्याला एकच गांठ पडली. सिद्दी रसूल याकूदखान पिढीजाद मालक असल्यामुळें व सिद्दीसात, अंबर, संबूल, याकूब वगैरे सुभेदार त्यानेंच नेमिले असल्यामुळें त्याच्या हयातींत ह्या सरदारांत परस्पर उघडपणें एकमेकांचा विरोध करण्यास कोणीही धजला नाहीं. सिद्दी रसूल संपल्यावर मात्र, परस्पर

विरोधास उघडपणें बाहेर येण्यास जागा झाली. सिद्दी रसूल याच्या सरदारांपैकीं गुहाघर येथील बाटलेला पाटील याकूबखान ऊर्फ शेखजी याचें व सिद्दी रसूल याचें पूर्वींपासूनच चित्त शुद्ध नव्हतें. सिद्दी रसूलाच्या मृत्यूनंतर शेखजीची द्रोह-बुद्धि विकास पावून, त्याचें व बाकीच्या सरदारांचें वांकडें आलें. सिद्दी रसूलाचा वडील मुलगा सिद्दी अबदल्ला शेखजीच्या बाजूचा होता, ही गोष्ट इतर सरदारांस न आवडून, त्यांनीं बाजीराव राजपुरीला येण्याच्या दिवशींच सिद्दी अबदल्ला यास ठार केलें. सिद्दी रसूल याचा दुसरा एक मुलगा आपल्या बापाच्या प्रेताचें दफन करण्यास फेब्रुवारींत जंजिऱ्यांतून दंडाराजपुरीस आला होता तो आपल्या वडील भावाची ती दुष्टवार्ता ऐकून राजपुरीसच राहिला. ह्या मुलाला म्हणजे अबदुल रहिमान याला यशवंतराव महादेव यांनीं वश करून ठेवलें होतें. हें वर्तमान शेखजीस कळतांच तोही अबदुल रहिमानास येऊन मिळाला. पंतप्रतिनिधि यांनीं शेखजीस अगोदर फितविलें होतेंच. तशांत खाशांपैकीं एक मुलगा आपल्या पक्षाला मिळालेला पाहून शेखजीला जास्तच हुरूप आला व त्यानें बाजीरावास हरएक प्रकारची मदत करण्याचा पत्कर घेतला. इकडे जंजिऱ्यांतील सरदारांनीं सिद्दी रसूलाच्या सिद्दी हसन नांवाच्या मुलास गादीवर बसविलें, व मराठ्यांशीं टक्कर देण्याची तयारी केली. येणेंप्रमाणें हबसाणांतील हबशांत दोन परस्पर विरुद्ध तट उत्पन्न झाल्यामुळें बाजीरावाचें काम बरेंच सोपें झालें. सिद्दी संबूल व सिद्दी अंबर अफलानी हे दोघे खुद्द जंजिऱ्यांत होते. अंजनवेल, उंदेरी, विजयगड, गोवळकोट, मंडणगड व रायगड वगैरे सर्व गड कडेकोट तयारी करून मराठ्यांशीं सामना देण्यास सिद्ध झाले. शेखजीनें बाजीरावास जंजिऱ्यांत प्रवेश करण्यास खोकरीची वाट दाखविली. एवढें एक काम केल्यावर, पुढें चार महिने कोणतेंही काम आपल्या हातून होणार नाहीं असा शेखजीनें मध्येंच बहाणा केला. हा बहाणा स्वतःचें महत्व वाढविण्याच्या इच्छेनें केलेला असो, अगर प्रतिनिधि वगैरेंच्या चिथावणीवरून केलेला असो; परंतु त्याला धुडकावून देऊन बाजीरावानें हातीं घेतलेलें काम तडक चालविलें. १७३३ च्या २५ मेला मंडणगड सर झाला. याच महिन्यांत बिखाडी, अष्टमी, अश्राधार, आंतोणें, नागाठणें, तळें, घोसाळें, निजामपूर वगैरे महालांतही मराठ्यांचा अंमल बसला. श्रीपतराव प्रतिनिधीनें १७३३ च्या ८ जूनास रायगड किल्ला घेतला. येणें प्रमाणें हबशाचें एकएक ठाणें सर होत होत, १७३३ च्या २२ आगष्टास जंजिरा व अंजनवेल ह्यांखेरीज बहुतेक सर्व ठाणीं बाजीरावाच्या ताब्यांत आलीं.

जंजिऱ्यांतील हबशांपैकीं सिद्दी रहीण यानें खुद्द बाजीरावाशीं जजिऱ्याच्या बाहेर येऊन सामना केला; परंतु त्यांत तोच ठार झाला. बाजीरावानें खुषकीवरून मोर्चे लावून जंजिऱ्यावर तोफांचा मार चालविला व मानाजीनें समुद्रांतून बरीच मारगिरी केली. जंजिऱ्यांतील हबशांस सुरतेच्या सिद्दी मसुदाकडून व मुंबईच्या इंग्रजांकडून मदत मिळत होती, तीही ह्याच सुमारास बंद झाली. ही बाहेरची मदत बंद झाल्याबरोबर सिद्दी अंबर, सिद्दी संबूल वगैरे जंजिऱ्यांतील हबशी अंजनवेल, गोवळकोट वगैरे ठिकाणीं पळून गेले व जंजिरा अबदुल रहिमान याच्या तर्फेनें बाजीरावाच्या ताब्यांत आला. अबदुल रहिमान याला ५॥ महालांचा वसूल देण्याचा, व त्याच्याकडून रायगड, तळें, घोसाळें, अवचितगड आणि बिरवाडी हे किल्ले मराठ्यांनीं घेण्याचा संकेत ठरला. १७३३ च्या डिसेंबरांत ही अशी व्यवस्था करून बाजीराव साताऱ्यास परत आला.

१७३३ च्या डिसेंबरांत अबदुल रहिमान याची जंजिऱ्यांत यद्यपि स्थापना झाली, तत्रापि सिद्दी अंबर, सिद्दी संबूल व सिद्दी सात ह्या मंडळीनें अंजनवेल, गोवळकोट वगैरे ठाणीं लढविण्याचा उपक्रम सोडिला नाहीं. हा कालपर्यंत जंजिरा म्हणजे मराठ्यांना मोठें दुरधिगम्य स्थल वाटत असे. तो भ्रम मोडण्याचें महत्कृत्य करून, मोहिमेचें बाकीचें सटरफटर काम बाजीरावानें पूर्वीप्रमाणें इतर सरदारांच्या अंगावर टाकून दिलें, व साताऱ्यास जातांना चेऊलास १७३४ च्या ४ जानेवारीस आंग्र्यांची स्थापना केली. १७३३ च्या सप्टेंबरांत उंदेरीस इंग्रजांशीं लढत असतां सेखोजी आंग्रे एकाएकीं मृत्यु पावला. सेखोजी आंग्र्यानंतर संभाजी आंग्र्याला सरखेलीचें पद प्राप्त झालें. बाजीराव साताऱ्यास निघून गेल्यावर, संभाजीनें अंजनवेलीस मोर्चे लाविले. अंजनवेलीस मोर्चे लाविण्याच्या कामांत बहुत दिवस जाणार हें ओळखून, संभाजीनें कुलाब्यास घरची व्यवस्था पाहण्यास आपले भाऊ धोंडजी व मानाजी यांस ठेवून दिलें. धोंडजीकडे प्रांताची व्यवस्था पाहण्याचें काम नेमून दिलें व मानाजीस कुलाब्याच्या आरमाराचा अधिकार सांगितला. ही व्यवस्था चार सहा महिने चालली नाहीं तों संभाजी आंग्रे व मानाजी आंग्रे ह्यांच्यांत तेढ उत्पन्न झाली. कारभारासंबंधें नानाप्रकारचे आरोप ठेवून, संभाजीनें धोंडजीस कुलाब्याच्या बाहेर काढून दिलें व मानाजीस दुरुक्तीचें भाषण करून जीवन्मुक्त करण्याचा विचार केला. मानाजी आंग्रे ब्रम्हेंद्रस्वामीच्या व बाजीरावाच्या वतीचा आहे, तो आपल्याविरुद्ध राजकारण करतो, अशा प्रकारचे संशय संभाजीच्या पोटांत येऊं लागल्यामुळें, संभाजीचें वर्तन हें असें तिरसटपणाचें व एककल्ली झालें

होतें. कुलाब्यांत राहून आपला जीव सुरक्षित नाहीं, हें जाणून मानाजी रेवदंड्यास फिरंग्यांच्या आश्रयाला गेला व तेथेंच कांहीं दिवस स्वस्थ राहिला. १७३४ च्या जुलैच्या सुमाराला संभाजी आंग्र्यावर आभाळ कोसळतें कीं काय अशी स्थिति झाली, म्हणून लक्ष्मीबाई आंग्रे हिनें एक पत्र लिहिलें आहे त्यावरून मानाजीनें संभाजीवर बरेंच काहूर आणिलें होतें हें स्पष्ट आहे. मानाजी पळून गेल्यावर संभाजी विजयदुर्गाकडे निघून गेला. इतक्यांत मानाजीनें हल्ला करून कुलाबा काबीज केला. हें वर्तमान ऐकतांच संभाजी आपल्या सर्व आरमारासह कुलाब्यावर धांवून आला, ते समयीं मानाजी आंग्रे यानें बाजीरावास कुमक करण्याविषयीं निकडीचीं पत्रें पाठविलीं. संभाजीचा स्वभाव तऱ्हेवाईक पडल्यामुळें तो बाजीरावास, ब्रम्हेंद्र स्वामीस व शाहूराजास अत्यंत अप्रिय झालेला होता. आपल्या पश्चात् अंजनवेल वगैरे ठाणीं सर करण्याचें काम संभाजीच्या हातून झालें नाहीं ह्यामुळें बाजीरावाचा राग संभाजीवर होता. १७३४ च्या पावसाळ्यांत ब्रम्हेंद्रस्वामी कोंकणांत गेला असतां त्यांची पासोडी, बंदूक व निशाण संभाजीनें थट्टेनें किंवा अपमान करण्याच्या हेतूनें हिसकावून घेतल्यामुळें स्वामींचाही क्रोध संभाजीवर विशेष झाला होता, व मानाजीशीं भांडून थळची चौवुर्जी शामळाच्या हातीं जाऊं दिल्याबद्दल शाहूराजाची इतराजी त्याजवर झाली होती. शिवाय संभाजी व मानाजी ह्या दोघांमधील वैमनस्य वाढवून आपला फायदा करून घेण्याचा डाव इंग्रज व फिरंगी ह्यांनीं चालविलाच होता. संभाजीच्या आरमाराचें भय ग्रजांना इतकें कांहीं झालें होतें कीं, आंग्र्यांच्या कुलांत गृहकलह वाढवून, त्यांची शक्ति कमी करण्याचाच उपाय इंग्रजांना योजणें भाग पडलें. अंजनवेल व गोवळकोट हे दोन किल्ले शामळाचे घ्यावयाचे राहिले होते. शामळाला इंग्रजांची पाण्यांतून मदत होत असल्या कारणानें व संभाजी व मानाजी ह्यांच्यामधील वैमनस्य वाढत चालल्या कारणानें, अंजनवेल व गोवळकोट हीं ठाणीं एका सबंध वर्षांतहि मराठ्यांच्या हातीं पडलीं नाहींत. तशांत थळची चौबुर्जीही शामळांनीं मध्येंच पटकाविली. ही अशी पिच्छहाट होत आहे असें पाहून, मानाजीच्या विनवणीवरून व वस्तुस्थितीच्या निकडीवरून बाजीराव १७३५ त कोंकणांत पुनः उतरला. बाजीराव येण्याच्या पूर्वीं १७३५ च्या जानेवारींत अंजनवेल मराठ्यांच्या ताब्यांत आली. १७३४ च्या आरंभीं उदाजी पवारानें सिद्दी अंबर अफवानी ह्याचा पराभव व शिरच्छेद रायगडखालीं वाडीपाचाड येथें केला. ह्या पलीकडे १७३४ च्या सबंध सालांत मराठ्यांच्या हातून विशेष कांहीं एक झालें नाहीं. संभाजीचें व मानाजीचें वांकडें असल्यामुळें व मानाजीच्या

हातांतील आरमाराचा उपयोग इंग्रज व फिरंगी ह्यांच्या हालचाली बंद करण्याकडे होत नसल्यामुळें, अंजनवेल मराठ्यांच्या ताब्यांत ह्या वेळपर्यंत आली नाहीं. बाजीराव आपल्या साहाय्यास येणार असें कळल्याबरोबर मानाजीनें अंजनवेल घेण्याची खटपट केली व त्यांत वर सांगितल्याप्रमाणें त्यास यश आलें. इतक्यांत १७३५ च्या फेब्रुवारींत बाजीराव कोंकणांत येऊन पोहोंचला. बाजीराव १७३५ च्या फेब्रुवारीपासून एप्रिलपर्यंत कोंकणांत होता. तेवढ्या अवधींत राजमाची, कुलाबा कांदेरी, कोह्याळा वगैरे किल्ले मानाजीच्या हस्तें घेववून बाजीरावानें संभाजीचा अगदीं पाणउतारा करून सोडला व मानाजीशीं तह करून राजमाची वगैरे ठाणीं सरकारांत घेतलीं. मानाजीस वजारतमाब असा किताब देऊन व संभाजीकडे सरखेलीचें पद कायम करून ह्या दोघां भावांमधील तंटा बाजीरावानें मिटविल्यासारखें केलें. मानाजीला कुलाब्याचें ठाणें देऊन व संभाजीस विजयदुर्गास स्थापून, व ही आंग्र्यांच्या घरांतील भाऊबदकी मिटवून, कोंकणांत स्वस्थता उत्पन्न करण्याचा प्रयत्न बाजीरावानें केला. मानाजी व संभाजी यांमधील हा तह अलीबागेजवळील नवदरें या ठिकाणीं झाला.

संभाजीच्या व मानाजीच्या दुहीमुळें सिद्दीसात, सिद्दी संबूल वगैरे हबशांचें पारिपत्य होण्याचें काम जें तहकूब झालें होतें, तें नवदरें येथील तहानें पुनः जारीनें सुरू होण्याला सवड झाली. संभाजीला व मानाजीला वाटणीप्रमाणें विविक्षित प्रांत व विविक्षित अंमल मिळाल्यामुळें, आपसांत दुही होऊन इंग्रज, फिरंगी, शामळ व सावंत वगैरे शत्रूंना सवलत मिळत असे ती बंद झाली. १७३५ च्या एप्रिलांतील नवदरें येथील तहाच्या कालापासून पुढें दीडवर्ष गोवळकोटास मराठे मोर्चे लावून बसले होते. १७३५ च्या आगष्टांत सूर्याजी चव्हाण कोंकणराव ह्यास गोवळकोटाच्या कामगिरीस पाठविलें होतें. १७३५ च्या जून महिन्यांत सिद्दी सातानें अगदीं मर्यादा सोडून मराठ्यांच्या प्रांतांला बेसुमार उपद्रव देण्याचा उपक्रम स्वीकारला. संभाजी आंग्र्यानें हबशाला शासनाक्रांत करण्याचा बेत केला होता, परंतु तो त्याचा बेत मनांतल्या मनांतच राहिला असें दिसतें. मानाजीचा द्वेष व स्पर्धा करण्यांतच संभाजीचा बहुतेक हुरूप आटून गेला! हबशानें अत्यंत उपद्व्याप केला आहे असें ऐकून चिमाजी अप्पा १७३६ च्या मार्चांत कोंकणांत उतरला, व रेवासेजवळ चरई येथें सिद्दीसाताचा उध्वंस १९ एप्रिल १७३६ त करता झाला. उंदेरीचा किल्लेदार सिद्दी याकूबहि ह्या लढाईंत ठार झाला. चिमाजी अप्पा कोंकणांतून १७३६ च्या मेंत वरघाटीं आल्यावर, १७३६ च्या अक्टोबरांत उदाजी

पवारानें गोवळकोटची मोर्चेबंदी चालविली होती. परंतु आतां हबशांच्या आंगांत विशेष जोर राहिला नव्हता. जंजिऱ्यांत १७३३ त दोन पक्ष पडले होते हें मागें सांगितलेंच आहेः—सिद्दी अबदुल रहिमान याचा एक पक्ष व सिद्दी अंबर, सिद्दी संबूल व सिद्दीसात ह्यांचा दुसरा पक्ष. पैकीं ह्या दुसऱ्या पक्षांतील सर्व मंडळी १७३६ सालांत ठार होऊन, तो पक्ष अजीबात नष्ट झाला. अर्थात् मराठ्यांचा आश्रित जो सिद्दी अबदुल रहिमान तोच तेवढा एकटा राहिल्यामुळें १७३३ तील तहाचीं कलमें अमलांत येण्यास कोणताच प्रतिबंध राहिला नाहीं. १७३७ त अबदुल रहिमानानें हा तह दुसऱ्यांदा मान्य करून, मराठयांच्या संमतीनें जंजिऱ्याचें आधिपत्य स्वीकारलें. येणेंप्रमाणें १७२६ त ज्या लढाईचा प्रारंभ झाला व जींत शाहू महाराजांना इतर सर्व युद्धांपेक्षां विशेष काळजी व गोब्राह्मणप्रतिपालनाची जबाबदारी वाटली, ती लढाई १७३७त कायमची बंद झाली. अबदुल रहिमानानें १७३७ पासून १७४० पर्यंत सुखासमाधानानें राज्य केलें. तोंपर्यंत मराठयांना जंजिऱ्याच्या सिद्द्यांकडून काडीमात्रहि त्रास पोहोंचला नाहीं. बाजीरावनें शामळांचें पारिपत्य केलें व कोंकणांत धर्म राखला हें अगदीं खरें आहे. संभाजी व मानाजीची चुरस मात्र थांबली नाहीं. ती सारखी पुढें चालू होती. या यादवीमुळें मराठ्यांची आरमारी सत्ता नष्ट झाली व इंग्रजांचें फावलें. पेशव्यांनीं मानाजीचा पक्ष घेतल्यामुळें संभाजी त्यांच्यावर चिडला होता, व त्याच्या आणि मानाजीच्या सारख्या चकमकी तो मरेपर्यंत चालल्या होत्या. बाजीराव व चिमाजी आपा औरंगाबादेकडे मोहिमेंत गुंतले असतां संभाजीनें १७४० त मानाजीवर स्वारी करून, अलीबाग, हिराकोट, थळचा कोट, राजकोट, सागरगड वगैरे ठाणीं काबीज केलीं. ही बातमी लागतांच नाना व चिमाजी दोघेही कुलाब्यास मानाजीच्या सहाय्यास आले. हिराकोटास झालेल्या लढाईंत तुळाजी आंगरे कैदी झाला व संभाजी पळून गेला. मानाजीला साह्य केल्याबद्दल पाल व मीरगड हे दोन किल्ले पेशव्यांनीं घेतले. पेशव्यांपुढें आपलें कांहीं चालत नाहीं हें पाहून पुढें संभाजी मनांतल्या मनांत चरफडत गप्प बसला. तो १७४१ त वारला; परंतु त्याचें पेशव्याशीं असलेलें वैर तुळाजीनें पुढें चालविलें, आणि या वैरापायीं अत्यंत प्रबल असलेले सरखेल आंगरे नाममात्र राहिले. परंतु ती पुढची गोष्ट आहे. ती दुर्दैवाची कहाणी पुढें बाजीरावाच्या मृत्यूनंतर घडून आली.

बाजीरावच्या हयातीपर्यंत पेशव्यांची कोंकणपट्टीवर पूर्ण सत्ता होती आणि त्या वेळीं आंगऱ्यांचें आरमार इतकें उत्तम होतें कीं, युरोपांतून आरमारी काफिले

मागवून देखील डच, इंग्रज व फिरंगी असे तिघे मिळून आंगऱ्यांचा पराभव करूं शकले नाहींत. त्या काळीं हिंदुस्थानांत बांधलीं जाणारीं जहाजें विलक्षण मजबूत व वेगवान् असत. हिंदी कारागिरांचें हें प्राविण्य पाहून इंग्रज चकित होत व त्यांच्याकडून ते मुंबईसच आपलीं लढाऊ व मोठीं जहाजें बांधून घेत. विलायतेंहून येणारीं जहाजें तकलादू असल्यामुळें चिल्लर चकमकीकरितां व व्यापाराकरितां काय तो त्यांचा उपयोग होई. आज ही दंतकथाच ठरेल. दर्यावर्दीपणा व नाविक विद्या कोंकणांतील कोळी व मावळे यांच्या इतकी हाडीमाशीं खिळली होती कीं इंग्रजांना अडीअडचणीच्या प्रसंगीं व वादळानें जोर केला म्हणजे त्यांच्याशिवाय दुसरे खलाशी विश्वसनीय वाटत नसत. आरबी समुद्राला जणूं घरापुढील अंगण हे शूर व धाडशी लोक लेखीत असत. त्यामुळें इंग्रज पेशव्यांपुढें दीन बनले व आंगऱ्यांचा द्वेष करूं लागले. कारण आंगऱ्यांचीं जहाजें उत्तम, त्यांचे खलाशी बेडर व त्यांचे सैनिक निर्ढावलेले होते. इंग्रज त्यांच्यापुढें हिरवट दिसत असत. होकायंत्र किंवा वायुभारमापक यंत्र, किंवा दूरदर्शी मोठ्या दुर्बिणी जवळ नसतांना देखील, हिंदी खलाशी केवळ अनुभवानें आकाशाकडे नजर फेंकून पुढें येणाऱ्या वादळी पावसाचें भविष्य वर्तवीत, व त्याप्रमाणें संरक्षणाची आगाऊ तजवीज करून ठेवीत. सामान्य माणसें जमीनीवरून जशीं चालतात किंवा गाडी घोडे भरधाव सोडतात, तितक्या सहज लीलेनें मराठे व भांडारी समुद्रांतून पोहून जात व जहाजें हांकारीत. त्यांची निर्भयवृत्ती व दर्यावर्दी चातुर्य पाहून त्यांना पिशाच्चें व जलदेवता कानमंत्र सांगत असाव्यात, असें युरोपीयन लोकांना वाटत असे. मराठ्यांची ही आरमारी सत्ता बाजीरावच्या उत्तरेकडील कामगिरीला अत्यंत पोषक अशीच झाली. कारण मराठी राज्याचा पश्चिम किनारा युरोपीयन चांच्यांना मारक झाला व त्यामुळें युरोपीयनांचा चंचुप्रवेश मराठी राज्यांत लवकर होऊं शकला नाहीं.

प्रकरण १५ वें.

## दिल्ली तो बहोत नजीक आई !



बुंदेलखंडाच्या स्वारीनंतर बाजीराव दक्षिणेंतील मोहिमांत गुंतला होता. परंतु शिंदे-होळकरांनीं उत्तर हिंदुस्थानांत आगऱ्यापर्यंत स्वाऱ्या करून बरीच लुटालूट केली. परंतु दमाजी गायकवाड व कंठाजी कदम यांचें वांकडें आल्यामुळें, कंठाजीनें माळव्यांत येऊन होळकरांचा आसरा पाहिला. हे दोघे नंतर माळव्यांतून गुजराथेच्या उत्तर विभागांत उतरले व पालनपूर, ईडर, अहमदाबाद येथून यांनीं बरीच लूट आणली. उत्तर प्रांतांत अगदीं दिल्लीच्या आसंमतांत स्वाऱ्या करून मराठे लूट आणूं लागले. मराठ्यांचा हा उपद्रव बादशाही सत्तेला फार जाचक झाला. खाल्लें तर बाधतें व टाकलें तर श्रापतें, अशी बादशहाची स्थिति झाली. मराठ्यांकडे ते भुरटे म्हणून दुर्लक्ष किती दिवस करायचें ? बरें त्यांचा बंदोबस्त करावयास जावें, तर अपयश आलें म्हणजे हात दाखवून अवलक्षण केल्यासारखें व्हावयाचें व सव्वा लाखाची झांकली मूठ उघडी पडावयाची.

परंतु माळवा, गुजराथ व बुंदेलखंड या तिन्ही प्रांतांत मराठ्यांचें प्राबल्य झाल्यामुळें बादशहास मुळींच स्वस्थ बसवेना. वजीर, खानडौरान व बंगष यांना मराठ्यांचा बंदोबस्त करण्याची कामगिरी बादशहानें सांगितली. परंतु पहिल्या दोघांत कर्तबगारी नव्हती व तिसरा मराठ्यांकडून चांगला मार खाऊन फजित होऊन आला होता. त्यामुळें दरबारांत सर्वजण बादशहाच्या तोंडावर अघळपघळ बोलून व लंब्याचवड्या गप्पा मारून त्याला खूष करीत, परंतु प्रत्यक्ष मोहिमेवर निघण्याची चालढकल करीत. खानडौरान हा त्यावेळीं बादशहाचा बक्षी होता. त्याच्या अंगीं कर्तृत्व नव्हतें, परंतु तो गोडबोल्या व नम्र असल्यामुळें त्याचे दोष झांकले जात व सर्वांवर आपली छाप ठेऊन तो आपलें काम पार पाडीत असे. त्याचा भाऊ मुजफरखान अजमीरचा सुभेदार होता. त्याला मराठ्यांवर चालून जाण्याचा हुकूम २८ जून १७३३ रोजीं धाडण्यांत आला; परंतु कोठारांतून तंबू काढून बाहेर पडावयास १७३४ सालच्या मार्च महिन्याची तिसरी तारीख उजाडावी लागली. बादशाही कारभारांत केवढी ढिलाई व सुस्ती त्यावेळीं आली होती, याचें हें उत्तम उदाहरण आहे. मुजफरखानाचे तंबू बाहेर निघे तोंपर्यंत मराठे आग्रा प्रांत लुटून माळव्यांत परतदेखील गेले.



महमदशहा ( दिल्लीचा बादशहा )



हैदराबादचा निजाम.

## २२१ दिल्ली तो बहोत नजीक आई !

१७३४-३५त वजीर, खानडौरान व जयसिंग यांनीं मिळून मराठ्यांवर स्वारी केली. त्यांच्या फौजेला मराठ्यांनीं छापे घालून भारी त्रास दिला. इकडे मल्हार-रावानें सांबरची लूट केली. तेव्हां हें त्रिकुट अजमीरच्या रोखानें होळकरावर चालून गेलें. जयसिंगाच्या मनांतून मराठ्यांशीं तह करावयाचा होता. त्यामुळें युद्धांत तो उदासीन रहात असे. त्याची तर अशी सूचना होती कीं, बादशहानें माळव्याच्या सुभ्याची सनद बाजीरावला देऊन मराठ्यांना संतुष्ट करावें. त्याची ही सूचना फारच सयुक्तिक होती. कारण एवींतेवीं मराठ्यांनीं माळव्यावर कबजा केलाच होता. तेव्हां त्यांना उघड सनदा देऊन गप्प बसविणें हितावह झालें असतें; कारण मग त्यांना बादशाहीवर हल्ला करावयास निमित्त तरी उरलें नसतें. परंतु मोंगल दरबारला ही सूचना पसंत पडली नाहीं. मराठे शत्रूशीं समोरासमोर लढाई न देतां सारखी धांवपळीची लढाई चालू ठेवीत. एखादेवेळीं त्यांचा जय होई तर दुसऱ्या वेळीं पराजय होई. परंतु त्यांना या भुरट्या जयाप-जयाचें महत्वच वाटत नसे. कारण प्रत्येक झटापटींत त्यांचें फारसें नुकसान होऊं शकत नसे. ते भुर्रदिशीं येत, लूटमार करीत व भुर्रदिशीं पळून दुसऱ्या ठाण्यावर हल्ला करीत. इकडे अवाढव्य बादशाही सैन्य खर्चे खात व माशा मारीत मुक्कामावर स्वस्थ पडलें राही. कारण त्यांच्या छावणींत लष्करापेक्षां लटांबर फार असल्यामुळें त्यांना मराठ्यांप्रमाणें धावते मुक्काम करतां येत नसत. मराठे तर फटिंग सडेस्वार असत. त्यांची पडशी त्यांच्या घोड्यावर व त्यांची राहुटी खोगिरांत लपलेली असे. तेव्हां चौथाईबद्दल बावीस लाख रुपये होळकराला देण्याचा करार करून खान-डौरान बुंदी कोट्यावरून परत फिरून दिल्लीस पोहोंचला.

१७३५ सालीं मराठ्यांनीं फारच जोराचा उठाव केला. उदेपूर, मेडता, नागोर, अजमीर, रूपनगर इत्यादि शहरांवर हल्ले करून त्यांनीं चापून खंडणी गोळा केली. बादशहानें या खेपेला वजीर, खानडौरान व अयोद्धयेचा सुभेदार सादतखान यांस मराठ्यांचा समाचार घेण्यास फर्माविलें. पण बादशाही मोहिमेची तयारी होण्यापूर्वींच पिलाजी जाधव व चिमाजी आपा बुंदेलखंडांतून उत्तरेस चालून गेले. यमुना उतरून त्यांनीं इटावा व कानपूर परगणे लुटले. खेचिवाड्यांतून पिलाजी जाधवानें आपल्या मुलास २५ आक्टोबर १७३५ रोजीं पत्र लिहिलें—"दसरा झाल्यावर खेचीचे मुलखांत आलों. बोलीचालीचा निर्णय जाहला. सवाईजी-कडील राजामल्ल आले. याचें मिडेनें दुप्पट जाहलें. महादेव भट दिल्लीहून आला. पादशाही फर्मान हत्ती व घोडे दोन जडाव घेऊन आले. वजिराचा मुनशी शिव-

नाथ आला आहे. पूर्वेकडे जावें ऐसा मुद्दा त्याचा आहे. कांहीं मदत खर्च कबूल केल्यास फाल्गुन मासीं जाणें होईल. येथून अहिरवाड्यांत जाणें होईल. वोडसें, दतिया वगैरे अवघे वकील जमा जाहले आहेत."

ता० ५ मार्च १७३६ पर्यंत बारक्या झटापटी झाल्या. कधीं बादशाही फौजेस— परंतु बहुधा मराठ्यांस—यशच मिळत गेलें. त्या दिवशीं जयपुराजवळ मनोहरपुर येथें बाजीराव व जयसिंग यांची मोठ्या सन्मानपूर्वक भेट झाली. बाजीरावाबरोबर त्याचा धाकटा मुलगा जनार्दनपंत व शिंदे, होळकर, पवार हे सरदार होते. जयसिंगानें बाजीरावास सनदा द्याव्या ही आपली पूर्वीची सूचना दरबारपुढें विशेष निकडीनें मांडली. बादशाही दरबारनें या प्रश्नाची चालढकल चालवून दिरंगाई मांडली. त्यामुळें यादगारखानानें १६ जुल १७३६ रोजीं धोलपूर येथें बाजीरावची भेट घेतली, तेव्हां बाजीराव अतिशय क्रुद्ध झाला व त्यानें अत्यंत चढाईचें बोलणें लावलें. 'सर्व माळवा आम्हांस जहागीर द्या. पन्नास लाख रुपये खर्चास द्या. प्रयाग, काशी, गया व मथुरा हीं तीर्थस्थानें आमच्या स्वाधीन करा. आणि दक्षीणच्या सहा सुभ्यांवर सरदेशपांडे म्हणून दोन टक्के नवा कर आम्हांस लावून द्या.' बाजीरावाच्या या चढेल अटी बादशहानें मान्य करणें शक्यच नव्हतें. शेवटची अट बादशहानें कबूल केली, हेतु हा कीं, बाजीराव व निजामचा परस्पर झगडा लागून बादशाहीवरील संकट टळेल, व या नव्या हक्काच्या बजावणीसाठीं मराठे दक्षिणेंत जातील. परंतु बादशहाचा हा हेतु साध्य झाला नाहीं.

१७२८ सालीं निजामाचा बाजीरावानें पराभव करून मुंगी शेवगांवचा तह त्याच्याकडून कबूल करवून घेतला, तेव्हांपासून तो मराठ्यांशीं बेतानें व वरपांगीं तरी गोडीगुलाबीनें वागत असे. मधून मधून तो मराठ्यांत भेद पाडण्याचा प्रयत्न करून त्यांना उपद्रव देई, परंतु आपली त्यांना दहशत असावी एवढ्यापुरताच तो उपद्रव असे. त्यानें कोणतीच बाब हातघाईवर येऊं दिली नाहीं. कारण त्याला नेहमीं असें भय वाटत असे कीं, ज्याप्रमाणें बादशहानें माळव्याचा सुभा जयसिंगाला व गुजराथचा अभयसिंगाला दिला, त्याप्रमाणें त्यानें दक्षिणचा सुभा मराठ्यांना दिला तर आपल्या राज्यावर व राजेपणावर कायमचें संकट कोसळावयाचें. त्यामुळें मराठ्यांच्या उत्तरेकडील राजकारणाच्या हालचाली त्याला फारशा अप्रिय नव्हत्या. कारण त्यामुळें मराठ्यांचें लक्ष त्याच्यावरून उडून दुसरीकडे वेधलें जात होतें व तेवढ्या अवकाशांत त्याला आपली दक्षिणेंतील सत्ता बळकट करतां येत होती. परंतु बादशाही अति दुर्बल झाल्यामुळें त्याची सुभेदारी जाण्याची पुढें

भीति उरली नाहीं. घेणाऱ्याच्या अंगांत पराक्रम असेल तरच बादशाही देणगीची किंमत. बादशहानें निजामची दक्षिणची सुभेदारी काढून घेऊन ती दुसऱ्याला बहाल केली, तरी त्या बक्षीसपत्राला मान देण्यास निजाम थोडाच बांधला होता. बादशहा भल्या आज्ञा सोडो, पण त्या आज्ञा मान्य करावयास लावण्याचें सामर्थ्य त्याच्यांत कोठें उरलें होतें ? त्यामुळें बादशहानें त्याला मराठ्यांचें पारिपत्य करण्याकरितां वर सहाय्यास बोलावलें तेव्हां तो मोठ्या आनंदानें दिल्लीकडे निघाला. या संधीचा फायदा घेऊन उत्तरेच्या बादशाही व दक्षिणच्या निजामशाही फौजांच्या कचाट्यांत बाजीरावला धरून गारद करावयाचें असा त्यानें आपल्या मनाशीं निश्चय केला. मराठ्यांचें वाढतें बळ त्याच्या डोळ्यांत कधींपासूनच खड्यासारखें खुपत होतें. दोन प्रबल फौजांच्या मध्यें मराठे चेंचले जाऊन त्यांची दामटी उडणार, अशी सर्व मुसलमान सरदारांची खात्री झाली.

बाजीराव या मोहिमेची तयारी करण्याकरितां आगष्ट १७३६ त दक्षिणेंत आला व दसऱ्यानंतर त्यानें शिंदे–होळकरांस दक्षिणेंत मुद्दाम बोलावून छत्रपतींच्या पायापाशीं हजर केलें. या सरदारांनीं उत्तरेंतील राजकारणाचें महत्व शाहूला पटविलें. या मोहिमेनें मराठ्यांच्या सत्तेचा व राज्यविस्ताराचा सोक्ष मोक्ष ठरणार होता. बाजीराव ही गोष्ट जाणून होता व म्हणूनच त्यानें आपल्या प्रमुख सरदारांनिशीं महाराजांशीं सविस्तर चर्चा करून पुढलें धोरण बांधलें. हेतु हा कीं, या महत्त्वाच्या मोहिमेंत एकदां गुंतल्यावर मागें महाराजांचा गैरसमज होऊं नये व त्यांच्याकडून उपसर्ग लागून स्वारीचा विचका होऊं नये. हें मोंगल बादशाहीशीं चालणारें युद्ध वर्ष दोन वर्षें सहज टिकेल असा बाजीरावचा अंदाज होता. मोंगल बादशाही मोडली होती खरी, परंतु मोडलें तरी तें जुनें वैरागड होतें. बादशाहीचे बंडखोर असलेले सर्व मुसलमान सरदार या वेळीं मराठ्यांविरुद्ध एकवटून लढण्याचा संभव होता. कारण या युद्धाला धर्मयुद्धाचें स्वरूप येऊं पहात होतें. यापुढें भारतवर्षाचे स्वामी हिंदू रहावयाचे कीं मुसलमान रहावयाचे, असा महत्वाचा प्रश्न या प्रसंगीं उपस्थित झाला होता. शाहूनें बाजीरावास मोठ्या प्रेमानें आशीर्वाद देऊन निरोप दिला.

शिंदे-होळकर शाहूमहाराजांना भेटून व त्यांचा निरोप घेऊन यापूर्वी माळव्यांत निघून गेले होते. कारण अशा आणीबाणीच्या प्रसंगीं दुय्यमावर भार टाकून चालण्यासारखें नव्हतें. त्यामुळें त्यांना माळव्यांतून फार दिवस गैरहजर राहणें शक्य नव्हतें. बाजीरावच्या आग्रहामुळें ते उभ्या उभ्या दक्षिणेंत येऊन महाराजांस भेटून

तडक परत गेले. नोव्हेंबर १७३६ मध्यें बाजीराव या स्वारीवर निघाला. त्याच्या हाताखालीं या वेळीं ऐशीं हजार फौज जमा झाली होती. ४ डिसेंबर रोजीं तो भेलसा येथें पोहोंचला व तेथें शिंदे-होळकरांस भेटून त्यानें पुढील मोहिमेचें धोरण निश्चित केलें. बादशहानें केलेल्या प्रचंड तयारीची बातमी ऐकून त्यानें आपलें जड सामान छत्रसालाचा मुलगा जगतराजजी याच्या हवालीं केलें, आणि आपला मुलगा जनार्दन यास ती अवजड सामानाची पिछाडी सांभाळून ठेवण्यास बजावलें. सड्या स्वारीनें शिंदे-होळकरांना बरोबर घेऊन तो यमुनेच्या बाजूस बादशाही मुलखांत शिरला.

बादशहानें या वेळीं फारच जंगी तयारी केली होती. मराठे म्हणजे केवळ भुरटे चोर किंवा लुटारू नसून कसलेले लढवय्ये आहेत, अशी मागच्या दोन तीन वर्षांच्या अनुभवानें त्याची खात्री पटली होती. कमरुद्दीनखान वजीर, खान-डौरान, मुजफरखान, मीर हुसेनखान कोका, शिवसिंग, सादतखान वगैरे थोर सरदार आपापल्या फौजांसह बादशाहीच्या इभ्रतीचें रक्षण करण्याकरितां गोळा झाले. बादशहानें मोठ्या अगत्याचें पत्र लिहून निजामाच्या साहाय्याची याचना केली. निजामाला पेशव्यांचा मोड करण्याची ही संधी हवीच होती. त्यामुळें तो १७३७ च्या प्रारंभीं बऱ्हाणपुरास येऊन दिल्लीकडे जाण्याची तयारी करूं लागला. परंतु बाजीरावनें प्रसंगावधान राखून त्याच वेळीं मराठ्यांच्या एका टोळीला त्याच्या वऱ्हाड प्रांतांत धामधूम करावयास पाठविल्यामुळें त्याला येण्यास विलंब लागला. त्याला पायबंद बसावा हाच बाजीरावचा उद्देश होता.

बाजीराव दरकुच दरमजल करीत पुण्याहून चंबळच्या कांठीं येऊन थडकला तरी दिल्लीपतीची तयारी चाललीच होती. ग्वालेरच्या ईशान्येस ५० मैलांवर चंबळ नदीच्या कांठीं मोंगल फौज व भदावरचा राजा अनुराधसिंग यांनीं त्याचा मुकाबला केला. अटेर येथें लढाई होऊन अनुराधसिंगाचा पराभव झाला व त्यानें वीस लाख रुपये खंडणी आणि दहा हत्ती देऊन बाजीरावशीं तह केला.

निरनिराळ्या मोंगल सरदारांच्या फौजा एकत्र होण्यापूर्वी, त्यांना एकेकटे गांठून त्यांचा समाचार घ्यावा हें लष्करी धोरण बाजीरावानें ठरविलें होतें व तेंच त्यानें अमलांत आणलें. बादशाही सरदारांच्या सरंजामी फौजा गोगलगाईच्या गतीनें चालणाऱ्या व मराठे तर घोड्यावर स्वार होऊन वाऱ्याप्रमाणें दौड मारणारे! मल्हारराव होळकरास त्यानें यमुनेच्या पलीकडे दुआबांत सादतखानाचा समाचार घेण्यास पाठविलें. मल्हाररावानें यमुनापार होऊन शुकोहाबादेस वेढा घातला. तेथील किल्लेदार लालजी खत्री यानें दीड लाख रुपये व हत्ती मल्हाररावास

देऊन आपला बचाव केला. तेथून त्यानें फिरोजाबादेवर जाऊन लूट केली. परंतु त्याच्या फौजेवर सादतखानानें अवचित छापा घालून त्याचा मोड केला. एक हजार मराठे मोंगलांनीं कैद केले व बाकीचे वाट फुटेल तसे पळाले. लपत छपत यमुना उतरून होळकराची ही शिलकी फौज २३ मार्च १७३७ रोजीं बाजीरावच्या फौजेंत कोटिला येथें येऊन सामील झाली.

इकडे सादतखान पश्चिमेस जाऊन खानडौरान यास मथुरेजवळ जाऊन मिळाला. बंगष तेथेंच होता. सादतखान आपल्या पराक्रमाचें वर्णन तिखटमीठ लावून करीत होता, तोंच अशी बातमी आली कीं समोरच्या मोंगल फौजांची नजर चुकवून बाजीराव एकदम दिल्लीवर चालून गेला. गोष्ट खरीच होती. दहा दिवसांचें अंतर त्यानें अहोरात्र चालून जाऊन केवळ दोन दिवसांत तोडलें व रामनवमीच्या दिवशीं तो दिल्लीपुढें येऊन हजर झाला. बादशहा तर ती बातमी ऐकून गर्भगळित झाला. त्याचा त्या बातमीवर कांहीं केल्या विश्वासच बसेना. कारण थोड्या दिवसांपूर्वीं आपण मराठ्यांचा सपशेल पराभव करून त्यांना परत दक्षिणेंत हांकून लावलें, अशा अर्थाचें आढयताखोर व फुशारकीचें पत्र त्यास सादतखानाकडून आलें होतें. त्यामुळें बादशहा आनंदविलासांत दंग होता. मराठ्यांच्या वकिलास त्यानें दिल्लींतून हांकलून लावलें होतें; पण गांवाबाहेर त्या दिवशीं जत्रा भरली होती, तेथील दुकानें बाजीरावच्या फौजेनें लुटलीं. सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. जाळपोळ केल्यास काम चिरडीवर जाईल हें जाणून बाजीरावनें आपला मुक्काम जरा दूर म्हणजे झील तलावाच्या कांठावर ठेवला. ही मनोरंजक हकीकत बाजीरावच्या प्रत्यक्ष शब्दांतच वाचकांनीं वाचावी—

" श्रियासह चिरंजीव राजश्री आपा यांसीः—

बाजीराव बल्लाळ आशीर्वाद उपरि येथील कुशल तागाईत वैशाख वद्य छ १५ जिल्हेज मु ॥ नजीक सवाई जयनगर जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष. बुनगे बुंदेलखंडाचा राजा जगतराज याचे हवालीं करून, बुंदेलखंडांत रवाना करून आम्ही सडे जाहलों. याचे वृत्त सादतखानाचें युद्ध होऊन सरदार आलियाचें वर्तमान विस्तारें लेखन करून चतुर्भुज कासिदाबरोबर पत्रें पाठविलीं. तीं पावोन सविस्तर कळलेंच असेल. सादतखान यमुना उतरोन आगरियासही आला. त्यांसी गांठ घालावी तरी तो आगरियाचा आसरा करून राहिला. तेथें जाऊन युद्ध करावें, तरी तो आश्रियाचा असतां मोडेल न मोडेल कळतच आहे. जरी गंभीर यमुनेच्या संगमीं दिल धरून राहावें तरी ते जागा जावून कोतर खळ्या फार.

खानडवरा व महमदखान बंगाष वगैरे दिल्लीहून आगरियासी येत होते व सादतखान एक जालिया मनसबा भारी पडेल. याजकरितां संगमीं राहणें उत्तम नव्हे. दुसरें सादतखानांनीं पादशहास व खानडवरा व कमरदीखान वगैरे अमीरांस लेहून पाठविलें कीं, ' मराठियांची फौज यमुना उतरोन आली होती, ते बुडविली. दोन हजार स्वार मारिले, दोन हजार नदींत बुडाले. मल्हारजी होळकर, विठोबा बुळे कामास आले. बाजीराव यांची धाड आली होती, तिची गत हे जाहली. त्याचे फौजेंत बाकी राहिली नाहीं. आपण यमुना उतरोन मराठे बुडवुन चमेली पार करितों, ' म्हणून कित्येक गप्पा लेहून पाठविल्या. पादशहासी मजुरा करून घेतला. पादशहांनीं खुशाली करून सादतखानास वस्त्रें व मोत्यांची माळ व हत्ती व शिरपाव पाठविला. व वकिलासही शिरपाव दिला. आपली बाजू सेर करून घेतली. वरकडहि अमीरास कित्येक प्रकारें धिःकारून लिहिलें. तें वृत्त राजश्री धोंडो गोंविंद याणीं वरचेवर लिहून पाठविलें. तात्पर्यार्थ, ' आमचे फौजेंत जीव नाहीं. केवळ निर्जीव; बुडवून नेस्तनाबूत केली; ' असें लिहीत [ लपंडाव ] करून दाखविले. मोंगली कारभार आपण ऐकत जाणतच आहेत. करावें थोडें, लिहावें फार. पादशहास सत्य भासलें, तें मिथ्या केलें पाहिजे. त्याचे विचार दोन; एक सादतखानास बुडवावें किंवा दिल्लीस जाऊन दिल्लीचें पूर जाळावें, तेव्हां मिथ्या होईल. त्यास सादतखान आगरें सोडीनासे देखोन आम्ही दिल्लीस जावयाचा ऐसा निश्चय केला. पूर जाळावें व मराठे आहेत असें पादशहास अवलोकन करवावें ऐसा विचार करून छ २६ जिल्दीं कुच करून, पादशाही रस्ता सोडून, लांब लांब मजला करून, दमणसिंग चुडामण जाट याचे मुलखांतून नेवातियाचे सरदें डोंगर किनाऱ्यानें चालिलों. खानदौरा व बंगष आगरियास गेले. यांची व सादतखानाची भेटी छ जिल्हेजी जाहली. धोंडोपंत खानदौरापाशीं होते. सादतखानांनीं खानदारास सांगून पाठविलें कीं, ' बाजीराव याची फैाज आपण मोडली. बुनगे पळाले. ते खासा हि चमेल उतरोन गेले. अद्याप तुम्ही त्याची खुशामत करितां ! वकील ठेवून घेतला आहे, हा कोण्या विचारें ? वकीलास निरोप देणें. " त्यावरून धोंडो गोविंद वकील यांसी निरोप दिल्हा. सादतखानानें सांगितलें यावरून वकिलास निरोप द्यावा असें खानदौराचें थोरपण नव्हतें. परंतु त्याणीं त्याचा शक चित्तांत न आणून यासी निरोप दिल्हा. आम्हांजवळ आले. कमर्दीखान व अजमुल्लाखान वगैरे आले. आम्ही त्याजसीं गांठ न घातली. साता कोसांवर उजवे बाजूस आमचे हातें त्यांस टाकून, लांब लांब मजली वीस वीस कोसांच्या करून

दोन मजलींनीं छ ७ जिल्हेजीं दिल्लीस बारापुला व कालिकेचे देऊळ उजवें हातें टाकून, कुशबंदी नजीक शहर येथें मुक्काम केला. पुन्यास आगी देऊन खाक शहर करावें; त्यास दिल्लीं महास्थळ, पादशहा बरबात जालियांत फायदा नाहीं. दुसरें पादशहाचें व खानदौराचे चित्तांस सल्लख करावयाचें आहे. मोंगल यास सल्लख करूं देत नाहींत. व अमर्याद केल्यास, राजकारणाचा दोरा तुटतो. या करतां आगी लावायाचे तहकूब करून, पादशहास व बखतमल यांसीं पत्रें पाठविलीं. शहरांतून दोन हत्ती व घोडीं, उंटें आलीं होतीं तीं सांपडलीं. लष्करचे लोकांनीं शहरचे लोक भवानीचे यात्रेस बाहेर आले होते, त्यास झांबड झांवड केलें. दुसरे दिवशीं बुधवारीं पादशहाचे आज्ञेनें बखतमल याणीं उत्तर पाठविलें कीं, धोंडोपंतास पाठविणें; त्यावरून मशारनिल्हेस पाठवावें तरी आम्ही शहराजवळ आलों. त्यामुळें दिल्लींत गलबला जाला. यामुळें पाठविला नाहीं. 'भला मजुरा व स्वार पाठवून देतों. आम्ही शहरानजीक राहिल्यानें शहरास उपसर्ग लागेल. याकरितां कुच करून झीलच्या तलावावर जातों.' म्हणून उत्तर पाठवून आम्हीं कुच केलें. शहराजवळून येत असतां पादशहांनीं नबाब मीर हसनखान कोका दरोगा खास चौकी, नबाब अमीरखान व खोजे राजे अफजूलखान, राजे शिवसिंग जमातदार रिसाले अमीर व मुजफरखान नायब बक्षिगिरी आहादी याणीं व नबाब मुजफरखान, खानदौराचे बंधु सात आठ हजार फौजेनिसीं शहराबाहेर रिकाबगंगाजवळ आले. राजश्री सटवाजी जाधव पुढें गेले होते. त्यांची व मोंगलांची गांठी पडली. झटापटी होत होती. मशारनिल्हेंनीं आम्हांस सांगोन पाठविले. त्यांजवरून राजश्री मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे व राजश्री तुकोजी पवार व जिवाजी पवार व यशवंतराव पवार व मानाजी पायगुडे व गोविंद हरी पाठविले. त्यांचे त्यांचे झुंज होऊन मोगल मोडिले. राजे शिवसिंग वगैरे दहा बारा दरबारी ठार जाले. नबाब मीर हसनखान कोका जखमी जाला. दिगरबादे चौकी पादशहाचे अडीच तीनशें मेले. चारशें माणूस जखमी जाहले. रोज अफजुलखान व अमीरखान व मुझफरखान वगैरे शहरांत पळून गेले. दोन हजार घोडा पाडाव जाहला. पांच सहा हजार पळोन गेले. राजश्री राणोजी सिंदे याजकडील इंद्रोजी कदम यांसी बोटास गोळी लागोन दोन बोटें गेलीं. वरकड नामांकित माणूस कोणी ठार जालें नाहीं. घोडें, माणूस जखमीं जाले. तदनंतर आम्ही झीलच्या तळावर मुक्काम केला. संध्याकाळच्या चार घटका दिवस बाकी राहिला. तो कमरदीखान पादशहापुरावरून आल्याची बातमी खबर आली. तेच क्षणीं आम्ही

तयार होऊन गेलों. त्यांचें आमचें फौजेचें युद्ध जाहलें. बारांत गेलेला एक हत्ती राजश्री यशवंतराव पवार याणीं घेतला. घोडीं, उंटें लष्करांत आलीं. त्यास दिवस अस्तामानास गेला. रात्रीचा दम धरून चौगीर्द मोंगल वेढून बुडवावा, तरी झीलचा तलाव सोळा कोस लांब, उजवीकडे कमर्दीखान, पुढें शहर. दुसरें, आम्ही दिल्लीस गेल्याचें वर्तमान नबाब खानदौरा व सादतखान व महनदबंगस यांसी छ ७ जिल्हेजी मंगळवारीं राधाकुंडाचे मुक्कामीं कळतांच सडेसड होऊन पंचवीस तीस हजार फौजेनें बडेलास बत्तीस कोस येऊन मुक्काम केला. दुसरे दिवशीं आलावर्दीच्या नालियावर पंचवीस कोस मुक्काम केला. गुरुवारीं प्रातःकाळीं खानदौरा सादतखान व बंगष व कमर्दीखान सारे एक होणार. एक झाल्यावर सोसणार नाहीं व शहर समीप. यास्तव मोंगलास टाकून चहूं कोसावर मुक्काम केला. आम्हांकडील फिरंगोजी पाटणकरास गोळी लागून ठार जाहला. वरकडहि दाहा पांच माणूस व घोडीं जखमी जाहलीं. मोंगलाकडील दाहा पांच ठार झाले. दाहा वीस जखमी जाहले. गुरुवारी सादतखान व खानदौरा, बंगस सारे कमर्दीखानाजवळ आले. आलावर्दीपासून झीलच्या तलावापर्यंत मुक्काम करून आहेत. आम्ही मोंगल पाठीवर घेऊन दाबांत आणून बुडवावें, या विचारें कुच करून रेवाद, कोटपुतळी, मनोहरपुरावरून आलों. परंतु अद्याप मोंगल सारे आलावर्दी व झीलच्या तळावरी आहेत म्हणोन बातमी वर्तमान आले. व मीरहसनखानचा कोका पहिल्या झुंजांत जखमी जाहला होता तो मेला म्हणोन वर्तमान आलें. खानदौराचीं पत्रावरी पत्रें राजश्री सवाई जयसिंगजीस गेलीं. त्यांवरून ते पंधरा सोळा हजार फौज व तोफखाना देखील स्वार होऊन बासवियावर गेले आहेत. खानदौराचे भेटीस जातात. सवाइजीचीं पत्रें ममतायुक्त आपला मुलूख रक्षावा म्हणोन येतात. व आम्हांकडील व्यंकाजी राम त्याजपासीं आहेत. त्याजपासून लिहवीत असतात. आम्ही त्यांचे मुलखाचे वाटेस जात नाहीं. वाटेनें दाणादुणा देतील. अभयसिंग जोतपुरास आहेत. आम्ही ग्वालेर, भडावर प्रांतें आतां बाकी साकी राहिली आहे ते वसूल करून मोंगल मागें मागें आले तरी त्यास हैरान पेरोसान करून, पाइची धापा देऊन, धांवतां धांवतांच खराब होत तेंच करून दाबांत आणून, गांठ घालून राजश्री स्वामींचे पुण्यें व वडिलांचे आशीर्वादें बुडवितों. आमची चिंता न करणें. मुख्य गोष्टी पादशाहाचे व खानदौराचे चित्तांत सलूख करावयाचें आहे. मोंगल याणीं हिंमत धरली आहे. त्यांतें शीरउपस्त सादतखान आहे. याचा गर्व श्रीसंकल्पें हत जाहलियास सर्व मनोदायानुरूप होईल. जरी मनोदयानुरूप सलूख

जालिया करूं; नाहीं तरी सलूख करीत नाहीं. दिल्लीभवतां मुलूख खालसा केला. पुढें सोनपत पाणिपत यमुनापार मुलूख राहिला. तोही ताराज करून मोंगल अन्नास महाग होत ऐसेंच केलें जाईल. मागाहून होईल तें वृत्त तुम्हांस लिहून पाठवूं. कदाचित् मोंगल दिल्लीस राहिले तरी आगरियास जाऊन अंतर्वेदींत उतरून मुलूख कुल मारून ताराज करितों. नबाब निजामन्मुलूख याणीं गडबड केली, रेवा उतरले, तरी तुम्हीं मागें शह देणें. पेशजीं लिहिलें आहे त्याप्रमाणें करणें. मारून ताराज करणें. इकडेस सक नाहीं. तिकडेसहि नाहींसा करणें. निजाम यास पायबंद असलिया उत्तम आहे. लोभ असो दीजे हे आशीर्वाद. ”

मनांत आणलें असतें तर बाजीरावला त्या वेळीं दिल्ली सहज काबीज करतां आली असती. कारण दिल्लींतील बहुतेक फौज मथुरा, फत्तेपूर सिक्री, व दीग येथें बाजीरावची वाट अडविण्याकरितां म्हणून गुंतलेली होती, बाजीराव आणि रत त्यांच्या हातावर तुरी देऊन व त्यांचा डोळा चुकवून दिल्लीसमोर थडकला होता. सादतखानानें आपल्या विजयाची हकीकत सर्वत्र फुगवून सांगून, मराठे पराभव पावून पळाले, असें वर्तमान पसरविलें होतें. तें वर्तमान सपशेल खोटें आहे हें बाजीरावनें आपल्या प्रत्यक्ष कृतीनें सिद्ध केलें. मराठे जीवंत आहेत हें त्यानें बादशहाला पटवून दिलें, व सादतखानाचे बढाईखोर दांत त्याच्या घशांत पाडले. दिल्लींत असलेल्या फौजेनें बाजीरावशीं सामना दिला, परंतु ती फौज तेव्हांच मराठ्यांनीं कापून काढली. परंतु बादशहास केवळ धाक दाखवूनच, त्याला बुडवून नव्हे, चौथाईच्या व सुभेदारीच्या सनदा त्याच्याकडून प्राप्त करून घ्यावयाच्या, असा बाजीरावचा शाहूपाशीं करार झाला होता. बाजीरावनें दिल्ली घेतली असती तर सर्व हिंदुस्थान पेशव्याविरुद्ध उठलें असतें. कारण बादशाही-विषयीं सर्व लोकांच्या मनांत आदर वसत होता.

झीलच्या तलावावरील लढाईनंतर बादशाही फौजा भांबावून जाऊन जागच्या जागींच माशा मारीत बसल्या. आपल्या पराक्रमाची चुणुक दिल्लीश्वरास दाखवून बाजीराव परत बुंदेखंडांत आला व तेथून बादशाही मुलुख उध्वस्त करण्याचा त्याचा सपाटा सुरू झाला. मराठे सहसा समोरा समोर उभे राहून मोठी लढाई घेत नसत. कारण त्यांत एखाद्या प्रसंगीं अपयश आलें, तर तें सहन करण्याचें सामर्थ्य मराठ्यांत अजून आलें नव्हतें. शिवाय मराठे आपल्या स्वराज्यापासून फार दूर अशा शत्रूंच्या प्रदेशांत वावरत होते. तेथें त्यामुळें शत्रूच्या मुलखांत पाय रोवून

व ठाणें मांडून बसलें, तर सर्वत्र हुकमत शत्रूंची चालत असल्यामुळें दाणा पाणी व रसद बंद केली जाण्याचा संभव फार! रसद मारली गेली म्हणजे मोठें पराक्रमी सैन्य असलें तरी तें कशाच्या बळावर लढणार ? लहानशा चकमकींत अंगावर बाजू घेतली तरी फारसें नुकसान होत नाहीं. परंतु सड्या स्वारीनिशीं झपाट्यानें शत्रूंभोंवतीं रिंगण घालून त्याच्या आघाडी पिछाडीचे सारखे लचके तोडून त्याला सहज नामोहरम करतां येतें. एक बाजू तोफखाना व पायदळ अशी सुव्यवस्थित मांडणी करून ठासून मुक्कामावर बसली असली तर त्यांच्यावर हे पळते छापे घालून त्यांना जेर करणें फार सोपें व सोयीचें असतें. कारण तोफखान्याचें लटांबर बरोबर असल्यास सैन्याच्या हालचाली फार सावकाशीनें होतात. मोंगलांजवळ तोफखाना जय्यत असे. त्यामुळें त्यांच्या तोफांच्या माऱ्यांत पुढें उभे राहून, तो मार खात खात समोरून त्यांच्यावर चालून जाणें फारसें शक्य नसे. तशा लढाईंत मनुष्यहानी फार व्हावयाची. त्यामुळें घोड्यावर सड्या स्वारीनिशीं जाऊन त्यांच्या उजव्या डाव्या बाजूवर छापे घालून त्यांच्या सैन्याचे लचके तोडणें फार फायदे-शीर होई. या धांवत्या छाप्यांनींच शिवाजी महाराजांनीं मुसलमानांना जेर केलें व त्यांचीच रणनीति बाजीराव व मल्हारराव यांनीं उचलून आत्मसात केली होती.

बाजीराव या महत्त्वाच्या मोहिमेंत गुंतला असतां शाहूचा जीव त्याच्याकडे कसा लागला होता हें खालील पत्रावरून दिसून येईल. मोंगलांचा विश्वास धरूं नये, ते केव्हां कपट करतील तें सहज लक्षांतही येणार नाहीं, हा स्वानुभवी सल्ला मोठ्या कळकळीनें शाहूनें बाजीरावास दिला आहे. बाजीरावनें शाहूचें प्रेम आपल्या कर्त-बगारीनें कसें संपादन केलें होतें व त्याच्याकडे शाहूचा जीव कसा ओढला जाई याचा हा उत्कृष्ट मासला आहे:—

" पै॥ छ. २२ मोहरम शा. १६५७.

राजमान्य राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांस आज्ञा केली ऐसीजे. प्रस्तुत तुम्हांकडून विनंतिपत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. कोठें आहां, काय विचार, पुढें कोठपर्यंत जाणार; मुख्य, अमीर सहवर्तमान, काय करीत आहेत हें सविस्तर दिन प्रतिदिन लिहीत जाणें. सांप्रत आगरेयानजिक गेलेच असाल, पलिकडील भेटीचा विचार घडणार म्हणून परस्पर ऐकिलें. ऐशियास मोंगली मनसुबा; इमान देऊन आपला मतलब साधितील. त्यांचा विश्वास मानावा ऐसा अर्थ नाहीं. याजकरितां शहरांत जाऊन भेट घ्यावयाचा मनसुबा करीत असाल तरी सर्वथा न करणें. भेट न घेतां दुरूनच ज्याचे हातें तुमचें राजकारण असेल त्यापासून आपलें मतलब

साधावयाचें तें साधणें. हावभरी होऊन त्याचे विश्वासावरी जाल, याजकरितां लिहिलें आहे. तुम्ही बुधमंत, कार्यकर्ते, यशस्वी सेवक आहांत. विचारास चुकणार नाहीं हा स्वामीस निशा आहे. तरी बहुत विचारें करून जें करणें तें करून आपली बाजू सर होऊन येई तें करणें. पलीकडील अमीर तुम्हांसीं विवेकावरी आहेत. आणि नबाब निजामन्मुल्क इकडून फारच वळवळ करून त्या प्रांतें येत आहेत. त्याचा विचार कांहीं कळत नाहीं. तरी बहुत बहुत सावधपणें मनसुबा करणें. मोंगली विचार तुम्हांस न कळेसा काय आहे. आपला नक्ष राहून योजिला मनसुबा सिद्धीस पावे ते गोष्ट करणें. जो विचार करीत असाल व घडोन येत असेल तो वरचेवरी हुजूर लेहोन पाठवीत जाणें. वरकड सविस्तर रा। महादजी अंबाजी लिहितील त्याजवरून कळों येईल. आन वृत्त दिनचर्येचें वरचेवर लिहिन. फुड मनसुबा काय ? व बोली काय मुद्दाची ? तेहि लिहीन. फुड कोठवर जान तेंहि लिहिन. त्याची मुखभान आहे यावर न जान. त्याचे वाट कदाचित् भेटीचा प्रसंग पडला तर लिहिन. मुख्याचे जय भेटीचा प्रसंग पडला, तर बलकटी करन, आन लिहिन, बहुत काय लिहिन, सुज्ञ असा. ”

इकडे निजाम दरकुच दरमजल करीत १२ जुलै रोजीं दिल्लीस येऊन पोहोंचला. बाजीरावनें आपल्या हस्तकाकडून त्याला दक्षिणेंतच पायबंद लावण्याचा प्रयत्न करून पाहिला, परंतु बहुतेक मराठी फौज बाजीरावच्या या वेळीं दिमतीस असल्यामुळें दक्षिणेंत फारच थोडी फौज शिल्लक होती. त्यामुळें निजामाला दक्षिणेंत डांबून धरतां आलें नाहीं. बाजीरावनें पाठविलेल्या टोळीनें निजामाच्या वऱ्हाड प्रांतांत धुमाकूळ घातला. तेव्हां निजामानें जमालखानाकरवीं त्या टोळीचा बंदोबस्त केला व मग तो उत्तरेकडे यावयास निघाला. निजामाची अडवणूक झाली नाहीं तरी कुचंबणा खास झाली. बाजीरावला तरी तेंच हवें होतें. तेवढ्या वेळांत त्यानें बादशाही सैन्याचा पराभव करून दिल्लीस फेरफटका मारला, व माळव्यांत शिंदेहोळकरांना बंदोबस्तानें ठेवून आपण पुढल्या स्वारीची तयारी करण्याकरितां दक्षिणेंकडे जाऊन आला. कमरुद्दीन खान वजीर निजामाचा चुलतभाऊ असून, शिवाय त्यानें आपली मुलगी निजामाच्या मुलास देऊन त्याच्याशीं व्याह्याचें नातेंही जोडलें होतें. कमरुद्दीनखान पंधरा मल सामोरा जाऊन निजामास मिरवीत घेऊन आला. निजामाचा थोरला मुलगा गाजीउद्दीन बारा तेरा वर्षें दिल्लीसच होता. या बापलेकांची मोठ्या समारंभानें भेट झाली. निजामाच्या स्वारीचें वैभव अपूर्व होतें. हिरेमोत्यांचें जणूं प्रदर्शनच भरलें

होतें. बादशहानें निजामाचा अत्यंत सत्कार केला व स्वतःचा झगा, मंदील व दुपेटा त्यास पांघरून 'आसफजा' ही उच्च पदवी त्यास दिली. बादशहानें आग्रा व माळवा हे दोन सुभे जयसिंगाकडून काढून घेऊन ते निजामाचा मुलगा गाजी-उद्दीन याच्या नांवानें करून दिलें. एक महिनाभर निजामानें दिल्लीपतीचा उत्कृष्ट पाहुणचार खाल्ला व पावसाळा संपतांच बरोबर तीस हजार स्वार व पल्लेदार तोफखाना घेऊन माळव्यावर चाल केली. निजामानें चंबल उतरून ग्वालेरच्या वाटेनें माळव्यांत उतरण्याचा मार्ग टाळला व तो काल्पीजवळ यमुना उतरून बुंदेलखंडाचे वाटेनें माळव्यांत उतरला. निजामानें दक्षिणेंतच बाजीरावास अडकवून ठेवण्याविषयीं नासिरजंगास लिहिलें. परंतु त्याला तें साधलें नाहीं. नासिरजंगास चुकवून नेमाडांत खर्गोणजवळ नर्मदा उतरून बाजीराव तडफीनें माळव्यांत आला. शाहूनें सर्व सरदारांना बाजीरावाच्या सहाय्यास आपापल्या फौजा घेऊन जाण्यास फर्माविलें होतें. कारण प्रसंग बिकट होता. एकवटलेल्या मुसलमानशाहीशीं बाजीरावला टक्कर द्यावयाची होती. दाभाडे व रघोजी भोंसले यांनीं शाहूच्या हुकमाची अवज्ञा केली. औरंगाबादची फौज उत्तरेस जाऊन निजामास सामील न व्हावी, व यदाकदाचित् पराभव झाल्यास पिछाडी उघडी पडूं नये व स्वराज्याशीं संबंध तुटूं नये, म्हणून चिमाजी आपा तापी नदीच्या कांठीं खानदेशांत उत्तरेचा मार्ग रोंखून बसला होता. तेथें राहून त्यानें औरंगाबादच्या फौजेस अडकवून ठेविलें, व रघूजी भोंसले आणि दाभाडे यांच्या हालचालीवर सक्त नजर ठेविली. त्या दोघांनीं पेशव्यांना मदत केली नाहीं तरी निदान त्यांनीं ऐनवेळीं प्रतिकूल तरी होऊं नये व मोंगलास किंवा निजामास जाऊन मिळूं नये, हें डोळ्यांत तेल घालून चिमाजी पहात होता. चिमाजीनें हा उत्तरेचा मार्ग छातीठोक रीतीनें अडवून धरल्यामुळें वर बेधडकपणें सिंहाच्या गुहेंत शिरून निजामास जेरीस आणणें बाजीरावास शक्य झालें. शाहूनें रघूजी भोंसल्यास पुनः आज्ञा केली कीं, "दक्षिणची फौज नबाबास सामील होऊं न द्यावी. यास्तव चिमणाजी बल्लाळ खानदेश प्रांती राहिले आहेत. त्यांस फौजेनिशीं जाऊन सामील होणें. बाजीरावाची व निजामाची गांठ पडली. निजाम भूपाळगडचे आश्रयास गेला. पंडित चौगीर्द चौक्या देऊन बसले आहेत. दक्षणी फौजेस लौकर येऊन पोहोंचणें म्हणून पत्रावरी पत्रें नवाबांनीं पाठविलीं, त्यावरून औरंगाबादची फौज नवाबाकडे जाऊं लागली. याकरितां टाकोटाक फौजेनिशीं जाऊन चिमाजीस सामील होणें. एक क्षणाचा उजूर न करणें." रघूजीनें ही आज्ञा मानली नाहीं हें सांगणें नकोच.

पेशव्यांचा वाढता उत्कर्ष, शाहूचें पेशव्यांवरील प्रेम, पेशव्यांचें तेज व त्यांचा पराक्रम यामुळें दाभाडे, भोसले व इतर जुने सरदार असूयेनें ग्रस्त होऊन मनातल्या मनांत जळत होते. पेशव्याचा पराभव व्हावा ही त्यांची इच्छा होती. परंतु पेशव्यांचा पराभव म्हणजे मराठी राज्याची इतिश्री, ही गोष्ट ते विसरत. दाभाडे व भोसले यांनीं बाजीरावास शाहूच्या आज्ञेप्रमाणें या बिकट प्रसंगीं मदत केली असती, तर निजामाचा पुरा मोड बाजीरावला करतां आला असता, व दक्षिणेंतील मराठ्यांचा व हिंदु धर्माचा कांटा कायमचा नष्ट झाला असता. त्यांची मदत न झाल्यामुळें चोराच्या हातून पदरांत पडलेल्या लंगोटीवरच मराठ्यांना समाधान मानून घेणें भाग पडलें. बाजीरावनें प्रगट केलेल्या रणचातुर्यानें निजाम पराभूत झाला, परंतु मोडला नाहीं.

नव्हेंबरांत बाजीराव नर्मदा उतरला. तेव्हां निजाम सिरोंज जवळ होता. चिमाजीआपाच्या पत्रांत खालील मजकूर आहे. " निजामाबरोबर त्याचा पुत्र गाजीउद्दीन, वोढसे व दतियाचे राजे व जासिंगाचा पुत्र व अहीर व रोहिला देखील पन्नास हजार फौज जमा आहे. सादतखानाचा भाचा व कोट्याचा राजा दुर्जनसाल वीस हजार फौज आणिक आणणार आहेत. माळव्याच्या सुभ्यांत रायास उतरूं न द्यावें ऐसे पादशहाशीं मान्य करून आले आहेत. सांप्रत आम्हीं तापी तिरीं आहोंत. औरंगाबादेस सुलतानजी व जानोजी निंबाळकर रावरंभा वगैरे मोगली फौज दहा हजार जमा आहे. " रजपूतराजे दोन्ही डगरीवर कसे हात ठेवित असत याचें हें नमुनेदार उदाहरण आहे. मराठे जिंकले तर जैसिंग त्यांचा मित्रच, व मोंगल जिंकले तर जैसिंगाचा पुत्र त्यांच्या सैन्यांत त्यांच्या बाजूनें लढाईंत प्रत्यक्ष हजर असलेला ! म्हणजे कोणत्याही परिस्थितींत जयसिंगाचा हिस्सा लागू झालाच. भोपाळच्या या लढाईचें वर्णन शकावलींत खालीलप्रमाणें दिलें आहेः—

" श्रीमंत बाजीराव साहेब व चिमाजी आपा असे उभयतां स्वारीस निघाले. छ १० साबान रोजीं सांगवी नजीक करवंद बारीनें बाजीराव भोपाळाकडे गेले व आपा परतोन खानदेशांत येऊन तारापुराहून साष्टीकडे गेले. छ. १४ जिल्काद निजामुन्मुल्क सिरोंजेस होता. तो भोपाळाजवळ चांगली जागा पाहून बाजीराव याची वाट पहात बसला होता. बाजीरावाचें लष्कर तेथें पोहोंचतांच याणीं ' निजामुन्मुल्क आसरा धरून बसला, तस्मात त्याचे मनांत भीति आहे ' असें

समजून छ ३ रमजान रोजीं भोपाळजवळ लढाई सुरू केली. त्यांत निजामाकडील रजपूत लोक ५०० पडले. घोडेस्वार सातशें मेले. मराठ्यांकडील १०० पडले व ३०० जखमी झाले. ते समयीं बाजीराव दोन बाणाचे टप्पावर उभा राहून 'निजामुन्मुल्क आपली जागा सोडून निघाला असतां त्यांजवर एकदम हल्ला करावा' अशी वाट पहात होता. परंतु ती जागा त्याणें सोडिली नाहीं. मग बाजीराव याणें फौजेच्या टोळ्या करून निजामासभोंवतीं गराडा घातला; व त्यास धान्य व गवत वगैरे मिळेनासें केलें. छ १९ रमजान रोजीं याप्रमाणें तजवीज केली. निजामास असें संकट प्राप्त झाल्याचें वर्तमान कळतांच त्याचे मुक्ततेविषयीं कुमक पाठविण्याची तयारी होऊं लागली. परंतु बाजीराव यास पक्कें ठाऊक होतें कीं 'खानडौरान वजीर याचें निजामाशीं वांकडें आहे. त्यामुळें तिकडील फौज येणार नाहीं.' कदाचित् हैदरबाद व औरंगाबादेकडून मदत येऊं लागल्यास त्याचे बंदोबस्ताविषयीं पेशवे याणीं व शाहुमहाराज याणीं रघोजी भोंसले यास लिहिलें असतां त्याणें ऐकिलें नाहीं. चिमाजी आपा मात्र लोक जमा करून तापीच्या कांठीं राहिला होता त्यास बाजीराव याणें पत्र पाठविलें कीं 'या समयीं तुला फौज मिळेल ती जमा कर; व दक्षिणेंत पत्र पाठऊन फत्तेसिग भोंसले व शंभुसिंग जाधव व सरलष्कर यास आण. बांडे व दाभाडे हे मजकडे येत नसतील तर तूं आपल्या जवळ घेऊन तापीवर राहा. यावेळेस मराठे एकचित्त झाले तर मुसलमान लोक दक्षिणेंतून हांकून द्यावे. याची संधि हीच आहे.' निजामुन्मुल्ख अशा अडचणींत पडला. तेव्हां, ती जागा सोडून दूर गेला. परंतु तोफा वगैरे सामान फार होतें. सबब तो माघारा फिरून भोपाळचे किल्ल्यांत शिरला. ती जागा लहान. कांहीं लोक आंत व कांहीं बाहेर असे राहिले. तेव्हां तो नबाब कांहीं सामान भोपाळ येथें व कांहीं इसलामगड येथें ठेऊन बाहेर पडून दाराई-सराई गांवा पावेतों पोंहोंचला. तेथें पेशवे याणीं शिंदे होळकर यांस पाठवून मीरमानाखान फौजदार मारला. दोनहजार फौज बुडविली. खुद्द पेशवे यांणीं नबाबाचे रोखें जाऊन तीन कोसांचे अंतरानें मुक्काम केला. नबाबांनीं पाठ देऊन कुच केलें. भोपाळचे तळ्याचा आश्रय केला; पेशवे यांजकडील फौजांनीं दाणा वैरण बंद केली. तीन शेर धान्य नबाबाचे लष्करांत झालें. नबाब ढेकळाचें कुसू रचून अडचणींत राहिले. रात्रंदिवस तिरंदाजी व गोळी पेशवे यांणीं त्याजवर चालविली. त्यामुळें नबाबाचे लोक रात्रंदिवस घोड्यावरील व हत्तीवरील हौदा न उतरतां राहिले. नबाब हौद्यांत बसून राहिले. अशी फजीती होऊं लागली. तेव्हां

छ २६ रमजानीं तह ठरला कीं 'बाजीराव यांस चंबळा व नर्मदा या मधील मुलु-खाचें आधिपत्य प्राप्त होण्यास बादशहास नबाबानीं अनुकूल व्हावें; व याशिवाय पन्नास लक्ष रुपये बाजीराव यांस स्वारी खर्चाबद्दल द्यावे.' असें ठरून लढाई तह-कूब झाली"

भोपाळची लढाई १३ डिसेंबर १७३७ पासून तों ८ जानेवारीपर्यंत चालली होती. सबदरजंग व कोट्याचा राजा यांनीं बाहेरून निजामास मदत आणली. परंतु मल्हारराव होळकर व यशवंतराव पवार यांनीं त्यांचा पराभव करून मोंगलांचे पंधराशें लोक कापून काढले. ८ जानेवारी रोजीं दुराईसराई येथें निजामानें बाजीरावास तह लिहून दिला.

भोपाळच्या लढाईंत बाजीरावानें निजामाला नेस्तनाबूत कां केलें नाहीं, असा प्रश्न पुष्कळजण विचारतात. परंतु त्या वेळीं ती गोष्ट मराठ्यांच्या शक्तिबाहेरची होती. निजामाजवळ उत्कृष्ट तोफखाना होता, व त्या तोफखान्यानें मराठ्यांची पुष्कळ हानी केली. तोफखान्याच्या बाबतींत मराठे अत्यंत कमजोर होते. त्यामुळें लढाईचा डाव मराठ्यांवर केव्हां कसा उलटेल याचा नियम नव्हता. बाजीरावाच्या केवळ रणकौशल्यानें तो प्रसंग टळला. शिवाय निजामाला मदत करणारे त्याचे इतर भाऊबंद व पुत्र होतेच. एका निजामाचा पराभव झाला म्हणजे निजामशाही मोडणार थोडीच होती ? शिवाय निजाम हा बादशाहीचा एक सरदार होता व निजामाला मराठ्यांनीं यदाकदाचित् नामोहरम केलें असतें तरी बादशाही त्यावेळीं ते थोडीच मोडूं शकत होते ? मराठ्यांना बादशाहाकडून युक्तीनें कार्य साधावयाचें होतें व तें त्यांनीं साधलें. खालील बाजीरावचें पत्र या दृष्टीनें वाचावें.

श्रियासह चिरंजीव राजश्री आपा यांसिः—

बाजीराव बल्लाळ आशीर्वाद उपरि येथील कुशल ता। छ २७ रमजान जाणून आपणाकडील कुशल लिहीत जाणें. यानंतर तुमचीं पत्रें छ ८ रमजानची वरण-गांवचे मुकामची विश्रामाबरोबरी आलीं व दुसरीं पत्रें छ ११ रमजानचीं आलीं तीं छ २४ रमजानीं पावलीं. लेखनार्थ विस्तारें कळला. येथील वर्तमान काल पत्र लिहून पाठविलें आहे त्यावरून कळलेंच असेल. अलीकडील वर्तमान तर नबाब बुनगे कांहीं भुपाळांत व कांहीं इसलामपुरांत टाकून सलुखाची संदर्प लाऊन कोस दोन कोस चालतात. आपल्या फौजा चौंतर्फा चालवून दाणागल्ला घासलकडी बंद केली. एक रुपयास एक शेर अन्न जाहलें. तेंहि कोणास प्राप्त कोणास अप्राप्त.

जालें. घोडीं पळसाचा पाला खाऊं लागलीं. परवा छ २५ रमजानीं मोंगल पठाणांनीं भाड्याचे बैल खादले. रजपुतास तों केवळ उपास पडों लागले. ऐसा प्रसंग जाहला. तेव्हां नबाब सर्वांचें दुःख पाहून बहुतच काहिला होऊन सलोखाविसीं त्वरा केली. बोलीच्या प्रसंगास पहिलेंच आबदुल खेरखान व सयद लष्करखान व अनवर अल्लाखान होते. सांप्रत आयामल्ल यांही सांगोन पाठविलें कीं, बोलीचालीच्या प्रसंगांत आपणास बोलाविल्यास आमची अब्रू आहे, व आम्हीं तुमचे शुभचिंतक असो. यावरून आयामल्ल यांसहि पाठवून द्यावें, म्हणवून नबाबास राजश्री आनंदराव पंडित सुमंत यांज समागमे सांगोन पाठविले. त्याजवरून नबाबानें आयामल्ल यांस भेटीस पाठविलें. भेटीनंतर आयामल्ल यांस पहिले त्रिवर्ग यांस सांगोन बोलीचालीचा ठराव केला कीं ‘ माळवा दरोबस्त द्यावा. पादशाही सनद दिल्लीस गेल्यावर करून द्यावी. द्रव्याची बोली पहिली राजश्री धोंडो गोविंद यांचे विद्यमानची आहे, त्याची रजबदल करून जें साधेल तें करून द्यावें. नर्मदे व चमेल मध्यें राजे आहेत त्यांजपासून आम्ही पैके घेतों, तैसा कमपेस घेणें तो घ्यावा. राजे यांस निरोप देऊन नबाबानीं दिल्लीस जावें. कोणेविसीं तफावत न करावी. जे गोष्टीनें आमचें बरें होईल तें करावें ’ या गोष्टीनें मजकुरांत द्यावे तेसी सिबत जाला. काल छ २६ रमजानीं सदर्हुप्रमाणें करार करून नबाबांनीं माळवा दरोबस्त जाहागीर सुभेदारीचे यादीवरी दस्कत करून दिलें. व द्रव्यहि साधेल तें पादशाहापासून करून देऊं’ ऐसें खासदस्तकानिसी याद लिहोन दिलें. राजश्री पिलाजी जाधवराव व राजश्री बाबुराव मल्हार नबाबाचे दर्शनास पाठवून दस्तकखतानिसीं याद करून दिली. यावर तमाम लष्करास व वाणियास ताकीद करून इरसाल पोंहोचवून दिल्हा. अतःपर नबाब आपले बुरंगे बाहेर दक्षिणेस रवाना करून दिल्लीस जातील. सारांश नबाबास अडचणीचा प्रसंग प्राप्त जाला म्हणवुन आपण हावभरी होऊन बुडवावयाच्या सायासास लागावें तर नबाबाची फौज, तोफखाना व बंदोबस्त पाहतां आवघाच ध्यानांत आला. रोहिले, बुंधेले व रजवाडे व सवाईची फौज व खेची व नरवर आदिकरून खासा नबाब देखील तीस पसतीस हजार. याखेरीज तोफखाना. तोहि कोणे प्रकारचा हें तुम्ही जाणतच आहां. सभोंवता आराबा चालून तमाम फौजेनिशीं तोफखान्याचे पाठीं चालावें तर राऊत अगर पायीचे माणूस निघावया गरज नाहीं. बंदोबस्तीनें चालत उठावें तर घोडे माणूस बहुत खर्च होऊं लागले. धावयाविणें तग करून बुडवावें तर मोंगल लोक मागें सरखणार. जुंजतां दिसगत लागल्यास चार दिवस निघोन जातील. हा अर्थ व तुम्हीं कितीएक

विचार लिहिला तो चित्तांत आणून सौस्याचा प्रसंग संपादिला. जो नबाब चौथाई व सरदेशमुखीचीं नांवें घेत नव्हता, त्यानें ‘ माळवे दरोबस्त ’ ऐसें खास-दस्तकानें लिहून व लिहितां उच्चार केला कीं, “ या मागे कधींच गोष्टी न जाहली ते या प्रसंगी जाहली. ” व नबाबांनीं हे गोष्टी मान्य करणें दुरापस्त. पुत्राचे नांवें सुभेदारी करून सामगमें आणिलें त्या माळव्याची दरोबस्त सनद करून देतों ! नबाबाच्या चित्तांत कल्पांत आला, परंतु काय करील ? संकटाचा प्रसंग देखोन द्यावें लागलें. जे राजेरजवाडे याचें, आपलें बरें इच्छून कश्यप धरून होते ते त्यास हातचे सोडावे लागले. हें दुःख लहान सामान्य न जाहलें. आपा ! राजश्री स्वामीचें तपोबळ, वडिलांचे पुण्य समर्थ तरीच ही गोष्टी घडोन. अन्यथा होणें कळलेंच आहे. आज पादशाहींत नबाबासारिखा दुसरा कोण आहे ? याणें जो पाया घालून दिला तो अवघ्यांत श्रेष्ठ आहे. नबाब अतःपर दिल्लीस जातील व समागमें कोणी द्यावयाचा तो देऊन नबाब दिल्लीस गेलियावरी या प्रांताचा व राजवाडियांचा बंदोबस्त कर्तव्य तैसा करून. होईल वर्तमान तें लिहून पाठवूं. कांहीं द्रव्य नबाबाजवळ मागावें ही इच्छा होती, परंतु नबाब द्रव्याचा लोभी. पूर्वीं याची साहित्य केली ते समयीं मन वाढवून द्रव्य देववलें नाहीं, ते हल्लीं पदरचे देतील हे गोष्टी तशासारखी. दिल्लीस गेल्यावर सार्वभौमापासून प्राप्त जाहल्यास चुकणार नाहीं. करार जाला यांत अंतर न करावें ऐसी जानरोटी नबाबांनी दिली. अतःपर नबाब खता करतील, कदाचित् काळक्रम दुर्बुद्धि निर्माण जाली तर केलें पावतील. श्री त्यास जय देणार नाहीं. लोभ असो दीजे हे आशीर्वाद. ”

भोपाळच्या युद्धामुळें मराठ्यांचें नांव सर्वत्र गाजलें व त्यांच्या उत्तरेकडील कारस्थानाला मोकळें रान सांपडलें. बऱ्या बोलानें आम्हांस चौथाई द्या, नाहींतर आम्ही ती तुमच्यापासून जबरदस्तीनें हिसकावून घेऊं, असा दम या लढाईमुळें मराठ्यांनीं बादशहास भरला. मराठ्यांच्या युद्धपद्धतीपुढें मोंगलांचा जय्यत तोफ-खाना दुबळा ठरला. भोपाळ व पालखेड या दोन्ही ठिकाणीं निजाम बाजीरावपेक्षां अधिक बलवान होता, परंतु बाजीरावनें त्यांस युक्तीनें हरविलें. यावरून बाजीरावचें युद्धचातुर्य चांगलेंच दृष्टीस येतें. झपाट्यानें मजला मारून जाणें व शत्रू लढाईस तयार होण्यापूर्वींच, इतकेंच नव्हे, तर आपल्या हालचालींची बातमी शत्रूस लागण्यापूर्वीं विजेप्रमाणें दौड करून शत्रूवर हल्ला करणें व त्याला अवचित गांठून त्याची पांगापांग करणें हीच बाजीरावची रणनीति होती. लढाईतील यश मुख्यत्वें-

करून झपाट्याच्या सैन्याच्या हालचालीवरच अवलंबून असतें. रणझुंजार नेपोलियननें याच मार्गाचा अवलंब करून यश मिळविलें.

भोपाळच्या लढाईनंतर कांहीं काळ बाजीराव तिकडेच राहिला. नवीन जिंकलेल्या प्रदेशावर त्यानें आपला अंमल बसविला व निरनिराळ्या जहागीरदारांकडून करभार वसूल केला. या लढाईनंतर मराठी राज्याचा विस्तार चंबळ नदीपर्यंत झाला. रघूजी भोंसल्यानें बाजीरावला जरी या प्रसंगीं मदत केली नाहीं, तरी त्यानें मोंगल बादशाही व निजाम यांच्यावरील आलेल्या घोर संकटाची व ते दुसरीकडे लढण्यांत गुंतले आहेत ही संधि साधून, एलिचपूरच्या नबाबाचा सेनापति सुजायत खान याचा पराभव करून वऱ्हाडांत आपला अंमल बसविला. रघूजीचा यांत स्वार्थ साधला असला, तरी त्यामुळें मराठी राज्याची सरहद्द दक्षिण व पूर्व दिशेस पुढें सरकली हें कांहीं खोटें नाहीं. भोपाळच्या संग्रामांत समग्र मोंगल बादशाहीची फौज बाजीरावावर चालून आली. या लढाईंत जर बाजीराव हरला असता तर मराठे पुनः डोकें वर काढूं शकले नसते. मराठी इतिहासांत यामुळें ही लढाई अत्यंत आणीबाणीची समजली जाते. या लढाईनें पेशव्यांची कर्तबगारी पूर्णपणें कसास लागली, व मराठेशाहीचें पुढारीपण त्यांच्याकडे आपण होऊन चालत आलें. मोंगल बादशाहीशीं समोरा समोर टक्कर मारणारा व तिची धूळधाण उडविणारा महापुरुष मराठी राज्यांत वावरत आहे, हें सर्वांना कळून चुकलें.

---

## प्रकरण १६ वें.

# खरा पाठिराखा.



बाजीरावाच्या यशाचा वराच मोठा वांटा त्याचा धाकटा भाऊ चिमाजी आपा याच्या पदरांत टाकावा लागेल. बाजीरावाहून हा सरासरी आठ दहा वर्षांनीं लहान होता. बाजीरावाला पित्याच्या शिक्षणाचा, सहवासाचा व उदाहरणाचा जितका फायदा मिळाला तितका चिमाजीस मिळाला नाहीं. कारण बाळाजीपंत मरण पावले व बाजीरावास पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं तेव्हां याचें वय सरासरी १०-१२ वर्षांचें होतें. आरंभीं बाजीराव जेव्हां मोहिमावर जाई तेव्हां हा साताऱ्यासच घरीं राहून शाहूमहाराजांची पडेल ती सेवा बजावीत असे. पुरंदरे, चिटणीस व भानू या त्रिकुटाच्या शिकवणुकीनें तो लवकरच राजकारणांत

वाकबगार झाला. प्रतिनिधी, अमात्य वगैरे मंडळी शाहूच्या दरबारीं बाजीरावाविरुद्ध नित्य कारस्थानें करून, त्याच्याबद्दलच्या खऱ्याखोट्या कागाळ्या महाराजांच्या कानीं प्रत्यहीं घालूं लागले, तेव्हां छोट्या चिमाजीनें आपल्या बंधूच्या गैरहजेरींत त्याचें समर्थन करावें, व प्रत्येक प्रश्नाला दोन बाजू असतात, हें अत्यंत नम्रपणानें शाहूमहाराजांच्या नजरेस आणावें. चिमाजीचें बालवय, त्याचा सुंदर चेहरा व त्याचें नम्र लाघवी भाषण, यामुळें शाहूवर त्याची चांगली छाप पडली. चिमाजी वर्तनानें फारच सुशील होता. शाहूमहाराजांच्या पायाशीं व बाजीरावाशीं त्याची अत्यंत निष्ठा होती. ब्रह्मेंद्रस्वामी हे तर शाहूचे व बाळाजीपासूनच भट घराण्याचे गुरु होते. त्यामुळें प्रत्येक लहानमोठी गोष्ट चिमाजी त्यांच्या कानावर पत्रद्वारें घालून त्यांचा आशीर्वाद घेई व त्यांचा सल्ला मागे. कार्यांत यश मिळालें म्हणजे ते गुरुमाउलीच्या पुण्यप्रतापानें व आशीर्वादानें मिळालें, अशी त्याची दृढ श्रद्धा असे. ब्रम्हेंद्रस्वामीवर असलेली त्याची भक्तिभावाची निष्ठा त्याच्या अनेक पत्रांत दिसून येते.

हा नम्र, मनमिळाऊ स्वभावाचा, सालस व सद्गुणी मुलगा तितकाच पराक्रमी होता. बापाचे व भावाचे भीम पराक्रम त्याच्या डोळ्यापुढें खेळत होते, आणि त्यांचें अनुकरण करून तलवार मारण्याची याला इच्छा झाली तर तें स्वाभाविकच ठरेल. वयाच्या पंधराव्या वर्षापासून हा स्वारीवर जाऊं लागला व एकोणीस विसाव्या वर्षांपासून तर तो सैन्याचें स्वतंत्र आधिपत्य स्वीकारून भावाप्रमाणेंच चौफेर वाऱ्यासारखा फिरूं लागला.

## चिमणाजी बल्लाळाच्या हालचालींचा तक्ता.

| | |
|---|---|
| १७२० एप्रिल | सातारा. |
| १७२३ सप्टेंबर ते डिसेंबर | कंब्रजखानावर स्वारी, हैदराबाद, पंढरपूर, तुळजापूर. |
| १७२४ जानेवारी ते जुलै | कंब्रजखानावर स्वारी |
| ,, नोव्हेंबर ते डिसेंबर | निजामावर स्वारी |
| १७२५ नोव्हेंबर ते डिसेंबर | निजामावर स्वारी |
| १७२६ जानेवारी ते जुलै | निजामावर स्वारी |
| ,, सप्टेंबर ते डिसेंबर | निजामावर स्वारी |

१७२७ जानेवारी ते जुलै.........निजामावर स्वारी
१७२८ आक्टोबर ते डिसेंबर........माळवा
१७२९ जानेवारी ते एप्रिल.........माळवा, दयाबहादूरावर स्वारी
,, आक्टोबर ते डिसेंबर........खानदेश, गुजराथ
१७३० जानेवारी ते जुलै............ढवळकें, पयागड
,, सप्टेंबर ते डिसेंबर.........खानदेश, माळवा
१७३१ जानेवारी ते जुलै...........माळवा, ग्वालेर
,, जुलै ते डिसेंबर .............उंब्रज, सातारा, पुणें
१७३२ अक्टोबर ते १७३३ जुलै ..................माळवा, चांपानेरची स्वारी
१७३३ सप्टेंबर ते डिसेंबर..........कोंकण, जंजिरा
१७३४ जानेवारी ते मार्च...........कोंकण, जंजिरा
,, मार्च ते जुलै.................खानदेश, वऱ्हाड
१७३५ .............देशीं
१७३६ मार्च ते जुलै.................कोंकण
१७३७ मार्च ते जुलै.................कोंकण
,, नोव्हेंबर ते डिसेंबर ..........ठाणें, तारापूर
१७३८ जानेवारी ते जुलै............साष्टी
,, नोव्हेंबर ते डिसेंबर.........साष्टी
१७३९ जानेवारी ते जुलै............साष्टी
,, नोव्हेंबर ते डिसेंबर.........खानदेश
१७४० जानेवारी ते एप्रिल.........कोंकण, साष्टी

चिमणाजी बल्लाळाच्या हालचालींचा तक्ता वर दिला आहे, त्यावरून त्याची रणकुशलता व युद्धाची आवड व्यक्त होते. तो धाकटा भाऊ असल्यामुळें वाटेल तिकडे मर्जीप्रमाणें वाटेल तेव्हां जाण्याची मुभा त्याला नसे. प्रसंगीं शाहूच्या किंवा बाजीरावाच्या आज्ञेनें, उत्तमपणें रंगलेली मोहीम अर्धीच टाकून त्याला दुसरीकडे जावें लागे व तिकडचीं सूत्रें हालवावीं लागत. त्यानें प्रारंभ केलेल्या कामगिरीचें

यश दुसऱ्याच्या पदरांत पडे व त्याला दुसरीकडे जाऊन नवी विटी नवें राज्य करण्याचा प्रसंग येई. परंतु स्वराज्याची सेवा हेंच एकदां मनाशीं ध्येय ठरविल्या-नंतर, वैयक्तिक मानापमानाचा प्रश्नच सज्जन माणसाला पडत नाहीं. त्यांतल्यात्यांत पहावयाचेंच झालें तर त्यानें केलेल्या मोहिमांपैकीं बऱ्याचशा दक्षिण हिंदुस्थानांतच झाल्या आहेत. निजाम, सिद्दी व पोर्तुगीज यांना चिमाजीनें चांगलाच शह लावला व मराठ्यांचें सामर्थ्य त्यांच्या प्रत्ययास आणलें. पोर्तुगीज लोकांशीं त्यानें घेतलेली झुंज, त्याची चिकाटी, धिमेपणा, पराक्रम व बेडर धैर्य हे गुण दर्शवि-तात. परंतु चिमाजीचा अति मोठा गुण म्हणजे त्याची अलौकिक बंधुप्रीति हा होय. या दोघां बंधूंच्या प्रेमाला राम लक्ष्मणाच्या किंवा राम-भरताच्या प्रेमाची उपमा द्यावी लागेल. बाजीरावासाठीं कोणताही स्वार्थत्याग करावयास तो सदोदित तयार असे. बाजीरावावर शाहू व शाहूचा दरबार क्रुद्ध झाला तरी त्यांचा भडिमार बिचाऱ्या चिमाजीवर होई, व त्यालाच त्यांच्या, अकारण असो किंवा सकारण असो, कोपाला तोंड द्यावें लागे. कारण बाजीराव साताऱ्याला स्थिर क्वचितच असे. त्याचें आसन एका जागीं कधींच स्थिर राहत नसे. तो नेहमीं उत्तरेस व तिकडील राजकारणांत गुंतलेला असे. शिवाय त्याचा दरारा इतका वाढला होता कीं सर्वजण त्याला भीत असत, व त्याच्या तोंडावर कोणीच ब्र काढीत नसे. कोणी अरे म्हटल्यास तो लागलीच कांरे असें ठणठणून उत्तर देत असे. त्यामुळें सातारा दरबारांतील राजापासून रंकापर्यंत सर्वांचा राग वांझोटा व कुरकुऱ्या स्वरूपाचा असे, आणि चिमाजीला सर्वांना नम्रतेनें पण स्पष्टपणें तोंड देऊन आपल्या भावाचें समर्थन करावें लागे. बाजीरावचा थोरला मुलगा बाळाजी बाजीराव ऊर्फ नाना हा वयांत येईपर्यंत, चिमाजीनें आपल्या भावाची बाजू शाहूच्या दरबारीं चांगली मांडली व राखली. पुढें हेंच काम नाना करूं लागला, व त्यामुळें चिमाजीला हातपाय हालविण्यास व मातबर लढाया मारण्यास मोकळीक मिळाली. चिमाजीपेक्षांही नाना अधिक गोडबोल्या, युक्तिबाज व लाघवी होता. नानांत चिमाजीची सरळता मात्र तितक्या प्रमाणांत नव्हती. पण दरबारांतील कामकाज समजूं लागून, उत्तर प्रत्युत्तर करण्याइतका नाना मोठा होईतोंपर्यंत चिमाजीनें आपल्या भावाच्या पाठराखणीचें काम उत्तम प्रकारें बजावलें.

चिमाजीआपाचें लग्न त्रिंबकराव पेठे याची बहीण रखमाबाई हिच्याशीं १७१६ त बाळाजीच्या आमदानींतच झालें. तिच्या पोटीं सदाशीव ( पानपतचा

महापराक्रमी योद्धा भाऊसाहेब ) ३ आगस्ट १७३० रोजीं पुणें मुक्कामीं जन्मास आला. सदाशीवचा जन्म झाल्यानंतर २८ दिवसांनीं रखमाबाई मरण पावली. त्यानंतर ९ डिसेंबर १७३१ रोजीं चिमाजीनें दुसरें लग्न केलें. या दुसऱ्या बायकोचें नांव अन्नपूर्णाबाई. हिच्यापासून त्याला एक मुलगी झाली. या मुलीचें नांव बयाबाई असें ठेवलें होतें. ही सरासरी एक महिन्याची झाली न झाली तोंच १७ डिसेंबर १७४० रोजीं तो मरण पावला. त्याची बायको अन्नपूर्णाबाई त्याच्याबरोबर सती गेली. म्हणजे बयाबाई एक महिन्याची असतांच पोरकी झाली. तिचें लग्न पुढें १७४५ त गंगाधर नाईक ओंकार यांच्याबरोबर झालें. त्या वेळीं लग्नांत ती केवळ ४॥ वर्षांची होती. ती पुढें १७५९ मध्यें वारली. चिमाजीच्या हयातींत २० मार्च १७३६ रोजीं सदाशिवाची मुंज झाली, व २५ जानेवारी १७४० रोजीं उमाबाईशीं सदाशिवाचें लग्न झालें. एवढें गृहसौख्य चिमाजीला लागलें. मरणसमयीं चिमाजीचें वय जास्तींत जास्ती ३२ वर्षांचें असावें. इतक्या लहान वयांत त्यानें केलेलें कार्य पाहिलें म्हणजे मन आश्चर्यचकित होतें.

पेशव्यांच्या घरांत चिमाजीचें फार वजन असे. त्याच्या तंत्रानें सर्व चालत असत. चिमाजीचा नानाला तर फारच लळा लागला होता व तो त्याच्या आज्ञेंत असे. आपल्या बापापेक्षां तो आपल्या काकाला अधिक मान देई. पुढेंपुढें बाजीरावचें वर्तन कलोदृष्टीनें कह्याबाहेर गेलें, तेव्हां त्याचें इतर कुटुंबीय मंडळीबरोबर वारंवार खटके उडूं लागले. चिमाजीचें खासगी वर्तन अत्यंत शुद्ध–अगदीं धुतल्या तांदुळांप्रमाणें स्वच्छ होतें. त्यामुळें त्याचा सर्वांवर नैतिक दाब पडे. चिमाजी लहान भाऊ असला, तरी त्याच्या नैतिक धाकामुळेंच बाजीरावचें वर्तन अखेरपर्यंत मर्यादेंत राहिलें. नाहींपेक्षां त्यानें काशीबाईसारख्या गरीब व साध्वी पत्नीस मुळींच जुमानलें नसतें, व तिला त्यानें कदाचित् टाकली देखील असती. मस्तानीचा संबंध चिमाजीला मुळींच रुचला नाहीं. तिच्यामुळें आपला भाऊ धर्मभ्रष्ट होत आहे व त्याचा अधःपात झाला, असें त्याच्या पापभीरु व धर्मभोळ्या मनाला वाटे. परंतु त्यानें मस्तानीला शिक्षा लावली, तरी भावाचा सार्वजनिक अपमान कधींच केला नाहीं. खासगी रीतीनें केवळ चार उपदेशाच्या गोष्टी त्यानें बाजीरावास सांगून पाहिल्या. बाजीरावचीं मुलें नेहमीं चिमाजीजवळ असत, व चिमाजीच त्यांच्या शिक्षणाची सोय लावी. नाना तर नेहमीं त्याच्या बरोबर स्वारींत असे. कुटुंबांतील लग्नकार्यें, घरांतील भांडणें, आप्तसोयऱ्यांचा परामर्ष, तीर्थयात्रा, दानधर्म, कुळाचार, हव्यकव्य, ह्या सर्व भानगडींचा व्याप चिमाजीच्या माथीं होता. कारण बाजीराव तिकडे मुळींच

लक्ष देत नसे, किंवा लक्ष देण्यास त्याला वेळ नव्हता म्हटलें तरी चालेल. बाजीरावचा धाकटा मुलगा रघुनाथ याची मुंज व सदाशीव याचें लग्न हीं दोन कार्यें जानेवारी १७४० त झालीं, तेव्हां बाजीराव मोहिमेंत गुंतला असल्यामुळें या महत्वाच्या कार्याला देखील तो घरीं येऊं शकला नाहीं. तेव्हां नानानेंच आपल्या भावाची मुंज लावली. शाहूमहाराज या प्रसंगासाठीं मुद्दाम साताऱ्याहून पुण्यास आले होते; कारण चिमाजी व नाना यांनीं त्यांचा फार लोभ संपादन केला होता. बाजीरावावर त्याच्या उद्दामपणामुळें जरी शाहूची मर्जी प्रसन्न नव्हती, तरी या चुलत्यापुतण्यावर त्याचा फारच लोभ होता. दुसऱ्याचें मन न दुखवितां युक्तीनें आपलें काम करून घेण्याची हातोटी त्या दोघांना साधली होती.

पिता किंवा वडील बंधु अति पराक्रमी व प्रख्यात असला तर लहानांचे गुण त्यांच्या तेजांत लोपून जातात, तसाच प्रकार थोडासा चिमाजीच्या बाबतींत घडला आहे. बाजीराव अत्यंत पराक्रमी व कर्तबगार तर खराच, परंतु चिमाजी त्याच्यापेक्षां रतिभर देखील कमी नव्हता. उलट त्याची चिकाटी बाजीरावपेक्षां जबरी होती व म्हणूनच बाजीरावनें शिद्दयावरील व पोर्तुगीज लोकांवरील मध्येंच अधांतरीं सोडलेल्या मोहिमा, त्याला यशस्वी रीतीनें पुऱ्या करतां आल्या. चिमाजी अत्यंत अल्पायुषी झाला. तो अधिक जगता तर त्याचें शौर्य, धोरण व राजकारण, यांचा पुढें नानासाहेब पेशव्याला व मराठी राज्याला फार फायदा झाला असता.

चिमाजीचें आपल्या हाताखालील लोकांशीं वागण्याचें धोरण फारच गोडीचें होतें. वसईच्या स्वारींत सामील न झालेल्या एका नायकाला मालकाच्या मदतीस जातां आलें नाहीं म्हणून फार वाईट वाटलें, तेव्हां त्याच्या सांतवनपर चिमाजीनें खालील पत्र पाठविलें:—

श्री.

शके १६५९ भाद्रपद व॥ ३०

" राजश्री गंगाजी नाईक अणजोरकर व शिवजी ना। अणजोरकर यांसः—अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य, स्ने॥ चिमणाजी बल्लाळ आशीर्वाद. सु॥ समान सलासीन मया अलफ. सांप्रत वसईवरी हल्ला जाहला ते समई कार्य न जाहलें म्हणून तुम्हीं कांहीं मनांत दिलगीर न होणें. शाबास तुमची कीं तुम्हीं मन वाढवून मेहनत उत्तम प्रकारें केली ! ज्याणीं साहेब कामाच्या ठाईं मन वाढवून कामकाज केलेलें आहे, त्यांचें सर्व-प्रकारें ऊर्जित केलें जाईल व कोण्ही साहेब कामावर ठार झाला असेल, त्याचे मागें मुलामाणसांचें चालविलें जाईल. कार्य

आजी न जाहलें, तरी पुढें तुमचे हातून घेतलें जाईल. तुम्ही आपलें समाधान असों देणें. जाणिजे. छ. २८ जमादिलावल. बहुत काय लिहिणें ? ”

म्हणजे पुढल्या स्वारींत तरी तो नाईक सामील होऊन पराक्रमाची शर्थ केल्याशिवाय रहावयाचा नाहीं. कोणत्याही संकटांत सरदारांनीं नको नको म्हणून मागें सारलें तरी, चिमाजी प्रथम आपण उडी टाकावयाचा व नंतर इतरांना आपल्यामागें बोलवावयाचा. वसईचा किल्ला लवकर सर होईना, तेव्हां ‘ निदान माझें शिर तरी तोफेच्या गोळ्यानें उडवून वसईंत टाका म्हणजे माझी मनकामना पूर्ण होईल, ’ हा त्यानें सरदारांना सांगितलेला निरोप त्याची योग्यता दर्शवितो. तो शूर असूनही नेहमीं मागें राहिला व यशाचें भरपूर माप त्यानें अखेरपर्यंत आपल्या वडील भावाच्या पदरांत पडूं दिलें.

तो अत्यंत धार्मिक वृत्तीचा होता. ईश्वरावर व त्या खालोखाल स्वामीवर त्याची दृढ श्रद्धा होती. प्रत्येक विजय तो ‘ देणें ईश्वराचें ’ समजे. फलाशेची आशा न धरतां कार्य सतत व तेंही आंग राखून न ठेवतां, करण्याची त्याची धडाडी पाहिली, म्हणजे गीतेचा उपदेश अंगीं भिनलेला तो कट्टा कर्मयोगी होता असें म्हणावें लागतें. बाजीरावला लोक भीत परंतु चिमाजीवर ते प्रेम करीत, यांतील रहस्य त्याच्या धार्मिक वृत्तींत साठविलें आहे. त्याकाळीं साधुसंतांवर श्रद्धा ठेवून चालणारा व प्रत्येक गोष्टीचें यश त्यांच्या चरणीं मनोभावें वाहणारा पुरुष लोकप्रिय व्हावा यांत नवल नव्हतें. आज कदाचित् तो भोळसट ठरला असता. त्याच्या भोळसर व धार्मिक स्वभावाचें चित्र खालील पत्रांत दिसून येईल. वसईस इतका पराक्रम गाजविल्यानंतर सामान्य लोकांप्रमाणें फुशारून न जातां हा देवपुरुष आपल्या गुरूला लिहितोः—

श्री.

१६६१ जेष्ठ व. ६.

“ श्रीमत् महाराज श्री परमहंस बाबा स्वामीचे सेवेसी. अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत ज्येष्ठ बहुल षष्ठीपर्यंत स्वामींचे आशीर्वादे करून यथास्थित असे. विशेष. सोमाजी बराबर स्वामींनीं आशीर्वाद पत्र पाठविलें, तें प्रविष्ट होऊन संतोषवासी जाहली. वसई फत्ते जाहली त्यावरून स्वामींनीं मजला कित्येक कृपा-उत्तरें गौरवून दाशरथी आदिकरून साक्ष उपसाक्ष देऊन आज्ञा दिली. तर सर्व सामर्थ्य स्वामीचे आशीर्वादाचे. वसई ‘दिल्ही दिल्ही’ हें उत्तरें त्रिवार स्वामीनीं लेख केली व स्वामींनीं पाटसास मज दर्शन

दिलें तेथेंहि वसईविशीं अभय दिलें. तदनरूप स्वामीनीं वसईवर सुदर्शन प्रेरून धर्मद्वेष्टे यांचा निःपात केला. येरवीं वसई सई होती असें नवतें व टोपकर अग्निरूप होते. त्यांच्या सर्व शक्ती कुंठित करणें हा प्रताप स्वामीचा, आम्हां मानवी लोकांचे हें कृत्य नव्हें. श्री रघुनाथ वानरांहस्तें समुद्रीं पाषाण तरवून लंकेशादिक त्रिकुटाचळाचें मर्दन केलें. तैसेच श्रीकृष्णें यादवाहस्तें म्लेंच्छादि दैत्यांचें निर्दळण केलें. याच प्रकारें पाश्चात्यांचें उपमर्दन स्वामींनीं करून वसईंत ध्वजारोपण केलें. स्वामी मूर्तिमंत ईश्वररूप आहेत. स्वामींचा प्रताप कर्तृत्व वर्णावयास आमची बुद्धी नाहीं. प्रपंचिक विचारें स्वामीनीं मज महत्व देऊन आज्ञा दिली. तर हें सर्व भूषण स्वामींचे आहे. मी स्वामींचा असे. ”

या त्याच्या धार्मिक वृत्तीमुळेंच तो त्याकाळीं पुण्यवंत व म्हणून प्रतापवंत ठरला. बाजीरावाच्या प्रतापामुळें बाजीरावाला पुण्यवंत म्हणूं लागले. दोघेहि बंधू पराक्रमी व लोकांच्या विश्वासास पात्र झाले असले, तरी त्यांच्या भूमिकांमध्यें हा महत्वाचा फरक होता.

---

## प्रकरण १७ वें.

# फिरंग्यांची दाणादाण

—:०:—

देशावरील माणसाला कोकणपट्टीची कल्पना सहसा करतां येत नाहीं, आणि ती झाल्याशिवाय पोर्तुगीज व मराठे यांच्यांत जी झुंज झाली तिचें रहस्य त्याला कळणार नाहीं. कोंकणची किनाऱ्याची रेघ ठिकठिकाणीं खंडित झालेली आहे. लहान लहान नाले व नद्या समुद्राला ठिकठिकाणीं जाऊन मिळाल्यामुळें ही किनारी रेषा भंग पावली आहे. या नद्यांचीं नांवें भूगोलांत आढळावयाचीं नाहींत, इतक्या त्या लहान आहेत. परंतु भरतीच्या वेळीं समुद्राचें पाणी त्यांच्यांत सारखें शिरून शिरून त्यांना महानद्यांचें स्वरूप प्राप्त झालें आहे. ओहोटीच्यावेळीं जो ओघळ इतका लहान असतो कीं सहज टांग टाकून माणसाला ओलांडतां येतो, तोच भरतीच्या वेळीं गंगानदीसारखें अजस्र रूप धारण करतो व नांवेवांचून पल्याड जाणें अशक्य होतें. कांहीं कांहीं नद्या हें भरतीचें पाणी सारखें शिरून शिरून कायमच्या रुंदावल्या व खोलावल्या आहेत. त्यांना खाड्या हें सर्वसामान्य नांव मिळालें आहे. यांपैकीं कांहीं खाड्या इतक्या प्रचंड आहेत कीं त्यांतून आगबोटींची ‘ जा ये ’ सारखी चालूं शकते. या खाड्यांमुळें पश्चिम किनाऱ्यावर बरींचशीं लहान लहान बेटें

बनलीं आहेत. सोबत दाखविलेल्या चित्राप्रमाणें जवळ जवळच्या दोन खाड्यांचें पाणी एका जागीं जुळलें कीं, त्यांच्यामध्यें बेट तयार झालेंच. हल्लीं रेलवेच्या सडका, पूल वगैरे कृत्रिम साधनांनीं मुंबईलगतच्या ह्या भागांतील निरनिराळीं बेटें एकमेकांशीं संलग्न होऊन, त्या भागाचें पूर्व स्वरूप पार बदलून गेलें आहे. म्हणून त्या वेळचा नकाशा डोळयांपुढें आणल्याशिवाय या लढाईंतील डावपेंच समजावयाचे नाहींत. अलीबागचा कुलाबा किल्ला सोडून आपण वर येऊं लागलों म्हणजे प्रथम खांदेरी उंदेरी बेटें व नंतर मुंबईच्या जवळचीं अनेक लहान लहान बेटें लागतात. पहिलें मोठें बेट मुंबई, त्याच्या पूर्व दिशेस करंजें, करंजाच्या उत्तरेस घारापुरी, तें सोडून पुढें गेलें म्हणजे तुरंबे. मुंबईस लागूनच उत्तरेस वांद्रा बेट; वांद्रें सोडल्यावर साष्टी हें मोठें बेट लागतें. त्यांत ६६ गांव असल्यामुळें त्यास साष्टी हें नांव पडलें. हें बेट दक्षिणेस चिंचोळें असून उत्तरेस रुंदावलें आहे. उत्तरेच्या बाजूला वसईची मोठी खाडी आहे. ही खाडी ठाण्यापर्यंत आली असून, तेथें तिला एक फांटा फुटून तो कल्याणकडे जातो. ठाणें हेंच त्यावेळीं साष्टींतील मुख्य ठिकाण होतें. तुरंब्याच्या पूर्वेस पनवेल खाडीच्या मुखाशीं बेलापूर नांवाचा किल्ला आहे. अंधेरीपासून वसईपर्यंत वर्सोवा, मालाड व धारावी हीं मोक्याचीं ठिकाणें होतीं. वसईच्या उत्तरेस आगाशी गांवाशेजारीं आरनाळा किल्ला आहे. त्यानंतर माहीम, केळवें, मनोर व अशेरगड; पुढें शिरगांव, तारापुर व चिंचणी हीं बंदरें; नंतर डहाणू, उंबरगांव व दमण; असा हा प्रांत पसरला होता, आणि त्यांत फिरंग्यांची सत्ता होती.




त्यावेळीं हे फिरंगी फार माजले होते. धर्मप्रसाराच्या नांवावर त्यांनीं औरंगजेबाच्या क्रौर्याला लाज आणील असा भयंकर जुलूम हिंदु लोकांवर चालविला होता. हिंदूंना आपल्या देवाची उघड पूजा करतां येईना कीं, देवदर्शनाला जातां येईना. देवळांतील देव स्थानभ्रष्ट होऊन तेथें पाद्र्यांचीं व्यासपीठें निर्माण होऊं लागलीं. बायकांची अब्रू भ्रष्ट करण्यांत येऊं लागली. तरुण हिंदु मुलींना, पाद्री व त्यांच्या फुसलावणीनें शेफारलेले बाटे, भर रस्त्यांतून ओढून नेऊन आपल्या घरांत घालूं लागले. ख्रिस्तीलोक निर्माण करण्याचे कारखाने ठिकठिकाणीं खोलण्यांत आले. किनाऱ्यावरील हिंदूंवर छापे घालून, त्यांना पकडून व गुप्तपणें जहाजांत बसवून

दूरदूरच्या देशांत गुलाम म्हणून विक्रीकरितां किंवा फुकट खपण्याकरितां पाठविण्यांत येऊं लागले. वसई-साष्टीच्या बाजूचे निदान चार हजार लोक तरी जबरीनें पकडून गुलाम करून गोव्यांत पाठविले होते. त्यांना जबरीनें चर्चमध्यें कामाला जुंपीत असत. हिंदुलोकांना हा जुलूम असह्य झाला. कोणी पाद्र्यांना विरोध केला तर त्याच्या नशीबीं हालहाल होऊन मरण ( Inquisition ) ठेवलेलें. त्याच्या डोळ्यांदेखत त्याच्या बायका-बहिणी-मुलींची विटंबना करण्यांत येई. त्याचीं मुलें चरचरां चिरलीं जात, व त्यांच्या तोंडांत गोमांस कोंबण्यांत येई. फिरंग्यांनीं गोवा व वसई प्रांतांत अशा अत्याचारी मार्गांनीं लाखों लोक ख्रिस्ती धर्मांत ओढले. त्यांच्यांतील बरेच अजूनही अंतःकरणानें हिंदू व केवळ वरपांगी ख्रिस्ती आहेत.

ठाण्याच्या खाडीपलीकडील गांवकऱ्यांनीं फिरंग्यांच्या जुलमास कंटाळून पेशव्यांकडे दाद मागितली. कारण पेशवे हे हिंदुधर्माचे संरक्षक समजले जात होते. पाठारे प्रभूंनीं गांवकऱ्यांचें पुढारीपण निर्भयपणें पत्करलें होतें. मालाडचे इनामदार अंताजी रघुनाथ व रामचंद्र रघुनाथ सरदेसाई यांनीं पेशव्यांकडे संधान बांधलें. पेशव्यांचा उद्देश हिंदुपदपादशाही स्थापन करण्याचा असल्यामुळें, स्वराज्यालगत चाललेले हे अत्याचार त्यांना उघड्या डोळ्यांनीं स्वस्थ पाहत बसणें शक्यच नव्हतें. १७३१ पासूनच फिरंग्यांची व मराठ्यांची धुसफुस सुरू झाली. १७३१ सालीं पेशव्यांनीं छापा घालून ठाण्याचा किल्ला फिरंग्यांच्या हातून घेण्याचा प्रयत्न करून पाहिला. परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. कारण पेशव्यांची मुख्य फौज उत्तरेकडील महत्वाच्या व राष्ट्रीय मोहिमांत गुंतली होती व फिरंग्यांच्या मदतीस इंग्रज धांऊन आले. फिरंग्यांत व इंग्रजांत जरी कायमचें अहिनकुल हाडवैर असलें, तरी मराठ्यांशीं लढतांना हे सर्व युरोपियन एक होत असत, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. यामुळें हें युद्ध उघड उघड मराठ्यांत व फिरंग्यांत असलें, तरी त्याला हिंदु-ख्रिस्ती लढाईचें स्वरूप लवकरच प्राप्त झालें. कारण हें युद्ध चालू असतांना इंग्रजांनीं फिरंग्यांना अनेकवार मदत केली. गार्डन या इंग्रज वकिलानें १७३९ सालीं शाहूच्या दरबारांत पैरवी केली तेव्हां, 'पोर्तुगीज तरी आमचे स्नेही व शेजारी म्हणून त्यांस मदत करणें आम्हांस भाग पडलें. आतां आपणास जय मिळाला आहे, तेव्हां आपल्याशींही आम्ही स्नेहभावानें वागणार,' अशी शाहूच्या प्रश्नांस उत्तरें देतांना फिरंग्यांस मदत दिल्याची उघड कबुली दिली.

१७३१ च्या छाप्यानें मराठ्यांना एवढें कळून चुकलें कीं, चांगली मोठी फौज जमा करून जय्यत तयारी केल्याशिवाय फिरंगी मोडतां येणार नाहीं. पेशव्यांचा

संचार सर्व हिंदुस्थानभर सारखा चालू असल्यामुळें त्यांना या मोहिमेवर आपली शक्ति एकवटण्यास संधि सांपडेना, कारण दुसरीकडील महत्वाचें राजकारण त्यांना तेवढयांत जलदीनें धांवून जाऊन साधावें लागे. ३४-३५ सालांत आंगरे यांच्या घराण्यांत भाऊबंदकीचा कलह उत्पन्न होऊन, मानाजी पेशव्यास मिळाला व संभाजीनें फिरंग्यांची कुमक मागितली. या भाउबंदकीच्या तंट्यामुळें ही मोहीम लांबली. फिरंगी मात्र आपल्यावर पुढेंमागें मराठ्यांचा हल्ला होणार हें नीट समजून चुकले होते. त्यामुळें त्यांनीं आपल्या मान्याच्या जागा बळकट केल्या व ठिकठिकाणीं किल्लेकोट उभारले व खंदक खणले. हीं कामें करण्याकरितां वेठीस हजारों हिंदु धरण्यांत आले. फिरंग्यांनीं अशी कडेकोट तयारी केल्यामुळें यशाविषयीं ते निश्चिंत होते. मराठ्यांच्या अंगीं चिकाटी व प्रसंगाला नेटानें तोंड देण्याची हिंमत नाहीं, असा त्यांना भ्रम होता. मराठे केवळ लुटमार करणारे गनीम ही त्यांची भावना होती. पण हा त्यांचा भ्रम चिमाजीआपानें समूळ नष्ट केला, असें त्यांनीं स्वतःच लिहून ठेवलें आहे. शत्रूंनीं दिलेल्या या कबुलायतींतच चिमाजीच्या पराक्रमाचें साग्र वर्णन भरलें आहे.

१७३७ च्या उन्हाळ्यांत या मोहिमेची सर्व तयारी होऊन चिमाजीनें सेनाधिपत्य स्वीकारलें. रामचंद्र हरि पटवर्धन, बिवलकर, खंडोजी माणकर यांनीं एक हजार लोक कल्याणास जमविले. नारायण जोशी, रामचंद्र जोशी, अंताजी रघुनाथ वगैरे मंडळी त्यांना येऊन मिळाली. त्यांनीं रात्रीचा छापा घालून २७ मार्च रोजीं ठाण्याचा किल्ला पहिल्या धडाक्यांत सर केला. नंतर शंकराजी केशव, मोरोजी शिंदे, चिमणाजी भिवराव वगैरे सरदार चिमाजीआपास येऊन मिळाले. चिमाजीनें त्यांच्यासह साष्टीबेटांत प्रवेश केला. नारायण जोशी यानें पारसिक घेतलें व बेलापुरास शह दिला. नारायणजी व गोपाळजी नाइकांनीं धारावीचा किल्ला काबीज केला. पावसाळ्यापर्यंत आरनाळें, मांडवी, तांदुळवाडी, टकमक, वर्सोवा, काळदुर्ग, मनोर, बेलापूर हीं ठाणीं मराठ्यांच्या ताब्यांत आलीं. चिमाजीनें ठिकठिकाणीं आपले कामगार व शिपाई ठेवून पावसाळ्यापुरती मोहीम बंद केली. पावसाळ्यांत फौजेच्या हालचाली करणें त्या दिवसांत अशक्यप्राय होतें. कारण रस्ते कच्चे असत. हल्लीं सारख्या सडका त्या वेळीं झाल्या नव्हत्या, मग रेलवेची गोष्टच बोलावयास नको. नद्या व नाले तुडुंब भरून वहात असत व उतार मिळेतोंपर्यंत त्यांच्या कांठीं कित्येक दिवस मुक्काम करावा लागे. शिवाय, शिपायांना आपली घरची शेती करण्यासाठीं पावसाळ्यांत स्वदेशींच रहावें लागे. शेती पिकून वर्ष-

भर पोटापुरत्या दाण्याची बेगमी झाली, म्हणजे मग चैनीची व लूटमारीची शिपाईगिरी व मुलुखगिरी सुचावयाची. त्यामुळें आठ महिने स्वारीवर बाहेर प्रांतीं काढून पावसाळयाच्या आरंभीं मराठी फौज परत स्वदेशीं येई. दसरा झाल्यानंतर ती मुलुखगिरीवर निघे. प्रायः दसऱ्याचें सीमोल्लंघन हेंच मुलुखगिरीचें प्रस्थान ठरे.

१७३७ च्या शेवटींशेवटीं फिरंग्यांनीं कडेकोट तयारी करून मराठ्यांशीं जोराची झुंज चालविली. माहीम येथील अधिकारी फडके हा फिरंग्याच्या माराच्या केवळ धाकानें कच खाऊन लढाईपूर्वींच पळाला व त्यानें ठाणें मोकळें केलें. तेव्हां बाजीरावानें रामचंद्र हरीस फौज बरोबर देऊन, कोंकणांत पाठविलें. त्यावेळीं रामचंद्र हरीस बाजीरावानें जें सणसणीत पत्र पाठविलें आहे, त्यांत फडक्यांचा सडकून निषेध केला आहेः—

‘ फिरंग्यांचें आरमार खांदेरीच्या बाऱ्यावर आलें ही खबर अणजूरकरांनीं शंकराजी केशव यांस लिहिली. त्यावरून त्यांनीं सलाबत खाऊन, केळवें माहीम येथील लोक उठवून माघारे नेले, गनीमाची सलाबत वाढविली. ऐशास वसई, आरनाळा आदिकरून लोकांचें सामान असें तसें नाहीं. नामांकित माणूस किती ! आणि गनीमाची सलाबत खातात ! यावरून त्यांचे व त्यांजवळील लोकांचे मर्दुमीच्या तारिफा काय कराव्या ! असो, न व्हावें तें झालें. अतःपर गनीमावरी सलाबत चढवून केळवें माहीम स्थळें जबरदस्तीनें घेतलीं, तरीच त्या लोकांची व सरदारांची शाबास. नाहीं तरी पैका खाऊन नाचीज होतो. तुम्हांस रवाना केलें तें सांगून रवाना केले. साडे बत्तीसशें माणूस केळवें माहीमच्या कार्यभागास तुम्हांकडे नेमिलें आहे. सरदारही तुमचे स्वाधीन आहेत. रा. महादाजी केशव यांनीं शंकराजी पंताजवळ जावें. वरकड सरदारांनीं तुमचे आज्ञेप्रमाणें चालावें, ऐसे कित्येक शंकराजी केशव यांस फजीत करून लिहिलें आहे. तरी तुम्ही सदरहू साडेबत्तीसशें माणसांनिशीं लगट करून केळवें माहीम हस्तगत करणें. झुंज भांडणाचे प्रसंगीं कित्येक माणूस सलाबत खाऊन पळून जातात, ऐशास लाखों खर्चून लोकांस द्यावे आणि प्रसंगीं पळ काढतील त्या पाजींचा मुलाहिजा काय ! साहेब काम करतील त्यांचें उर्जित करीतच आहों. ज्या ज्या वाटा पळून जावयाच्या आहेत तेथें चौक्या ठेवून पळतील त्यांस धरून परिच्छिन्न डोचकीं मारणें. सरदार प्यादा न म्हणणें. बिना एखाद दुसरा सरदार अगर परदेशी कानडे मारल्याविना माणूस भय धरून वर्तणार नाहीं. यास्तव हेंच परवानगी जाणून

पळ्यांचें पारपत्य करणें. फिरंग्यांच्या लोकांनीं वारें घेतलें आहे. तुम्हांवरही तोंड टाकतील. त्यांस जपून एकवेळ कापून काढणें; म्हणजे बलखुद राहतील. जाणिजे.'

परंतु या दमपट्टीनें काम भागलें नाहीं. १७३८ सालीं फिरंग्यांची सरशी होऊन पेशव्यांना ठिकठिकाणीं माघार घ्यावी लागली. फिरंगी चढाई करूं लागले व मराठी फौजांना बचावाचे डाव योजावे लागले. या वर्षीं पेशव्यांचें बहुतेक सैन्य उत्तरेस दिल्लीवरील स्वारींत व पुढें भोपाळच्या लढाईंत गुंतलें होतें. स्वतः बाजीराव व चिमाजी दोघेही उत्तरेंतील महत्वाच्या संग्रामामुळें कोंकणांत उतरूं शकले नाहींत. बाजीराव निजामाला चेपीत होता व चिमाजी खानदेशांत ठाणें देऊन दक्षिणची वाट रोंखून बसला होता. परंतु त्या मोहिमेंतून विजय संपादन करून पावसाळ्यांत दक्षिणेंत परत आल्यावर, चिमाजीनें कोंकणच्या या मोहिमेची कडेकोट तयारी चालविली. १७३८ च्या नोव्हेंबरांत ही मोहीम जोरानें सुरू झाली. प्रथम माहीमवर हल्ला करण्यांत आला. येथील लढाई फार निकराची झाली. डिसेंबर अखेर मराठ्यांनीं माहीम काबीज केलें. माहीमच्या कडाक्याच्या झुंजीचें चित्र खालील पत्रांत पहावयास सांपडतें:—

'रामचंद्र हरि व महादाजी केशव यांनीं माहिमास मोर्चे लाविले होते. गनीम इंग्रज फिरंगी व हबशी ऐसे एकत्र होऊन दोन तीन दिवसांत शंभर गलबतें भरून दक्षिणेकडे केळवें अंग मोकळें होतें, तिकडून गनीम कोटामध्यें जात. त्यास केळव्याकडील तर्फेस सात आठशें माणूस घेऊन ता. १० रोजीं रामचंद्रपंत चालोन गेले. गनीमाचे २५।३० माणूस मारिले. इकडील एक राऊत पडला, एक दोन घोडीं जखमी झालीं. त्या उपरी काल गनीमानें संधि पाहून दीड दोन हजार माणूस मोर्च्यांवर चालून घेतलें, एकच वेळेस तिहीं मोर्च्यांवर हल्ला केला. कोटावरून तोफांचा मार जबरदस्त केला. मोर्चे जळावयास लागले. लोकांस बाहेर निघोन हत्यार करावयास जागा नाहीं. तेव्हां रामचंद्रपंत, अमरसिंग शिर्के वगैरे दहा पंधरा राउतांनीं घोडीं घालून गनीमाचे दहा पंधरा माणूस मारिले. रामचंद्रपंतांनीं खुद्द दोघे ठार केले आणि गनीम फिरविला. ते समयीं रामचंद्रपंताचे उजव्या हातास गोळी लागली. हातची तलवार सुटून गुडघ्यास लागली आहे. ऐसें होतांच मशारनिल्हे फिरले, त्या बरोबर गनीमानें मोर्चे काबीज केले. आमचे लोकांचा धीर सुटोन निघाले. महादाजी केशव, वाघोजी खानवीलकर, राजबाराव बुरोडकर, चिंतो शिवदेव, जनार्दन हरि व गणेश हरि कारकून दि॥ महादाजी केशव, व

धोंडोपंत, विठ्ठल शिवदेव याचा भाचेजांवई, वगैरे लोक मोर्चांत होते, त्यांस निघावयास फुरसत न होऊन तेथेंच झुंजोन कामास आले. अजमासें दोनशें माणूस कामास आले व जखमी शंभरापर्यंत.' बाजीरावाची निर्भत्सना सहन न होऊन लढतांना ही मंडळी कामास आली. बाजीरावनें लोकांची केलेली निर्भत्सना त्यांना कशी झोंबली व शिपायांनीं वीरश्रीस चढून धारातीर्थीं कस देहविसर्जन केलें हें स्पष्ट दिसून येतें. सेनापतीचा शब्द शिपायांना युद्धास असा प्रवृत्त करीत असतो. 'लोकांनीं धीर सोडला आहे, गनीम हांवभरू झाला आहे, ऐसें असोन अवघ्यांस दील दिलासा देऊन, मोर्चे कायम करून, गनीमास बरासा नतीजा द्यावा, हे उमेद धरोन राहिलों आहों. अर्नाळा व बहारदपुर येथील खबरदारी शंकराजी केशवास, धारावी ठाण्याची खंडोजी माणकरास, अशेरीची दत्ताजी मोरेश्वरास, बेलापुरची नारायण जोशी यास, व कल्याण भिवंडीची बरवोजी तापकीर यास, येणेंप्रमाणें खबरदारी घेण्यास सत्वर लिहून पाठविणें. जागोजाग आपले लोकांनीं दहशत खादली आहे, त्यास स्वामींकडून उपराळा जाल्याविना लोकांस अवसान चढोन गनीमास नतीजा पोंचत नाहीं. तरी स्वामींनीं सहस्र कामें टाकून जरूर जाणोन राऊत पाठवून तेथील स्थलांचा उपराळा होय ते गोष्ट केली पाहिजे. दमण प्रांतीं आजपर्यंत आमची स्वारी गेली नाहीं. तरी त्या प्रांतीं स्वारी पाठवून, मुलूख मारून ताराज करून गुरें ढोरें, कुळें डाळें धरून आणावीं, तेणें करून शह बसोन गनीमाचा ओढा तिकडे पडेल. इतक्या गोष्टी स्वामींचें येणें नासिक प्रांतीं जालिया होतील. सबब अगत्य नासिक प्रांतीं आलें पाहिजे. मुलकाचा सत्यानाश दमण प्रांतीं करावा. एखादे जागां गनीम गांठून कापून काढावा, म्हणजे आपली सलाबत वाढेल. ही विज्ञापना.'

६ डिसेंबर रोजीं सेनापती पेड्रोनें ठाण्यावर अचानक हल्ला केला. परंतु त्या ठिकाणीं पराक्रमी मल्हारराव होळकर ठाणें मांडून बसला होता. तेव्हां तेथें फिरंग्यांचा पराभव झाला व पेड्रो त्या हल्यांत मारला गेला. मराठ्यांची फौज कोंकणांत चारी बाजूंनीं घुसून, ती फिरंग्यांची एकामागून एक ठाणीं सर करूं लागली. पेड्रोच्या मृत्यूमुळें व मराठ्यांचें वाढतें बळ पाहून फिरंग्यांनीं माघार घेतली. चौल, वसई व दमण या तीन ठिकाणीं त्यांनीं आपलें सैन्य एकत्रित केलें, व तीं स्थळें कसोशीनें शेवटपर्यंत झुंजविण्याचें ठरविलें. यामुळें जानेवारीची ( १७३९ ) अखेर होण्यापूर्वीं माहीम, केळवें, शिरगांव, चिंचणी, तारापूर, डहाणू, नारगोळ, खतलवाड व अशेरी हीं ठाणीं मराठ्यांनीं काबीज केलीं. तारापुरची लढाई फार

निकराची झाली. या संग्रामाचें चटकदार वर्णन चिमाजीआपाच्या एका पत्रांत पहावयास सांपडतें—

" सारे लष्करचे लहान थोर माणूस रात्रीचेंच खाडींतोन उतरून मोर्च्यांचें पाठीमागें जमा बसविले होते. सुरुंग एकामागें एक अंतर करून उडाले. सरकारच्या सुरुंगाचें खंडारें मोठें पडलें, उजव्या हाताकडे दुसरी थोडीबहुत खिंडारें पडलीं. त्याच्या उजवीकडे हबशांच्या लोकांनीं कोटासच शिडी टेंकून वरतीं चढले. पुढें धारकरी होता तो वर चढल्यावर, बरी गोळी लागून खालीं भुईवर पडला. त्याचे मागें दुसरा चढला तोही पडला. फिरोन लोकांनीं लगट करून वरती चढले. मारामारीची शर्थ केली. हुजरातचे निशाणाजवळ बाजी भीवराव व रामचंद्र हरि होते ते व सारे नामांकित लोक तितकें बरे वजेनें चालोन गेले. गुतेकर व बाळोजी चंद्रराव होते. उजवेकडे मल्हाररावाचीं व राणोजी भोंसल्याचीं निशाणें होतीं. त्यांणीही शर्थ करावयाची तैसी केली. खंदक सात आठ हात खोल व सात आठ हात रुंद होता. तो खंदक उतरोन कोटावरी चढावयासी बहुता प्रकारची अडचण होती. शेवट पावेतों फिरंगी यांनीं हिंमत सोडिली नाहीं. तोफांचा व बरकंदाजांचा मार सिमेपरता. " या लढाईंत बाजी भिवराव गोळी लागून मरण पावला. त्याच्या आईस पुढें बाजीरावानें खालील सुंदर सांतवनपर पत्र पाठविलेंः—

श्री

१६६० पौष व. १३

" गंगाजान्हवीसमान मातुश्री वेणुबाई काकी वडिलांचे सेवेसीः—अपत्य बाजीराव बल्लाळ साष्टांग नमस्कार वि॥ येथील ता॥ पौष वद्य १३ पावेतों स्वकीय लिहित जाणें. विशेष. पौष शु॥ ११ स तारापुरावर हल्ला केला ते समयीं बाजी भिवराव तोंडांत गोळी लागून कैलासवासी जाहले. ईश्वरें मोठें अनुचित केलें! तुम्हांस मोठा शोक प्राप्त जाला. आमचा तर भाऊ गेला त्यास, तुम्ही वडील. दुःखाचें परिमार्जन करून विवेक करावा. त्यांचीं मुलें व चिमणाजी आप्पा आहेत, त्यांचेहि त्याजपेक्षां अधिक चालेल. परंतु आमचा भाऊ गेला. बाजू गेली. उपाय नाहीं. त्यास चिमणाजी भिवराव हे पाठविले आहेत. हें सांगतील तें ऐकावें. सारांश, मीच तुमचा बाजीराव असा विवेक करून धीर धरावा. मजवर दृष्टी द्यावी. बहुत काय लिहिणें, लोभ कीजे हे विनंती. "

मालकाच्या मनांत शिपायाविषयीं व त्यांच्या कुटुंबियाविषयीं इतका आत्मीय भाव असल्यावर, शिपाई तरी धन्यासाठीं जिवावर कां बरें उदार होणार नाहींत? बाजीरावपेशव्यांच्या यशाचें रहस्य, त्याला शिपायाबद्दल वाटत असलेल्या प्रेमांत व कळकळींत भरलें आहे. ही कळकळ केवळ पोकळ व शाब्दिक नसे. तिचें भरीव स्वरूप देणगीच्या रूपानें शिपायांच्या किंवा त्यांच्या कुटुंबियांच्या पदरांत पडत असे. बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशव्यांनीं पुढल्याच वर्षी बाजी भीवरावच्या मुलाला दिलेली खालील सनद वाचावी:—

"राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी, सुभा प्रांत जुन्नर गोसावी यांसी:—

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी बाजीराव प्रधान, नमस्कार. सुरसन इहिदे आर्बैन मया व अलफ. राजश्री बापुजी बाजीराव यांचे तीर्थरूप बाजी भीवराव, पुरातन राज्यांतील सेवक एकनिष्ठपणें सेवा करीत आले, हल्लीं फिरंगाणचे मसलतीस तारापुरचे येलगार समयीं युद्धांत कामास आले. यास्तव यांजवरी कृपाळू होऊन, मौजे रेठवडी, तर्फे खेड प्रांत मजकूर येथील मोंगलाई व बाबती व चौथाई, सरदेशमुखी व सावोत्रा देखील इनाम यांसी व यांचे पुत्र-पौत्रादि वंशपरंपरेनें दिला असे. तरी तुम्हीं मौजे मजकूर सदरहू-प्रमाणें यांसी इनाम चालविणें. या पत्राची प्रत लिहून घेऊन, हें पत्र भोगवटीयास मशारनिल्हे-जवळ परतोन देणें, जाणिजे. छ ७ साबान आज्ञाप्रमाण."

वसईचा किल्ला अत्यंत मजबुत होता, व फिरंग्यांनीं तेथील बंदोबस्त कडेकोट केला होता. ह्या किल्ल्याला चिमाजीनें ६ फेब्रुवारी रोजीं वेढा घातला; त्यानंतर १५ मार्चेला मराठ्यांनीं वांद्र्याचा कोट काबीज करून तो जमीनदोस्त केला. कारण त्याचा वसईस आधार सांपडे. तीन महिने भयंकर संग्राम चालला होता. वसईचा किल्लेदार सिल्व्हेरा हा फार शूर लढवय्या होता. परंतु १५ एप्रील रोजीं तो मारला गेला. त्याचा दुय्यम परेरा हा त्यानंतर किल्लेदार झाला व त्यानें किल्ला नेटानें झुंजविण्याचें ठरविलें. चिमाजीनें किल्ला सर करून वसईच्या किल्ल्यांतील तुंगार टेकडीवरील महादेवाचें दर्शन घेतल्याशिवाय तेथून हलावयाचें नाहीं, असा निश्चय केला होता. किल्ला पडणार हें पाहून परेरानें रात्रीं जहाजांतून आपलीं बायकामुलें दमणकडे पाठविण्याचें ठरविलें. चुकून तें जहाज मराठ्यांच्या हातीं लागलें. किल्लेदाराची बायको फार सुंदर होती. परंतु चिमाजीनें बायकामुलें

असलेला तराफा पकडल्याबद्दल आपल्या शिपायांना दोष दिला व बायांस मोठ्या सन्मानानें परत किल्यांत पाठविलें. परेरा आपल्या बायकामुलांचें कसें होईल, या काळजींतच पडला होता. कारण ती मंडळी मराठ्यांच्या हातीं लागल्याचें त्याला कळलें होतें. मराठ्यांच्या क्रौर्याच्या व नामुष्कीच्या अनेक खोट्यानाट्या बातम्या त्या काळच्या उपद्व्यापी लोकांनीं उठविल्या होत्या व इंग्रज फिरंगी त्यांच्यावर थोडाबहुत विश्वास ठेवीत असत, असें दिसतें. कदाचित् कान्होजीची क्रूर मुद्रा पाहून, सर्वच मराठे क्रूर व काळे कभिन्न असावेत असा फिरंग्यांनीं तर्क बांधला असावा. कारण बाजीराव पेशव्यातर्फे त्यांचा मेहुणा व्यंकटराव घोरपडे १७३५ मध्यें फिरंग्याशीं तहाचें बोलणें लावण्यास गेला असतां, बोटेले या फिरंगी गव्हर्नरानें बाजीरावाची निग्रो या संबोधनानें संभावना केली. निगर हा निग्रोचा अपभ्रंश आहे. पेशव्यांचा असा अपमान झालेला पहातांच व्यंकटराव तहाचें बोलणें तसेंच अर्धें टाकून तेथून चालता झाला. फिरंगी किती मगरूर झाले होते याचें हें उत्तम उदाहरण आहे. ज्याच्या पराक्रमानें सारें हिंदुस्थान चळचळां कांपत होतें, त्याचा त्याच्या खास वकीलाजवळ निग्रो म्हणून उल्लेख करणें अत्यंत हलकटपणाचें होतें. फिरंग्यांना जग आपल्याप्रमाणेंच उद्धट व खटनट असेल, असें साहजिक वाटे, आणि त्यांतल्या त्यांत मराठे तर त्यांचे कट्टे दुष्मन ! परंतु परेराच्या बायकोनें मराठ्यांची व त्यांच्या सौजन्याची केलेली वाखाणणी त्याच्या पूर्वग्रहाशीं अत्यंत विसंगत होती. मराठ्यांचा सेनापति देवकोटींतील असामान्य पुरुष असून त्याच्याशीं झगडण्यांत तुम्हांला कधींही यश लाभणार नाहीं, असें तिनें आपल्या नवऱ्याला बजावलें. परेराला हें स्पष्ट कळून चुकलेंच होतें. कारण इंग्रजांकडून दारुगोळा व दाणागोटा यांची मदत वरचेवर झाली नसती, तर तितके दिवसदेखील किल्ला झुंझविणें शक्य झालें नसतें, ही गोष्ट त्याच्या अनुभवाला पटली होती. बांदरा, वर्सोवा, धारावी, कारंजा हीं शहरें खंडोजी माणकरानें काबीज केल्यामुळें, रिकामी झालेली मराठी फौज वसईपुढें येऊन दाखल झाली. मराठ्यांच्या वाढत्या जोरापुढें परेराचें कांहीं चालेना. तेव्हां त्यानें ५ मे रोजीं तहाचें बोलणें लावलें व किल्ल्यावर पांढरें निशाण उभारलें. ता. १३ रोजीं मराठे व फिरंगी यांच्यांत झालेल्या बोलाचाली-प्रमाणें फिरंग्यांनीं वसई खालीं केली व मराठ्यांनीं वसईचा ताबा घेतला. या लढाईंत चिमाजीच्या आधिपत्याखालीं मराठ्यांनीं दाखविलेली चिकाटी प्रशंसनीय आहे. समोरासमोर उभे ठाकून, शत्रूच्या तोफांच्या अचुक चालणाऱ्या गोलंदाजीची व तेणेंकरून येणाऱ्या मृत्यूची पर्वा न करतां निधड्या छातीनें खंदक ओलांडून

कोटावर चढणें सामान्य धैर्याचें काम नव्हतें. शत्रू न दिसतां व शत्रूवर उलटवार करण्याची एकदां देखील संधि न सांपडतां, मार खात खात व माणसांचे बळी देत देत नेटानें पुढें सरकणें, ही लष्करी शिस्त या प्रसंगीं मराठ्यांनीं उत्तम प्रकारें दाखविली. विजय प्राप्त झाल्यावर, तोंपर्यंत खाल्लेल्या माराचें उट्टें सहज शत्रूवर काढतां येतें. पण त्यापूर्वी शांतपणें घाव छातीवर घेऊन पुढें सरकण्यांत बहादुरी लागते.

वसईच्या किल्ल्यावर मराठ्यांचें निशाण लागल्याचें आनंदकारक वर्तमान ऐकून एका सरदारानें आपले विचार चिमाजीआपास लिहून कळविले; ते असे:—

" श्रवणें बहुत आनंद जाला. त्याचा विस्तार लिहिता विस्तार आहे. वसई एक्या तोंडानें झुंजावें; कोट बिलंद, गच्ची रुंद; मोर्चा अथवा सुरुंग चालवीन म्हटल्यास पाणी लागते. फिरंगे यासारखे झुंजणार. असें असोन अप्रतिम तर्तूद करून उघडे सुरुंग चालविले. त्याणींहि प्रत्योपकार यथाविध केला. तथापि स्वामीचें पुण्य व पराक्रम अप्रतिम. तन्मुळें याजवर सलाबत बसून ईश्वरावर तवकल केली. तन्मुळें फिरंगी यावर सलाबत बसली. दक्षिणची फौज म्हणजे मऊ लागले म्हणजे बेजरब घेणार. कठीण लागले म्हणजे फिरोन पाहणे नाहीं. ऐशी पूर्वापार या राज्यांतील तऱ्हा. सरदारांत कर्म जाहलें नाहीं. पुढेंहि होणें नाहीं हा तो निश्चयच आहे. स्वामी केवळ ईश्वरी अवतार तन्मुळें या फौजेस ह्या हिमती जाहल्या. ज्या प्रकारें वानराकरवून लंका घेविली त्या प्रकारें हे गोष्ट जाहाली. दक्षिणी फौजेस उपास करून व छातीचा कोट करून झुंजावे हे हिंमत पूर्वी कोणी केली ऐसे ऐकिलेंहि नव्हतें. परंतु स्वामी साक्षात् ईश्वराचे अवतार ह्यामुळें हें कर्म होतें तेथें संशय नाहीं. सर्व प्रकारें ओढ, उपास करून हिंमत धरणें आणि येणेंप्रमाणें झुंजणें ही गोष्ट सर्व स्वामींच्या पुण्याची आहे. नाहीं तरी औरंगजेब पूर्वींहि पादशहा जहाले होते. त्यांनीं ही कर्मे करावीं परंतु त्यासहि तवकल न जहाली. स्वामींचें पुण्य थोर. तत्प्रभावें हें होतें. नाहींतरी ह्या गोष्टी विचाराच्या वाटेनें या समयांत व्हाव्या ऐसे येत नाहीं. स्वामी ईश्वराचे अवतार हे गोष्ट खरी. येथें संशय नाहीं. आम्ही मानवी लोक, नानाविध मनाचे प्रकार, निश्चय होत नाहीं. सारांश येतदर्थी पर्याय मनांत आणतां अंत चित्तांत येत नाहीं. सर्व गोष्टी ईश्वरावतारासारख्या आहेत. जे सेवक हे पराक्रम पहात असतील त्यांचे जन्म धन्य आहेत. जे कामास आले त्याणीं तो:हा लोक आणि परलोक साधिला. ज्यापासून ईश्वराची सेवा जितकी

घडावयाची असते त्याप्रमाणें घडते. सारांश हे तर्तूद, हे मर्दुमी, या समयांत हें हिंमत, हे गोष्ट मनींहि कल्पवत नाहीं. हीं कर्मे ईश्वरासमान आहेत. सेवेसी श्रुत होय हे विनंती."

मराठ्यांच्या कोत्या हिंमतीबद्दल व चिकाटीच्या अभावाबद्दल एका मराठ्याचे हे उद्गार मननीय आहेत. चिमाजीची कामगिरी त्यामुळें फारच खुलते. त्यानें मराठ्यांत धैर्य उत्पन्न केलें व पुढें तेंच कामीं पडलें. चिमाजीनें अशक्य गोष्ट शक्य करून दाखविली, म्हणून त्याला देवपण लोकदृष्टीनें प्राप्त झालें.

ह्या महनीय वेढयाचें वर्णन खास चिमाजीनें ब्रम्हेंद्रस्वामीस पाठविलेल्या खालील पत्रांत आलें आहे, तें अर्थातच अत्यंत विश्वसनीय आहेः—

श्री.

१६६१ वैशाख व. १

श्रीमंत महाराजश्री परमहंस बाबा स्वामीचे सेवेसि. आपत्यें चिमाजीनें कृतानेक सा॥ नमस्कार. विज्ञापना. येथील कुशल ता॥ वैशाख बहुल प्रतिपदा पर्यंत मुक्काम वसई स्वामीचे आशीर्वादेकरून सुखरूप असो. विशेष. स्वामींचे अभयावरून वसईस मोर्चे माघ शु॥ दशमीस लाविले. त्या दारभ्य मोर्चे चालविले व धमधमे चार पांच बांधले. सुरंग चालविले. जे जे उपाय स्थल हस्तगत करावयाचे ते केले. फिरंगी यानीं निराकरणाचा मंत्र—पूर्वी युद्धप्रसंगी मोठ्या मोठ्या सुरांनीं—केले.—तदन्वयें फिरंग्यांनीं सुरंगावर व धमधमे यावर गरनाळा टाकिल्या. सुरुंग विच्छिन्न केले. पनळ लावून पाणी सोडिलें. आगीचे ओंडे जळके टाकून त्यावर तेल, दारू, राळ टाकून चार चार रोज डोंबराही सारखा करीत. बरकंदाजी व तोफाजी फिरंगियाची निस्सीम म्हणावि तैशी. तथापि स्वामींचा आशिर्वाद व दंड हें सबळ शस्त्र आम्हांजवळ. त्याचे प्रतापें इकडून तोफा लावून फिरंगियांच्या तोफा मना केल्या. सफेल पाडून लेश केली. वसई जागा बांका. बुलंद सुरुंगाचा उपाय नाहीं. परंतु स्वामींचे कृपाकटाक्षें सुरुंग चालवून दोही बाजूनीं खांब, वरती तक्तपोशी, त्यावर दोन अडीच हात रेती टाकून सुरंग नेऊन पोहोंचाऊन, दोनशे पाथरवट लावून, मोठमोठे चिरे फोडून सुरंगाचे बुधलियास जागा करून, वैशाख शु॥ पंचमीस सकल सिद्धता करून, सुरुंग लोकांस बाजू वांटून देऊन, नगारेयाची इशारत करून, सुरुंग उडतांच सर्वांनीं येलगारास उठावें, बुरुजावर चढावें, शिड्या टेकून चढावें ऐसा करार करून वैशाख शु॥ ६ बुधवारीं दोन घटका दिवस प्रातःकाळच्या येतांच

सुरंगास बत्त्या दिल्या. डावे बाजूचे सुरंग कांहीं उडाले, कांहीं उडणें होते, तोंच लोकांनीं उतावळी करून कोटावर चालून घेतलें; तों दुसरे सुरंग तेच बाजूचे उडाले, त्याणीं लोक दडपले व जाया व ठार जाले. तसेच उजवे बाजूचे सुरंग उडाले. एक दोन उडतांच बुरुजांस वाट जाहलीशी देखून लोक वरते चढले, तों दुसरे सुरंग उडाले, त्यांणीं वरते लोक चढले होते ते उडोन गेले. लोक कचरले. हिरमोड होऊन काम बंद पडिलें. फिरंगी याणीं संभाळून हुके व गरनाळा व रेजगरीचा मार न भूतो न भविष्यति केला. त्याणें लश्करचे लोकांस व हषमास अवसान राहिलें नव्हतें. उजवे बाजूचा मातबर सुरंग राजेश्री मल्हारजी होळकर यांजकडील उडणें होता, त्याचा शोध करून, पुन्हा त्यांत बुधले घालून रंजक दुरस्त करून लोकांची निवड केली. आणि सुरंग उडतांच खामखा निशाणें चढवावींसा करार करून वैशाख शु॥ ७ गुरुवारीं उजवेबाजूचा सुरंग उडविला. तेच समयीं लोक जाऊन बुरूज अर्धा उडाला त्याजवर चढले. फिरंगी यांनीं सफेलीच्या आंतून मेढा घालून पेटी भरून तोफा लाऊन तयार होतांच तेथें फिरंगी बळाऊन हुके गरनाळाच्या दारूच्या पोत्यास आग लावून मार केला, व रेजगिरीचा मार सीमेपरता केला. लोकांवरी अग्नीचा पर्जन्य करून भाजून काढिले. तथापि स्वामींचे अभय. आशीर्वादाचें वज्रकवच लोकांचे आंगीं होतें, तेणेंकरून आगीची तमा न धरितां लोकांनीं हत्यार बरे वजेने केलें. फिरंगी यांनीं मरदुमी, शिपाईगिरी करावी तैशी केली. त्याप्रमाणें इकडील लोकांनीं भारती युद्धाप्रमाणें युद्ध केलें. या मागें युद्धें बहुत जाली. परंतु या लढाईस जोडाच नाहीं. सर्व स्वामींचा आसीर्वाद. लोक बुरूच सोडीनातसे जाहले. तेव्हां स्वामीच्या दंडक प्रहारें करून फिरंगी धर्मद्वेष्टे बेहिमत होऊन अष्टमीस प्रहर दिवसास कबूलास आले. कबूल घेतला. ‘आठ दिवसांत कबिलासुद्धां झाडून जातोंसे’ करार केले. याजवरून मार महकूफ केला. फिरंगी यांणीं कबिले वस्तभाव गलबतांत भरिली. काल वैशाख पोर्णिमेस फिरंगी झाडून गेला. स्वामीचे पुण्यें करून जागा फत्ते जाहली. लश्करचे व हषमाचे लोक सुरंगानें उडाले व जाया ठार अदमासें पांच हजार किंबहुना विशेष होतील. तैसेंच फिरंगीयाचे सात आठशे मालीस ठार व या निराळे जखमी जाले. भारती युद्धाप्रमाणें युद्ध जालें. वसई बांकी जागा, पश्चिमेकडून समूद्र, दक्षिणेकडे खाडी, पुर्वेकडे खाजण चाखल, तिहीकडून किमपि इलाज नाहीं. एक उत्तरेकडून उपाय. तिकडेहि रेति, धर नाहीं. स्वामी साक्षात्कार ईश्वराचा अंश; स्वामींनीं वसई दिली. त्रिवार लिहिले,

ते शब्द अन्यथा कसे होतील ? वरकड वसईची गोष्ट मानवी लोकांनीं म्हणावी असें नाहीं ! वसई स्वामीचे आशीर्वादें फत्ते जाली. श्रीचें सुदर्शन धर्मद्वेष्टयाचे मस्तकीं वज्रप्रहार होऊन टोपीकर म्लानत्व पावलें. अन्यथा वसई वसई होती ! व फिरंगी आगीचा पुला होता. स्वामीचे कर्तृत्वास पार नाहीं ! स्वामीचा महिमा स्वामी जाणत ! आम्हा मानवी लोकांस काय कळे ? "वसई फत्ते होतांच सवाशे पुतळी पाठवून देणे व श्री भुलेश्वरास सव्वाशे रुपयांचा मुगुट घातला म्हणोन आज्ञा केली. याजवरून स्वामीचे आज्ञेप्रमाणें वसई फत्त होतांच श्रीनिवास केदार याजबरोबर पुतळ्या सव्वाशे व श्री भुलोबास मुगुट सव्वाशे रुपयाचा घातला ते रुपये १२५ सव्वाशे स्वामीचे सेवेशी पाठविले आहेत. प्रविष्ट होतील. आम्ही लेंकरें स्वामीचीं असो. सर्वप्रकारे कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. स्वामीचे वितरिक्त दुसरें दैवत आम्हां काय आहे ? सारांश, स्वामीच्या आशीर्वादें व दंडाच्या प्रतापें कार्य सिद्धीतें पावलें असे. स्वामीचा महिमा आम्हीं वर्णावयास सामर्थ्य धरीत नाहीं. श्रीनिवास केदार पुतळ्या व रुपये देऊन रवाना केले आहे ते लवकरच पावतील. वर्तमान त्वरेनें विदित व्हावें यास्तव हें पत्र पुढें रवाना केलें असे. सेवेसी श्रुत होत हे विज्ञापना."

वसईच्या युद्धानंतर ज्या तहाच्या अटी ठरल्या, त्या मराठ्यांनीं तंतोतंत पाळल्या, अशी खुद्द फिरंग्यांनीं कबूली दिली आहे. मराठे तहाचीं कलमें बरोबर पाळीत नसत, ही इंग्रजांची ठराविक ओरड यावरून लुच्चेगिरीची दिसते. मराठे तहाच्या अटी अत्यंत प्रामाणिकपणें अमलांत आणीत. परंतु शत्रूंनाही त्या ते उघड्या डोळ्यांनीं मोडूं देत नसत. उलट बाजूनें अटी मोडल्या, तर बावळटाप्रमाणें स्वस्थ न बसतां मराठे 'अरे'चें उत्तर 'कांरे' देत असत. या तहांतील कलमें किती उदार व शत्रूंचा गौरव करणारीं आहेत हें देखील लक्षांत घेण्यासारखें आहे. शत्रु कचाट्यांत सांपडला, म्हणजे त्याला अगदीं पिळून काढून जवळ जवळ नामशेष करावयाचा किंवा त्याची कंबर कायमची मोडून टाकावयाची, ही राजनीति मराठे शिकले नव्हते. या तहाचीं कलमें खालीं दिलीं आहेतः—

१. पोर्तुगीज फौज व बुणगे यांस सर्व हत्यारांसह बॅन्ड वाजवीत व निशाण उभारून, सुरक्षितपणें किल्ल्याबाहेर मराठ्यांनीं जाऊं द्यावें.
२. वसई येथें राहत असलेलीं क्रिस्ती, हिंदी किंवा मुसलमानी कुटुंबें किंवा लोक, जे वसई सोडून जाण्यास इच्छितील, त्या सर्वांस आपापली मालमत्ता घेऊन चिमाजीआपानें सुरक्षित जाऊं द्यावें.

३. वसईच्या बंदरांत जहाजें असतील त्यांसही आपापला दारूगोळा व तोफखाना घेऊन सुरक्षितपणें बंदरांतून जाऊं द्यावें.

४. कलम दोन प्रमाणें लोकांस निघून जाण्यास गलबतांची वगैरे जरूर लागल्यास तीं गलबतें मराठ्यांनीं पुरवावीं, आणि हे लोक आपापल्या स्थळीं पोंचेपावेतों, रस्त्यांत आंगरे वगैरेकडून त्यांस त्रास न होईल, अशी तजवीज चिमाजी आपानें ठेवावी.

५. क्रिस्ती पाद्र्यांसही आपापली मालमत्ता घेऊन सुरक्षित जाऊं द्यावें.

६. पोर्तुगीझ लोकांचा दारूगोळा व दाणागोटा वसईंत आहे तो सर्व बरोबर घेऊन जाण्याची त्यांस मोकळीक असावी. ( हें कलम चिमाजीनें कबूल केलें नाहीं. सर्व सामान त्यानें विकत घेतलें. )

७. जे क्रिस्ती लोक आपखुषीनें वसईच्या हद्दींत राहतील त्यांस आपलें धर्माचरण करण्यास मराठ्यांनीं हरकत करूं नये, किंवा त्यांच्या जिंदगीचा अपहार करूं नये. हें कलम मुसलमान व हिंदूंसही लागू असावें.

८. एकमेकांनीं पकडलेले कैदी ज्यांचे त्यांस परत करावे.

९. किल्ला खालीं करून निघून जाते वेळीं पोर्तुगीझांस कोणताही त्रास होऊं नये, म्हणून चिमाजीनें आपली फौज दूर अंतरावर मद्रापुरास न्यावी. पोर्तुगीझ लोक जहाजांत बसून तोफेच्या टप्याच्या बाहेर जाईपावेतों मराठी फौजेनें किल्ल्यांत प्रवेश करूं नये.

१०. वसईंतील कोणताही माल किंवा सामान योग्य किंमत दिल्याशिवाय मराठ्यांनीं घेऊं नये.

११. वसई शहरांत तीन क्रिस्ती देवळें आहेत, तीं तशींच राहूं द्यावीं; त्यांतील मूर्तींस व दागिन्यांस मराठ्यांनीं धक्का लावूं नये.

१२. या तहावर सही झाल्यानंतर त्याप्रमाणें वर्तन राहण्यासाठीं चिमाजीनें आपला एक अंमलदार पोर्तुगीझ जहाजावर ठेवून द्यावा, आणि पोर्तुगीझांचा एक अंमलदार मराठ्यांचे ताब्यांत रहावा '

या सुमारासच इचलकरंजीकर व्यंकटराव घोरपड्यानें गोवा प्रांतावर स्वारी करून फिरंग्यांना तिकडून पायबंद दिला. २६ जानेवारी रोजीं त्यानें मडगांव काबीज

केलें, व गोव्याचा प्रांत तो धडाक्यानें सर करूं लागला. इकडे दक्षिणेंतील वसईकडची भयानक व अपयशाची वार्ता तेथील गव्हर्नराला कळली. तेव्हां साष्टी ( गोंव्याची ) व बारदेश या दोन प्रांतांच्या वसुलावर शेंकडा चाळीस टक्के खंडणी मराठ्यांना निमूटपणें देण्याचें कबूल करून, २७ एप्रील १७३९ रोजीं व्यंकटराव घोरपड्यांशीं गोंव्याच्या गव्हर्नरनें तह केला. व्यंकटरावच्या व बाजीरावच्या अपमानाची येणेंप्रमाणें भरपाई झाली. ज्यांना निगर म्हटलें त्यांच्यापुढें मान वांकवून करुणा भाकणें फिरंग्यांना भाग पडलें !

हें वसईचें फिरंगी युद्ध इतकें लांबण्याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे नादीरशहाच्या स्वारीची बातमी हें होय. कारण ती बातमी दक्षिणेंत आल्यापासून बाजीरावचें लक्ष दक्षिणेंतून उडालें. ‘ वसईची बिशाद काय ? पुढें पाहिलें जाईल. हिंदु मुसलमान, राजे रजवाडे सर्वांनीं एक होऊन नादीरशहास प्रथम हांकलून दिलें पाहिजे, ’ असे बाजीरावनें उद्गार काढले व शाहूनें त्यास दुजोरा दिला. कारण नादीरशहा परकीय होता, आणि हिंदुस्थानावर हें परकीय टोळधाडीचें संकट येऊं पहात होतें. तेव्हां हिंदुमुसलमानांनीं आपसांतील भेद विसरून, स्वदेशगौरवार्थ एकत्र होऊन, परशत्रूशीं निकराची झुंज घेऊन व त्याला पराभूत करून हांकलून लावणें जरूर होतें. बाजीरावनें निरनिराळ्या सरदारांना पत्रें पाठवून या मोहिमेची तयारी चालविली. तेव्हां बाजीराव उत्तरेकडील युद्धांत गुंतल्यास आपल्यावरचा दाब कमी होईल, या उमेदीनें फिरंग्यांनीं बरेच दिवस दम धरला. परंतु चिमाजीला दक्षिणेची मोहीम तडफीनें निकालांत काढण्याची आज्ञा देऊन, बाजीराव तसाच मिळाल्या फौजेनिशीं उत्तरेस निघून गेला. त्यानें चिमाजीची फौज बरोबर नेण्यास मागून घेतली नाहीं. त्यामुळें फिरंग्यांच्या आशांवर विरजण पडलें व ते नाइलाजानें शरण आले. कारण त्यांना दुसरा तरणोपाय उरला नाहीं.

या युद्धामुळें फिरंग्यांचा सुमारें पाऊणशें मैल लांबीचा प्रदेश मराठ्यांस मिळाला. या टापूंत ३४० गांव होते. शिवाय आठ मोठीं शहरें, वीस किल्लेकोट, दोन डोंगरी किल्ले आणि वसई व ठाणें हीं दोन मोक्याचीं लष्करी नाकीं, मराठ्यांच्या हातीं लागलीं. शिवाय फिरंग्यांचा पंचवीस लाख रुपये किंमतीचा दारुगोळा व जहाजें वगैरे इतर सामान, आणि ५९३ लहानमोठ्या तोफा नष्ट होऊन त्यांना तेवीस लाख रुपये युद्धखर्च आला.

कोंकणपट्टीवर याप्रमाणें पेशव्यांचा अंमल चालू झाला. फिरंगी वंगले, व सिद्दी त्यांचा मांडलिक बनला. आंगऱ्याच्या घरांतील भाऊबंदकीमुळें त्यांची गुर्मी जिरली होती व पेशव्यांशीं ते नम्रपणानें वागूं लागले. उत्तर किनाऱ्यावर दमण बंदराखेरीज एकही ठिकाण फिरंग्यांच्या ताब्यांत राहिलें नाहीं. नुसत्या धाकदपटशहानें वाडीकर सावंत वठणीवर येऊन पेशव्याशीं नरमाईनें वागूं लागले व गोंव्यांतही फिरंग्यांची सत्ता नाममात्र उरली. कारण ४० टक्के वसूल तेथच्या गव्हर्नरानें मराठ्यांना देऊं केला. पेशव्यांची चलती पाहून इंग्रज घाबरले व त्यांनीं प्रथम इंचबर्ड व नंतर गार्डन या वकीलानां, आपल्या तर्फे अनेक नजराणे छत्रपतीला, राण्यांना, पेशव्यांना व इतर लहानमोठ्या सरदारांना देण्याकरितां त्यांच्या बरोबर देऊन, पेशव्याशीं व छत्रपतीशीं तहाचें बोलणें करण्याकरितां पाठविलें. पेशव्याशीं तह केल्याशिवाय इंग्रजांना गत्यंतरच उरलें नव्हतें. नाहींपेक्षां पश्चिम किनाऱ्यावरील त्यांचा व्यापार संपुष्टांतच आला असता. इंग्रजांची मोहमयी व्यापारी माया पेशव्यांच्या राजवटींत छत्रपतीच्या महालांत व पेशव्यांच्या वाड्यांत आपले हातपाय पसरूं लागली होती. मालकांचें अनुकरण करून मराठे सरदारदेखील आपल्या घरांतून या मायेला वावरूं देऊं लागले होते. ८ आगस्ट १७१५ रोजीं शाहू राजानें कान्होजी आंगऱ्यामार्फत इंग्रजांकडून खालील माल पत्रद्वारें मागविला. मालाच्या यादींत तलवारी, चाकू, कस्तुरी, जर्दा, शाली, शंभर बाटल्या गुलाबपाणी, चारशें मेणबत्या, रेशमी कापड वगैरे सामान लिहिलेलें आढळतें. श्रीशिवछत्रपतींच्या कारकीर्दींत युरोपीयन व्यापाऱ्यांकडून हत्यारें व दारुगोळा यांचीच मागणी मराठे करीत असत. पण शाहूच्या विलासी कारकीर्दींत चैनीच्या तकलादू वस्तूंची खरेदी सुरू झाली. जुना माल मुंबईंत विकून, त्याऐवजीं डोळे फिरविणारा चकचकीत कोरा भपकेदार माल विकत घेण्याची प्रवृत्ति वाढूं लागली. १७३४ मध्यें पेशव्यांच्या मुंबईंतील गुमास्त्यानें मुंबईस गालिचे व रंगीबेरंगी सत्रंज्या आपल्या मालकासाठीं खरेदी केल्याचें पत्र पुणें येथील पेशवे दप्तरांत अलीकडे सांपडलें आहे. आरसे, झुंबरें, घड्याळें, दिवे, दुर्बिणी फार काय पण कांचेचे प्याले, कपबशा व चहादाण्या यांची खरेदी पेशव्यांचे वकील करूं लागले. प्रि. रालीन्सननें पुण्याचें पेशवाई दप्तर श्री. सरदेसाई यांच्याबरोबर नुक्तेंच तपासलें, आणि त्यासंबंधीं टाइम्समध्यें एक लहानसा लेख लिहिला त्यांत खालील उल्लेख आहे.

Some of the letters show that the demand for English goods, both at Poona and Satara, was very large, and the shrewd merchants in Bombay did a brisk trade with the Maratha Courts. In a letter dated August 8th, 1715, Shahu Raja orders from the English through Kanhoji Angre, a very long list of articles, including European swords of the finest quality, knives, musk, one hundred bottles of rose-water, four hundred candles, shawls, silks, and tobacco. The Peshwa's Vakil in Bombay writes to Bajirao I some time in 1734, "The old sack cloth has been handed over to the Bombay merchants for disposal by auction. There are various carpets, coloured and embroidered, for sale here, but as the highest bid was only Rs. 18-4-0 per pair, they were withdrawn. Moro Visvanath, however, managed to get hold of a certain number. This may kindly be confirmed." Evidently English articles had already entered Maratha households, and had become the fashion.

इंग्रजांपासून हत्यारें विकत घेण्याऐवजीं स्वतःच्या तोफा व बारुदगोळा तयार करण्याचे कारखाने पेशव्यांनीं आपल्या राज्यांत सुरू केले व त्यामुळेंच पुढें मराठ्यांना मुसलमानांचा पराभव सहजरीत्या करतां येऊं लागला. भोपाळच्या लढाईंत तोफखान्याच्या कमजोरीमुळें बाजीरावला जो कटु अनुभव आला, त्याचा त्यानें पुढें फायदा करून घेतला. कारण १७३९ मध्येंच खंडो मानकर यानें तोफा ओतण्याचा क्रम सुरू केला. पुढें नानासाहेबांच्या कारकीर्दींत व सदाशीवरावभाऊच्या देखरेखीखालीं पेशव्यांचे तोफा व बारुदगोळा करण्याचे मोठाले कारखाने पुणें व अहमदनगर येथें सुरू झाले. परंतु चैनीच्या वस्तु विकत घेण्याचा प्रघात उत्तरोत्तर वाढत चालला, व त्यामुळें इंग्रजांचें मीठ तुटूं शकलें नाहीं, आणि मराठ्यांशीं व्यापार करून श्रीमंत व पुष्ट बनलेल्या इंग्रजांनीं पुढें त्याच द्रव्याच्या बलावर मराठ्यांचा पराभव केला ! मराठ्यांचा पैसा त्यांनाच मारक झाला !



हिंदुस्थानांत बांधलेलें जुनें लढाऊ जहाज.

इंग्रज वकीलांनीं आपल्या ठराविक नीतीप्रमाणें शाहूंत व पेशव्यांत भेद पाडून आपला स्वार्थ साधण्याचा यत्न करून पाहिला, परंतु तो सफळ झाला नाहीं. कारण नानानें त्यांस चांगलेंच चापलें, असें दिसतें. कारण तो म्हणतो, 'भेटीस येण्याचें कारण काय, असें नानानें विचारलें. माझें उत्तर त्यास समाधानकारक वाटलें नाहीं. आम्ही शाहूचे भेटीस आलों हें त्यांस आवडलें नसावें. ता. १४ जून रोजीं नादीरशहा परत गेल्याची खबर आली. मराठ्यांस भिऊन तो पळून गेला याबद्दल शाहूनें दरबार भरवून बक्षिसें वांटलीं.' शाहूनें देखील त्यांची फारशी डाळ शिजूं दिली नाहीं. कारण त्याजजवळ महाराज म्हणाले, 'हा सर्व व्यवहार आम्ही बाजीरावावर सोंपविला आहे. आम्ही त्यांत हात घालीत नाहीं. पण तुम्हांस जर शांतपणें केवळ व्यापार करावयाचा आहे, तर आमचे नोकर जे आंगरे त्यांच्याशीं कलह करण्याचें तुम्हांस प्रयोजन काय?' बिचाऱ्यानें सर्व लहान मोठ्या सरदारांना किंमती नजराणे अर्पण केले, परंतु उलट मोबदल्यांत 'मला मिळालेल्या सर्व वस्तूंची किंमत जेमतेम २४० रुपये भरेल,' असें बिचारा कुरकुरत होता. साहजिकच आहे. त्या वेळीं इंग्रजांची फारशी पत्रास या देशांत नव्हती. ते भिक्षेकरी बनून व्यापाराच्या सवलती हिंदु राजाजवळ मागावयास येत होते. आणि अन्नछत्रीं जेवणारानें साजुक तुपाचा किंवा भातावर मिरपूड मागण्याचा हट्ट धरून कसें चालेल?

---

प्रकरण १८ वें

# नादीरशहाचा प्रलय

भोपाळच्या लढाईनें हिंदुमुसलमानांतील भांडणाचा निकाल लागला नाहीं. निजाम त्यावेळीं अडचणींत सांपडला असल्यामुळें त्यानें बाजीरावच्या सर्व अटी कबूल करून त्याच्याशीं तह केला. परंतु तो केवळ जुलुमाचा रामराम असल्यामुळें त्याप्रमाणें वागण्याची त्याची मुळींच इच्छा नव्हती. दिल्लीस आल्यावर त्यानें या तहासंबंधीं पुष्कळ विचार करून पाहिला. कोणताही तह जर दोन्ही पक्षांनीं प्रामाणिकपणें अंमलांत आणला, निदान आणण्याचा प्रयत्न केला, तरच त्याचें महत्व असतें. नाहींपेक्षां त्याला कागदाच्या कपट्याचीही किंमत राहाणार नाहीं. बाजीरावाचे वकील सनदांसाठीं दिल्लीच्या दरबारांत निकड लावीत होते, आणि निजाम त्यांच्याशीं टोलवाटोलवी करीत होता. इतक्यांत इराणच्या नादीरशहाचें व दिल्लीच्या बादशहाचें अफगाणिस्थानच्या सरहद्दीसंबंधानें भांडण उपस्थित झालें. कारण नादीरशहानें अफगाणांचा पराभव करून, तो देश जिंकून आपल्या राज्यास जोडला होता. या लढयाचा निकाल आपणास अनुकूल असा लावून घेण्याकरितां हिंदुस्थानावर स्वारी करण्याची नादीरशहानें धमकी दिली. बहुधा धमकीनेंच कार्यभाग साधण्याचा आरंभीं त्याचा विचार असावा. परंतु निजाम, सादतखान वगैरे सरदारांनीं त्याला उचीपट्टी दिल्यामुळें त्यानें खरोखरच हिंदुस्थानावर स्वारी करण्याचा बेत कायम केला. नादीरशहाची आपणांस मदत मिळाली म्हणजे शिरजोर झालेल्या मराठ्यांची आपणास चांगली खोडकी जिरवितां येईल, असा या मुसलमानी सरदारांचा मनसोबा असावा. केवळ बादशाही फौजेच्या जोरावर मराठ्यांचा पराभव करणें दुरापास्त आहे, हें त्यांना आतांपर्यंतच्या अनुभवावरून कळून चुकलें होतें. मुसलमानांना जर यापुढें राज्यकर्ते म्हणून हिंदुस्थानांत नांदावयाचें असलें तर हिंदुस्थानाबाहेरील मुसलमानी सत्तांचें सहाय्य घेतल्यावांचून चालणार नाहीं, हें त्यांना पुरतेपणीं समजून चुकलें होतें. हिंदुस्थानांत पिढयानूपिढया स्थाईक झालेल्या मुसलमानांचा ओढा हिंदुस्थानापेक्षां बाहेरच्या मुसलमानी जगाकडे असावा, हें कोणाला चमत्कारिक वाटलें तरी अक्षरशः खरें होतें. हा त्यांचा स्वभावधर्म आहे. **सुजलां सुफलां** असा मातृदेश किंवा पितृदेश, यापेक्षां वाळवंटी व रेताड धर्मभूमीची ओढ त्यांच्या

मनाला अधिक असते. हिंदुस्थानच्या ‘ सुजलां सुफलां सस्यशामलां ’ अशा सुवर्णमय भूमीपेक्षां आरबस्थानांतील डोंगरी व उजाड पठारांचा मोह त्यांच्या मनाला अधिक पडतो. मुसलमानांच्या या स्वभावधर्माप्रमाणें निजाम, सादतखान वगैरे बादशाही सरदारांनीं हिंदुस्थानांत फौजेनिशीं चालून येण्याविषयीं नादीरशहाला आमंत्रण दिलें इतकेंच नव्हे, तर त्याला त्यांनीं तशी गळ घातली.

नादीरशहाचा जन्म १६८८ त झाला, आणि १७३६ त त्याला इराणची गादी मिळाली, तो जातीनें इराणी नसून तुर्क होता. त्या वेळीं अफगाणिस्थान हा हिंदुस्थानांतील एक प्रांत समजला जात असून दिल्लीच्या बादशाहींत मोडत होता. अफगाण बंडखोरांचा इराण देशाला फार त्रास होऊं लागल्यामुळें नादीरशहानें अनेक वेळां दिल्लीच्या बादशहाकडे तक्रार केली; इतकेंच नव्हे, तर बंडखोरांचा बंदोबस्त करण्याविषयीं बादशहास समक्ष विनंति करण्याकरितां त्यानें आपले वकीलदेखील दिल्लीस पाठविले. दिल्लीच्या बादशहानें त्याच्या तक्रारींकडे मुळींच लक्ष पुरविलें नाहीं. कारण दिल्लींत चौचिंधी माजली असून कोणाचाच पायपोस कोणाच्या पायांत राहिला नव्हता. तेव्हां निरुपायास्तव नादीरशहानें अफगाणिस्थानावर स्वारी करून कंदाहार शहर काबीज केलें. त्यावेळीं नासीरखान हा काबूलचा सुभेदार होता. त्यानें वारंवार बादशहाकडे मदतीची याचना केली, परंतु त्याला दिल्लीहून कोणी मदत पाठविली नाहीं. नासीरखानानें तशा स्थितींतही काबूल शहर चांगलेंच झुंजविलें. जून १७३८ मध्यें नादीरशहानें काबूल काबीज केलें. तेथून त्यानें पुनः एकदां आपला वकील दिल्ली येथें पाठविला. राज्यांत एवढी महत्वाची घडामोड होऊन, एक महत्वाचा प्रांत हातांतून गेला तरी देखील दिल्लीच्या दरबारांत त्याची कोणाला वार्ताही नव्हती, व पर्वादेखील वाटत नव्हती. दिल्लींतील ही बजबजपुरी पाहून नादीरशहानें आपला मोरच्या हिंदुस्थानाकडे वळविला. मोंगल सरदारांच्या निकडीच्या आमंत्रणामुळें त्याच्या बेताला दुजोरा मिळाला.

पेशावर व अटक हीं शहरें काबीज करून ८ जानेवारी १७३९ रोजीं त्यानें चिनाब नदी उतरून लाहोरावर स्वारी केली. लाहोरचा सुभेदार झकारियाखान मोठा पराक्रमी व हुषार माणूस होता. त्यानें बादशाहीकडून कुमक मिळविण्यासाठीं दांताच्या कण्या करून पाहिल्या, परंतु ज्याचें नांव तें! बादशाही दरबार गाढ निद्रेंत घोरत होता. जे सावध होते त्यांना नादीरशहाचें आगमन इष्टच होतें. १२ जानेवारी रोजीं नादीरशहानें लाहोर शहर काबीज केलें. तेव्हां कोठें बादशहा जागा होऊन त्यानें आपले अमीरउमराव गोळा केले व आपली फौज घेऊन तो

१८ जानेवारीं रोजीं नादीरशहाला अडविण्याकरितां स्वारीवर निघाला. दिल्लीपासून सरासरी ८० मैलांवर कर्नूल येथें बादशहानें आपल्या फौजेचा तळ ठोकला. बादशाही फौज मोठी असली, तरी फौजेचीं सूत्रें एकतंत्री हालत नव्हतीं. प्रत्येक सरदार आपल्या मतानें चालणारा होता. लढाईंत असा लोकशाही स्वच्छंदी कारभार चालत नाहीं. कोणातरी एका खंबीर सेनापतीच्या हातीं लढाईचीं सूत्रें सोंपविलीं असलीं, तरच यशप्राप्तीची आशा असते. नादीरशहाची फौज त्याच्या खास हुकमतींत होती. त्या फौजेला दुसरा अधिकारी माहीत नव्हता. स्वतः नादीरशहा चतुर सेनानी होता. शिवाय मोंगलापेक्षां त्याच्या बंदुका व तोफा अधिक पल्लेदार व मजबूत होत्या. याखेरीज निजाम व सादतखान हे बादशाहींतील प्रबल सरदार आंतून त्याला अनुकूल झाले होते.

लाहोर येथें आपल्या फौजेला विश्रांति देऊन व लष्करी सरंजामांत जी तूट पडली होती ती भरून काढून, नादीरशहानें ५ फेब्रुवारी रोजीं पुढें कूच करून सरहिंद घेतलें, व १३ फेब्रुवारीस त्यानें कर्नूल येथें बादशाही फौजेशीं सामना दिला. विशेष आयास न करितां नादीरशहाला विजय प्राप्त झाला. कारण निजामानें या लढाईंत मुळींच भाग घेतला नाहीं. खानडौराननें मात्र लढण्याची शिकस्त केली. त्याचे तीन मुलगे व भाऊ मुजफरखान हे लढाईंत कामीं आले, आणि तो स्वतः जबर जखमी झाला व झालेल्या जखमांमुळें लढाईनंतर दोनच दिवसांनीं तो मरण पावला. या लढाईंत बादशहाचे सरासरी शंभर लहानमोठे सरदार व तीस हजार शिपाई कापले गेले. नादीरशहा जात्या अत्यंत क्रूर होता. त्याला दयामाया ठाऊक नव्हती. त्यामुळें बादशाही फाजेचा मोड झाल्यावर त्याच्या शिपायांनीं बादशाही फौजेची लांडगेतोड सुरू केली. शरण आलेल्यांना देखील जीवदान मिळालें नाहीं. बादशाही फौज नामशेष केल्याशिवाय विजयाचा पूर्ण फायदा आपल्याला या परक्या देशांत घेतां येणार नाहीं, ही गोष्ट नादीरशहा जाणून असल्यामुळें त्यानें खाटिकगिरीची शर्थ केली.

लढाईनंतर तहाची वाटाघाट सुरू झाली. तेव्हां पन्नास लाख रुपये घेऊन परत स्वदेशीं जावयाचें नादीरशहानें कबूल केलें. खानडौरान फारसा पराक्रमी नसला तरी अत्यंत राजनिष्ठ होता. त्यानें मरतांना मोंगल बादशहाला सांगितलें कीं, 'या राक्षसाला दिल्लीस येऊं देऊं नका. त्याची तृष्णा अनिवार आहे. तो तेथें आल्यास दिल्ली खाऊन फस्त करील. त्याची वाटेल तशी समजूत करून त्याला येथूनच परत लावा.' खानडौरानच्या या अखेरच्या उपदेशाप्रमाणें बादशहानें नादीरशहाला मोठेपणा देऊन त्याच्या सर्व अटी मान्य केल्या. परंतु खानडौरान मेल्यावर त्याची

बक्षीगिरी बादशहानें निजामला दिली. त्यामुळें निजाम व सादतखान यांचें वांकडें पडलें. कारण बक्षीगिरीवर सादतखानाचा डोळा होता. त्याची आशा विफल झाल्यामुळें त्यानें नादीरशहाकडे चुगली खाल्ली, व तहाच्या अटी धुडकावून देऊन दिल्लीवर कुच करण्याची त्यास सल्ला दिली. दिल्लीवर चालून गेलें तर पन्नास लाखांच्या ऐवजीं पन्नास कोटींचा ऐवज पदरांत पडेल, अशी सादतखानानें त्याला लालुच दाखविली. आपल्या यत्किंचित् होणाऱ्या काल्पनिक फायद्याकरितां बादशाहीवर अंगार ठेवणाऱ्या या नराधमाला काय म्हणावें ?

नादीरशहानें बादशहाला व निजामाला आपल्या भेटीस बोलावलें. तहाची सविस्तर वाटाघाट करावयाची असेल या भोळ्याभावानें ते दोघेही नादीरशहाच्या छावणींत गेले. नादीरशहानें विश्वासघात करून त्यांना पकडलें व झालेला तह उधळून लावला. महंमदशहाचा जनानखाना, वजीर कमरुद्दीनखान व इतर महत्वाचे सरदार यांना त्यानें पकडून आपल्या छावणींत ओलीस म्हणून अटकेंत ठेवलें व इतर सरदारांना आणि फौजेला पाहिजे तिकडे जाण्यास सदर परवानगी दिली. बादशहाचे याप्रमाणें पंख कापून टाकल्यानंतर, त्यानें सादतखानास बरोबर वाटाड्या म्हणून देऊन, आपल्या एका प्रमुख सरदारास दिल्लीचा कबजा घेण्यास पाठविलें. दिल्ली नादीरशहाच्या सरदारांच्या हवालीं निमूटपणें करण्याबद्दल तेथील अधिकाऱ्यांना त्यानें महंमदशहाकडून एक स्वदस्तुरचें आज्ञापत्र लिहविलें, व तें आपल्या सरदाराबरोबर पाठविलें. २७ फेब्रुवारीस दिल्लीचा कबजा नादीरशहाकडे आला. पेशव्यांचा वकील बाबूराव मल्हार बर्वे हा त्यावेळीं कर्नूल येथें महंमदशहाच्या छावणींत होता. छावणीची पांगापांग झाल्यावर तो जयपुरास गेला. तेथून त्यानें लिहिलेलें पत्र खालीं दिलें आहे:—

१६६० फाल्गुन शु० ९

" राजश्री शामजीपंत मामा स्वामीचे से॥

सेवक बाबूराव मल्हार साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल ता॥ फाल्गुन शुद्ध नवमी बुधवार मुकाम जयपूर यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहिणें. विशेष आम्हीं दिल्लीहून पादशाहासमागमें तोहमासकुलीच्या लढाईस गेलों होतों. त्यास दिल्लीहून साठ सत्तर कोसावर त्याची यांची गांठ पडली, हें वर्तमान पूर्वी तुम्हांस लिहिलें आहे. अलीकडील वर्तमान महमदशाहाची फौज तोफखानियाचा आसरा धरून मोर्चे बांधून बसली. तोहमासाचे कजलबास येऊन गोटाभोंवतें रोज माणसें मारिताती. सादतखान वीस हजार फौजेनसीं आला. दुसरे दिवशीं

पातशाहाची मुलाजमत केली तों कजलबासांनीं बुनगियांवर घातलें, हें वर्तमान ऐकोन सादतखान त्यांचे फौजेवर चालोन गेला. मागाहून अमीरही तयार होऊन गेले. युद्ध मोठें जालें. सादतखानास कजलबासानें धरून नेलें. अमीरुलउमराव जखमी होऊन रणांत पडले. यादगारखान, मुसफरखान वगैरे पांच अमीर मारले गेले. दाहा बारा हजार फौज मारिली. कोण्ही कोण्ही पळून गेले. याप्रकारें पूर्वी जालें. त्याउपर, अमीररुलउमराव डेरियास येऊन येका दो रोजा मृत्यु पावले. तदनंतर या फौजेचा इस्तकहाल राहिला नाहीं. तेव्हां नबाब असफजानीं सलूक आरंभिला. सैद लष्करखानास तोहमासाकडे पाठविलें, आणि आपण जाऊन भेटून आले. दुसरे दिवशीं पातशाहास नेऊन भेटून आले. त्याऊपर कमर्दीखान, गाजदीखान, असफजा मेजवानी खावयास गेले. मेजवानी खाऊन आले. तोहमासकुली याचे डेरियास यावे हा करार जाला. तो आठ पांच रोज गुदरले, तों यांच्या लष्करांत अन्न न मिळें ऐसें जालें. सा सात रुपयीं शेर अन्न न मिळे ! वैरण तों किमपि न मिळे. पांच पांच उपोषणें लोकांस झालीं. तेव्हां आसफजास तोहमासानें बोलाविलें. ते व सैदलष्करखान व हपीजुद्दीखान व गाजदीखान व सैदमहमदखान ऐसे गेले. ते दोन रोजपर्यंत फिरोन न आले. तिसरे दिवशीं पातशाहास बोलाविलें. हे गेले, ते लष्करासमीप जाऊन राहिले. त्यांचे दर्शनास कोण्ही न आलें. रात्रौ पातशाहाजवळ आसफजा व सादतखान मात्र आले. त्याउपर पातशाहा तोहमासाच्या डेरियास जाऊन आलियावर पातशाहाभोंवतीं चौकी बसविली. असफ व गाजदीखान वगैरे अमीर कैद केले. प्रातःकाळीं तोहमासाकडील लोक येऊन शाहाजादा नेला. तोफखाना लेऊन नेला. कमरदीखानास धरून नेले. तोंपर्यंत रविवारी चतुर्दशीस तिसरा प्रहरपर्यंत लष्करांत आम्हीं होतों. हें नजरेनें पाहून, मग छातीचा कोट करून लष्करांतून हत्ती, उंटें, माणसें वस्तभाव कुलसुद्धां निघालों. उंटे, हत्ती, पायीचीं माणसें रस्तियास लावून, आम्ही वाट टाकून रानांत निघालों. एक रात्र रानांत होतों. दुसरे दिवशीं चाळीस कोसांची मजल करून दिल्लीच्या रस्त्यास मिळालों, सादतखान कजलबासांची फौज घेऊन दिल्लीस आला. त्याचे पाठीमागें दिल्लीस तिसरे दिवशीं पावलों. तेच दिवशीं दिल्लीहून ती कोसांवर महमदखानाचे सराईस येऊन राहिलों. चौथे रोजीं पळवलास आलों. पांचवे रोजीं सुरजमल्ल जाट याची भेटी घेऊन मुकामास आलों. त्या उपर जयपुरास मंगळवारी फाल्गुन शुद्ध अष्टमीस पावलों. तेथे धोंडोपंत होते त्यांची भेटी जाली. उंटे हत्तीहि दिल्लीस येऊन पुढें रेवाडीवरून आली. एका दो रोजीं जयनगरास दाखल होतील. ईश्वरानें

मोठें संकट टाळून अब्रूनें बाहेर काढलें. तुम्ही खबर ऐकोन हैराण व्हाल, यास्तव मुजरद कासीदा बरोबर पाठविले आहे. चकतियाची पातशाही बुडाली ! इराणी जाली ! याउपर बरी गोष्ट आहे ऐसें नाहीं.

पौ फाल्गून वद्य अमावास्या शके १६६० कालयुक्त नाम संवत्सरे सन हजार ११४८ छ २८ जिल्हेज सु॥ तिसा सलासीन मया व अलफ."

नंतर दोघे बादशाहा कर्नूलहून निघून ७ मार्च रोजीं दिल्लीस येऊन पोहोचलें. तेथील सालीमार बागेंत या दोघाही बादशहांनी मुक्काम ठोकला. सादतखान सारखा नादीरशहाच्या तैनातींत असे. त्याला पहिल्याच दिवशीं नादीरशहानें 'वीस कोटी रुपयांची भरपाई तावडतोब करून दे, नाही तर तुझा शिरच्छेद करीन,' अशी जरब दिली. तेव्हां भीतीनें त्या विश्वासघातक्यानें विष खाऊन आत्महत्या केली. १० मार्च रोजीं नादीरशहानें दिल्लीस बादशाहीपद स्वतः धारण केलें व सर्वत्र आपल्या नांवाची द्वाही फिरविली. यानंतर त्यानें दिल्लीस जे अनन्वित प्रकार केले त्यांचें सविस्तर वर्णन करणें अशक्य आहे. एकदां त्याच्या शिपायांचे व दिल्लींतील नागरिकांचें रस्त्यांत भांडण जुंपलें. या निमित्तानें त्यानें दिल्लींतील रहिवाशांची सरसकट कत्तल करून त्यांच्या मुंडक्यांचे ढीग आपल्या तंबूसमोर रचविले. कत्तलीबरोबरच लूट व जाळपोळ यांची कमाल करण्यांत आली. मोठमोठ्या सरदारांचा छळ करण्यांत आला व त्यांची अब्रू घेऊन त्यांना नागविण्यांत आलें. खुद्द वजीर कमरुद्दीनखान याला उन्हांत सारखे उभें करून, त्याच्याकडून एक कोट रुपये नक्त, शिवाय हत्ती व जवाहीर उकळण्यांत आले. सुप्रसिद्ध मयूरासन, कोहिनूर व दिल्लीपतीचें इतर जडजवाहीर, व दिल्लींत पांचसहाशें वर्षांच्या मुसलमानी राजवटींत हिंदुस्थानांतील ठिकठिकाणची एकत्रित झालेली सर्व संपत्ती नादीरशहानें लुटून इराणांत नेली. त्या वेळची किंमत धरली तर निदान शंभर कोटींची लूट नादीरशहानें या देशांतून नेली. आजच्या मोलानें तिची किंमत कितीतरी पट अधिक भरेल. वित्तहानीबरोबरच प्राणहानीदेखील भयंकर प्रमाणांत झाली. दिल्ली इंद्रपुरी होती ती कंगालपुरी बनली. या अत्याचारांचा उल्लेख पुढील पत्रांत आहे, तो पहावा.

श्री शके १६६१ चैत्र शु. २

"राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री अंताजी नारायण स्वामी गोसावी यांसिः—

पोष्य बाजीराऊ बल्लाळ प्रधान नमस्कार विनंति. उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष. सांप्रत तुम्हांकडून पत्र येऊन वर्तमान कळत

नाहीं तरी सविस्तर लिहीत जाणें. येथील वर्तमान तर ब्ऱ्हाणपुरानजीक मुक्काम आहे. उत्तर प्रांतें जावयाचा विचार राहिला. दिल्लीकडील वर्तमान तर राजश्री बाबूराव मल्हार यांची व राजश्री सवाई जैसिंगजी यांचीं पत्रें–छ–२५ जिल्हेजचीं पत्रें—जैनगरचीं आलीं. त्यांत वर्तमान हेंच कीं नादरशाहा तक्तीं बैसले. महमदशाह व निजामन्मुल्लूक व कमरुद्दीनखान व गाजुदीखान तमाम अमीर व मुत्सद्दी कैदेंत आहेत. नादरशाहानें पातशाही खजाना व अमीरांचा खजाना, मिळोन एक अर्बुज जमा केला. आणखी शहरांत खणती लावून पैसा जमा करीतच आहेत. धनाचा व बिशादीचा सुमार नाहीं. निजामन्मुल्लुक व कमरुद्दीनखान यांची दौलत, कुल, हत्ती, घोडे, पैका जप्त केला. स्त्रिया होत्या त्यापैं॥ एक दोन ज्यांच्या त्यांस दिल्या. वरकड घेऊन कजलबासास दिल्या. वरकड शहरांत कल्पांत जाला असे. पन्नास हजार माणूस कजलबाशांनीं जिवें मारिलें. आड विहिरी भरून निघाल्या व कजलबासहि मारले गेले. कितेक दिल्लींतील हवेलिया जाळून खाक केल्या; कितेक जळत आहेत, कितेक लुटल्या, कितेक लुटीत आहेत. कोण्हाचे हवेलींत कोण्ही जाऊं पावत नाहीं. नादरशाहा कोटांत आहे. कजलबास कुल शहर लुटीत आहेत. महर्गता मोठी जाली आहे. दिल्लींतील माणसें बाहेर जाऊं पावत नाहींत; बाहेरील आंत जाऊं पावत नाहींत; तमाम रहदारी बंद जाली आहे. ज्या गोष्टी कधीं ऐकिल्या नाहींत; त्या गोष्टी कजलबाशांनीं दिल्लींत केल्या आहेत. मोठा उल्कापात जाला आहे. दिल्लीचा बंदोबस्त जाला नाहीं. सादतखान मृत्यु पावलियावरी दिल्लींत इतका प्रसंग जाला आहे. ईश्वरानें विचित्र करणी केली आहे. दिल्लीचा बंदोबस्त जालियावरी नादरशाहा अजमेरीच्या पिराच्या दर्शनास येणार आहेत. यास्तव सवाईजींनीं आपले व लोकांचे कबिलें उदेपुरास पाठवून सडे जाले आहेत. कदाजित् नादरशाह अजमेरीस आलें तर त्याच्यानें झुजावत नाहीं. उदेपुरास जातील. इकडील दक्षणेच्या फौजा मातबर जातील तेव्हां नादरशहासी प्रसंग पडेल ! तुम्हांस वर्तमान कळावें यास्तव लिहिले आहे. तुम्हांस पूर्वी कितेक लिहिलें आहे त्याप्रमाणें वर्तणूक करणें. लोभ असो दीजे हे विनंति. ”

मोंगल बादशहांनीं या वेळीं रजपूत व मराठ्यांशीं सख्य जोडून त्यांना आपल्या मदतीसाठीं बोलावलें असतें, तर नादीरशहाचें हें प्राणघातकी अरिष्ट टाळतां आलें असतें, व हिंदुस्थानची आब राहिली असती. परंतु निजाम व सादतखान यांच्या मनांतून नादीरशाहाच्या सहाय्यानें रजपूत व मराठे यांना चेंचावयाचे होते. ते कट्टे इस्लामी वृत्तीचे होते. एकटा खानडौरान

काय तो राष्ट्रीय वृत्तीचा मुसलमान व बादशाहीचा राजनिष्ठ सेवक होता. त्यानें पडतें घेऊन रजपूत राजांची मदत मागितली. "पातशहांनीं व खानडौरांनी राजेंद्रास (जसासिंगास) बोलाविलें तेव्हां हे अवघे राजे (रजपूत) गेले नाहींत," असें व्यंकाजीरामानें बाजीरावास लिहून पाठविलें. नादीरशहाला जय मिळून त्याची फत्ते झाली याबद्दल जयसिंगाला मनांतून आनंद झाला व नादीरशहाला त्यानें अभिनंदनपर पत्रदेखील पाठविलें. पूर्वींच्या आठवणींनीं जयसिंगास व इतर रजपूत राजांस मोंगल बादशाहीची इतकी चीड आली होती. इकडे जयसिंग बाजीरावला सारखीं पत्रावर पत्रें पाठवून त्याला दिल्लीस बोलावीत होता. पेशव्यांचा दुसरा वकील धोंडो गोविंद मार्च १७३९ त लिहितो, 'आतां नवी सृष्टि जाहली. तहमास्पकुलीस (नादीरशहास) निजामाचें नामर्दीनें मोठें यश आलें. आतां राहिले राजे (रजपूत). त्यांत मातबर सवाईजी (जयसिंग.) त्यांचा विचार स्वामीस विदित आहेच. त्यांनीं तहमास्पकुलीस मुबारकीची अर्जदास्त लिहिली. आपले सलुखाचे विचारांत आहे. इकडे स्वामीसही बोलाविताती. जैसे बनेल तैसा प्रसंग संपादून घेतील. स्वामीचा प्रताप सर्वांस विदित आहे. स्वामीस माळव्यांत यावे हे मसलती निमित्य मोहरा प्रथम माळवा आहे. यावें अशी मसलत आहे. न यावें हेंही मसलत आहे. यावे तेव्हां बहुत खबरदारीनें मातबर फौजेनें यावे. **तहमास्पकुली कांहीं देव नाहीं, जे पृथ्वीस कापून काढील.** तोही शाहणा आहे. जबरदस्तांशी सलूख करील.'

बाजीरावच्या वकिलांचीं कारस्थानें यावरून उत्तम रीतीनें व्यक्त होतात. पेशव्यांच्या पराक्रमाबद्दल त्यांना किती खात्री होती व यश पदरीं पडेल याबद्दल त्यांचें मन किती निश्चित होतें, हें या बाणेदार पत्रावरून दिसून येतें. या घडामोडींचा फायदा घेऊन बाजीरावाच्या मदतीनें साधल्यास दिल्लीचे तक्तावर स्वतः बसावें, असा जयसिंगाचा मनांतून उद्देश असावा. 'आतां सारे रजपूत व स्वामी एका जागां जालिया कांहीं निकाल पडेल. समस्तांस, बुंदेल वगैरे एका जागां करून मोठा भाव दाखविला पाहिजे. फलदाता श्री आहे'. 'राजाधिराज स्वामीचा मार्ग लक्षीत आहेत.' 'रायांचे मनीं राणोजीस दिल्लींत तख्तीं बसवावें.' पेशव्यांच्या वकीलांच्या पत्रांतील या उल्लेखावरून तसें वाटूं लागतें. दोन्ही डगरींवर हात ठेवून केवळ स्वार्थ साधण्याचा जयसिंगाचा स्वभाव मात्र या पत्रांनीं चांगला उघडा पडतो.

खुद्द बादशाहा व खानडौरान मराठे-रजपुतांची मदत घेण्यास इच्छीत होते. परंतु निजाम व सादतखानांपुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. बादशहाच्या सहाय्यास जाऊन नादीरशहास हिंदुस्थानांतून हांकलून लावावयाचें, हा बाजीरावचा बेत शाहूस पसंत पडला. मराठ्यांची राष्ट्रीय वृत्ति व स्वदेशप्रेम हे सद्गुण यावरून उत्तम प्रकारें व्यक्त होतात. परकीय शत्रू हिंदुस्थानावर चाल करून आल्यास, हिंदु-मुसलमानांनीं आपलीं आपसांतील भांडणें मिटवून, परकीय शत्रूचा प्रथम पाडाव करून त्यास हांकलून दिलें पाहिजे, हें मराठ्यांचें प्रथमपासूनच राष्ट्रीय धोरण ठरलें होतें. त्यांना हिंदुपदपादशाही हवी होती, परंतु ती हिंदुस्थानची पातशाही होती. अकबराच्या बादशाहींत जसे हिंदु व मुसलमान गुण्यागोविंदानें एकत्र नांदत होते, त्याचप्रमाणें या बाजीरावाच्या हिंदुपदपादशाहींत हिंदू व मुसलमान या दोघांनाही नांदावयास स्थान होतें. हिंदुस्थानच्या कारभाराचीं मुख्य सूत्रें हिंदूंच्या हातीं कीं मुसलमानांच्या हातीं रहावीं, हाच काय तो दोघांमधील विरोधाचा प्रश्न. मराठ्या-प्रमाणेंच खानडौरान व बादशहा हे राष्ट्रीय वृत्तीचे मुसलमान होते. निजाम व सादतखान यांची वृत्ति कट्टर इस्लामी होती. हिंदूंच्या हातीं हिंदुस्थानचीं सूत्रें जाण्यापेक्षां ती परकीय नादीरशहाच्या हातीं गेली, तरी त्यांना त्यांत विषाद वाटत नव्हता. त्यांचा डाव शेवटीं त्यांच्या अंगलट कसा आला याचें वर्णन पेशव्यांच्या वकीलानें मोठ्या मार्मिकपणें एका पत्रांत केलें आहे. 'सांपडले ते (हेर) धरून आणिले. सवाईजीनें पुशिलें कीं तुम्ही कोणाचे चाकर आहांत ? त्यांनीं सांगितलें कीं निजामाचे बातमीचाकर आहों. तेव्हां कित्येक मारिले, कित्येकांचे नाककान कापून सोडिले. त्यावरून दिसून येते जे, सर्व खेळ निजामाचे आहेत; निजामाचा जर फितूर आहे तर नादीरशहा माघारा जात नाहीं, हिंदु राज्यावर निघेल. निजा-मानें सादतखानानें मिळून नादीरशहा खानडौरास मारावयास आणिला. येथील आबालवृद्ध विश्वतोमुखी खानडौरास धन्य धन्य म्हणताती. खानडौरा मरतांच महंमदशहा आणून भेटविला. सादतखान द्वाही फिरविण्यास दिल्लीस गेले परंतु कपट सिद्धीस जात नाहीं. सादतखान तर खानेजंगीत जखमी होऊन दुसरे दिवशीं मृत्यू पावले. निजाम वांचले, पण मृत्यूहून विशेष झालें. खेचरावर बसून दरबा-रास जावें दक्षिणेंत अंमल उठला. स्वामींसच यश आलें. आतां राणोजीस विप-त्तीनें मरणही पावेल.'

भोपाळच्या स्वारीनंतर १७३८ सालच्या जुलै महिन्यांत बाजीराव पुण्यास आला. त्यावेळीं दक्षिणेंत वसईवरील मोहिमेची जोरानें तयारी चालली होती. पोर्तुगीज

लोकांचा कायमचा सोक्षमोक्ष लावावयाचा निश्चय चिमाजीनें या प्रसंगीं केला होता. फिरंग्यांची तयारी मोठी व त्यांचा तोफखाना अचूक आणि पल्लेदार असल्यामुळें, या मोहिमेसाठीं सर्व मराठी फौजा एकत्र झाल्या होत्या. बाजीराव व चिमाजी या तयारींत गुंतले असतांना नादीरशहाचें परचक्र हिंदुस्थानावर वेगानें धांवून आलें. मराठ्यांची दृष्टि राष्ट्रीय स्वरूपाची असल्यामुळें, फिरंग्यांवरील पूर्णपणें शिजलेली स्वारी देखील जरूर पडल्यास अर्धवट टाकून, उत्तरेस जाण्याचा बाजीरावचा बेत कायम ठरला, शाहूमहाराजांची त्यास अनुमति मिळाली व नादीरशहास हिंदुस्थानांतून हांकलून देण्याचें ठरलें. बाजीराव या वेळीं दक्षिणेंत असला, तरी त्यानें उत्तरेकडे कसा आपला उत्तम बंदोबस्त ठेवला होता, हें त्याला वेळोवेळीं त्याच्या वकिलाकडून आलेल्या मार्मिक व खुलासेवार पत्रावरून स्पष्ट दिसून येतें. बाजीरावाच्या तलवारीप्रमाणेंच त्याची बुद्धि अत्यंत व्यापक, तीक्ष्ण व दूरवर पोहोंचणारी होती. नादीरशहा दिल्लीस प्रत्यहीं काय करीत आहे, याची खडानखडा हकिकत बाजीरावला कळत होती.

"छः २० रोजः—निजामन्मुल्क यास पुत्र जाला. घरच्या मुत्सद्यांनीं घरांतच नजर गुजरानली. नौबत वाजविली नाहीं.

"छः—२१ रोज बुधवारः—निजामन्मुल्कांनीं पादशाहास अर्ज केला कीं 'गनीम मराठे नर्मदा उतरून माळव्यांत फौज आली. तुम्ही म्हणाल कीं आपणास खबर न केली.' त्यावरी त्याणीं उत्तर दिल्हें कीं "तुमचा लेक त्यांचा हरोल आहे." त्याउपरी निजामांनीं अर्ज केला कीं 'त्यांचे कैदेंत आहे. त्यानें पुढें घालून आणिलें असेल. तर आपणास दखल नाहीं.' मग त्याउपरी त्याणीं आज्ञा केली कीं 'मराठ्यांसीं सल्लख करा.' त्या उपरी त्याणीं उत्तर दिल्हे कीं 'पादशाहा गेल्याखेरीज होत नाहीं.'

चंद्र २३ रोज. शहरांत खबर आहे कीं नादरशहानें महजर बमोर्तब तयार केले कीं 'आपल्या वतनांतून दिल्लीची पातशाही घ्यावयासाठीं खंदारास आलों. खंदार घेतलें. तेथून पातशहास एलची महमदशाहास पाठविली. त्यानीं जबाब न पाठविला. तेथून काबुलास आलों. किल्लेदारास धरून कैद केलें. आणि पठाण खोऱ्यांत होते त्यांसी युद्ध करून पेशावरास आलों. नासरखान काबूलचा सुभा राहात होता. त्यास धरलें. त्याउपरी लाहुरास आलों. जकीरियाखान लाहुरचा सुभा त्यास धरिलें. तेथून महमदशाहासीं युद्ध प्रसंग होऊन, पादशाहास कैद

केलें. दिल्लीची पादशाही घेतली. त्यावर येथील रयतेनें हरामजादी केली. तेव्हां +++ लाख सात हजार माणूस मारले गेले. त्यास आपण सर्वत्रास सज्या दिल्हा. पुढें पादशाही महमदशाहास देऊन आपल्या मुलकास जावें. आपल्या आज्ञत राहावें ' इतकें बोलिला; तें महजरांत लेहून महमदशाहाचीं वगैरे त्याच्या अमीराची मोहर करविली.

चंद्र २५ रोजः—नादरशाहा बोलिले कीं " आपण इलायतेस जाऊं. बलख व बुखारा व कासगर व काबूल व लाहोर व हिंदुस्थान आपले समशेरीच्या कुवतेनें घेतलें. परंतु भाइ मिरजा महंमदशाहा यांनीं, बहुत आपणांस रजावंद राखिलें. त्यास त्यापासून आपण कांहीं घ्यावें ऐसें नाहीं. हा तख्ताचा खावंद आहे. आम्हीं महंमदशाहास ऐसें लेखतो कीं मीरतैमूर याचे जागां लेखतों. संपूर्ण मुल्क जो घेतला आहे तो लेखीं करून सरंजाम करितों. आतां भाइ मिरजा महमदशाहा तख्तावरी कायम करून विलायतेस जातों. " तयारी कुचाची आहे.

चंद्र २६ रोजः—हुकूम जाला कीं " शहरांत धांडोरा पिटणें. एक प्रहर चार घडी दिवस आलियावरी अवघें माणूस जितके शहरांत आहे, तितके बाहेर निघेत " त्यावरून कळतें कीं खजाना शहरांतून लष्करांत जातो.

चंद्र २७ रोजः—शहरच्या माणसास धांडोरा पिटून ताकीद जाली होती; त्यास आणून खजानाचीं ओझीं त्यांच्या डोईवर देऊन सालेमार बाग आहे तेथें घेऊन गेलें. खबर आहे की चंद्र २९ जिल्हेजीं अगर पहिले मोहरमीं कुच होईल. परंतु इतबार येत नाहीं. "

नादीरशहाचा दिल्लीस मुक्काम असतांना त्याच्या तेथील मुक्कामाच्या दिनचर्येची सविस्तर हकीकत, बाजीरावच्या विश्वासू हस्तकांनीं त्यास लिहून पाठविली, ती वर दिली आहे. भोपाळच्या लढाईमुळें उत्तरेकडील राजकारणांत बाजीरावाला केवढें महत्व आलें, व मिळालेल्या संधीचा त्यानें व त्याच्या वकिलांनीं कसा फायदा करून घेतला, हें दर्शविणारा पत्रव्यवहार विपुल आहे. एका काळीं डोंगरी उंदीर म्हणून तुच्छ लेखले गेलेले मराठे, केवळ आपल्या धडाडीनें दिल्लीचीं सूत्रें हालवूं लागले व बादशाही त्यांच्या मुठींत मावली. बादशाहीवर पुढें महादजी शिंद्यामार्फत जी मराठ्यांची सत्ता दृढ झाली, तिचा आरंभ बाजीरावानें १७३८ सालीं दिल्लीची रपेट मारून व भोपाळची लढाई जिंकून, आपल्या कारकीर्दींत केला. त्यानें मारलेल्या या शकुनवंती गांठीनें पुढचें राजकारण सुलभ केलें. त्यानें उत्तरेस नेमलेले वकील खऱ्या मराठी बाण्यानें आपलें कर्तव्य चोख बजावीत होते.

मराठा हा कुठें राहो, असे त्या हिंद आनंद
मराठ्यांना कुठें ठेवा, मराठीचाच त्या छंद ॥
मराठा हा कुठें राहो, शिवाजी मानतो राणा
भवानी लेखतो देवी, धडाडी दाखवी बाणा ॥
मराठा हा कुठें राहो, स्वदेशीं गुंतले डोळे
जसा देहीं तसा चित्तीं स्वधर्मी रंगुनी बोले ॥

हा मराठ्यांचा ध्येयवादी मंत्र या वकीलांनीं मोंगलाईंत राहूनही अक्षरशः पाळला.

बाजीरावचे वकील केवळ कलमबहाद्दर नसून पदरीं थोडीफार फौज बाळगणारे तलवारबहाद्दरही होते. थोडें तरी लष्करी सामर्थ्य मागें पाठीशीं असल्याशिवाय कोणत्याही लेखणीचा त्यावेळीं राजकारणावर प्रभाव पडण्यासारखा नव्हता.

बाजीरावनें उत्तर हिंदुस्थानांत लौकर यावें म्हणून त्याच्या वकिलांनीं सारखी निकड लावली होती. परंतु नादीरशहाचें प्रस्त कांहीं सामान्य नव्हतें. बरोबर मोठी फौज घेतल्याशिवाय वर जाणें,म्हणजे अपयश मुद्दाम अंगावर ओढून घेण्यासारखें होतें. शिवाय निजामाच्या देशद्रोही मसलतीमुळें नादीरशहा दक्षिणेंत मराठ्यांवर चालून येणार अशी बातमी उठली होती. प्राप्त होणाऱ्या या घोर संकटापासून दक्षिणेंतील स्वराज्याच्या बचावाची तरतूद करणें, हें बाजीरावचें आद्य कर्तव्यच होतें. त्यामुळें त्याचा पाय लौकर पुण्याबाहेर पडेना. शिवाय सर्व मराठी फौज त्यावेळीं वसईच्या मोहिमेंत गुंतली असून वसईचा वेढा ऐनरंगांत आला होता. वसई काबीज झाल्याखेरीज तेथील फौज हलविणें शक्य नव्हतें. परंतु नादीरशहानें दिल्लींत चालविलेल्या अनन्वित अत्याचारांच्या हकिकती ऐकून बाजीरावाचें मन संतापानें भडकलें, व वसईची मोहीम सर्वस्वी चिमाजी आपावर सोंपवून, हातीं सांपडली तेवढी फौज घेऊनच, बाजीराव मोठ्या हिंमतीनें उत्तरेकडे चाल करून गेला. प्रसंग अत्यंत कठीण होता. नादीरशहा प्रथम अजमीरास पिराच्या दर्शनास येऊन नंतर, तेथून दक्षिणेवर स्वारी करून मराठेशाही बुडविणार अशा बातम्या दक्षिणेंत आल्या होत्या. परंतु बाजीरावला भीति हा शब्द ठाऊक नव्हता. त्याच्याजवळ त्यावेळीं मोठी फौज नसली तरी त्याचें धैर्य अचाट होतें. आपल्या पराक्रमावर व रणकौशल्यावर त्याचा पूर्ण भरंवसा होता. नादीरशहाच्या पराक्रमाचीं व क्रूरतेचीं वर्णनें वाचून त्याचें चित्त प्रजेच्या दुःखानें दुःखित झालें असलें, तरी तें तितकेंच किंबहुना त्याहून अधिक संतप्त झालें होतें. केलेल्या अत्याचारांचा केव्हां एकदां नादीरशहावर सूड उगवूं

व मराठ्यांच्या तरवारीचें पाणी त्याला चाखवूं, अशी उत्कंठा बाजीरावला लागली होती. तो दरकूच दरमजल करीत बऱ्हाणपुराजवळ येऊन थडकला. जैनाबाद येथें २२ मे १७३९ रोजीं उत्तरेकडील जासूद बाजीरावास भेटले व नादीरशहा परत इराणला तांतडीनें निघून गेल्याची बातमी त्यांनीं कळविली. नादीरशहानें इराणास परत जाण्यापूर्वी शाहू, बाजीराव, जैसिंग व इतर हिंदू राजांस धमकीचीं पत्रें पाठविलीं कीं, 'महंमदशहास आम्हीं तख्तावर स्थापिलें आहे. आम्ही त्यास आपला भाऊ समजतों. इतःपर सर्वांनीं त्यांची आज्ञा पाळावी. न पाळल्यास आम्ही पुनः येऊन सर्वांचें पारिपत्य करूं.' हीं पत्रें पाठविण्याची सल्ला त्याला बहुधा निजामानें दिली असावी. परंतु महमदशहाला पदच्युत करून व स्वतः त्याच्या जागीं आपण तख्तावर बसून, सर्वत्र आपल्या नांवाची द्वाही फिरविणारा बादशहा नादीरशहा एकाएकीं दिल्ली सोडून कां गेला, हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. त्याचा पहिला बेत तर निराळा होता. हिंदुस्थानांत एकदां कोणत्या तरी निमित्तानें पाऊल टाकल्यावर येथचा मोह कोणाला आजपर्यंत सुटला आहे ? मग या नियमाला नादीरशहा तेवढा अपवाद ठरून इतक्या तांतडीनें स्वदेशीं परत कां गेला ? मराठ्यांनीं आरंभलेल्या हिंदूंच्या एकीला तर तो भ्याला नाहीं ?

नादीरशहा व बाजीराव यांचा अखेरीस समोरासमोर सामना झाला नाहीं. परंतु बाजीरावनें आपल्या वकिलांच्या मार्फत सर्व हिंदु राजांची व राष्ट्रीय वृत्तीच्या मुसलमानांची एकी घडवून आणून, उत्तरेकडील राजकारण कसें खेळविलें, हें आपणास त्या वेळच्या पत्रव्यवहारावरून कळून येतें. नादीरशहा हिंदुस्थानांतून मे महिन्यांत आपल्या देशीं रवाना झाला. १ मे रोजीं त्यानें दिल्ली सोडली. त्यानें आपल्याबरोबर एक अब्ज रुपये नेले आणि सिंधू नदीच्या पश्चिमेकडील बादशाही प्रदेश आपल्या राज्यास जोडला. तो जर पुढें हिंदुस्थानांत राहिला असता, तर बाजीरावचा व त्याचा सामना अत्यंत चुरशीचा व निकराचा झाला असता यांत शंका नाहीं. हा काळदेखील बाजीरावला अत्यंत अनुकूल असाच होता. कारण १३ मे रोजीं चिमाजी आपानें वसई सर केली. त्यामुळें वसईच्या वेढ्यांत अडकलेली धनत्तर मराठी फौज व पराक्रमी सरदार बाजीरावाच्या कुमकेस उत्तरेस धांवून गेले असते.

मे महिन्यांतील मोहीम नादीरशहा वापस गेल्यामुळें व्यर्थ गेली. परंतु लढण्याचा खराखुरा शोक असलेल्या बाजीरावानें तें वर्ष सुनें जाऊं दिलें नाहीं. १२ डिसेंबर रोजीं त्यानें नासिरजंगावर स्वारी केली. हंडिया व खरगोण या प्रांताची जहागीर

नासिरजंगानें बाजीरावास देण्याचें पूर्वी कबूल केलें होतें. परंतु तो आपल्या दिल्या वचनाला न जागल्यामुळें, बाजीरावला त्याच्यावर ही मोहीम करणें भाग पडलें. मुसलमान लोक अडचणींत सांपडले असतांना वाटेल त्या अटी कबूल करीत व एकदां कशी बशी संकटांतून सुटका होतांच, आपल्या वचनाला तात्काळ हरताळ फांशीत असत. भोपाळच्या लढाईंत पराभव पावल्यानंतर निजामानें कबूल केलेल्या अटी तो दिल्लीस जातांच साफ विसरला, आणि उलट त्यानें मराठ्यांच्या विरुद्ध मोठें कारस्थान रचलें. तें त्याच्या आंगलट आलें ही गोष्ट निराळी. एवढेंच कशाला, परंतु बाजीरावच्या हयातींत त्याला माळवा व गुजराथ प्रांताच्या सनदा कधींच मिळाल्या नाहींत. त्या पुढें नानासाहेबांनीं संपादन केल्या. त्या सनदा जवळ नसल्यामुळें मराठ्यांचा त्या प्रांतांतील कारभार कांहीं अडला होता, अशांतला भाग नाहीं. परंतु मुसलमानांच्या वचनभंगाचीं हीं गमतीदार उदाहरणें आहेत. नासीरजंगावर स्वारी करण्याला असेंच कारण घडून आलें.

नासिरजंगाजवळ या वेळीं चाळीस हजार फौज होती. गोदावरीनदीच्या कांठीं या दोन्ही फौजांची गांठ पडून दोन महिने एकसारखी झुंज चालली होती. बाजीरावानें नासिरजंगास थेट औरंगाबादेपर्यंत मागें रेटीत नेलें. नासिरजंग अखेरीस जेरीस आला, व त्यानें जुन्या कबुलायतीप्रमाणें हंडिया व खरगोण हे प्रांत पेशव्यांस देऊन, मुंगीपैठण मुक्कामीं २७ फेब्रुवारी १७४० रोजीं मराठ्यांशीं तह केला. ३ मार्च रोजीं त्याची व बाजीरावाची मुलाखत वरखेडे मुक्कामीं मोठ्या समारंभानें झाली. त्यानंतर आपल्या मिळालेल्या नव्या प्रांताचा कबजा घेण्याकरितां बाजीराव उत्तरेकडे निघून गेला. तह होऊन सनदा मिळाल्यानंतर देखील बाजीराव महिनोगणती उत्तरेस जाऊन कां राहतो, व तेथें काय करत असतो, हें कोडें शाहूला पडत असे. पण तहाच्या सनदांतील कलमांची व्यवहारांत अंमलबजावणी करणें महाकठिण कर्म असतें, हा अनुभव बाजीरावप्रमाणें शाहूला कोठें आला होता ? कलमांची अंमलबजावणी व्यवहारांत न केली, तर त्या सनदा कागदाच्या कपट्याप्रमाणें कवडीमोल ठरतात, हें तत्व बाजीराव पुरतेपणीं ओळखून होता; आणि म्हणूनच तो जिंकलेल्या प्रांतावर आपली सत्ता दृढ करण्याच्या उद्योगांत महिनेच्या महिने लढाईनंतर निमग्न होत असे. तें जिकिरीचें व चिकाटीचें काम करण्याचा त्याला कधीं कंटाळा आला नाहीं. कारण तो खेळाडू नसून कामसू होता.

## प्रकरण १९ वें.

# संसाराची अखेरी



बाजीरावाची बायको काशीबाई ही जोशी सावकारांच्या घराण्यांतील होती. त्या वेळच्या चालीरीतीप्रमाणें बाजीरावचें लग्न जरा उशीराच, म्हणजे त्याच्या वयाच्या तेराव्या चौदाव्या वर्षी झालें. कारण त्याचे वडील बाळाजीपंत हे सारखे राजकारणांत व युद्धाच्या धुमश्चक्रींत गुंतले असल्यामुळें संसाराकडे लक्ष देण्यास त्यांना वेळ मिळत नसे. त्या वेळीं मुलींच्या लग्नाची मर्यादा सरासरी ४ ते ८ व मुलांच्या लग्नाची वयोमर्यादा १० ते १२ होती. ही मर्यादा अर्थातच ब्राम्हणासारख्या पुढारलेल्या कुटुंबांत पाळली जात होती. इतर जातींत पुष्कळ वेळां पाळण्यांतच लग्न लावण्यांत येत असत. चिमाजी आपाच्या मुलीचें लग्न तर ती ४॥ वर्षांची असतांनाच लागलें.

बाजीरावाला चार मुलें झालीं. बाळाजी ऊर्फ नानासाहेब, रामचंद्र, रघुनाथ व जनार्दन, हे बाजीरावचे चार पुत्र होत. नानासाहेब व रघुनाथराव हे दोघेच पुढें प्रख्यातीस आले. नानासाहेबांचा जन्म नाणेमावळांत साते येथें ६ डिसेंबर १७२१ रोजीं झाला. रघुनाथरावांचा जन्म माहुलीस १ आगष्ट १७३४ रोजीं झाला. म्हणजे या दोघां बंधूंत जवळ जवळ तेरा वर्षांचें अंतर होतें. रघुनाथाची मुंज बाजीरावच्या हयातींतच, पण नानासाहेबानें १९ जानेवारी १७४० रोजीं लावली. कारण बाजीराव तेव्हां स्वारींत गुंतला होता. नानासाहेबांचें लग्न १७३० सालीं म्हणजे ते ९ वर्षांचे असतांच भिकाजी नाईक रास्ते यांची कन्या गोपिकाबाई हिच्याशीं झालें. चिमाजीचा मुलगा सदाशीवराव भाऊ याचें लग्न २५ जानेवारी १७४० रोजीं लागलें. रामचंद्र फार लहानपणींच वारला; जनार्दन मात्र थोडा मोठा झाल्यावर मरण पावला. भिड्यांच्या घराण्यांतील सगुणाबाईशीं त्याचें लग्न झालें होतें. तो १७४९ त मृत्यू पावला.

बाजीरावचें सर्व आयुष्य लढण्यांत गेलें, परंतु पावसाळ्यांत स्वदेशीं परत येऊन छावणी करून मुक्कामीं राहण्याचा रिवाज असल्यामुळें, त्याला संसारसुख भरपूर मिळालें. त्याची पत्नी काशीबाई ही पतिनिष्ठ, गरीब व शांत स्वभावाची होंती. तिला घरांत ताई म्हणत असत. १७४२ त रामेश्वरची व १७४६ त काशीची

यात्रा केल्यावर १७५८ मध्यें ती मरण पावली. तिनें पेशवाईचा अत्यंत भरभराटीचा काळ अवलोकन केला व नानासाहेबावर मातेचें कृपाछत्र जवळजवळ अखेरपर्यंत राहिलें. बाजीरावची आई अत्यंत कर्तबगार, शाहणी व कुशल होती. प्रसंग पडल्यास ती राजकारस्थानेंही तडीस नेत असे. काशीबाई साधीभोळी, नम्र व सहनशील असे. त्यामुळें तिचें बाजीरावावर फारसें वजन पडूं शकलें नाहीं. काशीबाईपेक्षां राधाबाईचेंच बाजीरावावर अधिक वजन होतें.

बाजीरावचें आणखी एक प्रेमपात्र होतें. ती जातीची मुसलमान असून तिचें नांव मस्तानी असें होतें. तिच्याशीं त्याचें प्रत्यक्ष धर्मविधीप्रमाणें लग्न झालें नसलें, तरी ती त्याच्याशीं पातिव्रत्य धर्मानेंच वागे. तिचें बाजीरावावर अत्यत प्रेम होतें. ही अत्यंत सुंदर विलासिनी होती. विडा खात असतांना तांबुलाचा लाल रंग तिच्या गळ्यांतून आंत उतरतांना दिसत असे, इतकें तिचें गोरेपण उज्वल, कातडी मृदुल व मान नाजुक होती. बाजीरावसारख्या सुंदर, वीर पुरुषाचें मन तिच्यावर बसल्यामुळें तिला आपलें आयुष्य सार्थकीं लागलें, असें वाटत असे.

तिच्याबद्दल अनेक हकीकती प्रचलित आहेत. पेशव्यांच्या बखरींत अशी हकीकत आहे कीं, निजामावर सुजायतखान नांवाचा सरदार दिल्लीहून चालून आला, त्यावेळीं निजामानें चिमाजीचें सहाय्य मागितलें, व त्याप्रमाणें निजामाशीं तहाच्या अटी ठरवून चिमाजीनें सुजायतखानावर स्वारी करून त्याला ठार मारलें. मस्तानी ही त्याची रक्षा होती. ती सुजायतखानाच्या मृत्यूनें दुःखी होऊन प्राणत्याग करूं लागली. तेव्हां चिमाजीनें तिचें रक्षण केलें व ती रक्षा आपल्या वडील बंधूला भेट म्हणून अर्पण केली. चिमाजीचा धार्मिक व नीतिपरायण स्वभाव लक्षांत घेतां ही हकीकत असंभवनीय व अशक्य वाटते. दुसरी हकीकत अशी आहे कीं, ती मूळचीं हिंदु असून निजामी राज्यांत फुसलावणीनें बाटली. तिच्या सौंदर्यानें निजामच्या जनानखान्यांत तिचा प्रवेश झाला. पुढें मुंगी शेवगांवच्या तहानंतर बाजीराव व निजामाची भेट झाली, तेव्हां त्याला संतुष्ट करण्याकरितां निजामानें आपल्या जनानखान्यांतील हें अप्रतिम रत्न अर्पण केलें व बाजीरावनें 'स्त्रीरत्न दुष्कुलादपि,' हें शास्त्रवचन जाणून तिचा स्वीकार केला. परंतु मुसलमानांचा नित्याचा स्वभाव लक्षांत घेतां व त्यांतल्या त्यांत निजामासारखा खानदानी घराण्यांतील मानी पुरुष हें स्वकुलास कमीपणा आणणारें वर्तन करील, असें मुळींच वाटत नाहीं. मुसलमान दुसऱ्याची स्त्री बळजबरीनें आपल्या जनानाखान्यांत कोंबून घालील, पण

आपली स्त्री दुसऱ्यास कदापि देणार नाहीं या दोन्ही हकीकती याप्रमाणें असंभवनीय असल्यामुळें, तिसरी बहुधा खरी असावी असें निश्चित वाटतें.

छत्रसाल राजाजवळ अनेक विलासदासी होत्या. कारण तो बुंदेलखंडी होता व जवळच्या बादशाहीचा वारा त्याच्या अंगावरून नित्य वाहत असल्यामुळें, मुसलमानांच्या विलासी जनानखान्याची छाया त्याच्यावर साहजिक पडली होती. शिवाय त्याचें वय पराक्रमापेक्षां विलासालाच अधिक अनुरूप झालें होतें. तारुण्यांत दीर्घ पराक्रमी असलेले पुरुषसिंह म्हातारपणीं बहुधा रंगेल लाल बनतात! त्या रक्षा भिन्न भिन्न जातींच्या व धर्मांच्या होत्या. त्यापैकीं एका मुसलमान राखेच्या पोटीं मस्तानी हें स्त्रीरत्न जन्मास आलें. म्हणजे एका अर्थानें ती राजा छत्रसालाची मुलगी होती. ती अनौरस असली तरी राजकन्या होती, आणि तिच्या रूपगुणांनीं तिनें आपल्या पित्याचें मत आकर्षण करून, ती त्याची लाडकी बनली होती. तिला छत्रसालानें संगीतादि कलांचें उत्तम शिक्षण दिलें होतें. बंगष छत्रसालावर चालून आला, तेव्हां ही सुंदरी तारुण्याच्या उमलत्या प्रांतांत नुक्तीच शिरली होती. तिला कोणा तरी लायक, थोर व शूर पुरुषाच्या पदरांत घालावें, याबद्दलची चिंता छत्रसालास लागली होती. तोंच बाजीरावनें त्यास मदत करून संकटमुक्त केलें. बाजीरावसारखा सौंदर्यसंपन्न व पराक्रमी पुरुष पाहतांच छत्रसालाला इतके दिवस लागलेली काळजी दूर झाली. मस्तानीनेंही बाजीरावचें रूप व वैभव प्रत्यक्ष पाहिल्यामुळें ती त्या पुरुषश्रेष्ठावर मोहित झाली. छत्रसालानें युद्धानंतर बाजीरावला आपल्या राजधानींत नेऊन त्याचा परोपरीनें गौरव केला, व त्याला आपली ही कन्या अर्पण करून त्याच्याशीं आपलें नातें जोडलें. मस्तानी अनौरस असली तरी सुशिक्षित राजकन्या असल्यामुळें तिची योग्यता व थोरवी बाजीराव जाणून होता. शिवाय, तिनें आपल्या अतुलनीय रूपगुणांनीं त्याच्यावर आपली छाप पाडली होती. त्यामुळें तिला पुत्र झाल्यास त्याला राज्याचा वांटा देण्याचें बाजीरावनें तिला वचन दिलें.

ही हकीकत बहुधा खरी असावी. अकबर बादशहानें रजपूत राजांशीं सख्य जोडलें व त्यांच्या घराण्यांतील मुली स्वीकारण्याची वहिवाट पाडली. बादशहाच्या जनानखान्यांत गेल्यावर त्या मुसलमान होत व त्यांची संततीही मुसलमान गणली जाई. परंतु जनानखान्यांत त्यांनीं वृंदावन ठेवून तुळशीची पूजा केली, किंवा ब्राम्हणाकडून कधीं मधीं पोथीपुराण वाचवून घेऊन ऐकलें, तरी अकबर बादशहाला त्याचा फारसा विधिनिषेध वाटत नसे. उलटपक्षीं, मुसलमानांशीं शरीरसंबंध करणाऱ्या या मूख व भाबड्या रजपूतरमणींना व त्यांच्या नातलगांना, बाद-

# पेशव्यांची पुढची वंशावळ

विश्वनाथ भट श्रीवर्धनकर

- मुलगी ल. बहिरवभट मेहेंदळे.
  - गणपतराव
    - बळवंतराव
      - कृष्णराव आपा
    - मुलगी ल. जनार्दन बाबा फडणीस
      - बाळाजी उ. नाना फडणीस.
- **बाळाजीपंत नाना** ल. राधाबाई ( डुबेरकर बर्वे ). ( १७१४–२० )
  - विसाजी ऊर्फ **बाजीराव.** १७२०–४० — १ काशीबाई (चासकर जोशी) | २ मस्तानी (रक्षा)
    - **नानासाहेब** १७४०–६१ — १ गोपिकाबाई (रास्ते) — २ राधाबाई ( वाखरे पैठणकर).
      - विश्वासराव ल. लक्ष्मीबाई (दिक्षित कायगांवकर)
      - **माधवराव** ल. रमाबाई (सती) जोशी मिरजकर १७६१–७२
      - **नारायणराव** ल. गंगाबाई (साठे)
        - **सवाई माधवराव** (१७७४–९५)
    - रामचंद्र
    - **रघुनाथ** — १ जानकी (बर्वे)—२ आनंदीबाई (ओक)
      - अमृतराव दत्तक चित्रकूट संस्थान
      - **बाजीराव** (पदच्युत) (१७९६–१८१८)
        - नानासाहेब (दत्तक) १८५७
        - धोंडोपंत ( द. )
          - रावसाहेब १८५७
        - बाळासाहेब ( द. ) १८५७
      - चिमाजी
    - जनादन ल. सगुणाबाई (भिडे) मृ. १७४९.
    - समशेर बहाद्दर (१७३३–६१)
      - अलीबहाद्दर उ० कृष्णसिंग (१७६१–१८०२) बांद्याचा नवाब
        - समशेर ब. १८०२–१८२३
        - झुलफिकारअली मृ. १८२३
          - अलीबहाद्दर मृ. १८७३
  - भिऊबाई ल. आबाजी नाईक बारामतीकर.
  - अंताजी उ. चिमाजी आपा. ल.
    - १ रखमाबाई (पेठे).
      - सदाशिवराव ल. १ उमाबाई.—२ पार्वतीबाई (कोल्हटकर) मृत्यु स. १७८३.
    - २ अन्नपूर्णा (सतीगेली)
      - बयाबाई ल. ओंकार
  - अनूबाई ल. व्यंकटराव घोरपडे इचलकरंजीकर.

शहाच्या या धर्मस्वातंत्र्याचें फार कौतुक वाटे व त्या आपल्याला मनांतून हिंदूच समजत असत. मुसलमानांना त्यांच्या धर्माप्रमाणें, परधर्मांतील मुली शादी करून आपल्या घरीं आणण्याची मुळींच आडकाठी नाहीं. कारण मुसलमानाशीं शादी होतांच ती आपोआप मुसलमान होत असे. इतकेंच नव्हे तर उलट मुसलमानी धर्मानें परधर्मांतील बायामुली बळजबरीनें किंवा खुषीनें आपल्या धर्मांत घेण्याविषयीं सर्वांना उत्तेजनच दिलें आहे. त्यामुळें अनेक रजपूतरमणी मुसलमानांच्या जनान्यांत दाखल झाल्या. इतर जातीच्या हिंदुस्त्रियाही मुसलमानांच्या जनानखान्यांत बेगमा बनून रहात असत.

परंतु, हिंदु धर्माचीं बंधनें अत्यंत कडक असल्यामुळें हिंदु राजांना मुसलमानधर्मी स्त्रियांशीं कायदेशीर रीत्या लग्न करतां येईना. त्यामुळें हिंदु–मुसलमानांचे लग्नसंबंध केवळ एक तर्फी घडून आले. त्यांच्यांत साटेलोटे न झाल्यामुळें, किंबहुना हीं दुतर्फी लग्नें घडून येणें हिंदु धर्मांतील कडक बंधनांमुळें अशक्य असल्यामुळें, हिंदु–मुसलमानांचा पूर्ण मिलाफ अकबराच्या इच्छेप्रमाणें कधींच घडून आला नाहीं. परंतु रजपूत राजे केवळ अकबराला संतुष्ट करण्याकरितां म्हणून, आपल्या राणीवशांत, लग्नाच्या बायका म्हणून नाहीं तरी रक्षा म्हणून कांहीं मुसलमान रमणी बाळगूं लागले. हा प्रकार केवळ बादशहाला खुष करण्याकरितांच घडत होता असें मात्र नाहीं. तें एक निमित्त होतें. परंतु खरोखर पाहूं गेलें तर, त्यांत विलासदृष्टि व शृंगारप्रियताच प्रमुख असत. बादशाही धोरण हें एक नाममात्र कारण होतें. रजपूत राजांच्या या द्विधर्मी राणीवशांमुळें (कारण मुसलमानीण नांवाची रक्षा असली तरी तिचा मानमरातब प्रत्यक्ष राणीप्रमाणेंच व तिच्या संततीचा राजपुत्राप्रमाणें, ठेवण्यांत येई.) मस्तानी ही छत्रसालाची, किंवा त्याच्या पदरच्या दुसऱ्या एखाद्या रजपूत मांडलिक संस्थानिकाची अनौरस कन्या असण्याचा फार संभव! १७२९-३० सालीं बाजीराव छत्रसालाच्या मदतीस धावला, व बंगषाचा पराभव करून पन्ना येथें छत्रसालाचा पाहुणचार घ्यावयास गेला, त्यावेळीं बहुधा मस्तानी त्याला मिळाली असावी. बाजीरावचें आयुष्य उत्तर हिंदुस्थानांतील मोहिमांत बरेंच व्यतीत झालें. दिल्लीकडील राजकारण तो खेळला होता, व आग्रा, पाटणा, दिल्ली वगैरे उत्तर प्रांतांतील समाजस्थिति त्यानें अवलोकन केली होती. त्या प्रांतांतील मुसलमानांचें संख्याबल महाराष्ट्राप्रमाणें उपेक्षणीय नाहीं, हें त्याला समजून चुकलें होतें. हिंदुस्थानांत हिंदुपदपादशाही स्थापन करण्याची त्याची महत्वाकांक्षा होती. हिंदु व मुसलमान या देशांत गोडीगुलाबीनें व खेळीमेळीनें

राहिल्याशिवाय कोणतीही सार्वभौम सत्ता या देशांत कायमची नांदू शकणार नाहीं, हें अकबराप्रमाणेंच त्याला पटलें होतें. थोर पुरुषांची दृष्टी अशीच दूरवर पोंचणारी व व्यापक असते. अकबरानें हिंदूंच्या मुली आपल्या घराण्यांत सुना म्हणून स्वीकारून मोंगल पातशाहीला बळकटी आणली. त्यामुळें मुसलमानांचे पिढयान्-पिढ्या शत्रू असलेले रजपूत, मोंगलबादशाहीचे एकनिष्ठ सेवक व आधारस्तंभ बनले. कारण बहुतेक रजपूत राजांचें कांहींना कांहीं तरी नातें मोंगल बादशाहाशीं, शहाजाद्यांशीं किंवा त्याच्या प्रमुख मुसलमान सरदारांशीं गुंतलेलें असावयाचें. अकबराला जी गोष्ट इष्ट, हितावह व राज्याला बळकटी आणणारी वाटली, ती गोष्ट बाजीरावासारख्या चतुर व दूरदृष्टि पुरुषसिंहाला पटली असल्यास त्यांत नवल नाहीं. हिंदुराजांनीं व त्यांच्या प्रमुख सरदारांनीं मुसलमान स्त्रियांशीं विवाह करून मुसलमानांचें सख्य संपादावें आणि हिंदुपदपादशाहीला बळकटी आणावी, अशी त्याची या बाबतींत दृष्टि असावी. हिंदुराजांना आपल्या मुली देण्यास तयार असलेले मुसलमान व तसले सोयरसंबंध जोडणें कमीपणाचे मानणारे मुसलमान, असें मुसलमानांतच दोन पक्षभेद झाले तर हिंदुपदपातशाही या देशांत खात्रीनें स्थिर होईल, असें त्याला वाटलें असावें. हिंदूंच्या मुलींशीं लग्न लावल्यानें मुसलमान हिंदु होत नसत. त्याप्रमाणेंच हिंदूंनीं देखील मुसलमानांच्या मुलींशीं लग्न लावून कट्टर हिंदू म्हणवून घेतलें, म्हणजे झालें. अशानें धर्म रक्षण होईल व हिंदु राज्याला बळकटी येईल. कारण, देशांतील मुसलमान प्रजाजनांना मराठी राजे, राजपुत्र, मराठे सरदार व त्यांचे वंशज आपल्याच रक्तसंबंधाचे वाटून, त्यांच्याकडे मुसलमानांचें मन ओढूं लागलें असतें. बांद्याचे मुसलमान नबाब अखेरपर्यंत पेशव्यांना चिकटून राहिले, आणि इब्राहीमखान गार्दीनें पेशव्यांच्या वतीनें आपल्या जात व धर्मभाईशीं शेवटपर्यंत निकराची झुंज घेतली, हे पुढील काळांत आलेले अनुभव लक्षांत घेतले म्हणजे अकबर व बाजीराव यांच्या कल्पना चुकीच्या नव्हत्या असा विश्वास पटूं लागतो. बाजीरावचें म्हणणें महाराष्ट्राला तेव्हां मान्य झालें असतें, तर शुद्धीचा प्रश्न फारच सुलभ रीतीनें सुटला असता, आणि अकबराच्या मुसलमानी साम्राज्यांत जसे हिंदु व मुसलमान प्रजाजन गुण्यागोविंदानें नांदत होते, त्याप्रमाणेंच पेशव्यांच्या हिंदुसाम्राज्यांत हिंदु व मुसलमान भाऊ भाऊ म्हणून नांदले असते. फार प्राचीन काळीं या देशांतपितृसावर्ण्य पद्धति रूढ होती. आई कोणत्याही जातीची असली तरी, जी बापाची जात तीच मुलांची जात समजली जाई. ती जुनी रूढी हिंदुधर्मांत पुन्हा सुरू केली, म्हणजे असले मिश्रविवाह होण्यास कोणतीच धर्माची

अडचण उरणार नाहीं! बाजीरावची विचारसरणी अशी नवीन दृष्टीची असल्या-मुळें, १७३२-३३ सालीं त्याला मस्तानीपासून समशेर नांवाचा जो मुलगा झाला, त्याची मुंज करण्याचा पुढें त्यानें हट्ट धरला. जुन्या पितृसावर्ण्याच्या पद्धति-प्रमाणें, बाजीराव ब्राह्मण असल्यामुळें त्याचा मुलगा समशेर हाही ब्राह्मणच ठरत होता. काशीबाईपासून झालेले चार पुत्र जसे ब्राह्मण, तसाच मस्तानीचा पुत्रही ब्राह्मण मानला जावा असा त्याचा हट्ट होता. बाजीरावाची विचारसरणी निदान त्याकाळीं तरी महाराष्ट्रांत पटण्यासारखी नव्हती. बाजीराव ध्येयप्रधान पुरुष होता. या देशांत हिंदुपदपातशाही स्थापण्याचा त्याचा कृत संकल्प झाला होता. दुसऱ्या जातींना व धर्मांना आपल्या स्पर्शानें, संसर्गानें व सहवासानें पावन करील, तेंच खरें ब्राह्मण्य! इतरांच्या स्पर्शानें व सहवासानें भ्रष्ट होईल तें ब्राह्मण्यच नव्हे, हें बाजीरावचें मत होतें. अकबराचा कित्ता त्याला गिरवावयाचा होता. अकबराची योजना बादशाहीला किती बळकटी आणती झाली, हें ज्ञान त्याला इतिहासाच्या मार्मिक अभ्यासानें व उत्तरहिंदुस्थानांतील प्रत्यक्ष वस्तुस्थितिदर्शनानें झालें होतें. परंतु देशांतील भटभिक्षुक व सामान्य लोक हे त्याच्याप्रमाणें ज्ञानी, अनुभवी, मह-त्वाकांक्षी व ध्येयवादी नसल्यामुळें, त्याचें म्हणणें कोणालाच रुचलें नाहीं. उलट सर्वांनीं त्याचा धिःकार केला व त्याला परोपरीनें नांवें ठेविलीं.

१७३९ सालीं समशेर सहा सात वर्षांचा असतांना हा प्रश्न वादास निघून घरां-तील भांडण विकोपास गेलें. चिमाजी व नाना त्याच्यावर संतापले आणि शाहूमहा-राजांची त्याच्यावरील मेहेरनजर कमी झाली. चिमाजी व नानांनीं मस्तानीला कैद करण्याचा घाट घातला, आणि बाजीरावची व तिची ताटातूट करण्याचा हर-प्रयत्न केला. चिमाजी धार्मिक वृत्तीचा व कडक नैतिक आचरणाचा असल्यामुळें त्याला बाजीरावचें वर्तन आवडलें नसल्यास नवल नाहीं. परंतु नानाची मजल तर बाजीरावच्या ऐवजीं आपण स्वतःच मस्तानीवर खोटें प्रेम दाखवून तिचें मन वळविण्यापर्यंत पोहोंचली! मस्तानी ही परधर्मीय असली तरी ती बाजीरावा-जवळ पत्नीव्रतानें रहात असल्यामुळें, नानाचें हें वर्तन अत्यंत गर्हणीय ठरतें. नाना-साहेबांचा व मस्तानीचा निंद्य संबंध प्रत्यक्ष घडला नाहीं हें खरें; परंतु तिचा व आपल्या बापाचा असलेला संबंध सुटावा या सद्धेतूनें देखील तिच्यावर कामुक प्रेमाची, खोटी कां होईना पांखर घालणें, हें पुत्राचें वर्तन गर्हणीय होय. आपल्या सावत्र-मातेशीं प्रेमालाप करणें, मग तें सद्धेतूनें असलें तरी इष्ट नाहीं. धार्मिक समजल्या जाणाऱ्या लोकरूढींचा पगडा मनावर बसून तें एकदां अंध झालें म्हणजे त्याचा

अधःपात कोठपर्यंत होऊं शकतो, आणि अधःपाताच्या गर्तेत पडल्यानंतरही तें समजण्याची पात्रता कशी रहात नाहीं, याचें हें उत्तम उदाहरण आहे.

घरांतील या जळफळाटानें व धुसफुशीनें त्रासूनच १७३९ च्या अखेरीस बाजीराव नासीरजंगावर चालून गेला. नासीरजंगाचा पराभव करून ७ मार्च रोजीं तो उत्तरेस नवीन जिंकलेल्या हंडिया व खरगुण या प्रांताची व्यवस्था लावण्याकरितां निघून गेला. खरगुण जिल्ह्यांत नर्मदेच्याकांठीं रावेर खेडी येथें असतांना तो तापानें आजारी पडला. ताप आला तरी नर्मदेंत पोहोंण्याचा त्याचा क्रम चालूच होता; त्याच्यासारखा शूर व आडदांड शिपाईगडी पथ्यपाणी थोडाच सांभाळत बसतो ? मरणाची भीति वाटत असेल तर मनुष्य पथ्यपाण्याच्या नादीं लागतो. सतत काम करणें व शेवट-पर्यंत चमकून तान्याप्रमाणें एकदम तुटून अस्तंगत होणें, हाच थोरांचा जीवनक्रम ! वीर अंथरुणाला खितपत पडून कधींही राहणार नाहीं. त्यामुळें ताप वाढून २८ एप्रिल १७४० रोजीं हा शूर पुरुष एकाएकीं मरण पावला. मृत्युसमयीं याचें वय केवळ ४२ वर्षांचें होतें. त्यावेळीं त्याचा धाकटा मुलगा जनार्दन व काशीबाई त्याच्याजवळ होती. बाजीरावच्या मरणानें खरोखरच अनाथ झालेली मस्तानी खऱ्या पतिव्रतेप्रमाणें सती गेली. बाजीरावच्या मृत्यूची बातमी नानासाहेबास कुलाब्यास समजली. तेथेंच त्यानें वडिलांची क्रिया केली, व २५ मे रोजीं चिमाजी आपासह तो पुण्यास येऊन दाखल झाला.

१७३९ सालच्या सप्टेंबर महिन्यापासूनच चिमाजीची प्रकृति बरीच बिघडली होती. वसईच्या वेढ्यांत झालेल्या अतिश्रमामुळें त्याला खोकल्यानें बेजार केलें, व सारखा ताप येऊं लागला. त्यानंतर कांहीं दिवस त्याला बरें वाटलें. परंतु १७४० च्या अखेरीस त्याची प्रकृति अधिकच बिघडली व १७ डिसेंबर रोजीं तो मरण पावला. त्या वेळीं त्याचें वय ३१-३२ वर्षांचें असावें. एकाच वर्षांत हे दोघेही पराक्रमी बंधु मराठेशाहीला अंतरले. सर्वच पेशवे अल्पायुषी निघाले, यामुळें मराठेशाहीचें अत्यंत नुकसान झालें यांत संशय नाहीं. आपल्या पराक्रमाचा व अनुभवाचा फायदा त्यांना फार दिवस मराठेशाहीला देतां आला नाहीं, आणि यामुळें हिंदुपदपादशाहीची दृढ पायावर उभारणी होण्यास वेळ मिळाला नाहीं. पेशव्यांच्या घराण्यांत क्षयासारखा आनुवंशिक रोग असावा अशी कल्पना कोणी बसविली आहे, परंतु ती तत्वतः फारशी खरी दिसत नाहीं. कारण बाळाजी विश्वनाथ सरासरी ६०-६२ च्या घरांत मरण पावला व शेवटचा बाजीराव तर पाऊणशेंच्या घरांत जाऊं शकला. पेशवाईचे हे आद्यंत दीर्घायुषी असल्यामुळें घराण्यांत आनुवंशिक

क्षय किंवा मेंदूचा रोग असावा हें खरें दिसत नाहीं. थोरले माधवराव पेशवे कायते क्षयानें २८ च्या घरांत वारले. बाकी नारायणरावचा खून झाला व सवाई माधवरावनें आत्महत्या केली. बाजीराव व पुढें नानासाहेब दोघेही ४० च्या घरांत मरण पावले. अतिश्रम हेंच त्यांच्या मृत्यूचें कारण असावें. पंधराव्या सोळाव्या वर्षा-पासून हे राज्यकारभार पाहूं लागले व जातीनें मोहिमा झुंजावयास जाऊं लागले. अशा तडफीनें घालविलेलें आयुष्य फार दिवस टिकणार कसें ? दोन्ही टोंकाकडून पेटविलेली मेणबत्ती फार वेळ जळूं शकत नाहीं. ती लवकर संपते. राज्यांतील भानगडी वारा-वयाच्या व लढाया मारावयाच्या, या दुहेरी पेंचांत त्यांचें आयुष्य आटलें. पराक्रम संथस्वरूपाचा असला तर तो दीर्घ काळ टिकतो. परंतु नदीला पुराचा लोंढा येतो, तसा भीमपराक्रम असला तर तो लवकर ओसरतो. प्रत्यक्ष श्रीशिवछत्रपतींचा या जगांतील कारभार पन्नाशीच्या घरांतच आटोपला. अतिश्रम हेंच असल्या महा-पराक्रमी पुरुषश्रेष्ठांच्या मृत्यूचें कारण ! ध्येय साध्य होईतोंपर्यंत ते देहाची पर्वा करीत नाहींत. बाजीरावच्या मृत्यूवरील त्रिंबक साळी या शाहीराचा पोवाडा खालीं दिला आहे:——

**"एका खडी बोला कशि गत झाली बाजीला ॥ ध्रु० ॥ कक काशिबाई गहिंवरे । खख खबर गेली पुणियारे ॥ गग गाय जशि हंबरे । घरोघरीं झाला कहार ॥ देव कोपला ॥ कशि० ॥ १**

**नाना पुसतसे आपाला । चिमाजी गहिंवरें दाटला ॥ छछ छत्र होतें आम्हांला । जज जनम थोडा जाहला ॥ पहाड पडला ॥कशि०॥२**

**झझ झडकुनी आलें मरण । या देवानें केला खुन ॥ टट टोडूनी नेलें रतन । ठठ ठार झाला प्राण । नरमदेला ॥ कशि० ॥ ३**

**डवलतेचा खांब होता । ढढरणीवर पडला आतां ॥ णाणा म्हणे 'कुठें पाहुं पिता । तताराझमकत होता ॥ अंधकळा' ॥ कशि० ॥ ४**

**थथरकत बाजी बहिरी । ददलांत मोंगलावरी ॥ धधरुनि मोरचें मारी । नाना म्हणे श्रीहरी ॥ वैराकार केला ॥ कशि० ॥ ५**

**पपप्यार शाहुराजाचा । फफरारा जरताचा ॥ बबाळाजी बाप त्याचा । भारांत उमराव दक्षिणेचा ॥ मोहरा गेला ॥ कशि० ॥ ६**

**माय म्हणे बाजीरायासी । रंगमाहाली कधीं बैससी ॥ लोळाविला सर्वांसी । अंतरला ॥ कशि० ॥**

बवजावुनी बैसला वनीं। सससाया धरली कुणी ॥ खलवीत जन गेले टाकुनी। शाशा शाहीर वर्णील गुणी। उमरावाला ॥ कशि० ॥८

हा पवाडा बाजीरायाचा। अलंक्षा एका खडी गायाचा ॥ झाडा जाहला अक्षरांचा। साळी त्रिंबक श्रीगोंद्याचा। अभंगाला ॥कशि०॥"९

बाजीरावच्या मृत्यूची वार्ता ऐकून शाहू महाराज दुःखानें झीट येऊन पडले. त्यांना आपला आधार तुटला असें वाटणें साहजिक आहे. बाजीरावनें मराठी राज्याचा व्याप व विस्तार एवढा वाढवून ठेवला होता कीं, तो आवरावयाला खंबीर पुरुषच पुढें हवा होता. शाहू गादीवर आला तेव्हां मराठी स्वराज्य एखाद्या लहानशा जहागिरीसारखें होतें. बाळाजी व बाजीराव या पेशव्यांच्या पराक्रमानें शाहू हिंदुस्थानांतील एक अत्यंत प्रबल राजा बनला. बाळाजी पेशवा झाल्यानंतर तर त्याच्या प्रत्येक स्वारी बरोबर बाजीराव असे. त्या वेळीं बाळाजी वृद्ध झाला होता. त्यामुळें बाळाजीच्या अनुभवाला व मुत्सद्देगिरीच्या चातुर्याला बाजीरावच्या धडाडीची जोड मिळाली. हीच धडाडी त्यानें आपल्या स्वतंत्र कारकीर्दींतही दाखविली. परंतु जुन्या लोकांच्या मतें त्याच्या चरित्राला मस्तानीचें गालबोट लागलें. त्यामुळें पराचा कावळा होऊन त्याच्याविषयीं अनेक कंड्या उठविण्यांत आल्या. यामुळें शाहूचें मनदेखील त्याच्याबद्दल कसें कलुषित झालें होतें, हें खालील मजेदार पत्रावरून दिसून येईल.

" पु॥ तीर्थरूप राजश्री नाना व तथा राजश्री भाऊ स्वामींचे शेवेसी. विनंति. शेटी मलीक स्वामीकडून येथें आला, त्याजबरोबर पत्र पाठविलें तें पावलें. सेटीनें राजश्रीस वर्तमान सविस्तर स्वामीकडील सांगितलें. महाराजांनीं ऐकून घेऊन मागती येकीकडे सेटीस न्हेऊन पुसिलें. त्याणें सांगितलें कीं, " पेशवे सुखरूप आहेत. कामकारभार पूर्ववतप्रमाणेंच होत आहे. आपल्या बंदोबस्तानें आहेत." '**ब्राह्मणाचे हात तोडले**' '**कलावंतिणी राखल्या**' '**दारू पितात**' '**धुंद जहाले**' म्हणून महाराजांनीं ऐकिलें होतें; परंतु सर्व शोध बारकाईनें घेतला व दिसोनहि सर्व आला. अगदीं बाष्कळ. नाना बहुत खबरदार आहेत. तेव्हां महाराज बोलले कीं " लवंडिचे लोक भलतेंच सांगतात. **सर्व लटकें.** नाना खुशाल आहे कीं ?" तेव्हां हा म्हणाला कीं " खुशाल आहेत. " महाराज बोलले " इतकेंच असलें म्हणजे जाहलें. नाना जिवानें खुशाल असला म्हणजे सबंरे आहे. लोकांचे मजकूर आम्हीं कोठें मानतो ? तूं सांगतोस हें खरें. बारांना ग्राईट नाना. तेवढा माझा चाकर माझे पदरीं मातबर आहे. सुखरूप असला

म्हणजे जाहलें. ” मग शेटी म्हणाला कीं “ सुखरूप आहेत. ” हें वर्तमान शेटीनें येऊन आम्हांजवळ सांगितलें. खरेंच आहे. परभारी शेटीनें जेव्हां राजश्रीजवळ स्वामींचें पत्र दिल्हें, महाराजांनीं वाचलें, दरबारीं लोक फार होते. यास्तव शेटीला म्हणाले “ इकडे ये. तुला वर्तमान पुसावयाचें आहे. ” असें सदरेस बोलून पलीकडे शेटीला घेऊन गेले. वर्तमान पुशिलें. यानेंहि सांगितलें. हेंहि वर्तमान राजश्री गोविंदराव याणीं सांगितलें कीं, “ नानाचें वर्तमान पुसायासी सेटीस या प्रमाणें पुशिलें व जाबसालहि उत्तम जाहला. आतां महाराजांचें निदर्शनास आलें. ” इतक्या उपरी राजश्री दरबारीं काय चर्चा करितात व बाईजवळ काय चर्चा करितात हेंहि येक दों दिवशीं कळेल. तदोत्तर शेवेसीं लिहीन. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. ”

एका पिसाचा पिसारेदार मोर होऊन, एका मस्तानीचें अनेक वचनांत रूपांतर झालें. पितृसावर्ण्यानुरूप समशेराला ब्राम्हण ठरवून त्याची मुंज करण्याबद्दल बाजीरावचा ब्राम्हणांशीं वाद होऊन कांहीं उत्तरें प्रत्युत्तरें झालीं, तर ‘ब्राम्हणांचे हात तोडले’ असा प्रवाद उत्पन्न झाला ! मुसलमानीण घरांत ठेवणारा व तिच्याशीं लग्नाच्या बायकोप्रमाणें वर्तन करून, उघडपणें तिचीं मुलें आपलीं मुलें म्हणून कबूल करणारा बाजीराव ‘ दारू पीत असावा, ’ असा शोध लावण्यांत आला, आणि त्या धुंदीच्या भरांतच त्यानें समशेरच्या मुंजीचा वेडगळ हट्ट धरला अशी त्यावर मल्लीनाथी लढविण्यांत आली. बाजीरावनें वेश्यागमन केलें असतें तर जुन्या कट्टर ब्राह्मणांनीं तिकडे दुर्लक्ष केलें असतें, व त्यावर पांघरूण देखील घातलें असतें, कीं राजांना हें पाप माफ आहे. पण बाजीरावनें तिला घरांत घेऊन पत्नीप्रमाणें वागविलें हें महापाप ठरलें. तिच्या महालाला मस्तानी महाल, त्या बाजूच्या शनवार वाड्याच्या दरवाजाला मस्तानी दरवाजा, अशीं नांवें देऊन तिचा बाजीरावनें उघड उघड गौरव व सन्मान केल्यामुळें, तो कट्टर हिंदूंच्या द्वेषाला पात्र झाला. बाजीरावनें मिळविलेल्या बुंदेलखंडाच्या खासगी जहागिरींतील बांद्याचें राज्य तिच्या मुलाला पुढें पुष्कळ वर्षांनीं देण्यांत आलें. समशेर बहादूरला अलीबहादूर नांवाचा पुत्र झाला. हा पित्याप्रमाणें रणशूर असून वडिलांप्रमाणेंच यानें पेशव्यांची सेवा केली. नानासाहेबांस वडील बंधूप्रमाणें मान देऊन समशेर बहादूरनें तलवार गाजवली. बांद्याचे मुसलमान नबाव हे पेशव्यांचे वंशज होते. भटाभिक्षुकांच्या कोल्हेकुईला बळी पडून चिमाजी व नानांनीं त्या साध्वीचा छळ केला व तिला प्रतिबंधांत टाकलें. परंतु तिनें युक्तीनें आपली सुटका करून घेऊन ती बाजीरावला लष्करी छावणींत

जाऊन मिळाली. या विशेष उचापती १७३९-४० सालांतच घडून आल्या. बाजीरावच्या मृत्यूचें वर्तमान ऐकतांच तिनें प्राणत्याग केला. तिला हिंदुधर्मा-प्रमाणें पतिदेवाच्या चितेंत प्रवेश करण्याची परवानगी कशी मिळणार ? 'श्रीमंत विषयलंपट झाले, त्यामुळें चिमाजीआपाशीं अंतर पडून नर्मदा तीरास गेले. महादाजी अंबाजी व नानासाहेब राजेश्री जवळ गेले,' या पत्रांत उल्लेखलेली बाजीरावची विषयलंपटता ती हीच ! ह्या लंपटतेमुळें बाजी-रावचें राज्यकारभारावरील लक्ष उडालें, असे उल्लेख आहेत. तरी बरें, मृत्युपूर्वी केवळ दोनच महिने अगोदर यानें नासिरजंगावर स्वारी करून त्याचा पराभव केला होता. त्याचें सर्व आयुष्य इतक्या मोहिमांनीं भरगच्च भरलें आहे कीं, विषयवासनेंत गर्क होण्याला त्यांत जागाच उरली नाहीं. त्याच्यापेक्षां इतर अनेक सरदार अधिक विषयलंपट होते, परंतु ते हा प्रकार चोरून करीत होते. बाजीरावनें एका मुसलमानणीची घरांत स्थापना करून, तिला पत्नीप्रमाणें वाग-विण्याचा हट्ट धरला म्हणूनच केवळ त्याला ही विषारी निंदेची झळ सोसावी लागली. प्रत्यक्ष शाहूमहाराजापासून तों मराठेशाहींतील सामान्य सरदारांपर्यंत, सर्वांजवळच त्यावेळीं पत्न्या व उपपत्न्यांची गर्दी असे. परंतु बाजीरावच्या आग्रही वर्तनानें व सत्यप्रियतेनें तो विशेष निंदेचा विषय झाला. मस्तानीला तो वेश्येप्रमाणें वागवीना. तिला तो पत्नी मानूं लागला हाच त्याचा महाअपराध ! सोवळें नेसून व ब्राह्मणांना दक्षिणा देऊन पितरांचें श्राद्ध करण्याऐवजीं, शत्रूंचीं शिरें उडवून त्यांच्या रक्ताचें तर्पण करून तो श्राद्धपक्ष साजरे करीत असे ! हिंदुपद-पातशाहीचा असा धर्मलंड संस्थापक भटाभिक्षुकांना कसा आवडावा ? त्याच्यापेक्षां घृतकल्या मधुकल्या खाऊं घालणारा दुसरा बाजी त्यांना पसंत पडावयाचा !

बाजीरावावरील विषयलंपटतेचा व दारूबाजीचा आरोप वर उल्लेखलेल्या पत्रांतच खोडून काढला आहे. अभक्ष्यभक्षणाचा व पानाचा आरोप कदाचित थोडाबहुत खराही असूं शकेल. बाजीरावला सोवळ्या ओवळ्याचा विधिनिषेध नव्हता, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. तो कांहीं भटभिक्षुक नव्हता. लहानपणापासून त्याचें आयुष्य सारखें स्वारी शिकारींत गेलें असल्यामुळें, त्याचा ब्राह्मणी आचारधर्म सर्वस्वी सुटला होता. शिंदे-होळकर-पवार-जाधव हे त्याच्या विश्वासांतील मित्र व सरदार सर्वच मराठे होते. तो खरा शिपाई गडी होता व त्याचें आयुष्य शिपायांतच गेलें. त्याचें खाणेंपिणें नेहमीं शिपायांबरोबर होत असे. त्यामुळें त्यानें विटाळ बिटाळ कधीं मानला नाहीं व कदाचित् त्यानें आपल्या ब्राह्मणेतर मित्रांच्या हातची

झुणकाभाकरही कधीमधीं खाली असावी. अर्थातच कट्टर ब्राह्मणांच्या दृष्टीला हा सबगोलंकार खपला नसावा, व म्हणूनच बाजीरावावर हे प्रवाद लादले गेले. खाण्यापिण्याच्या बाबतींत तो ब्राह्मणी आचारधर्मांची व रूढींची मुळींच फिकीर बाळगीत नव्हता. त्यामुळें तो ब्राह्मण सरदारांच्या व इतर शिष्टांच्या तिरस्काराला पात्र झाला असला, तरी त्याच्या मोकळेपणाच्या भावनेनें व उदार आणि समानतेच्या वागण्यानें, त्यानें आपल्या शिपायांचीं व सरदारांचीं अंतःकरणें काबीज केलीं. शिपाई त्याला आपल्यापैकींच एक समजत व म्हणूनच त्याच्या हातून इतके अचाट पराक्रम झाले. शिपायांच्या या अढळ निष्ठेमुळेंच तो बेडर बनला होता. शाहू महाराजाला व इतर सरदारांला तो उद्दाम भासला असला, तरी त्याच्या हाताखालील शिपायांचा तो देव होता. त्यांना त्याची वर्तणूक भारी प्रेमळ व बंधुभावाची वाटे.

बाजीरावची खाजगी राहणी अत्यंत साधी होती. पेशव्यांचा प्रसिद्ध शनवारवाडा बांधावयास सारे सोळा हजार रुपये लागले. वास्तुशांतीच्या वेळीं दक्षिणा केवळ १५॥ रुपये लागली. यावरून भटा भिक्षुकांना फारशा देणग्या देण्याच्या तो विरुद्ध असे, असें दिसतें. त्याच्या घरचीं कार्यैही थोड्या खर्चांतच पार पडलीं. पुढें उत्तर हिंदुस्थानांतील नबाबी विलास पाहून उत्तर पेशवाईंत खर्चाचें प्रमाण थोडेंफार वाढलें, परंतु एकंदरींत पेशव्यांची राहणी गरीबीची होती. त्यांना मिळे तो पैसा फौजेंत ओतावा लागे व मोहिमांच्या पायीं खर्चावा लागे. घरीं यामुळें त्यांची नेहमीं ओढघस्त चालत असे, परंतु त्या प्रमाणांत बाहेर त्यांचा दरारा वाढत होता.

जुन्या सरदारांचा समाचार बाजीराव नेहमीं घेत असे, व त्यांच्या उन्नतीची तो कळकळ वाही. नरसोजी नाईक वणजारे यास बाजीराव लिहितो, ‘ तुम्ही पुरातन राज्यांतील सेवक, तुमचे हातून सेवा घेऊन सर्व प्रकारें उर्जित करावें हें अवश्यक आहे. **स्वामीसेवा केलीया तुमचे बरें सर्व प्रकारें पूर्ववत प्रमाणें चालेल,** उर्जित होईल यांत संदेह नाहीं. ’ १७२७ सालांत त्यानें या नमुन्याचीं पत्रें जवळ जवळ वीस जुन्या लहानमोठ्या सरदारांना लिहिलीं आहेत. कर्तबगारी दाखविणाऱ्यांचा तो बोज राखी व त्यांचा बडेजाव वाढवी. परंतु शिवशाहींतील जुन्या पराक्रमी सरदारांचे वंशज लोभी पण आळशी, ऐतोबे व दारुबाज बनले होते. त्यांना काम न करतां वतनें व जहागिऱ्या हव्या होत्या. त्यांपैकीं जे थोडेसे

कर्तबगार लोक होते, ते मातबर सरंजामाच्या लालचीनें मोंगलांना जाऊन मिळाले, आणि कांहीं सातारा-कोल्हापूर या राष्ट्रघातकी यादवींत कायमचें डोकें खुपसून कारस्थानें करीत बसले. त्यामुळें जुन्या निर्बल बनलेल्या व गंजलेल्या किंवा फितुरी सरदारांच्या जागीं नवे पराक्रमी मराठे सरदार बाजीरावनें हाताशीं धरून उदयास आणले. बाजीरावच्या कारकीर्दींत ब्राम्हणांना फारसा वावच मिळाला नाहीं. तो केवळ गुणांचा चाहता होता, जातीचा नव्हता. ब्राम्हणांना विशेष महत्व नाना-साहेबांच्या व पुढें नारायणरावाच्या व सवाई माधवरावांच्या कारकीर्दींत विशेष रीतीनें प्राप्त झालें. अखेरचा बाजी तर भट नसून भटजी होता. नेमाजी शिंद्याची पत्नी जिजाऊ शिंदे हिला बाजीरावानें लिहिलें, ‘ हें घर तुमचें आहे, आम्ही सर्वस्वें तुमचे असो यांत संदेह नाहीं. ’ मराठे सरदाराशीं बाजीरावचा असा घरोब्याचा संबंध होता.

बाजीरावनें पुण्यास राहण्याचा उपक्रम केल्यामुळें सातारच्या छत्रपतीची सत्ता व त्यांचें महत्व कमी झालें हें म्हणणें अर्धवट खरें आहे. परंतु पेशव्यांनीं पुण्याला आपलें घर करण्यापूर्वी प्रतिनिधीनें कऱ्हाडास, सचिवानें भोरास, सेनापतीनें तळेगांवास, अशीं अनेक प्रमुख सरदारांनीं ठिकठिकाणीं आपलीं घरें बांधलीं असून तेथें ते स्वतंत्रपणें नांदत होते. पेशव्यांनीं त्यांचेंच अनुकरण केलें. परंतु प्रतिनिधी, सचीव किंवा सेनापति यांच्या मागोमाग मराठी राज्याचीं सूत्रें साताऱ्याहून कऱ्हाडास, भोरास किंवा तळेगांवास कधींही गेलीं नाहींत. सारांश, पेशव्यांनीं पुण्यास स्वतंत्र घर केलें, म्हणून छत्रपतींचें महत्व कमी झालें नाहीं. छत्रपति आळशी व विलासी बनले व पेशवे पराक्रमी आणि कर्तबगार निपजले, म्हणून मराठी राजकारणाचें केंद्र साताऱ्याहून पुण्यास आलें. छत्रपति शाहूंत धडाडी असती तर मराठी सत्तेचें स्थलांतर झालेंच नसतें, किंवा सचीव व सेनापति पराक्रमी व कर्तबगार असते, तर मराठी सत्तेचें केंद्र भोर किंवा तळेगांव झालें असतें.

बाजीरावनें शिवाजीमहाराजांचें युद्धचातुर्य आपलेंसें केलें. शत्रू सावध होण्या-पूर्वींच अत्यंत द्रुतगतीनें दिवस रात्र कूच करून त्याच्यावर अचानक हल्ला करून त्याचें नुकसान करावयाचें, आणि तो सावध होऊन आपली संघटना करूं लागण्या-पूर्वींच तेथून परतावयाचें व नंतर चपळाईनें त्याच्या छावणीभोंवतीं फिरून त्याची रसद मारावयाची आणि त्याच्या उजव्या डाव्या बाजूंचे लचके तोडून त्याला जर्जर

करावयाचें; व अशा छाप्यांनीं त्याचें धैर्य गळून तो मागें हटला म्हणजे त्याच्यावर उघड हल्ला करून त्याचा धुव्वा उडवावयाचा. शिवाजीमहाराजांची ही रणनीति बाजीरावनें उचलली आणि तीच पुढें मल्हारराव होळकर व रघुनाथराव ऊर्फ राघोबा भरारी यांनीं चालू ठेवली. 'गनिमी कावा' या ऐवजीं 'धावती लढाई' किंवा 'भरारी छापा' असें नामाभिधान या प्रकारच्या युद्धपद्धतीला अधिक लागू पडेल. गनिमी कावा या शब्दांनीं लबाडी हा अर्थ ध्वनित होतो. परंतु मराठ्यांच्या युद्धरीतींत कोणतीच लबाडी नव्हती. चापल्य हेंच त्या रीतींतील विजयाचें प्रधान अंग होतें. या बाबतींत बाजीराव व नेपोलीयन यांच्यांत फार साम्य दृष्टीस पडतें. दोघेही पराक्रमी सेनापती--दोघेही शिपायांचे लाडके, दोघांच्या पायाला सारखें चक्र बांधलेलें, व दोघेही जलद मजला मारणारे होते. नेपोलीयनला शेवटीं अपयश आलें, पण बाजीरावला अखेरपर्यंत विजयानें माळ घातली. नेपोलीयनच्या मागें फ्रान्सची दुर्गती झाली, परंतु बाजीरावच्या मागें त्याचा पराक्रमी, कर्तबगार आणि मुत्सद्दी पुत्र नानासाहेब हा पेशवा झाल्यामुळें, बिस्मार्कनें ज्याप्रमाणें विस्कळलेल्या जर्मन संस्थानांचे बादशाही सत्तेंत एकीकरण केलें, त्याप्रमाणेंच नानासाहेबानें बाजीरावच्या चढाऊ व लढाऊ धोरणामुळें ठिकठिकाणीं निर्माण झालेल्या विस्कळित मराठी संस्थानांचें पेशवाईच्या केंद्रांत एकीकरण केलें. इंग्रजांचा वकील गार्डन १७३९ त साताऱ्यास गेला होता. तो तेथील परिस्थिति वर्णन करतोः—

'बाजीरावचे बेत बाहेर कुणासही कळत नाहींत. हुकूम होईल त्याप्रमाणें लोक निमूटपणें वागतात. सारांश, सर्व सत्ता बाजीरावच्या हातांत आहे. परभारें शाहूमहाराजाकडे आपण खटपट केली तर ती गोष्ट बाजीरावास पसंत पडणार नाहीं. नुसता मुजरा करावयास जाणें असेल तर त्याची हरकत नसते. **शाहूमहाराज मध्यें पडले नाहींत,** तर सातही प्रधानांस बाजूस सारून आपला हुकूम अमलांत आणण्याचें सामर्थ्य बाजीरावास आहे.'

परंतु इतकें सामर्थ्य असूनही, बाजीराव कर्जानें अगदीं गांजून गेला होता. त्याचा मेहुणाच कर्जफेडीसाठीं त्याच्यामागें एखाद्या ब्रह्मसमंधाप्रमाणें लागला होता. इतर सावकारांनींही त्याला धारेवर धरलें होतें. ब्रम्हेंद्रस्वामी त्याचा गुरु होताच, पण तसा तो बाजीरावचा सावकारदेखील होता. सावकारांनीं कर्जफेडीचा तगादा लावला म्हणजे युद्धाच्या धामधुमींत गुंतलेला बाजीराव गांजला जाई व वैतागून जिवाचें काय करावें व काय नाहीं, असें त्यास होई. या महापराक्रमी पुरुषाचीं कर्जाबाबत लिहिलेलीं पत्रें अत्यंत हृदयद्रावक आहेतः—

" श्रीमत् परमहंस परशरामबावा स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक आज्ञाधारक बाजीराव कृतानेक विज्ञापना. महाराजांनीं खंडूबरोबर आशीर्वाद पत्र पाठविलें व कित्येक आज्ञा केली. तरी बाबा, आम्हांस काय चिंता आहे ? तुम्ही जालेत गोसावी, आणि आम्हाकडे प्रपंच लाविला. त्या प्रपंचामुळें आम्ही जोड इतकीच केली कीं, वीस लाख रुपये कर्जदार जालों. कर्जदारांचे नरकांत कुजतों इतकेंच मेळविलें. या दुःखास्तव गतवर्षीं पिंपरीस आलों तेव्हां सारें तुमच्या हवालीं करून मोकळें होऊन देवाची सेवा करावी हा हेत धरून स्वामीस विनंति केली. स्वामी कृपाळु होऊन आश्वासन दिल्हें. "भार्गव तुझें ध्यानीं आहे. फत्ते तुझी होईल; व पैकाहि उदंडसा मिळोन कर्ज फिटेल. सर्व साह्यकारी भार्गव आहे." तेवढे वचनावर दृष्टि ठेऊन होतों. त्यास चिरंजीव तुझा तिकडे गेला होता. यश मात्र थोडें बहुत आलें. पैका न मिळाला. लष्करचे हाल श्रीरंगपट्टणचे वेळेस जालें होतें तसेच जाले. आपण या गोष्टीचा शोध करावा. आतां नित्य उठोन कर्जदारांचे पायां पडावें. शिलेदारांचे पाया पडता पडता कपाळ छिनत चाललें. आतां हीं सुखें आम्हांस नकोत. तुम्ही या आणि आपला कारभार संभाळा. अगर टाकून द्या म्हणाल तरी टाकून उठोन येतों. वरकड तुम्हीं आपल्या पैक्यासाठीं लिहिलें, तरी स्वामीनें कांहीं चिंता न करावी. आमचा जीव आहे तों पैकियाची काय चिंता आहे ? कोणे समयीं पैका पाहिजे तें आम्हांसहि कळतें. पैका पावता करूंच. आतां प्रस्तुत तो आमचा जीवच मात्र आहे. तो येथें येऊन घेणें अगर तेथें बोलावशील तरी सर्वसंग टाकून येतों. तुम्ही थोर देव. तुम्हांस वचनास धरावें. तें वचन खरें न जालें म्हणून आम्हीं लेकरांनीं तुमची रड तुम्हांपासीं रडावी आणि रडतियाची अशी तुम्ही पुसोन परिणाम त्याचा करावा तो कराल. तुमचे झाड लाविलें, तोडाल तरी आतां तोडा, वाढवाल तरी वाढवा. या गोष्टीस नादर कोण आहे. तुमचे दबवणीस आम्ही कां भिऊं ? मारशील तरी तूच, बाबा, मारशील. यांतहि कीर्ती तुझीच आहे. आणि आम्हां लेंकराचे लडिवाळ चालवून कीर्तिरूप होसील तरी तूंच होसील. गांवचा मजकूर लिहिला कीं शिष्य पाठविणें त्याचें हवालें करूं. तरी शिष्य मीच आहे. मला बोलवावें; मीच येतो. हा कारभार पाहावासा असला तरी येऊन आटपणें. पाहिले तरी, आम्ही मुत्तालीक तुझे. टाकून द्या म्हणाल तरी येतो. नाहीं, चार दिवस आमचेच हातून घ्यावयास असेल तरी तैसीच आज्ञा करावी. आम्ही तों कर्जदाराचे नरकांत बुडालों. तुझे वचनावर

अवंदाचे सालीं जर मला कर्ज व राजा व लोक यांचे देणियापासून मुक्त करशील यास्तव देवाजवळ आमचा प्राण देऊं. आम्हांस लेंकरास मुक्त कराल ऐसें वचन अभयपूर्वक आलिया एवढे आठ महिनें आणीक जीव धरून पाहूं. यांत जर आम्हीं कृत्रिम लिहिलें असेल तरी आम्हांस तुझीच शफत असे. काय तें उत्तर लौकर पाठविणें. तैसीच तजवीज करूं. तूं देव कैसा कीं आमची कृत्रिमता किंवा निर्मळता न कळे. ध्यानांत येईना तेव्हां आम्हीच प्राक्तनाचे गाढे. आमचे कपाळ फुटले! तुमचा कोप आम्हां गरीबावर कशास? जे दुष्ट असतील त्यांजवर करा कीं? तेणें करून प्रजा सुख पावे. **आज दाभाडे, गायकवाड, बांडे कोटी कोटी रुपये खजीने** आणि **मीन आम्ही तुझे पायांपाशीं व धन्याचे पायाशीं निष्ठेनें वर्ततों ते अन्नास महाग जालों !** त्यांत आम्हीं चिपळुणें तुझे वाढविलें. लाज तुला असावी. लाज धरशील तरी त्यांजवर कोप करा; आणि आमचे उर्जित करून, राहिलें ब्राह्मणाचें काम करून घ्या. नाहीं तरी आम्हांवरी कोपराग कशास पाहिजे? आपले स्वाधीन करून घे आणि आम्हांस मुक्त कर. आणिक एखादा देव पाहून सेवा करूं. पिंपरीसच बोलिले आहां कीं "माझा राग तुजवर होणार नाहीं. कदाचित रागें भरलों तरी चालणार नाहीं." त्यास आतां लिहिलें कीं, "पिंपरीस मरत होतो. ज्वरानें शुद्ध नव्हती. ते बोली प्रमाण नाहीं." तरी मरत होतास तरी रात्रींच माझे रक्षणास कैसा आलास? ह्या गोष्टी कैशास लिहितां? जर आम्ही उमगतो न, तरी त्वां भार्गवच साक्ष असेल. आतांच उठोन संन्यासी होऊन एखादेकडे उठोन जावे ऐसे वाटत नसेल तरी भार्गवाची शपथ आहे. परंतु मागती कांहीं विवेक धरून धीर धरून पाहतो. जर धीर धरवेल तरी धरवून पाहूं. नका म्हणाल तरी आम्ही तों सिद्धच आहों. सेवेसी श्रुत होय. हजार रुपये साताऱ्याहून धावडशीस पावते करणें म्हणून पूर्वीच खंडूचें अगोदर दोन दिवस पत्र लिहून पाठविलें आहे. पावले असतील अगर पावतील. उत्तर पाठवावें हे विज्ञप्ति."

या थोर पुरुषाला मुलुखगिरीच्या व्यापाराबरोबर ही दारिद्र्याची चिंता वहावी लागली याबद्दल अत्यंत वाईट वाटतें. या चिंतानलानें त्याचें आयुष्य कमी झालें यांत शंका नाहीं. द्रव्याची तरतूद करतां आली नाहीं यावरून बाजीरावला कांहीं इतिहासकारांनीं दोष दिला आहे. परंतु स्वार्थत्यागी वृत्तीला भिकारडेपणा, स्वामीनिष्ठेला चोंबडेपणा, युद्धनैपुण्याला कलहप्रियता, राज्यविस्ताराला हांवरटपणा, धडाडीला बेफामपणा, अशीं नांवें दिलीं व देतां आलीं तरी त्यांत

सत्य थोडेंच असतें ? बाजीरावनें मराठी राज्याचा जो विस्तार केला व ज्या लढाया मारल्या त्या फौजेच्या बळावरच ना ? नवी फौज पदरीं ठेवावयास द्रव्य खर्च करावें लागणार. नवे प्रांत जिंकतांना पैसा अलोट खर्च करावा लागतो. हिंदुपदपादशाही स्थापन करण्यास निघालेल्या महापुरुषानें मिळविलेला सर्व पैसा, फौजा तयार करण्यांत व लढाया लढण्यांत खर्च झाला, आणि तो अन्नाला मोताद झाला. त्याची महत्वाकांक्षा आकुंचित असती, तर त्यानें फौजेवरील खर्च कमी करून हें कर्ज एका दमांत चुटकीसरसें फेडलें असतें. परंतु सर्व आयुष्य स्वाऱ्यांत गेल्यामुळें त्याला पदरची फौज बिलकुल कमी करतां येईना. बाजीरावनें फौज कमी केली असती तर मराठेशाही तेव्हांच उलटली असती, व स्वराज्याचें साम्राज्य कदापि झालें नसतें. फार काय पण तें चिमकुलें स्वराज्यदेखील टिकलें नसतें. बरें, नवीन प्रांत जिंकले म्हणजे त्यांतील मलई शिंदे, होळकर, गायकवाड, कदम, दाभाडे वगैरे सरदार खाऊन जात आणि ताक बाजीरावच्या हातीं लागे. त्यांना जर ही मलई खाऊं दिली नसती तर ते मराठ्यांना सोडून निजामाला जाऊन मिळण्याचा संभव होता. चंद्रसेन जाधव व निंबाळकर हे निजामाला जाऊन मिळाल्यामुळें वैभवसंपन्न सरदार बनले व त्यांना विस्तीर्ण जहागिऱ्या बक्षीस मिळाल्या, हें उदाहरण मराठ्यांच्या डोळ्यांसमोर होतें. त्यामुळें त्यांचा मलिदा कमी केला तर ते द्रोही होण्याची सारखी भीति असे. द्रोह करण्यापेक्षां स्वामीनिष्ठ राहणें अधिक फायदेशीर आहे हें सरदारांना पटवून दिल्याखेरीज त्यावेळीं गत्यंतर नव्हतें. राजबाबतीबद्दल सरदारांशीं वांटणी करून, तत्संबंधीं वाटाघाट करूं म्हटल्याबरोबर ते नाराज होत असत व निजामाला जाऊन मिळण्याचा घाट घालीत. दाभाडे-गायकवाडांनीं काय प्रकार केला ? तोच कित्ता इतर गिरवावयाचे. त्यामुळें सरदारांना धाकांत ठेवून व युद्धांतील विजयाची मलई त्यांना खाण्यास देऊन बाजीराव आपलें काम काढून कसें बसें घेई. त्यामुळें सरदारांना खुष ठेवून जें द्रव्य त्याच्या वांट्याला मिळे, त्यांतूनच त्याला फौजेची सरबराई करावी लागे. तेवढयांतच भागलें नाहीं तर त्याला कर्ज काढून राज्याचा भार वहावा लागे. इतकी चिंता वाहून देखील राज्याचा कारभार पेशव्यांनीं चालविला, मातबर फौजा बाळगून नवे प्रांत जिंकले व मराठ्यांची इभ्रत आणि लौकीक वाढविला, सरदारांना मलई चारून त्यांना संतुष्ट राखले व आपण दारिद्र्यांत दिवस काढले, या अपूर्व स्वार्थत्यागाबद्दल बाजीरावला दोष देणें कितपत रास्त होईल ? बाजीरावला या अडचणींतून निघावयास दोनच मार्ग होते.

( १ ) सरदारांची खुराक बंद करावयाची व त्यायोगें फौजेचें देणें देऊन राज्याचें कर्ज वारावयाचें. पण मग सर्व सरदार असंतुष्ट होऊन मोंगलांना मिळाले असते.

( २ ) प्रजेला लुटून पैसा मिळवावयाचा. पण मग प्रजेला ' भीक नको कुत्रा आवर ' असें वाटून, हिंदुपदपादशाहींत येण्याऐवजीं ती मोंगल सुभेदारांच्या अंमलाखालीं राहणेंच पसंत करती. पेशव्यांचा माळव्यांतील कारभार मोंगलाईपेक्षां प्रजेला इतका सुखावह वाटला कीं लोक मराठी राज्याचे गोडवे गाऊं लागले.

या खेरींज एक तिसरा मार्ग बाजीरावाला मोकळा होता. पण मग त्याचें चरित्रच कोणी लिहिलें नसतें व त्याची पुण्यतिथिहि पण कोणी इतक्या वर्षांनंतर साजरी केली नसती. तो मार्ग म्हणजे केवळ स्वार्थाकडे लक्ष देऊन गबर बनावयाचें व जहागिरी मिळवून हिंदुपदपादशाहीच्या कल्पनेवर तिलांजली द्यावयाची. बाजीरावानें आपल्या ध्येयापासून न ढळतां, कर्जाचें ओझें व जाच स्वतःवर लादून घेऊन मराठ्यांचें वैभव वाढविलें व आपण दारिद्र्यांत दिवस काढले, याबद्दल त्याची जितकी प्रशंसा करावी तितकी थोडीच होईल.

बाजीराव मरण पावला तेव्हां त्याला चौदा लाख रुपये देणें असून त्याचे सावकार तीस होते. व्याजाचा दर त्याला दरसाल दरशेंकडा १२ टक्यांपासून तों ३० टक्यांपर्यंत भरावा लागे. निकडीची मोहीम असली, म्हणजे वाटेल तो व्याजाचा दर कबूल करून बाजीरावला कर्ज काढावें लागे. सावकार त्याच्यापासून वाटेल त्या शर्ती लिहून घेत, वाटेल तितकें व्याज उकळीत व वाटेल तसा त्यास पिळून काढीत. प्रत्यक्ष त्याच्या मेहुण्याचा भाऊ बाबूजी नाईक, हा अत्यंत खाष्ट सावकार होता. रघोजी भोंसल्याचा बाबूजी मित्र असून, त्याच्या मार्फत पेशवाई मिळविण्यासाठीं तो सारखी खटपट करीत होता. त्यावेळीं नानासाहेबांचें वय अवघें १९ वर्षांचें होतें. परंतु शाहूचा त्याच्यावर फार लोभ जडला होता, व त्याची लायकीही शाहूला दिसून आली होती. तेव्हां सर्व सरदारांच्या व प्रधानांच्या खटपटीला यश न येतां शाहूनें नानालाच अखेर पेशवाई दिली. कोंकणस्थ-देशस्थ हा वाद प्रतिनिधीच्या मुखानें निघे. नानासाहेबांचें बालवय असें सरदार म्हणत, आणि बाबूजी नाइकाला द्रव्याची अनुकूलता आहे म्हणून त्याचें घोडें रघोजी पुढें दामटी. कारण बाजीरावचें व रघोजीचें फारसें सूत नव्हतें. परंतु चिमाजीचें वजन शाहूवर पडून, त्यानें नानासाहेबांसच २५ जून रोजीं म्हणजे बाजीरावच्या मृत्यूनंतर केवळ दोन महि-

त्यांनीं पेशवाईचीं वस्त्रें दिलीं. " बाजीरावानें थोरले बाळाजीपंत यांचे मागें बहुत सेवा निष्ठेनें करून मोठमोठीं कार्यें करून दाखविलीं. शेवटीं इराणीचें पारिपत्य करून बादशाही स्थापावी म्हणून रवाना केलें. तेथें आयुष्य थोडें झालें. त्यास त्यांचे पुत्र तुम्ही, **पातशाही रक्षून सर्व हिंदुस्थान आपलें करावें** ऐसा बेत त्यांही केला, तो तुम्ही सिद्धीस न्यावा. अटकेपार घोडे चालवावे. " असा उपदेश करून कोणाची लुडबुड चालूं न देतां, शाहूनें नानासाहेबांसच पेशवाईचीं वस्त्रें दिलीं.

---

## प्रकरण २० वें.

# 'उपसंहार'



बाजीरावानें आपल्या वीस वर्षांच्या कारकीर्दीत खालील महत्वाचीं कामें केलीं.

( १ ) **कोल्हापूरच्या भाऊबंदकीचा निकालः**—यादवी थांबली, परंतु एका मराठी राज्याचीं सातारा व कोल्हापूर अशीं दोन छकलें झालीं, त्यामुळें छत्रपतींचा मान कमी झाला; परंतु याला कांहीं इलाज नव्हता. ताराबाईनें आपल्या स्वार्थी वृत्तीनें जें विषारी बीज पेरलें त्याला हें दुहीचें रोप आलें. राजाला जितकीं मुलें होतील तितक्यांत राज्य वांटून दिलें, तर कोणतेंही राज्य टिकणार नाहीं. संस्थानाच्या वांटण्या होऊं लागल्या तर संस्थानें नष्ट होऊन पाटीलक्या निर्माण होतील. ह्या एकाच परसांत जवळ जवळ निर्माण झालेल्या दोन छत्रपत्या मराठी राज्याला अखेर घातुक ठरल्या. कारण या थोर राजांचें अनुकरण सरदार करूं लागले. एका पवाराचे तीन पवार झाले, आणि स्वार्थाकरितां भांडणें भांडण्याची प्रवृत्ति वाढली. राजांचा कित्ता प्रजेनें गिरविला. मराठी राज्याला ही जी दुहीची कीड लागली, तिनेंच तें राज्य नष्ट झालें. इतर कारणें केवळ आनुषंगिक होत. मराठी राज्य नष्ट होण्याचें आद्यकारण कोल्हापूरची यादवी हें होय. हें तत्वच घातुक होतें. परंतु शाहूनें आपल्या नेहमींच्या गोड स्वभावानुरूप राजाराम महाराजांच्या संततीला राज्याचा हिस्सा देण्याचें ठरविलें. तेव्हां त्या दोन घराण्यांत सारखीं भांडणें चालण्यापेक्षां शक्य तेवढी गोडीगुलाबी नांदणें राष्ट्रहिताच्या दृष्टीनें इष्ट होतें. म्हणून बाजीरावानें घडवून आणलेली तडजोड राष्ट्रास हितावह अशीच झाली. कोल्हापूरकर या तहाविरुद्ध नेहमीं कुरकुर करीत असत व पेशवे समर्थ

नसते तर त्यांनीं निजामाचें साह्य घेऊन केव्हांच साताऱ्याशीं युद्ध पुन्हां उपस्थित केलें असतें. शाहू व संभाजी यांचीं मनें धुतल्या तांदुळासारखीं झालीं नसलीं, तरी एकमेकांविषयीं बरींच स्वच्छ झालीं. पेशव्यांचा प्रबल पाठपुरावा शाहूला असल्यामुळें कोल्हापूरकरांचें कांहीं चालेना, व त्यामुळें ते पेशव्यांवर, आणि पेशवे ब्राम्हण म्हणून सर्व ब्राम्हणांवर, दांतओंठ खाऊन चरफडूं लागले. हा उभा दावा मराठेशाहीचा समूळ नाश होईतोपर्यंत कोल्हापूरकरांनीं सारखा चालविला. पराक्रमाच्या अभावीं तें वैर वांझोटें ठरलें, इतकेंच !

( २ ) **कोंकणपट्टीचा बंदोबस्तः**—शिद्दी व फिरंगी यांचा खरपूस पराभव करून बाजीरावनें सर्व कोंकणप्रांत मराठी सत्तेखालीं आणला व स्वराज्याची पिछाडी बळकट केली. कोंकणपट्टींत शत्रू असले, म्हणजे सह्याद्रीचे घांट झटपट चढून ते स्वराज्याला केव्हां उपद्रव देतील याचा नेम नसतो. तेव्हां बाजीरावनें हा पायांतील कांटा नाहींसा केला. फिरंग्यांनीं हिंदु लोकांवर जो अनन्वित जुलूम चालविला होता, तो यामुळें बंद होऊन मराठी राज्य हें हिंदूंचें धर्मराज्य आहे, अशी सर्वांची भावना झाली. या राज्यांत गोब्राह्मणांचें व देवालयांचें रक्षण पूर्ववत् होईल अशी सर्वांची खात्री झाली. यामुळें पेशव्यांच्या फौजेंत भरती होण्याकरितां अनेक भिन्नजातीय लोक अहमहमिकेनें पुढें होऊं लागले.

( ३ ) **निजामाचा बंदोबस्तः**—प्रथम १७२० पासून २८ पर्यंत व पुढें १७३५ पासून तों ४० पर्यंत, बाजीराव-निजामाचा सारखा सामना चालू होता. निजाम, त्याचे सरदार किंवा पुत्र, किंवा त्याला सामील झालेले कोल्हापूरकरी स्वराज्यकंटक, यांच्याशीं या कालांत बाजीरावचें सारखें युद्ध चालू होतें. बहुतेक प्रसंगीं बाजीरावासच यशानें माळ घातली. १७२० सालीं झालेल्या आरंभींच्या बाळापुरच्या लढाईत काय तो निजाम यशस्वी झाला. परंतु त्या लढाईत मराठ्यांनीं फारसा भाग न घेतां ते अलिप्त राहिले असें दिसतें. पण पुढें निजामाचा किंवा त्याच्या हस्तकांचा सारखा पराभव होत गेला. निजामापासून बराच प्रांत मराठ्यांनीं हस्तगत केला व निजाम याप्रमाणें खच्ची झाल्यामुळें दक्षिणेंत मराठी सत्ता अत्यंत प्रबल झाली. पुष्कळ पराक्रमी मराठे सरदार व त्यांच्यामुळें त्यांचे अनेक प्रजाजन निजामाला स्वार्थबुद्धीनें सहाय्य करीत असल्यामुळें, त्याला कायमचें उखडून फेंकणें बाजीरावला शक्य झालें नाहीं. पराभव करून त्याचा गर्व मात्र बाजीरावनें जिरविला, व मुलुख घेऊन रग उतरवली. शाहूचा मानलेला पुत्र फत्तेसिंग भोंसले व बाजीराव यांची सारखी आपसांत धुसफूस चालू असल्यामुळें, १७२६ च्या श्रीरंग-

पट्टनच्या स्वारीनंतर १७४० पर्यंत मराठ्यांनीं कर्नाटकाकडे ढुंकून देखील पाहिलें नाहीं. कारण फत्तेसिंग अक्कलकोटचा संस्थानिक बनला असल्यामुळें कर्नाटकाशीं त्याचे हितसंबंध गुंतले होते. त्यामुळें बाजीरावनें कर्नाटकांत ढवळाढवळ करावी हें त्याला खपत नव्हतें, आणि स्वतः कर्नाटकचा बंदोबस्त करण्याची व नवा मुलुख जिंकण्याची कुवत त्याच्यांत नव्हती. फत्तेसिंगावर शाहूचें पुत्रवत् प्रेम असल्यामुळें त्याला दुखविणें बाजीरावला शक्य नव्हतें, कारण त्यामुळें शाहू क्रुद्ध झाला असता. मराठ्यांनीं या काळांत कर्नाटकाकडे दुर्लक्ष केल्यामुळें राजवाड्यांच्या मतें खालील अनर्थपरंपरा कोसळली. मराठ्यांनीं कर्नाटकांत १७२६ ते ४० च्या दरम्यान स्वाऱ्या केल्या असत्या तर,

( अ ) त्या प्रांतांत निजामाची सत्ता दृढ झाली नसती,

( आ ) निजामाचे हस्तक असलेले अर्काटचे नबाब पार नाहींसे झाले असते,

( इ ) तंजावरच्या मराठ्यांना जोर चढला असता व निजाम मराठ्यांच्या कचाट्यांत खालूनवरून पुरता सांपडला असता,

( ई ) मद्रासेंतील इंग्रजांना व पांदेचरींतील फ्रेंचांना अर्काटच्या नबाबांच्या द्वारा कर्नाटकांत ढवळाढवळ करतां आली नसती, व

( उ ) श्रीरंगपट्टनचें हिंदु राज्य नष्ट होऊन हैदरासारखा नवीन शत्रु उद्भवला नसता.

बाजीराव व फत्तेसिंगामधील दुही अशी राष्ट्रहितविघातक झाली.

( ४ ) **उत्तरेंतील राजकारणः**—बाजीरावचें हें राजकारण अत्यंत यशस्वी झालें. गुजराथपासून तों बंगालच्या सीमेपर्यंतचा प्रांत मराठ्यांच्या सत्तेखालीं आला. इ. स. १७०७ सालच्या आरंभीं म्हणजे शाहू मोगलांच्या कैदेंतून सुटण्यापूर्वीच, बाळाजी विश्वनाथानें गुजराथवर स्वारी केली आणि झबुवा व गोध्रा या प्रांतांचा सुभेदार मुरादबक्ष याचा पराभव केला, आणि तो अहमदाबाद शहराच्या दाराशीं येऊन थडकला. तेथील मोंगल सरसुभेदाराची तर बाळाजी विश्वनाथाच्या पराक्रमानें घाबरगुंडी उडाली, आणि सर्व प्रजाजन भयभीत झाल्यामुळें दोन लक्ष दहा हजार रुपयांची खंडणी देऊन मोंगल सुभेदाराला बाळाजीची समजूत घालावी लागली. मराठ्यांना व पेशव्यांना नेहमीं तुच्छ लेखणाऱ्या, फार काय पण श्रीशिव प्रभूंच्या पराक्रमाची देखील हेटाळणी करणाऱ्या मुसलमान इतिहासकारांनीं बाळाजीच्या या

पराक्रमाचें वर्णन करून ठेवलें आहे त्यावरून बाळाजीच्या लष्करी गुणांची सहज परिक्षा होते. **मिरात-इ-अहमदी** या ग्रंथांत बाळाजीच्या या धडाडीच्या पराक्रमांचें सविस्तर वर्णन केलेलें आहे. सरांश बाळाजी हा शाहूच्या सुटकेपूर्वीच पराक्रमी व कर्तबगार सेनानी म्हणून नावाजला गेला होता आणि म्हणूनच त्याच्या लष्करी सहाय्याबद्दल त्याला शाहूनें सेनाकर्ते हा किताब दिला. बाळाजीचें गुजराथेंतील कारस्थान कदम बांडे याच्या मार्फत बाजीरावानें पुढें चालविलें व स्वतः माळवा जिंकण्याचा उद्योग आरंभला. चिमाजी व तो स्वतःही अधून मधून गुजराथेंत जात होताच. पित्याच्या वारशी नात्यानेंच दाभाड्याच्या बरोबरीनें बाजीराव अर्ध्या गुजराथेवर हक्क सांगत होता; आणि बाळाजीच्या पूर्व कर्तबगारीवर व पराक्रमावर मिस्त ठेवून शाहूनें बाजीरावच्या हक्काला मान्यता दिली असावी. त्यामुळेंच दाभाड्यांचें व बाजीरावाचें पुढें वांकडें आलें. परंतु भट पेशव्यांनीं—पितापुत्रांनीं मिळूनच गुजराथ-माळव्याचें राजकारण केलें व त्या उत्तर पट्टीवर मराठ्यांचा शह बसविला, हें निर्विवाद सिद्ध होतें. याप्रमाणें विंध्याद्रीच्या वरचा हा पट्टाचा पट्टा मराठ्यांच्या ताब्यांत आला व दक्षिणदेशाला शत्रूंच्या स्वाऱ्यांची त्यामुळें भीति उरली नाहीं. हा पट्टा जिंकल्यामुळें दक्षिण देशाच्या उत्तर सीमेवरील भानगडीचा प्रश्न कायमचा मिटला, व मराठ्यांना उत्तर हिंदुस्थानांतील राजकारण करावयास सोयीस्कर जागा मिळाली. दिल्लीच्या स्वारीवर गेलें म्हणजे फक्त माळव्याशीं संबंध राखला म्हणजे काम भागूं लागलें. प्रत्येक स्वारीच्या प्रसंगीं दूर पुण्यासाताऱ्याकडे मागें वळून पाहण्याचें कारण उरलें नाहीं. माळव्याच्या नव्या घरांत मोहिमेची सर्व पूर्व तयारी करून तेथून युद्धास निघतां येऊं लागलें. त्यामुळें सैन्याचे निष्कारण दौडीचे श्रम वांचून, प्रत्यक्ष पराक्रमाला अधिक वाव मिळूं लागला. बुंदेलखंडांतील भाग कबजांत आल्यामुळें घरीं बसून दिल्लीवर नजर फेंकली तरी ती पोहोंचूं लागली. मोंगल बादशाही मराठ्यांच्या परसांत जणूं येऊन बसली. मराठ्यांच्या सत्तेचा व पराक्रमाचा सर्वत्र बोलबाला झाला. ठिकठिकाणचे हिंदू मराठ्यांकडे आपलेपणाच्या भावनेनें पाहूं लागले. लवकरच सर्वत्र हिंदु पदपातशाही स्थापन होणार, अशीं स्पष्ट चिन्हें सर्वांस दिसूं लागलीं. पेशवेदेखील हिंदूंचीं उत्तर हिंदुस्थानांतील प्रमुख तीर्थक्षेत्रें आपल्या ताब्यांत आणण्याविषयीं सारखा खटाटोप करूं लागले.

ही चौसूत्री साधण्याकरितां पेशव्यांना अनेक लढाया माराव्या लागल्या. एकाच वेळीं त्यांच्या अनेक शत्रूंशीं झुंजा चालल्या असत. पण फौजेची दौड मारून ते

एका शत्रूला थोड्या लोकांनिशीं थोपवून धरून, दुसऱ्या शत्रूचा तोंपर्यंत समाचार घेत असत व मग दुसऱ्यास थोड्या लोकांकरवीं थोपवून धरीत व तेथील बहुतांश फौज पहिल्या ठिकाणीं आणून, पूर्वी थोपवून धरलेल्या त्या शत्रूशीं निकराची झुंज घेत व त्याचा निःपात करीत. एखाद्या अष्टावधान्याप्रमाणें पेशवे निढीवले असून त्यांची दृष्टी चौफेर पोहोंचत असे व सर्व जवळचीं दूरचीं कारस्थानें ते एकसमयावच्छेदेंकरून चालवीत, सर्वांवर नजर ठेवीत, बिलकुल न डगमगतां, वेळ आल्यास एकदम दोघांतिघांशीं युद्ध फुकारीत व सर्वांचा पृथक् पृथक् समाचार घेत असत. बाजीरावला चिमाजीरावासारखा पराक्रमी, आज्ञाधारक, स्वार्थत्यागी व स्वराज्यभक्त असा बंधू लाभला असल्यामुळें त्याचें कार्य सत्वर सफल होई. एक भाऊ एका बाजूस गुंतला असला तर दुसरा दुसरी बाजू थोपवून धरी व युद्धाची आणि राजकारणाची बाजी आपणांवर उलटूं देत नसे. बाजीराव एकाच वेळीं अनेक शत्रूंशीं लढण्यांत कसा गुंतला असे, हें खालील आलेखावरून स्पष्ट नजरेस येईल.




राजवाड्यांनीं बाजीरावच्या या मोहिमांतील लढायांची हकीकत थोडक्यांत दिली आहे. ती फार वाचनीय आहे. बाजीराव शब्दशः वाऱ्याप्रमाणें दौड मारून विजेप्रमाणें सर्व हिंदुस्थानभर तळपून आपल्या शत्रूंचा आळीपाळीनें समाचार घेत होता, हें त्या वृत्तांतावरून कोणालाही दिसून येईल.

"१७२० च्या १७ एप्रिलास बाजीरावास प्रधानपद प्राप्त झालें. ह्या वेळीं तो खानदेशांत किंवा वऱ्हाडांत अलमअल्लीच्या साहाय्यास गेला होता, अथवा खरें म्हटलें असतां, बाळाजी विश्वनाथानें त्यास पाठविलें होतें. बाळाजी विश्वनाथाच्या व शाहूच्या बहुतेक स्वाऱ्यांत बाजीराव हजर असे. बाळाजी विश्वनाथ, दमाजी थोरातावर चाल करून गेला तेव्हां बाजीराव त्याच्याबरोबर होता. दमाजी थोरातानें दगा कसा केला, ह्याची आठवण शाहूनें बाजीरावाला एका पत्रांत केली आहे. बाळाजी विश्वनाथाबरोबर बाजीराव दिल्लीस गेला होता. तेथून परत आल्यावर बाळाजीपंत नानांनीं त्याला खानदेशांत सय्यदांचा हस्तक जो अलमअल्लीखान ह्याचें साहाय्य करण्यास ठेवून दिलें. १७२० च्या जुलैंत अलमअल्लीचा निजामुन्मुल्कखानें बाळापूर येथें पराभव केला. १७२०चा पावसाळा छावणींत काढून त्या सालाच्या आक्टोबरांत निजामुन्मुल्कखाच्या कोणा एका हस्तकाचा बाजीरावानें बारामतीजवळ पराभव केला. हा पराक्रम करून १७२० च्या नोव्हेंबरांत बाजीरावानें साताऱ्यास पेशवाईचीं वस्त्रें महाराजांच्या हातून घेतलीं. बाजीराव उपेक्षणीय पुरुष नाहीं, अशी पक्की खातरी होऊन निजामानें बाजीरावाची भेट सावर्डिया येथें घेतली, परंतु तिच्यापासून विशेष कांहीं निष्पत्ति झाल्याचें आढळत नाहीं. १७२१ च्या आगष्टपर्यंत बाजीराव विजापूर प्रांतांत होता. १७२१ च्या सप्टंबर–आक्टोबरांत त्याची भडभुंज्या मोंगलांशीं पुरंदरास लढाई झाली व नंतर १७२२ प्रारंभीं करीमबेगाशीं युद्ध झालें. निजामाच्या ह्या दोघांही सरदारांचा पराभव करून बाजीराव १७२२ मेंत सुप्यास व जुलैंत साताऱ्यास गेला. ह्या अवधींत निजामुन्मुल्क दिल्लीस जाऊन पातशाहींत ढवळाढवळ करूं लागला. १७२२ च्या सप्टेंबरांत निजामुन्मुल्कखाचे सरदार अर्काटाकडे स्वारीस निघणार अशी बातमी आली. निजामाच्या पाठीवर शह देण्यास बाजीराव १७२२ च्या नोव्हेंबरांत औरंगाबादेस गेला. तेथें ऐवजखानाचा पराभव करून स्वारी बऱ्हाणपुरास गेली. १७२३ च्या जानेवारींत बाजीरावाची हांडिया प्रांतांतील अनूपसिंगाशीं भेट जाहाली. १७२३ च्या फेब्रुवारींत खुद्द निजामुन्मुल्कखाची मुलाखत करून स्वारी बाघेलखंडाकडे गेली. तेथून १७२३ च्या जुलैंत साताऱ्यास येऊन खंडेराव दाभाडे, फत्तेसिंग भोंसले व चिमणाजी बल्लाळ ह्यांच्या साहाय्याला बाजीराव १७२३ च्या डिसेंबरांत गेला. १७२३ च्या डिसेंबरांत अंबाजीपंत पुरंधरे, मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे व नंतर बाजीराव यांनीं माळव्यांत व बुंदेलखंडांत स्वारी केली. हैदराबादकर मोगलांनीं उत्तर व दक्षिण पाईन घाटांत गडबड केली, ती बंद कर-

ण्याकरितां १७२३ च्या सप्टंबरापासून १७२४ च्या जुलैपर्यंत खंडेराव दाभाडे, फत्तेसिंग भोंसले व चिमणाजी बल्लाळ गुंतले होते. हैदराबादकर मोंगल कंबरजखान व निजामुन्मुलुख ह्यांचा युद्धप्रसंग १७२४ च्या पावसाळ्यानंतर सुरू झाला. ह्या प्रसंगीं बाजीरावानें निजामाचें साहाय्य करून कंबरजखानाचा साखरखेडलें येथें १७२४ च्या आक्टोबरांत पराभव केला. तेथून बाजीराव माळव्यांत जाऊन १७२५ च्या एप्रिलास साताऱ्यास आला. १७२५ च्या सप्टंबरांत फत्तेसिंग भोंसले, त्रिंबकराव दाभाडे, रघूजी भोंसले, प्रतिनिधी व बाजीराव त्रिचनापल्लीपर्यंत कर्नाटकांत स्वारी करून १७२६ च्या मेंत परत आले. ह्या अवधींत चिमणाजी बल्लाळ व कान्होजी भोंसले निजामावर चाल करून गेले. निजामानें शाहूच्या विरुद्ध संभाजी, प्रतिनिधी, वगैरेंच्या मनांत विकल्प आणून युद्धाची तयारी केली होती. बाजीराव कर्नाटकांत गेला असें पाहून निजामानें हा डाव आरंभिला होता, परंतु शाहूनें माळव्यांतून उदाजी पवार, कंठाजी कदम, पिलाजी गायकवाड ह्यांस फत्तेसिंग भोंसले व चिमणाजी बल्लाळ ह्यांच्या साहाय्यास बोलाविलें व बाजीरावासहि परत येण्यास पत्रें पाठविलीं. १७२६ च्या सप्टंबरांत बाजीराव व खंडेराव दाभाडे पंढरपूरच्या रोखें निजामावर गेले. कान्होजी भोसल्याचा ऐवजखानानें बालाघाटांत पराभव केला. त्याच्या मदतीस चिमाजीअप्पा गेले. बाजीरावानें औरंगाबादेकडून शह दिला. निजामावरील ही स्वारी संपवून बाजीराव १७२७ जुलैंत साताऱ्यास गेला. १७२७ च्या आगस्टांत बाजीराव पुन्हा निजामावर गेला. निजामाला अनेक झुकांड्या देऊन त्याचा पराभव बाजीरावानें १७२८ च्या फेब्रुवारीस पालखेड येथें केला. नंतर १७२८ च्या ६ मार्चास मुंगी येथें तह करून बाजीराव जुलैंत साताऱ्यास आला. ह्या तहांत निजामुन्मुलुखाची व कोल्हापूरच्या संभाजीची कायमची फारकत झाली. १७२८ च्या आक्टोबरांत बाजीराव तुळजापुराकडे व खानदेशांत स्वारीस निघाला व चिमाजीअप्पा माळव्यांत दयाबहादूरावर गेला. चिमाजीअप्पा माळव्यांतून १७२९ च्या मार्चांत परत आला व बाजीराव चिमाजीआप्पाच्या जागीं माळव्यांत गेला. बाजीरावानें अहमदखान बंगषाचा पराभव जैतपुरीं ३० मार्चास व कायमखाँ वंगष याचा पराभव ४ मे १७२९ रोजीं केला व १७२९ च्या जुलैंत साताऱ्यास परत आला. १७२९ च्या आक्टो-बरांत चिमाजी गुजराथेंत व माळव्यांत स्वारीस निघाला, तो १७३० च्या मार्चांत ढवळकें लुटून पायागड घेऊन जुनांत देशीं परत आला. १७२९ त खंडेराव दाभाडे वारला व सेनापतिपद त्रिंबकराव दाभाड्यांस १७३० च्या

जानेवारींत मिळालें. १७२९ च्या आगष्टापासून १७३० च्या फेब्रुवारीपर्यंत बाजीराव सुपें, पुणें वगैरे ठिकाणीं देशींच होता. १७३० च्या फेब्रुवारींत उंब्रजेस जाऊन कोल्हापूरकरांशीं लढाई वगैरे होऊन स्वारी आगस्टांत पुण्यास आली. १७३० च्या सप्टेंबरांत बाजीराव व चिमाजी अपा निजामुन्मुल्ख व त्रिंबकराव दाभाडे यांजवर चालून गेले. १७३१ च्या फेब्रुवारींत दाभाड्याचा डभईस पराभव करून एप्रिलांत बाजीराव देशीं परत आला. चिमाजीअप्पा ग्वालेरीपर्यंत हिंदुस्थानांत जाऊन मांडोगडची स्वारी करून जुनांत देशीं परत आला. १७३१ च्या एप्रिलांत संभाजीशीं तह झाला. १७३१ च्या डिसेंबरपर्यंत दोघे बंधू पुणें व सातारा येथें देशींच होते. १७३२ च्या जानेवारी-फेब्रुवारींत बाजीराव कुलाब्यास गेला होता. तेथून माळव्यांत जाऊन स्वारी आगोटीस देशीं आली. १७३२ च्या जानेवारीपासून जुलैपर्यंत फत्तेसिंग भोंसले निजामावर गेले होते. १७३२ च्या डिसेंबरांत बाजीराव निजामाच्या भेटीस गेला, तो १७३३ च्या मार्चांत परत आला. १७३२ च्या आक्टोबरांत चिमाजीअप्पा बुंदेलखंडांत जाऊन चंपानेर सर करून १७३३ च्या जुलैंत परत आला; १७३३ च्या मार्चांत बाजीराव व फत्तेसिंग भोसले कोंकणांत जंजिऱ्यावर गेले ते डिसेंबरांत परत आले. चिमाजीअप्पा १७३४ च्या मार्चांत कोंकणांतून परत आला. १७३४ च्या जानेवारींत बाजीराव खानडौरावर दिल्लीपर्यंत चालून जाऊन जुलैंत परत आला. चिमाजी १७३४ च्या मार्चापासून जुलैपर्यंत वऱ्हाड खानदेशांत होता. १७३४ च्या नोव्हेंबरपासून १७३५ च्या जुलैपर्यंत पिलाजी जाधवाची स्वारी हिंदुस्थानांत कमरुद्दीन वजीरावर झाली. १७३४ च्या जुलैपासून १७३५ फेब्रुवारीपर्यंत पुणें, सातारा वगैरे स्थळीं राहून बाजीरावाची स्वारी १७३५ च्या फेब्रुवारींत कुलाब्यास गेली. ह्याच स्वारीस गोवळकोटची स्वारी असें म्हणतात. ह्या स्वारीहून पेशवे आगोटीस परत आले. १७३४ च्या जुलैपासून १७३६ च्या मार्चापर्यंत चिमाजी देशींच होता. १७३५ च्या नोव्हेंबरांत बाजीराव हिंदुस्थानांत अजमीरपर्यंत जाऊन १७३६ च्या जुलैंत परत आला. १७३६ च्या मार्चांत चिमाजी कोंकणांत जाऊन १७३६ च्या जुनांत परत आला. १७३६ च्या नोव्हेंबरांत बाजीराव पुनः हिंदुस्थानच्या स्वारीस निघाला तो १७३७ च्या जुलैंत परत आला. हीस भेळशाची स्वारी म्हणतात. चिमाजीअपा १७३६ च्या मार्चपासून जुलैपर्यंत कोंकणांत होता. बरोबर मल्हारजी होळकर, राणोजी शिंदे व पवार होते. १७३७ च्या आक्टोबरापासून

१७३८ च्या जुलैपर्यंत बाजीरावानें भोपाळची स्वारी केली. १७३७ च्या नोव्हेंबरापासून १७३८ च्या जुलैपर्यंत चिमाजी तारापूर साष्टीकडे होता. १७३८ च्या नोव्हेंबरांत चिमाजी व बाजीराव वसईच्या स्वारीस निघून, १७३९ च्या मार्चांत बाजीराव खानदेशांतून नागपुराकडे आवजी कवड्याचा सूड उगविण्याकरितां जात असतां नादीरशहानें दिल्ली लुटल्याची खबर आली. चिमाजी वसई सर करून व बाजीराव दिल्लीच्या पातशहाच्या मदतीची तयारी करण्याकरितां १७३९ च्या जुलैंत देशीं परत आले. बाजीराव व चिमाजीअपा नासरजंगावर १७३९ च्या नोव्हेंबरांत जाऊन त्याला १७४० च्या मार्चांत पक्का नरम आणून, बाजीराव औरंगाबादेवरून खानदेशाकडे गेला व चिमाची बाळाजी बाजीरावाला घेऊन कोंकणांत मानाजी आंग्र्याच्या साहाय्यास गेला. बाजीराव २८ एप्रिल १७४० त रघूजी भोंसल्याचें पारपत्य केल्याशिवाय व हिंदुस्थानची निरवानिरव केल्याशिवाय वारला. ही बातमी चिमाजीअपास कोंकणांत कळली. ”

बाजीरावच्या मोहिमांचा हा सारांश वाचून देखील एखादा भांबावून जाईल. रेलवेरस्ते व इतर वाहतुकीचीं साधनें, तारायंत्रें, वर्तमानपत्रें वगैरे दळणवळणाचीं आधुनिक सुधारणेचीं साधनें अस्तित्वांत नसतां, बाजीरावनें आपल्या सैन्याच्या अशा विलक्षण जलद हालचाली केल्या आहेत. याप्रमाणें सारखें निवळ चैनींत एखाद्यास फिरावयास सांगितलें तरी तो कंटाळून जाईल. मग लढाया लढत असतां, शिपायांचें हित पाहत व कर्जाचा भार शिरावर वहात असून, राजकारणाचीं स्वदेशी व परदेशी अशीं दोन्हीं अवधानें सांभाळून, त्यानें घरभेद्या व उघड शत्रूंचा समाचार घेतला, आणि पराक्रमाची शर्थ करून मराठी राज्य प्रबल व पुण्यवंत बनविलें, ही तडफ असामान्य नाहीं असें कोण म्हणेल ?

बाजीराव उत्तम सेनापति होता कीं नाहीं याबद्दल वादच नाहीं. परंतु त्याप्रमाणें तो मुत्सद्दी होता कीं नाहीं याबद्दल मात्र एकमत नाहीं. बहुतेक इतिहासकारांनीं तो मुत्सद्दी नव्हता असा निर्णय दिला आहे. कांहींनीं शिवाजी महाराजांशीं त्याची तुलना करून त्याला मुत्सद्देगिरींत हिणकस ठरविलें आहे. शिवाजी महाराजांच्या योग्यतेचे पुरुष महाराष्ट्रांतच काय, परंतु जगाच्या इतिहासांत देखील जेमतेम चारपांच सांपडले तर सांपडतील. बाजीरावाला हिणकस ठरविण्याकरितां त्याची शिवाजी महाराजांशींच इतिहासकारांना तुलना करावी लागली, हेंच बाजीरावच्या मुत्सद्देगिरीचें उत्तम निर्देशपत्र आहे. न्यायमूर्ति रानड्यांशीं तुलना करून एखाद्या सरकारी नोकराला कोणी कमी लेखलें, तर तो त्या सरकारी नोकराचा

अपमान नसून गौरवच ठरेल. किंवा टिळकाइतका एखाद्या लोकाग्रणीचा देशाभिमान व स्वार्थत्याग उज्वल नाहीं असें कोणीं विधान केलें, तर तें त्या व्यक्तीला कमीपणा न आणतां भूषणास्पदच होईल. हिशोब ठिशोब बरोबर लिहिण्याची, जमाखर्चावर देखरेख ठेवावयाची, व आणे पैची चूक बारकाईनें शोधून काढावयाची, ही कारकुनी वळणाची मुत्सद्देगिरी बाजीरावांत नव्हती यांत शंका नाहीं. परंतु मुत्सद्देगिरी या शब्दाचा इतका आकुंचित अर्थ आहे कीं काय ? मुत्सद्याची दृष्टि फार दूरपर्यंत पोंहोचावी लागते व सर्व परिस्थिति विचारांत घेऊन व भूतभविष्याचा मेळ घालून त्याला वर्तमान धोरण निश्चित करावें लागतें. **खरा मुत्सद्दी तोच, कीं ज्यानें टाकलेल्या डावानें पुढील शंभर वर्षांच्या इतिहासाला पलटणी मिळून नवें वळण लागेल.** 'बाजीराव गोड बोलून किंवा गोड पत्रें लिहून सरदारांवर छाप पाडीत नसे. त्याला जमाखर्चाचें धोरण नव्हतें.' हे आरोप खरे आहेत, परंतु त्याला कारणेंही तशींच गंभीर स्वरूपाचीं आहेत. बाजीराव राजा नसून वजीर होता, ही गोष्ट कोणीं विसरतां कामा नये. त्या वेळचे सरदार वतनांचे इतके लोभी बनले होते कीं, वेळप्रसंगीं—व असे प्रसंग नित्य येत—ते वाजवी सरकारदेणें देण्याचें टाळत. सरंजामाबद्दल जहागिरी उपटीत व फौज पदरीं न बाळगतां सरंजामी उत्पन्न चैनींत खर्च करीत. त्यांना बाजीरावाला प्रसंगीं जरब द्यावी लागे. रघोजी भोंसले, पिलाजी जाधव, नंदलाल मंडलोई यांना त्यानें जोराची दरडावणी देण्यास कमी केलें नाहीं. राज्याचा धनी नरमाईनें वागत असला, म्हणजे राज्याच्या हिताकरितां प्रसंगीं प्रधानाला वाईटपणा पदरीं घ्यावा लागतो. त्याशिवाय राज्याचा बंदोबस्त राहणार कसा ? घरांत आई किंवा बाप यांपैकीं कोणींतरी कडक होऊन मुलांना धाक लावावा लागतो. राजानें हा धाक लावला असता तर सरदारांना त्याबद्दल वैषम्य वाटलें नसतें, फारतर वाईट वाटलें असतें. परंतु पेशवा दाबूं लागला म्हणजे 'मालकाचें वेंचतें व कोठवळ्याचें पोट दुखतें,' असे टोमणे त्याला सहन करावे लागत व त्याचें सरदाराशीं वितुष्ट येई. स्वतः राजा पराक्रमी असला तर त्याच्या पराक्रमाचें कौतुक त्याचे नोकर करणारच ! परंतु त्या नोकरांपैकींच एखादा विशेष पराक्रमी निपजला म्हणजे बाकीचे त्याचा द्वेष व मत्सर करूं लागतात. कारण तेणेंकरून त्याचें वजन वाढून त्याच्यावर पारितोषिकांचा पाऊस पडेल व आपण वळचणीखालीं राहूं, अशी भीति त्यांच्या मनांत सारखी डांचत असते. मग ते सरदार राजाचे कान त्या प्रमुखाविरुद्ध फुंकूं लागतात. राजा हलक्या कानाचा असला तर अत्याचार करतो व मोठ्या मनाचा असला तर फक्त शंकित होतो. सुदैवानें शाहूचें

मन थोर होतें. तरी या चुगल्या ऐकून ऐकून त्याचें मन शंकित होई. पेशवे किल्ल्यावरील दारूगोळा व दाणागोटा विकतात, अशी एकानें शाहूजवळ चुगली केली. तेव्हां पुरंदऱ्यानें सांगितलें कीं ' ही गोष्ट साफ खोटी आहे. तपास करावा.' यावर राजे म्हणाले, ' असे तपास पुष्कळांचे होऊन गुन्हेगार ठरले. त्यांचें कोणीं काय केलें ? ' त्यावर पुरंदऱ्यांनीं खडखडीत जबाब दिला, ' आमचे धनी पेशवे अशी गय करणार नाहींत. खरें करून न दिलें तर चहाडखोरांचें डोचकेंच मारतील. ' यामुळें त्या चुगलखोरांचें तोंड बंद झालें. अधिकारानें बरोबरच्या परंतु दुर्बल व मत्सरी सरदारांनीं, बाजीरावाविरुद्ध सारखी आदळ आपट करून त्याला त्रास दिला. बापानें तीन चार लाड्ड गट्ट केले तरी मुलगा ती गोष्ट निमूटपणें सहन करतो. परंतु भावानें एक लहानसा तुकडा अधिक घेतला कीं भांडणाला सुरवात होते. बाजीरावाविषयीं इतर सरदार नाखुष असण्याचें हेंच मुख्य कारण आहे.

सरदार सरकारांत पैशाचा भरणा न करतां आपल्या खासगी तिजोरीची धन करतात, हें बाजीरावला कळत नव्हतें असें थोडेंच आहे. परंतु माहीत असूनही त्याला तें पुष्कळ वेळां उघड्या डोळ्यांनीं सहन करावें लागे. कारण सरदारांची राजनिष्ठा त्या द्रव्याच्या भोंवतीं घुटमळत होती. त्यांच्या पुढील मिठाईचें ताट बाजीरावनें उचललें असतें, तर त्या माशा तेथून उडून दुसऱ्या मिठाईच्या ताटांवर जाऊन बसल्या असत्या. निजामानें तर एखाद्या हलवायाप्रमाणें हें मिठाईचें, आकर्षक दुकान मांडलें होतें. निजामानें देऊं केलेली लालुच इतकी मोठी होती कीं, अर्धे मराठे निजामाच्या राज्यांत सामील झाले इतकेंच नाहीं, तर मराठ्यांचा खरा पोशिंदा अशीं निजामाचीं स्तुतिस्तोत्रें गाऊं लागले. शाहू स्वतः प्रतापी असता तर त्याला कदाचित ह्या स्वार्थाला थोडाबहुत बांध घालतां आला असता. परंतु एक सरदार इतरांची सरदारी कशी काढून घेऊं शकणार ? शिवाय शाहू त्या वेळीं स्वतः कारभार पहात होता. बाजीरावावर त्याचा विश्वास असला व त्याच्याशिवाय राज्यांत दुसरा कर्तबगार पुरुष नाहीं अशी त्याची खात्री झाली असली, तरी त्याला बाजीरावच्या पराक्रमाचें भयच वाटे. त्यामुळें बाजीराववर सर्व राजकारण शाहूनें सोंपविलें असलें, तरी बाजीराव वरचढ होऊं नये म्हणून तो मुद्दामच इतर सरदारांना सवलती देई व त्यांच्या अपराधाकडे कानाडोळा करी. त्यांनीं राजाच्या हुकुमाची अवज्ञा केली तरी तो तिकडे प्रसंगीं दुर्लक्ष करी व सरकारांत वेळेवर वसुलाचा भरणा केला नाहीं तरी त्यांच्यामागें निकाराची तंगी लावीत नसे. अशा स्थितींत सरदारांना राजी राखूनच बाजीरावला त्यांच्याकडून कामगिरी घ्यावी लागे. परंतु बाळाजी व शाहू यांच्या नरमाईच्या धोरणानें ज्या-

प्रमाणें चंद्रसेनानें फितवा केला व कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ झाला, त्याप्रमाणें दाभाड्यानें द्रोह करतांच बाजीरावनें प्रथम त्याला सामोपचारानें वळवून महाराजांच्या सेवेशीं आणण्याचा प्रयत्न केला; परंतु दाभाड्यानें सामोपचाराचें बोलणें आपल्या गुर्मीत धुडकावून दिलें तेव्हां बाजीरावनें त्याच्यावर चालून जाऊन राजद्रोहाच्या पातकाचें प्रायश्चित्त त्याला दिलें व इतर सरदारांवर आपला वचक बसविला.

राजा प्रबल व कर्तृत्ववान् नसल्यामुळें ठिकठिकाणच्या मराठे सरदारांना आपापल्या जहागिरीपुरते स्थानिक स्वतंत्र हक्क देऊन, छत्रपतींच्या पेशव्यांशीं राजनिष्ठ राहण्याची कबुलायत केलेल्या सरदारांचा असा संघ स्थापन करून, मराठी राज्याला त्यानें बळकटी आणली. इंग्लंड व वसाहती यांचे जे आज परस्परांशीं संबंध आहेत तेच, ठिकठिकाणीं पसरलेले, तिकडील प्रांत जिंकून तेथेंच स्थायिक झालेले, व स्वतंत्रपणें आपल्या प्रांताचा बंदोबस्त करणारे सरदार व पेशवे यांच्यांत होता; आणि पेशवे आपणास छत्रपतींचे नोकर लेखीत असल्यामुळें छत्रपतीच्या गादीला या संघटनेनें चांगलीच बळकटी आली. एखाद्यावर प्रसंग आला तर सर्वांनीं मिळून त्याची पाठ राखावयाची व एकजुटीनें शत्रूंचा समाचार घ्यावयाचा, इतर प्रसंगीं सर्व स्वतंत्र कारभार करणारे राजे, अशा स्वरूपाचें हें मराठामंडळ निर्माण झालें. प्रत्येकाला पराक्रमाची हौस, कारण कोणीं कोणताहि नवा प्रांत जिंकला कीं तो त्याचाच व्हावयाचा. यामुळें मराठेशाहीच्या मर्यादा झपाट्यानें चहूं बाजूंस पसरूं लागल्या. सरदारांचा स्वार्थ तो मराठेशाहीचा परमार्थ ठरला. त्या काळच्या परिस्थितीवर उत्तम प्रकारें लागूं पडणारा हा तोडगा बाळाजीपंतांच्या मनांत प्रथम निर्माण झाला. परंतु त्या कल्पनेची चतुरस्रपणानें वाढ करून, अभेद्य असें सामर्थ्यवान् मराठामंडळ बनविण्याचें कार्य बाजीरावानें केलें. होळकर, शिंदे, पवार, जाधव हे तर त्याचेच सरदार होते. परंतु गायकवाड हा दाभाड्यांचा हस्तक होता, आणि डभईच्या लढाईनंतर त्याचें व बाजीरावाचें स्वाभाविक वांकडें आलें. परंतु बाजीरावनें बलिष्ठ व कर्तबगार अशा गायकवाड घराण्याचा मराठेशाहीला बळकटी आणण्यासाठीं उपयोग करून घेतला. पिलाजी हा डभईच्या लढाईंत दाभाड्यातर्फे लढत होता. परंतु पुढें लवकरच त्याचा खून झाल्यामुळें, त्याचा पुत्र दमाजी याच्या अमलांत हा वैराग्नि साहजिक कमी झाला व गायकवाड बाजीरावानें निर्माण केलेल्या या मराठासंघांत सामील झाले. फत्तेसिंगाशीं त्याचें बरें नसलें तरी तो शाहूचा मानसपुत्र असल्यामुळें बाजीरावनें त्याला वारंवार चुचकारून, निदान वांकडे होऊन शत्रूला मिळ-

ण्याचा अवसर त्याला मिळूं दिला नाहीं. परसोजी व कान्होजी भोंसलें यांना पेशव्यांची मुळींच पर्वा वाटत नसे. कारण ते दूरचे असले तरी छत्रपतीच्या घराण्यांतले असल्यामुळें व पेशव्यांचा उदय होण्यापूर्वींच त्यांनीं नांव लौकिक मिळविला असल्यामुळें, ते स्वतंत्रपणें वागत. परंतु कान्होजी शाहूच्या कैदेंत पडून रघोजीच्या हातीं कारभार आला, तेव्हांपासून भोंसले पेशव्याशीं मधून मधून मित्रत्वाच्या नात्यानें वागूं लागले. रघोजी हा फार धोरणी व पराक्रमी पुरुष होता. त्यानें पूर्वेस बंगाल कटकपर्यंत मराठ्यांच्या राज्याची सीमा वाढवली. पेशव्यांच्या कारस्थानांत हा सामील होत नसे, कारण त्यामुळें याच्या वांटणीचा हिस्सा इतरांबरोबर विभागून बराच लहान बसला असता. परंतु पेशव्यांनीं मोंगलाशीं युद्ध सुरू केलें, म्हणजे त्यांच्या मदतीस जाण्याऐवजीं, हा ही संधी साधून मोंगल बादशाहीचे पूर्वेकडील लचके तोडूं लागे. मोंगल सरदार पेशव्याशीं युद्ध करण्यांत गुंतले असल्यामुळें, त्यांना रघोजीचा नेटानें प्रतिकार करतां येत नसे. रघोजीच्या पराक्रमामुळेंच पूर्व वऱ्हाडचे राजे बनलेले भोंसले, गोंडवण ( हल्लींचा मध्यप्रांत ) व कटक प्रांत जिंकून प्रतापशाली व वैभवसंपन्न बनले. रघोजीनें मराठ्यांच्या राज्याची हद्द पूर्व समुद्राला नेऊन भिडविली. यामुळें रघोजीच्या कारभारांत बाजीराव फारसा पडत नसे. कारण तो स्वतंत्र वागत असला तरी पराक्रमी होता, व त्याच्यामुळें पश्चिम किनाऱ्यापासून तों पूर्व किनाऱ्यापर्यंत मराठ्यांचें राज्य पसरलें. पेशव्यांच्या मराठेमंडळांत पुढें भोंसलेही सामील झाले.

हिंदुपदपादशाहीची मूळ कल्पना पुण्यश्लोक शिवाजीमहाराजांची. गो-देव-ब्राह्मणांच्या रक्षणाकरतां त्यांनीं महाराष्ट्रांत स्वराज्य स्थापन केलें असलें, तरी तें **हिंदवी स्वराज्य** होतें. त्यांचें स्वराज्याचें ध्येय हिंदुस्थानाइतकें व्यापक होतें. परंतु अत्यंत बिकट संकटांत सांपडलेली महाराष्ट्रभूमि स्वतंत्र करण्यांतच त्यांचें आयुष्य वेंचलें गेलें. पहिलें आपल्या घराचा पाया बळकट करावा व मग हात पाय बाहेर फैलवावे, हें यशस्वी व विचारी धोरण त्यांना ठाऊक होतें. स्वराज्याचा पाया बळकट घालून, पहिला मजला मजबुत बांधल्याशिवाय दुसरा मजला वर कसा उभारणार ? शिवाजीमहाराजाशीं सतत झुंजणारे महान पराक्रमी मोंगल सम्राट शहाजहान व औरंगजेब मृत्यू पावल्यानंतर मोंगल बादशाही खिळखिळी झाली होती. त्या सुमारास बाळाजीपंताबरोबर बाजीराव उत्तरेस दिल्लीस गेला होता. तेथील अंदाधुंदी पाहून त्यानें पेशवा झाल्याबरोबर **हिंदुपदपादशाही** स्थापन करण्याची घोषणा केली व सर्वांचें लक्ष

आपल्याकडे वेधून घेतलें. मराठी राजकारण त्यानें उत्तराभिमुख केलें. बाजीरावची हिंदुपदपादशाही म्हणजे श्रीशिवछत्रपतींच्या हिंदवी स्वराज्याचें नामांतर होय. नांवांत जादू भरली असते. घोडेस्वार या शब्दापेक्षां शिलेदार किंवा बारगीर हे शब्द अधिक पराक्रमी भासतात. पण त्यांच्या अर्थांत कांहींच फरक नाहीं. एक स्वतःच्या मालकीचा घोडा असलेला व दुसरा सरकारी घोड्यावरचा स्वार ! प्रधान या नांवापेक्षां पेशवा या नांवांत लोकांना अधिक जादू भासूं लागली. अधिकार तोच ! बाजीरावनें कल्पना श्रीशिवप्रभूंची उचलली, परंतु लोकांच्या हृदयांत बाणेल असें नवें गोंडस नांव तिला दिलें. काळ अनुकूल असल्यामुळें बाजीरावाला आपली कल्पना मूर्त स्वरूपांत लोकांपुढें मांडतां आली. त्याच्या पराक्रमानें मराठ्यांचे हातपाय हिंदुस्थानांत पसरले व त्याचा दरारा सर्वांना वाटूं लागला. बाजीराव शिवाजीमहाराजांसारखा स्रष्टा असा महापुरुष नव्हता. असा प्रतिभाशाली महापुरुष जगांत क्वचित निर्माण होतो. परंतु तो महामुत्सद्दी व भीमपराक्रमी होता यांत शंका नाहीं. एक कल्पना त्यानें शिवाजीमहाराजांच्या चारित्र्याच्या अभ्यासानें आपलीशी केली व दुसरी त्यानें आपल्या पित्याकडून उचलली, आणि आपल्या भीमपराक्रमाच्या जोरावर त्या दोन्ही कल्पनांना लोकांना रुचेल व पटेल असें रूप देऊन, त्या अमलांत आणल्या. माळवा व बुंदेलखंडांत त्यानें जो राजकारणाचा डाव टाकला त्यामुळें पुढें साठ सत्तर वर्षें दिल्लीवर व तेथील मोंगल बादशाहीवर मराठ्यांची प्रथमारंभीं तरी अधांतरी बसलेली पकड पुढें घट्ट बसली व तशीच टिकून राहिली. जो राजकारणाचे डाव खेळून पुढील इतिहासाचा ओघ सर्वस्वी बदलून टाकतो तो मुत्सद्दी नव्हे, तर काय रुपये आणे पैची बेरीज करणारा किंवा नम्र पत्रें लिहिणारा कारकून मुत्सद्दी म्हणावयाचा ? बाजीराव जसा भीमपराक्रमी व चतुर सेनानी होता, तसाच तो महामुत्सद्दी होता, व म्हणूनच त्याला मराठेशाहीचें वैभव इतकें वाढवितां आलें.

बाजीराव पेशव्यानें शाहूछत्रपतीचें राज्य बळकावलें व मराठेशाहीच्या जागीं ब्राह्मणशाही स्थापन केली कीं काय ?

हा महत्वाचा प्रश्न सोडवूं म्हटलें तर खालील मुद्दे निघतातः—

१ शाहूचें राज्य केवढें होतें ?

२ तें आंगठीच्या खड्याएवढें असलें तर तें वाढविलें कोणीं व कसें ?

३ शाहूचे सरदार पेशव्यांनीं फोडले किंवा त्यांना पेशव्यांनीं शाहूवर उलटवलें ?

४ शाहूचे जुने सरदार काय झाले ?

५ पेशव्यांनीं जे नवे सरदार निर्माण केले ते त्यांच्या जातीचे होते कीं काय ?

६ पेशव्यांनीं निर्माण केलेल्या नव्या सरदारांमुळें मूळच्या मराठेशाहीला ब्राम्हणशाहीचें रूप आलें कीं काय ?

७ शाहूशीं पेशव्यांची वागणूक कशी होती ?

८ शाहू आपल्या पित्यासारखा किंवा पितामहासारखा पराक्रमी होता काय ?

९ शाहूची सत्ता कमी झाली काय ? व झाली असल्यास कां झाली ?

१० शाहूला पेशव्यांनीं पदच्युत केलें व त्या जागीं आपला इसम तख्तावर बसविला कीं काय ?

या मुख्य मुद्यांशिवाय इतर आनुषंगिक मुद्देही काढतां येतील, परंतु त्यांचा यांत अंतर्भाव होऊं शकत असल्यामुळें स्वतंत्र विचार करण्याचें कारण नाहीं. आतांपर्यंत लिहिलेल्या मजकुरांत दोन्ही बाजूचा सविस्तर पुरावा नमूद केला आहे. तेव्हां हे मुद्दे निकालांत काढण्यास कांहींच अडचण पडणार नाहीं.

(१) शाहू गादीवर आला तेव्हां त्याचें राज्य खरोखरच आंगठीच्या खड्याप्रमाणें चिमुकलें होतें. सातारा व भोंवतालचा लहानसा टापू एवढाच त्या स्वराज्याचा विस्तार होता.

(२) हें राज्य बाळाजीपंत व त्यांचा पुत्र बाजीराव यांनीं आपल्या पराक्रमानें वाढविलें व त्याचा विस्तार केला. पेशव्यांचा पराक्रमामुळें शाहूचा शिक्का काशीपासून तों रामेश्वरापर्यंत चालूं लागला.

(३) शाहूचे सरदार पेशव्यांनीं तर फोडले नाहींच, परंतु उलट जे फुटून निघाले व शत्रूंना जाऊन मिळाले त्या फितुऱ्यांना, पेशव्यांनीं चांगलें चरकावर धरून त्यांचा खरपूस समाचार घेतला. शाहूचे सरदार जर कोणीं फोडले असले तर ते, त्याची चुलती ताराबाई व चुलत भाऊ संभाजी यांनीं फोडले. त्याबद्दल पेशव्यांनीं खुद्द संभाजीवर स्वारी करून त्या सर्वांला शिक्षा लावली.

(४) शाहूचे जुने सरदार आळशी, सुखावलेले व चैनी जहागीरदार बनले होते; व कांहीं स्वार्थाचे दास होऊन मोंगलांना जाऊन मिळाले व तिकडे बडे जहागीरदार बनले. एवंच मराठेशाहीचे जुने सरदार गंजून किंवा फितुर होऊन शाहूला पारखे झाले.

(५) **निदान बाजीराव पेशव्याच्या कारकीर्दीच्या अखेरीपर्यंत** जे प्रमुख सरदार पेशव्यांनीं उदयास आणले, त्यांच्यापैकीं कोणीच पेशव्यांच्या जातीचे नव्हते. शिंदे, होळकर, जाधव, बांडे व पवार हे प्रमुख सरदार मराठे होते व गोविंदपंत खेर हा कऱ्हाडा ब्राह्मण होता.

(६) पेशव्यांनीं निर्माण केलेल्या या नव्या सरदारांत एकच ब्राह्मण होता व तोही त्या काळीं दुय्यम दर्जाचा सरदार समजला जात होता. याशिवाय खुद्द शाहूचे असे दाभाडे, व त्यांचे हस्तक गायकवाड, व भोंसलेद्वय असे चार प्रबळ मराठे सरदार चोहोंकडे वावरत होते. तेव्हां ती मराठेशाही ब्राह्मणशाही कशी बनणार ? मराठ्यांचेंच सर्वत्र प्राबल्य होतें. जुन्या घराण्यांचें नसलें तरी नवीन उदयास आलेल्या घराण्यांचें वर्चस्व सर्व जागीं स्थापित झालें होतें. जुनीं घराणीं काळाच्या ओघांत लयास जावयाची व नवीं उदयगिरीवर यावयाचीं हा सृष्टिक्रमच आहे.

नागपूर, सातारा, कोल्हापूर, अक्कलकोट व तंजावर अशा पांच ठिकाणीं भोंसले नांदत होते. परंतु त्यांच्यांत एकी नव्हती. मराठी स्वराज्याचा खरा स्वामी साताऱ्याचा शाहू याच्या आज्ञा, त्याचे जातभाई व घराण्यांतील नातलग भोसले बेलाशक धुडकावून लावीत. शिवाजीमहाराजांच्या वेळेपासूनच तंजावरच्या भोसल्यांनीं नवी चूल मांडली, आणि नागपूरचे भोसले आपल्यापुरतेंच पाहूं लागले. अक्कलकोटचा फत्तेसिंग शाहूचा मानसपुत्रच असल्यामुळें प्रथमप्रथम तो शाहूला नमून असे. पण पुढें त्यालाही पंख फुटून तो आपल्या वळणावर गेला, आणि छत्रपतीला धुडकावून लावूं लागला. कोल्हापूरची भाऊबंदकी तर प्राणघातक स्वरूपाची ! भोसल्यांतच पांचामुखी परमेश्वर या स्वरूपाची एकी होण्याऐवजीं, स्वराज्याचे पांच पाट मात्र त्यांच्याकडून काढले गेले ! मग इतरांना दोष देण्यांत काय अर्थ ? छत्रपती व त्यांचे मराठे सरदार इतके शेळपट बनले होते कीं, त्यांच्या घराण्यांत कर्त्या पुरुषाला दोनदोन चारचार राण्या असून देखील त्यांना औरस-पुत्र होईनात, आणि केवळ दत्तकांची मालिका लावूनच वंश जगवावा लागे. छत्रपतींच्या सर्व घराण्यांच्या किंवा इतर प्रमुख सरदारांच्या वंशावळ्या सहज कोणीं नजरेखालीं घातल्या, तर दत्तकांची रांगचीरांग आढळून येईल. औरस पुत्रांचा हा सततचा अभाव पराक्रमाचा ऱ्हास व चैनीचा विलासी जीवनक्रम सुचवीत नाहीं काय ?

(७) नानासाहेबांच्या वेळेपर्यंत पेशवे भर दरबारांत शाहूपुढें हात जोडून बसत असत. खुद्द बाजीराव तर आपल्याला मिळालेलें यश सर्वस्वी छत्रपति स्वामीच्या

पुण्यप्रतापानें मिळालें असें अखेरपर्यंत समजत होता व शाहूबद्दल अत्यंत गौरवाचे उद्गार त्याच्या अनेक पत्रांत सांपडतात. हबशावरील स्वारी चालू असतां शाहूकडून वेळेवर पैसा येईना. कारण शाहूचा ऐषआराम चालून उरला तरच पैसा पेशव्यांना स्वारीच्या खर्चाकरितां मिळत असे. त्याप्रसंगीं बाजीरावनें लिहिलें, " आजीत ॥ आम्हांस अनुकूल पडेल तितका खर्च केला. याउपरी आमचे वस्तु खर्च कैचा करवितो. बेमवलग खर्च पाहिजे. त्यास कार्यहि धण्याचें साधलें. **राज्य धण्याचें आहे.** खर्च लागेल तो धण्यांनींच केला पाहिजे. आम्हांस कर्ज घेऊन मनसुबा होत नाहीं. धनी खर्चास पुरवितील **तरी मेहनत करून जिवाकडे न पाहतां धन्याचें काम होईल तें करून.** या मागेंहि कर्ज झालें तें धनीच देईल. सुटलें राज्य तेंहि धन्याचेंच आहे. **आम्हापासोन चाकरीस कोताई होणार नाहीं.** आम्ही तो जीवाभ्य श्रम करावयास चुकत नाहीं. " पेशवे 'शाहूशीं नम्रपणानें व आज्ञाधारकपणानें वागत. हें त्यांचें वर्तन केवळ औपचारिक होतें असें नाहीं. शाहूशीं ते कृतज्ञ व भक्तिपूर्ण भावनेनें वागत असत.' शाहूला सर्वच लोक अवतारी पुरुष समजत असत.

(८) तारुण्यांतील सर्व धडाडीचें आयुष्य मोंगलांच्या कैदेंत गेल्यामुळें शाहूच्या पराक्रमाला वाव मिळाला नाहीं व तो अगदीं गंजून गेला. मोंगल दरबारांतील राहणी-मुळें त्याची वृत्ति विलासी बनली होती. त्याचें तारुण्य फुकट गेलें, व कामाची हौस त्याच्यांत उरली नाहीं. यामुळें पेशव्यावर राज्याचा भरंवसा टाकून तो हात झाडून मोकळा होई. शाहू जातीनें १७३७–३९ मध्यें काय तो स्वारीवर मोठ्या थाटानें निघाला. त्या मोहिमेला स्वारीपेक्षां मिरवणुकीचें स्वरूप मोठ्या समारंभानें व दिखावटीनें आलें. रोज फक्त कोस दोन कोस कूच करावयाचें व मग चार चार आठ आठ दिवसांचा मुक्काम विश्रांतीस्तव ठोकावयाचा ! मुक्कामांत नाचरंग उडावयाचे ! या स्वारींत मिरज काबीज करून शाहूमहाराज परत साताऱ्यास आले. ही स्वारी दोन वर्षें चालली. कोल्हापूरकराशीं शाहूचा तह पूर्वीच झाला होता. परसांतली मिरज देखील कोल्हापूरकरांना काबीज करतां आली नाहीं, इतके ते पराक्रमी होते ! आणि शाहूच्या आयुष्यांत देखील त्यानें जातीनें भारलेली हीच मोहीम ! मग भोसले मागे पडले तर लोकांना कां दोष द्यावा ? शाहू स्वभावानें गोड, अजातशत्रू, जुनें तें मोडावयाचें नाहीं अशा मनोवृत्तीचा, विलासी, चैनी, आळशी पण दयाशील होता.

(९) शाहूची सत्ता कमी झाली ती त्याच्या स्वभावामुळें झाली. बाहेरील जगाच्या दृष्टीनें शाहूला देवाचें स्वरूप आलें, आणि कर्तबगारी पेशव्यांच्या

वांव्याला आली. शाहूचें लक्ष कारभारांत नसल्यामुळें पेशव्यांनाच राज्यांतील सर्व भानगडी उलगडाव्या लागत. भाऊबंदकीमुळें एका छत्रपतीचे दोन छत्रपति झाल्यामुळेंही शाहूचें महत्व कमी झालें. सत्ता नेहमीं पराक्रमी पुरुषाच्या हातांत राहते. त्या न्यायानेंच पेशवे सत्ताधीश झाले, कारण ते पराक्रमी होते. परंतु त्या सत्तेच्या जोरावर बाजीरावनें शाहूचा उपमर्द कधींच केला नाहीं. अशा परिस्थितींत मुसलमान वजीर पादशहाला पदच्युत करून व त्याच्या मुलाबाळांची व त्याची स्वतःची देखील प्रसंगीं कत्तल उडवून, स्वतः सिंहासन बळकावीत असत. विलासी बादशहांना कर्तबगार वजीरांनीं पदच्युत केलेलीं उदाहरणें मुसलमानी रियासतींतून वाटेल तितकीं काढून दाखवितां येतील. गायकवाडांनीं देखील आपले मालक दाभाडे यांना गचांडी देऊन गुजराथ स्वतःच्या घशांत घातली. हा जगाचा न्याय होय. परंतु त्यांतल्यात्यांत बाजीरावनें शाहूचा मान मरातब व बडेजाव यांत तिळमात्र अंतर पडूं दिलें नाहीं. बाजीराव शाहूची आज्ञा शिरसावंद्य मानी.

(१०) या प्रश्नाचें उत्तर **नाहीं** असें स्पष्ट आहे. छत्रपतींचा वंशच अखेरपर्यंत साताऱ्याच्या गादीवर होता. बाळाजीपंत, व बाजीराव या दोघांही पेशव्यांच्या हयातीला पुरून शाहू महाराज उरले, तेव्हां निदान या दोघांच्या कारकीर्दींत तरी वंशजांचा प्रश्नच उद्भवला नाहीं.

याप्रमाणें सर्व मुद्दे निकालांत काढले गेल्यामुळें, सदर आरोप म्हणजे **बाजीरावनें शाहूस निर्माल्य करून ब्राह्मणशाही स्थापन केली, हें विधान सपशेल खोटें आहे,** असें सिद्ध होतें. उत्तर पेशवाईत जें कांहीं घडलें असेल तें येथें पुराव्यादाखल उपयोगीं पडूं शकत नाहीं. कारण बाजीराव बल्लाळाचें हें चरित्र असल्यामुळें त्याच्यापुरताच किंवा फार तर त्याच्या पित्याच्या कारकीर्दीचा विचार येथें करतां येईल. त्याच्या वंशजांनीं शाहू छत्रपतीच्या वंशजांना कसें वागविलें, या गोष्टीची शहानिशा करून बाजीरावाला दोष देणें कोंकरू-लांडग्याच्या गोष्टीप्रमाणें न्याय्य ठरणार नाहीं. बाजीरावाच्या मृत्यूपर्यंत ज्या गोष्टी घडल्या व जी घटना झाली त्यावरूनच बाजीरावचें चरित्र व त्याचें कर्तृत्व ठरवावें लागेल. त्याच्या वंशजांच्या पराक्रमानें त्याचा पराक्रम खुलणार नाहीं, त्याप्रमाणेंच त्यांच्या इतर बऱ्यावाईट वर्तनानें त्याच्या चारित्र्यावर डाग पडूं शकत नाहींत.

याप्रमाणें ह्या पराक्रमी वीरानें मराठेशाहीच्या पराक्रमाचा डंका सर्व हिंदुस्थानभर झडविला व शाहूचा शिक्का काशीपासून रामेश्वरापर्यंत चालू केला. हिंदूंच्या एकी-

करणाचा प्रयत्न करून, मोंगल बादशाही उलथून तिच्या जागीं हिंदुपदपादशाही स्थापन करण्याची त्यानें आपल्या कारकीर्दीच्या आरंभीं जी घोषणा केली, ती वीस वर्षांच्या अल्प काळांत त्यानें जवळ जवळ खरी करून दाखविली. शाहू मोंगल बादशाहीला आजोळ मानीत असे; कारण क्रूर औरंगजेबाची दयाळु मुलगी **झिनत उन्निसा** या बेगमेनें त्याचा मातेप्रमाणें लहानपणीं कैवार घेऊन प्रतिपाळ केला, हे उपकार तो विसरला नव्हता. त्यामुळें मोंगल पादशाही बुडवूं नये अशी त्याची बाजीरावास सक्त ताकीद होती. मोंगल पादशाहीचे निजामासारखे प्रबल सरदार देखील शाहू शत्रुस्थानीं लेखीत नव्हता. त्यांना देखील वाटल्यास झोडपावें पण नामशेष करूं नये, अशी शाहूची बाजीरावास आज्ञा असे. शाहूच्या या मतांच्या दडपणामुळें बाजीरावाच्या अचाट पराक्रमाला जितकें फळ यावें तितकें आलें नाहीं. परंतु हा बाजीरावाचा दोष नव्हे. शाहूनें त्याचें आचार-स्वातंत्र्य मर्यादित केलें तिकडे हा दोष जातो. त्यानें हिंदुपदपादशाही स्थापन करण्याची आपल्याकडून शिकस्त केली व त्याचें ध्येय बहुतांशीं सिद्धीस गेलें. शाहूच्या इच्छेप्रमाणें मोंगल बादशाही कायम राखून, त्यानें मराठ्यांचें स्वामित्व व श्रेष्ठत्व अखिल हिंदुस्थानांतील लोकांना पटवून दिलें.

**धर्मासाठीं मरावें । मरोनि अवघ्यास मारावें**
**मरतां मरतां घ्यावें । राज्य आपुलें ॥**
**मराठा तितुका मेळवावा । आपला (महा) राष्ट्रधर्म वाढवावा**
**ये विशीं न करतां तकवा । पूर्वज हांसती ॥**
**आहे तितुकें जतन करावें । पुढें आणिक मेळवावें**
**महाराष्ट्र राज्यचि करावें । जिकडे तिकडे ॥**
**देव मस्तकीं धरावा । अवघा हलकल्लोळ करावा**
**मुलुख बडवा कां बुडवावा । धर्मस्थापनेसाठीं ॥**

मराठ्यांच्या ह्या राष्ट्रीय ध्येयासाठीं शिवाजी महाराजांनीं **'धर्मासाठीं फकीरी घेतली,'** आणि **'शिवाजीचें नव्हे तर धर्माचें व देवाब्राह्मणांचें हिंदवी स्वराज्य'** स्थापन केलें. त्याच उज्वल ध्येयानें प्रेरित होऊन बाजीरावनें आपल्या शिपायांस आज्ञा केली कीं, **'अरे बघतां काय! चला जोरानें चाल करून! हिंदुपदपादशाहीस आतां उशीर काय!'** खंडो बल्लाळनें एकदां असें म्हटलें कीं, व्यक्तीसाठीं आम्ही लढत नसून **'हिंदूंच्या साम्राज्या-**

**साठीं आम्ही झटत आहों.'** त्यामुळेंच अत्यंत स्वामिभक्त असें चिटणीसांचें घराणें पेशव्यांचें ऋणानुबंधी झालें. या उच्च भावना मनांत सारख्या खेळत असल्यामुळें बाजीरावनें बेडरपणें प्रश्न केला कीं, **'बघूं नादीरशहा कसा पुढें येतो तो.'** हिंदु साम्राज्यस्थापनेचें उज्वल ध्येय डोळ्यांसमोर नाचत असल्यामुळेंच बाजीरावच्या हातून इतका पराक्रम झाला. ध्येयाचा ध्यास घेतलेला माणूसच असामान्य होतो. शिवाजी महाराजांनीं आरंभलेलें हिंदवी स्वराज्याचें कार्य बाजीरावानें नेटानें पुढें चालवून समाप्त केलें. कार्य तेंच, नांवें फक्त निराळीं! हिंदवी स्वराज्य तीच हिंदुपदपादशाही. सामान्य लोकांत तर त्या वेळीं असा समज होता कीं, बाजीराव श्रीशिवछत्रपतीचा अवतार असून त्यांचें कार्य शेवटास नेण्याकरितांच केवळ जन्मास आला. म्हणूनच बाजीरावाच्या **'पुण्यवंत'**—पणाचा खासगी पत्रांतून ठिकठिकाणीं प्रेमपुरस्सर उल्लेख अनेक मराठे सरदारांनीं केला आहे. **शतकोटी अभंग लिहिण्याची नामदेवाची अर्धवट राहिलेली प्रतिज्ञा तुकाराममहाराजांनीं पूर्ण केली, त्याप्रमाणेंच श्रीशिवप्रभूंच्या पुण्यपदावर पावलें टाकून बाजीरावनें स्वराज्यमंदिरावर हिंदुपदपादशाहीचा मजला चढविला, व हिंदवी स्वराज्य ही त्या पुण्यश्लोक नृपाची प्रतिज्ञा शब्दशः सार्थ केली.**



